# संस्कृत-मराठी-सुभाषितकोष

खंड दुसरा

संस्कृत भाषेंतील अनेक विषयांचीं सुभाषितें—

ल. गो. विंझे

यांनी केलेल्या त्यांच्या श्लोकमय व गद्य भाषांतरासह.

पहिली आवृत्ति १९६४

मूल्य पंधरा रुपये

# अर्पणपत्रिका

भाषांतरांच्या, रूपांतरांच्या, भावार्थांच्या, टीकाविस्तारांच्या, इ. स्वरूपांत, श्रीज्ञानेश्वरांपासून आजपर्यंत, ज्यांनीं ज्यांनीं, संस्कृत ज्ञान-गंगेच्या कावडी आणून, मराठी वाचकांची तहान भागविली, त्यांच्या त्यांच्या, मराठी भाषेच्या प्रेमानें केलेल्या या सर्व प्रयत्नांबद्दल,

आदरांजलि म्हणून

त्यांना

हा संस्कृत-मराठी-सुभाषित-कोष अर्पण करीत आहें.

— ल. गो. विंझे

## अनुक्रमणिका—

# पहिल्या खंडाची प्रस्तावना

संस्कृत वाङ्मयात, निरनिराळ्या ज्ञात अज्ञात कवींच्या सुभाषिताचे संग्रह, अनेक ग्रंथकारांनीं करून ठेविले आहेत. त्यापैकीं हरिहराची सूक्तिमुक्तावली, लक्ष्मणकवीची पद्यरचना, हरिभास्कराची पद्यामृततरङ्गिणी, वेणीदत्ताची पद्यवेणी, गदाधर-भट्टाचें रसिक जीवन, श्रीधरदासाचें सूक्तिकर्णामृत, गोविंदाचें सभ्यालंकरण, जल्हणाची सूक्तिमुक्तावली, शार्ङ्गधराची शार्ङ्गधरपद्धति, विद्याकराचा सुभाषितरत्नकोश, अमितगतीचा सुभाषितरत्नसंदोह, सुंदरदेवाचें सूक्तिसुन्दर, वल्लभदेवाची सुभाषितावली वगैरे संग्रह आतापर्यंत प्रसिद्ध झाले आहेत. तसेच सुभाषितरत्नभाण्डागार, सुभाषितसुधारत्नभाण्डागार, सुभाषितमुक्तावली वगैरे अज्ञातकर्तृक संग्रहहि प्रसिद्ध झाले आहेत. भर्तृहरीचें शतकत्रय, अमरुशतक, जगन्नाथपंडिताचा भामिनीविलास, गोवर्धनाचें आर्यासप्तशती वगैरे ग्रंथहि एका अर्थानें सुभाषिताचे संग्रहच आहेत. प्राकृत भाषेंतहि हालाची गाथासप्तशती, जयवल्लभाचें वज्जालग्ग, आणि नुकतीच प्रसिद्ध झालेली छप्पण्णयगाहा ( षट्पञ्चाशद्गाथा ) हेहि सुभाषितसंग्रहच आहेत. अशा प्रकारचे संग्रह करण्याची प्रवृत्ति संस्कृत-प्राकृत भाषेंतील विद्वानांची आहे. एवढेंच नव्हे तर असे संग्रह हें त्या भाषाचें वैशिष्ट्यआहे. अशा संग्रहग्रंथामुळें निरनिराळ्या युगात होऊन गेलेल्या प्रसिद्ध अप्रसिद्ध ग्रंथकाराच्या सूक्तिरत्नाचा ठेवा सामान्य वाचकाच्या हातीं येतो आणि त्यामुळें त्याच्या बहुश्रुततेंत भरच पडते अशा संग्रहाचा आणखी एक उपयोग असा कीं.—ज्या कवींची ग्रंथसंपत्ति मोजकी किंवा नष्ट झालेली असेल त्यांची नावें, त्याच्या ग्रंथांची नावें वगैरे माहिती इतिहासकाराला उपलब्ध होते. सुभाषित-संग्रह हा संस्कृत प्राकृत वाङ्मयातील एक विशिष्ट विभाग आहे असें सुद्धा म्हणण्यास हरकत नाहीं

श्रीयुत लक्ष्मण गोविंद विंझे याचा संस्कृत मराठी सुभाषितकोश हाहि वरील प्रकारच्या सुभाषितसंग्रहाचाच एक प्रकार आहे. प्रस्तुत ग्रंथाचा विशेष हा, कीं, यात मूळ सुभाषित संस्कृतात दिलें असून त्याचें मराठी भाषांतर पद्यात आणि गद्यात ग्रंथकारांनीं दिलें आहे. हीं दोन्ही भाषांतरें श्री. विंझे यानीं स्वत च तयार केलीं आहेत गद्य भाषांतर लोकांच्या तोंडी बसणें कठिणच, पण पद्यमय भाषांतराची तशी स्थिति नाहीं. पाठान्तराची सवय असलेल्या वाचकाना तीं सहज तोंडपाठ करणे शक्य आहे. श्री. विंझे याची निरनिराळ्या वृत्तातील पद्यरचना प्रसादगुणानें परिपूर्ण असून शिवाय हा पद्यमय अनुवाद मुळातील रस उत्तम प्रकारें वठविणारा आहे. ही गोष्ट या ग्रंथाचें कोणतेंहि पान उघडून पाहिल्यास स्पष्ट होण्यासारखी आहे श्री विंझे यानीं संस्कृत पद्याचीं मराठी भाषांतरें करण्याचा परिपाठ ठेवला होता. आणि या त्याच्या दीर्घकालीन व्यासंगाचा परिपाक प्रस्तुत ग्रंथात पदोपदीं दिसून येतो.

संस्कृत सुभाषितसंग्रहामध्यें पद्याचा संग्रह विषयवार निरनिराळ्या प्रकरणानीं केलेला असतो. त्या त्या कवींचीं सुभाषितें विषयवारीनें निवडून त्याचा एकेक प्रकरणात संग्रह केलेला दिसतो अशा प्रकरणाना संग्रहकारानीं संस्कृतात पद्धति आणि प्राकृतात वज्जा म्हणजे पद्या किंवा पद्धति असे नाव दिल्याचें आढळतें. सर्वसाधारणपणें पुढील प्रकारच्या प्रकरणाचा संग्रह असतो:—प्रथम ईशस्तुति, आणि नतर क्रमानें लक्ष्मीची स्तुति व निंदा, सज्जन दुर्जन स्वभाव, कृपणाचा स्वभाव, दात्याचें गुणवर्णन, निर्धनस्वभाव, कर्माचा मनुष्यावर होणारा परिणाम, विद्याप्रशंसा, लक्ष्मीचें चंचलत्व, प्रेम, विरह, प्रियजनाचें मीलन, स्त्रीपुरुषगुणवर्णन, कामक्रीडावर्णन, नृपतिसेवकवर्णन, नानाप्रकारचे वृक्ष, पशु, पक्षी वगैरेंचे स्वभावविशेष, अन्योक्ति प्रकरण, मित्रस्नेह, राजनीति, धर्म, अधर्म, परस्त्री, वेश्या, रागद्वेषादि मनोविकार, कलिकाल इत्यादि प्रकरणें असतातच. त्याप्रमाणें तीं याहि संस्कृत मराठी सुभाषितकोशात आहेतच. पण संस्कृतातील प्रसिद्ध ग्रंथकार भर्तृहरि, जगन्नाथपंडित, अमरुकवि, शंकराचार्य, कालिदास वगैरे विख्यात ग्रंथकाराच्या सुभाषिताचा किंवा सूक्ताचा संग्रहहि यात आहे

भाषांतर किंवा अनुवाद —विशेषत पद्यरूपातील अनुवाद—हें अत्यंत जिकिरीचें काम आहे पद्याचीं बंधनें सभाळून मुळातील आशय संपूर्णपणें व स्पष्टपणें पद्यात प्रतिबिंबित व्हावयास पाहिजे. समश्लोकी, समवृत्त, आणि एका पद्यास एक पद्य, अशीं सर्व बंधनें घालून घेतल्यास अनुवादाचें काम जास्त कठिण होऊन जातें. श्री. विंझे यानी वरील सर्व बंधनें कटाक्षानें पाळलीं नाहींत, आणि म्हणून त्याच्या अनुवादात मुळातील संपूर्ण अर्थ उतरला आहे, आणि त्यात बोजडपणा आला नाहीं. याची जाणीव वाचकास झाल्याशिवाय राहणार नाहीं, असें माझें प्राजल मत आहे. श्री विंझे यानीं एक मोठें आणि अवघड काम अत्यंत यशस्वीपणे करून दाखवून मराठी वाङ्मयात मोलाची भर टाकली आहे, असे माझ प्रामाणिक मत आहे.

माधवबाग सदाशिव पेठ, पुणें २ — प. ल. वैद्य.
२३-१२-६२

# ग्रंथकर्त्याची प्रस्तावना —

माझा व्यवसाय व अभ्यास दोन्ही रसायनशास्त्रसंबद्ध. परंतु इ. स. १९५० च्या शेवटीं मला हृदयविकार जडला. त्या दुर्धर रोगाची जाणीव मनांतून बाजूस सारण्यासाठीं, निरनिराळ्या भाषांतील सूक्ति–सुभाषितांचें मराठींत श्लोकबद्ध भाषांतर करण्याचा सहज छंद म्हणून लावून घेतला. त्यांत उत्तरोत्तर अधिकाधिक आनंद मिळूं लागला, व पुस्तकरूपानें प्रसिद्ध होण्याइतकें हें साहित्य जमलें. आतापर्यंत ऋग्वेदी संध्या, पुरुषसूक्त, व गंगालहरी यांचें समवृत्त समश्लोकी भाषांतर व इंग्रजी काव्यसूक्तींची पाणपोई या पुस्तकाचे दोन खंड इतकें पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालें व त्यांचें मराठी वाचकाकडून अत्यंत उत्साहानें स्वागत झालें. संस्कृतवाङ्मयातील सुमारें २२०० सुभाषितांचें मीं केलेलें मराठी श्लोकबद्ध व गद्य भाषांतर मूळ संस्कृतश्लोकांसह या संस्कृत–मराठी–सुभाषित–कोशाच्या स्वरूपांत प्रसिद्ध करून आज मराठी वाचकास देण्यास मला आनंद होत आहे.

## संस्कृत—

प्रस्तुत सुभाषितकोशातील मूळ श्लोक ज्या संस्कृत भाषेंतील आहेत, ती संस्कृत भाषा ही जगातील सर्वांत प्राचीन भाषाच असेल, हें निश्चित नसलें, तरी ती प्राचीनतम भाषांपैकीं एक—निदान मानवातल्या आर्यांच्या प्राचीनतम भाषांपैकीं संस्कृत ही एक आहे, यांत शंका नाहीं. ऋग्वेदांतील ज्योतिषशास्त्रीय उल्लेखांवरून कै. *लोकमान्य टिळकांनीं*, आर्यांचें मूळ वसतिस्थान उत्तरध्रुवाजवळ होतें हा काढलेला निष्कर्ष जगांतल्या सर्वच पुरातत्त्वविदांनीं मान्य केला नसला तरी संस्कृतांतील प्राचीनतम वाङ्मय जो ऋग्वेद ( निदान त्याचा पहिला भाग ) त्याचा रचनाकाल इ. स. पूर्वं १०००० वर्षांइतका जुना असावा. या भाषेला लिपीमुद्रा त्या वेळीं प्राप्त झालेली नव्हती; तर तिचें लेखन तरी कुठून असणार ? वेदांना 'श्रुति' म्हणतात. *म्हणजे, त्यांतील सूक्तें, मंत्र, इत्यादि, ऋषींना दैवी वाणीनें उच्चारलेले ऐकूं आले, म्हणून त्या ' श्रुति ' आणि त्या ऋषींच्या* अंतश्चक्षूंना ते मंत्र दिसले, म्हणून वेदरचनाकर्त्या ऋषींना ' मंत्रद्रष्टे ' म्हणण्याचा प्रघात आहे.

लिपिनिविष्ट झाल्यानें लेखन व त्याचें वाचन या माध्यमानींच ज्या सारस्वताचा प्रसार हल्लीं होतो—केवळ वाणीच्या माध्यमापेक्षा कितीतरी मोठ्या प्रमाणावर होतो—त्या सारस्वताला ' वाङ्मय ' हें नांव लावणें ५० टक्क्यांहून कमीच सार्थ आहे. त्यांतलें ' मय ' हें पद ( वाणीनेंच संपूर्ण व्यापलेलें अशा अर्थी ) वेदकालीन परिस्थितीचें स्मारक म्हणूनच भाषेंत उरलें असावें कारण वेदकालीं, मंत्र इत्यादि हे केवळ वाणीनें उच्चारावयाचे व श्रुतीनें ग्रहण करावयाचे, व पाठ करून ते पुन्हा वाणीनेंच दुसऱ्यांना—गुरूनें शिष्यांना—पित्यानें पुत्रांना—एका पिढीनें दुसऱ्या पिढीला—द्यावयाचे, अशा प्रक्रियेनेंच संरक्षिले गेले असल्यानें, खऱ्याखुऱ्या अर्थानें ' वाङ्मय ' हें नांव वेदांनाच *अक्षरशः लागू पडत होतें. आणि,* हें सर्व ' अक्षर-वाङ्मय ' लिपिनिविष्ट होईपर्यंतच्या सहस्रावधि वर्षांच्या काळांत, शेंकडों पिढ्यांनीं त्यांतील काटेकोर उच्चार–वैशिष्ट्यांसह हें वाङ्मय जतन केलें, ही जगाच्या इतिहासातील अत्यंत विस्मयकारक घटना होय.

स्थलकालाला न जुमानतां, कोणत्याहि भाषेचें मूळ स्वरूप, न बदलतां, जसेंच्या तसें राहणें अशक्य असतें. वेदवाङ्मय काय किंवा उत्तरकालीन आरण्यकें, उपनिषदें किंवा महाभारतादि काय, यांची रचना शतकानुशतकें चालू असल्यानें मूळ भाषेंत फरक होत राहिले त्या सर्वांची स्थिति ध्यानीं घेऊन इ. स. पूर्वं ७००–८०० वर्षांच्या सुमारास भगवान् पाणिनीनें आपलें व्याकरण तयार केलें;—इतकें काटेकोर, इतकें संपूर्ण, इतकें कमींत कमी शब्दांच्या सूत्रांत ( ८ अध्याय व ४००० सूत्रें ) ग्रथित *केलेलें व्याकरण जगातल्या कोणत्याहि भाषेंत नाहीं. भाषाशास्त्राची उत्पत्ति केवळ या व्याकरणामुळें शक्य* झाली. वेदवेदांगें, रामायण, महाभारत, व नंतरचीं महाकाव्यें इत्यादींच्या बरोबरीनें पाणिनिव्याकरण हें संस्कृतभाषेचें अत्यंत देदीप्यमान रत्न आहे.

संस्कृत भाषेच्या परिणतीचे अनेक टप्पे, ऋग्वेदापासून तों अगदीं अलीकडील संस्कृत वाङ्मयापर्यंतच्या म्हणजे सुमारें १२००० वर्षांच्या इतिहासाचा भव्य चित्रपट त्यांतील वाङ्मयाच्या समृद्धतेमुळें, व आजसुद्धा संस्कृतमध्यें लेखन भाषण होत आहे या घटनेमुळें, पाहाणाराचे डोळे अक्षरशः दिपवून टाकतो. यामुळेंच कीं काय, संस्कृत भाषेला ' मृतभाषा, ' न म्हणतां (पाणिनीनें काटेकोर व्याकरणानें तिला बद्ध केल्यानें ती प्रसरणशील राहिली नाहीं, यासाठीं ) केवळ ' बद्धभाषा, '

म्हणावें, असे विख्यात जर्मन संस्कृतज्ञ पंडित वुइंटरनित्झ यानें म्हटलें आहे. आज स्वतंत्र भारताच्या घटनेनें मान्य केलेल्या, जीवत भाषांत एक, म्हणून संस्कृतला स्थान प्राप्त झालेलें आहे.

आद्यकवि वाल्मीकीचें रामायण, व इ. स. पूर्व ३००० वर्षांचे सुमारास व्यासांनीं सुरू करून दिलेलें व पुढें शतकानुशतकें भर पडून प्रचंड झालेलें महाभारत, या दोन ग्रंथाइतके अधिकांत अधिक कालपर्यंत अधिकांत अधिक मानवावर परिणामकारक सत्ता गाजविलेले दुसरे कोणतेही ग्रंथ जगांत नाहींत. जगांतल्या घटनांची, मानव स्वभावाची, त्या त्या प्रसंगीं उपयोगी पडणाऱ्या बोधतत्त्वाची, महाभारतांतील प्रचंड विविधता लक्षांत घेऊनच "*व्यासोच्छिष्टं जगत् सर्वम्*" म्हणण्याचा प्रघात पडला. ईलियड व ओडिसी मिळून होईल त्याच्या आठपट विस्तार असलेल्या व १ लक्षावर श्लोकसंख्येच्या महाभारताची संशोधित आवृत्ति करण्यास शेकडों विद्वानांचे कष्ट ; ४० लक्षावर खर्च , व ४० वर्षे ; पुणें भांडारकर इन्स्टिट्यूटला लागलीं. यावरून या ग्रंथाची अपूर्व थोरवी ध्यानीं येईल १९४२ पासून सुरू झालेल्या व १९८२ पर्यंत म्हणजे ४० वर्षे चालणाऱ्या, इतिहासक्रमानें संस्कृत शब्दकोश रचण्याच्या, डॉ कत्रे यांच्या नेतृत्वाखालीं चाललेल्या, १ कोटी रु खर्चाच्या योजनेची प्रचंडता पाहिली म्हणजे संस्कृत शब्दसृष्टीची श्रीमंती लक्षांत येते.

आधुनिक संस्कृत काव्य नाटकादींची परंपरा कालिदासापूर्वी सुमारें तीनशें वर्षे, त्यानेंच उल्लेखिलेल्या भास, सौमिल्ल इत्यादींच्या वेळेपासून सुरू होते. कालिदासाचीं रघुवंश व कुमारसंभव, भारवीचें किरातार्जुनीय, माघाचें शिशुपालवध, व श्रीहर्षाचें नैषधीयचरित हीं पंचमहाकाव्यें व दण्डीचें दशकुमार व बाणाची कादंबरी हीं गद्यकाव्यें यांनीं संस्कृत वाङ्मयाच्या सौंदर्याचा परमोच्च बिंदु गाठला व यांच्यापुढे ( विशेषत कालिदासापुढे ) इतर बहुतेकांच्या काव्यांचें महत्त्व लुप्त झालें व पुढील बहुतेकांवर यांनीं आपली छाप टाकली

ध्वनिशास्त्राला सर्वस्वी धरून यथोच्चार लेखन व यथालेखन उच्चार व एकेका अक्षराला एक ठराविकच उच्चार असणें हें संस्कृताचें महान् वैशिष्ट्य आहे तसेच विराट शब्दसंपत्तीमुळे व संधि समास यांच्यामुळें थोडक्यांत पुष्कळ अर्थ, सुंदरपणें व लालित्यानें आणणें हें संस्कृताचें अनन्यसाधारण स्वरूप आहे यामुळेंच बाणाला आपल्या गद्यांत, व जयदेवाला, जगन्नाथाला त्याच्या काव्यांत ललित मधुर अनुप्रासाच्या मार्गानें सुंदर संगीत निर्माण करतां आलें. एकेका शब्दाला अनेक अर्थ असणें व त्यामुळें श्लेष कोटि इत्यादि करण्याची शक्यता व त्यामुळें उत्पन्न होणारी मर्मस्पर्शी रसोत्पत्ति होणें हा प्रकार संस्कृताइतका दुसऱ्या कोणत्याहि भाषेंत शक्य नाहीं या श्लेषादींच्या आश्रयानें एकाच काव्यांत एकाच वेळीं दोन कथा सांगणारीं द्विसंधान काव्यें संस्कृतामध्यें आहेत एकाच वेळीं दोनच काय पण सात अर्थ निघणारें हेमचंद्राचें सप्तसंधान काव्य, व एकेका श्लोकाचे १०० अर्थ काढून दाखविणारी सोमप्रभव सोमसुंदर यांची विलक्षण रचना, जगांतील अन्य कोणत्याहि भाषेंत केवळ अशक्य आहे. गतागत विलोमकाव्यें म्हणजे सुलट वाचलें असतां एक अर्थ व उलट वाचतां दुसराच अर्थ निघणारीं काव्येंहि संस्कृतमध्यें ५-७ आहेत. शब्दाला समानार्थी शब्द सांगणारे (सुमारें १६०० श्लोक व २०००० शब्द) अमरकोशासारखे पद्यमय कोश, व व्याकरणाचीं रूपे काव्यांत सांगणारीं द्व्याश्रय काव्यें ( यांना भट्टीकाव्यें म्हणतात ) व श्लोकांचीं अक्षरें खड्ग, चक्र कमळ, अशा आकृतींत बसवून दाखविणें हेंहि विलक्षण प्रकार संस्कृत कवींनीं करून दाखविले आहेत.

संस्कृतचें आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे नवीन नवीन अर्थ व्यक्त करणारे शब्द नवीनच उत्पन्न करण्याची संस्कृत ही एक टांकसाळ आहे. संस्कृतांत मूळ ज्ञात नसलेल्या विज्ञान, रसायन, जीवशास्त्र इत्यादि नवनव्या शास्त्रांसाठीं पारिभाषिक शब्द, डॉ. रघुवीर, किंवा राज्यव्यवहाराचे शब्द, पदनामकोशकर्ते, संस्कृताचा आश्रय केल्याशिवाय कसे करू शकले असते ?

व्यक्तींचे, समाजाचे, गुण व दोष, वर्णविणारा अभिनव प्रकार १७ व्या शतकांतील वेंकटाध्वरीच्या विश्वगुणादर्श चंपूत आढळतो यांत दोन गंधर्व. एकजण वर्ण्य वस्तूचे गुण सांगतो, व दुसरा दोष सांगतो. इतर भाषांत नसलेला, "लेकी बोले सुने लागे" असा अन्योक्ति किंवा अन्यापदेश हा प्रकार ९ व्या शतकांतील काश्मीरी कवि बल्लट, दक्षिणी कवि नीलकंठ व जगन्नाथ यांनीं पुष्ट केला. व्याजोक्तीनें, व्यंग्योक्तीनें अचूक मर्मभेद करणाऱ्या सहस्रों अन्योक्ति केवळ संस्कृतांतच सांपडतील. एक श्लोकांत, मागचा पुढचा संदर्भ पाहण्याची आवश्यकता न ठेवतां, एक लहानसा विचार किंवा सिद्धांत, ठासून व जोरानें सांगणारीं सुभाषितें हेंहि संस्कृताचें अनन्यसाधारण वैशिष्ट्य असून अशा सुभाषितांचीं शतकें-भर्तृहरीचीं तीन, घटकर्पराचें नीतिसार, अमरुकाचें एक, ७०० आर्यांची गोवर्धनाची आर्यासप्तशती, सुंदर पाड्याची नीतिद्विषष्टिका ( व यांशिवाय डॉ. प. ल वैद्य यांनीं आपल्या प्रस्तावनेंत उल्लेखिलेले अनेक संग्रह ) हेंहि प्रकार संस्कृतान्यतिरिक्त फारसे आढळत नाहींत.

या ग्रंथांतील मंगलाचरणांतील कांहीं वैदिक श्लोक सोडले व योगवासिष्ठ, रामायण, महाभारतांतील (सुमारें १००) सुभाषितें सोडलीं तर इ. स. पूर्व ३०० ते २० व्या शतकापर्यंतच्या सुमारें २३०० वर्षांतल्या काव्यवर्षांतील हीं सुभाषितें आहेत.

## मराठी--

प्रत्येक भाषेचें स्वरूप, स्थल, काल, व परिस्थिति याना अनुसरून सतत बदलत असतें. इ. स. पूर्व १ शतक ते इ. स. ५०० पर्यंतच्या कालखंडात केव्हातरी झालेल्या, खुद्द कालिदासाच्या नाटकातून, पुरुष तेवढे शुद्ध ग्राथिक संस्कृत बोलतात, व स्त्रिया, मुलें व खालच्या दर्जाचे पुरुषसुद्धा, प्राकृत भाषा बोलतात, असे आढळतें म्हणजे इतक्या जुन्या काळीं सुद्धा ग्राथिक संस्कृतापासून साधारण माणसाची बोलीभाषा दूरदूर जाऊ लागली होतीच याच प्राकृत स्वरूपाच्या भाषेंतून प्रात-भेदानें ज्या अनेक अपभ्रष्ट भाषा निघाल्या, ..पाली, अर्धमागधी, शौरसेनी इत्यादि; त्यात महाराष्ट्री ही विशेष महत्त्वाची होती; हें वररुचीनें लिहिलेल्या व्याकरणात इतर भाषाना महाराष्ट्रीच्या तुलनेनें, गौण स्थान दिलें, यावरून दिसतें.

ज्यातील भाषेला साधारणत. निश्चित मराठी म्हणता येईल, असे शिलालेख स्थूलमानानें आठव्या शतकापासूनचे सापडलेले आढळतात. इ. स. ९८३ चा म्हैसूर राज्यातील श्रवणबेलगोळच्या गोतमेश्वराच्या पायाशीं असलेल्या शिलालेखात "चामुंडरायें करवियलें" हें शुद्ध मराठी वाक्य आढळतें. साधारण ५ व्या ७ व्या शतकापर्यंत शिष्टाची भाषा संस्कृत समाजात बोलीभाषा जरी मराठी असली तरी लेखात तिला स्थान मिळालें नाहीं म्हणजे असे म्हणावयास हरकत नाहीं, कीं, ५-६ व्या शतकापासून, समाजात बोलण्यात रूढ झालेल्या मूळ मराठीला, मुकुंदराज (१२ वें शतक) व ज्ञानेश्वर (१३ वें शतक) याच्यापर्यंतच्या मध्यतराचा सुमारें ५००-६०० वर्षांचा काळ, ग्रथनिविष्ट होण्याइतकी प्रौढावस्था येण्यास लागला. या मध्यतरात महानुभवानी मोठ्या प्रेमानें व अभिमानानें मराठीची जोपासना केली या पथाचा सस्थापक मूळचा गुजराती असला तरी 'महाराष्ट्री बसावें' 'मराठीतच लिहावें' असा आपल्या अनुयायाना त्यानें दडक घालून दिल्यानें त्या पथाचे प्रचारक परप्रातात गेले तरी तेथेंहि त्यानीं मराठी नेली. पजाब, सरहद्द प्रात, काश्मीर, काबूल, अफगाणिस्थान, येथपर्यंत त्यानीं मराठीचे झेंडे, मराठी वीराच्या चार शतकें आधींच अटकेपार नेले होते. पद्याबरोबर त्यानीं सोप्या मराठी गद्यातहि रचना केल्यानें गद्याचे आद्य प्रवर्तक महानुभावच असावेत.

अशा रीतीनें, अगदीं बीजरूपाच्या मराठीच्या उदयापासून, आजपर्यंतचा कालावधी, फारतर दीड सहस्र वर्षे म्हणजे संस्कृतच्या तुलनेनें मराठीचें वय अवघें ½ इतकेंच आहे, व प्रत्यक्ष वाङ्मयाचा काल केवळ ८०० वर्षांचाच आहे असें म्हणता येईल एकूण आजपर्यंतच्या मराठी वाङ्मयाचा विचार करता, असें दिसतें, की, मुकुंदराजापासून अव्वल इंग्रजीपर्यंतच्या सुमारें ७०० वर्षांत बहुतेक सर्व रचना (महानुभावाचें गद्य सोडून) पद्यात झाली, व बहुतेकाचा विषय रामायण, महाभारत, पुराणें, त्यातील आख्यानें या माध्यमानें, तत्त्वज्ञान, वेदात, भक्ति याचा प्रचार व प्रसार हाच असून त्यावर बहुतेक सतकवि व पतकवि यानीं परिश्रम केलेले आहेत. तुकारामादिकाचे आर्त भक्तीचे अभग व रामदासाचे खडे व तेजस्वी तात्त्विक व्यवहारवादी बोल इतनेच याला अपवाद म्हणता येतील परतु शिवकालीन वामनपडितानीं केलेली रूपातरापेक्षा जवळचीं संस्कृताचीं मराठी भाषांतरें शतकत्रयी, गगालहरी, यथार्थदीपिका इत्यादि ही खऱ्या भाषातराची सुरुवात म्हणावयास हरकत नाहीं.

ज्ञानेश्वरानतरच्या ३००० वर्षांत मुसलमान, पोर्तुगीज इत्यादींच्या स्वाऱ्या व जुलुम व मोठे मोठे दुष्काळ यामुळें महाराष्ट्राला अवकळा व दैन्य आलें. मराठीवर फारसी, उर्दू शब्दाचा भयकर पगडा बसला, तो इतका की, शिवाजीनें भाषा-शुद्धीच्या केलेल्या प्रयत्नाना दाद न देता आज सुद्धा न्यायालयातून 'फिर्याद दरखास्त' याचेंच प्राबल्य आहे. याचें कारण शाहूराजा हा मोंगलाच्या कृपेनें सुटला व त्याच्या संस्कृतींत वाढला, यामुळें या भाषाशुद्धीला पायबद बसला; परतु पेशवे-कालीन मोरोपत, श्रीधर या कवींनीं या भ्रष्ट भाषेला बहिष्कृत कल्यामुळें व्यवहारभाषा फारशीमय होऊनसुद्धा, ग्राथिक भाषेचें स्वरूप शुद्ध राहिलें

शिवाजी व नतर पेशवे याच्या पराक्रमाच्या स्फूर्तीमुळें शाहीराचे पोवाडे व लावण्या याची पुष्कळच रचना झाली, त्यामुळे मराठी वाङ्मयात एका नव्या दालनाची भर पडली.

पेशवाई गेली व इंग्रजी राजवट आली. पुस्तकें प्रथम शिळा, नतर ठसे, नतर छापखाने यांच्या द्वारा भराभर प्रसिद्ध होऊ लागली. (परतु, फादर स्टीफन या मिशनऱ्यानें, रोमन लिपींत परतु मराठी भाषेंत, ख्रिस्त पुराण नावाचें (इ. स. १६१५) जें पुस्तक छापलें, तें आद्य मराठी छापील पुस्तक होय.) १८१० मध्यें पहिला मराठी इंग्रजी कोश झाला. या काळाच्या शास्त्रीपडितानीं मराठीला संस्कृतप्रचुर वळण लावून, मराठीवरची फारसीची पक्कड तर काढलीच पण त्याचबरोबर फारसीऐवजीं, नव्यानेंच इंग्रजी वळण मराठीला लागू पहात होतें तेंहि मारून काढलें.

इग्रजी वाघिणीचें दूध प्यालेल्या या नव्या पिढीच्या उत्साहामुळे, १२ व्या ते १८ व्या शतकापर्यंतच्या काळांत कधीं आला नव्हता, एवढा मराठी वाङ्मयाला महापूर आला. चरित्र, निबंध, इतिहास, व्याकरण गणित, ज्योतिष, अशा विविध विषयांच्या व इग्रजींतून अनुवाद केलेल्या अनेक पुस्तकांची मराठी वाङ्मयात भर पडली या काळातील परशुरामपंत गोडबोले, जामेकर, लोकहितवादी, नवर विष्णुशास्त्री चिपळूणकर, टिळक, आगरकर, नतर हरिभाऊ आपटे, केशवसुत, परांजपे, केळकर यांनीं व केसरी विविधज्ञानविस्तार इत्यादि नियतकालिकांनीं आधुनिक मराठी वाङ्मयाचा पाया पक्का घातला.

प्रस्तुत प्रयास अनुलक्षून महत्त्वाचा विषय म्हणजे, संस्कृतमधून नुसतें रूपातर नव्हे तर प्रत्यक्ष भाषातर करण्याचा उपक्रम वामनपंडितानतर जो बद पडला होता तो पुन्हा दसपट वेगानें व उत्साहानें सुरू झाला. परशुरामपंत गोडबोले कृष्णशास्त्री राजवाडे, कृष्णशास्त्री चिपळूणकर, नतर लेलेशास्त्री, के वि. गोडबोले, इ. यांच्यापासून, तों नुकतेच दिवंगत झालेले डॉ. श्रीखडे यांचेपर्यंत अनेकानेक रसिकांना अनेक संस्कृत नाटकांचीं, काव्यांचीं, अन्योक्तींचीं मराठींत भाषातरें केलीं. परतु सुम्या सुम्या सुभाषिताच्या श्लोकबद्ध भाषातराचा प्रयत्न एवढ्या मोठ्या प्रमाणावर, पूर्वी झाला नव्हता, तो या ग्रथाचे रूपानें जनतेस सादर करण्यात येत आहे, त्याचा महाराष्ट्रजनता प्रेमानें स्वीकार करील अशी अपेक्षा आहे

## भाषातर —

येथेच भाषातर या विषयासबधी, थोडेसे लिहिणें आवश्यक वाटतें. कोणत्याहि वाङ्मयाचे-विशेषत काव्याचें-ततोतत १०० टक्के भाषातर होणें केवळ अशक्य आहे, हें काटेकोर तात्त्विक दृष्टीनें पाहिल्यास नाइलाजानें मान्य केलेंच पाहिजे. पण ही निव्वळ तात्त्विक दृष्टि सोडली तर, खरें भाषातर म्हणजे एका बाटलीतलें अत्तर दुसऱ्या बाटलींत ओतल्यासारखें असलें पाहिजे, असें म्हटलें तरी, हें असें ओतताना, थोडेंतरी अत्तर पहिल्या बाटलींत आत चिकटून राहणारच, व त्यामुळे मूळातलें सुगधी द्रव्य थोडेंतरी कमी होऊनच नव्या बाटलींत येणार, हेंहि गृहीत धरावेंच लागतें, ( अर्थात अत्तराऐवजी पारा वापरला तर ! पण मग त्यात अत्तराचें काव्य कोठून येणार ? ) दुसरें एक उदाहरण—उत्तम भाषातर म्हणजे वस्तु तीच, पण पोषाख काय तो निराळ्या भाषेचा असे म्हणण्यात येतें पण निग्रो स्त्रीला जपानी किमोनो, किंवा हिंदु स्त्रीला इग्रजी फ्रॉक नेसवून तें सोंग कसे काय दिसतें तें रसिकांनीच सागावें ! भाषातर म्हणजे बिंबाचें आरशा तील प्रतिबिंब असेहि म्हणण्यात येतें, पण त्यातहि 'डावें उजवें ' होऊन, महाराष्ट्रीय स्त्री, पदर उलटा घेतल्यासारखी गुजराती स्त्री दिसू लागते ! व उजव्या हातात तलवार घेतलेला वीर डावखोरा बृहन्नडा दिसू लागतो. तेव्हा-सैल रूपातर, शब्दास प्रतिशब्द, स्वैर भाषातर, ओळीस ओळ, अक्षरश भाषातर, नक्कल, इत्यादींच्या कात्र्याकुटात न पडता, मूळातील आशय, ( नुसत्या गोळाबेरजेनें न सागता ) शक्य तितक्या सपूर्णपणें, त्याच्या मूळ सौंदर्यासह ( तें सौंदर्य, लालित्याचें, अलकाराचें, सूचकतेचें, भावनोत्कटतेचें, रचनेचें, अर्थघनतेचें, अशा अनेक प्रकारचें असेल ) भाषातरात आणला गेला पाहिजे. हें करताना केवळ शब्दाला शब्द ठेवल्यानें येणारी दक्षता व विसंगति टाळून, शब्दश नव्हे तर अर्थश. भाषातर झालें पाहिजे " I love you Three Divine Words'' याचें भाषातर ' शब्दश चाल्यानें ' " मी तुझ्यावर प्रेम करतो ! तीन स्वर्गीय शब्द " असें केल्याचें सागतात !!! ज्या भाषेत भाषातर करावयाचें त्या भाषेस शोभेलशी समर्पक रचना झाली पाहिजे ; नाहींतर, मिशनऱ्यांनीं केलेल्या बायबलच्या हेंगाड्या भाषातराचा प्रकार व्हावयाचा. भाषातर प्रसादयुक्त म्हणजे ( कवितेच्या बाबतींत ) अन्वयार्थ लावून दुसऱ्यांनीं समजावून सागावें न लागणारें,-सहज समजणारें, सोपें झालें पाहिजे. तसेच त्यात भाषातरकर्त्यानें स्वत ची भर शक्यतों घालू नये. अगदीं भाग च पडलें, तर, ती मूळ आशयाला पोषक झाली पाहिजे तरच ती क्षम्य ! भाषातरकर्त्याला दोन्ही भाषाचें उत्तम ज्ञान म्हणजे ' शब्दकोशकर्त्याचें ' पाडित्यच केवळ नव्हे तर त्या त्या भाषेची मर्मज्ञ रसिकता असावयास पाहिजे. त्याला मूळ काव्याच्या व कवीच्या अतरंगात शिरून त्याच्याशीं तद्रूप होतां आलें पाहिजे— त्याच्या भावना भावतां आल्या पाहिजेत. मूळ काव्याची जी भाषा असेल ती भाषा बोलणाऱ्या समाजाच्या चालीरीती व आवडीनिवडी इत्यादींची सुद्धा माहिती त्याला असणें आवश्यक असतें.

' Nothing in my hand I bring , Only to Thy cross I cling " याचें भाषातर—आलों तुझ्या जवळ मी प्रभु ! रिक्तहस्तें !, धरीन केवळ मिठी तुझिया पदातें ॥ असेंच व्हावयास पाहिजे. ' शब्दश ' चें येथे काम नाहीं. ' भावनिक साम्ययुक्त ' अशा भाषातरासाठीं, ज्यांत भाषातर करावयाचें त्या भाषेच्या मोडणीकडे व ती बोलणाऱ्याच्या सामाजिक

चालीरीतीकडे लक्ष देऊन, मूळ उपमा सुद्धां भाषांतरांत योग्य तऱ्हेनें बदलली पाहिजे. कारण भाषांतर हें पांडित्य नसून ती मुख्यत्वें कला आहे हें ध्यानीं घेणें आवश्यक आहे.

अशा रीतीनें भाषांतर कसें असावें या विषयाची पुष्कळ अधिक चिकित्सा करणें शक्य आहे. पण मूळ काव्य हें त्याच्यांतील रसाच्या माध्यमानें रसिकाला ग्राह्य होतें म्हणून या विषयाची रुक्ष चिकित्सा करण्यापेक्षा या कोशांतील भाषांतराच्या सरस माधुरीचें वर्णन करणाऱ्या एका सुभाषिताकडे ( प्र. २८९ ) अंगुलिनिर्देश करतों. त्यात कवि म्हणतो–आपल्या प्रियेचें तांबूलसेवन चाललें आहे. व तांबूल तिच्या मुखात अतिशय रंगलेला आहे, हें पाहून, प्रियकरानें तिचें चुंबन घेऊन, तो तांबूल आपल्या मुखांत घ्यावा, व आपल्याहि रसनेला प्रियेच्या रसनेच्या तोडीस तोड रंग आणावा, याला म्हणतात भाषांतर! रसिकांना यांतील श्लेष समजेलच. याहून सरस असें भाषांतराचें वर्णन माझ्या पाहण्यांत नाहीं.

स्वतंत्र कविता करण्यापेक्षां, ( यापूर्वीच्या विवेचनांतील बंधनें स्वीकारून ) भाषांतरित कविता करणें हें काम शतपट अवघड आहे हें तर परमेश्वर बोलून चुकला आहे. याचप्रमाणें इतर भाषांतून मराठींत भाषांतर करण्यापेक्षां संस्कृतातून मराठींत भाषांतर करणें हें काहीं विशेष प्रकारें अवघड आहे, पण त्यांत कांहीं थोडी सुकरताहि आहे. अवघडपणा पुढें दर्शविला आहे, पण सुकरता अशासाठीं कीं मराठी ही संस्कृतची कन्याच ( पण प्रौढ गुणाढ्य मातेची अल्लड ) असल्यानें, इंग्रजी वगैरे भाषांतून मराठींत भाषांतर करतांना, मूलभूत कल्पनाचा परकेपणा भासतो तसा येथें नाहीं. पुष्कळ शब्द दोन्ही भाषांत तेच आहेत, केव्हां केव्हां ते तसेच ठेवल्यानेंहि काम भागतें, संस्कृत–मराठी यांतील साम्य इतकें आहे कीं, केव्हा केव्हां **तेवढ्याच जागेंत अगदीं तंतोतंत तोच अर्थ अगदीं त्याच क्रमानें** आणतां येतो—हें उदाहरण पहा— ( प्र. ७ श्लो. ११ )

मातर्लक्ष्मि ! तव प्रसादवशतो दोषा अमी स्युर्गुणाः ॥ याचें मराठी—

माते लक्ष्मि ! तुझा प्रसाद घडतां, हे दोष होती गुण ॥

पण असे आदर्श भाषांतर सर्वत्र जमत नाही ( याचप्रमाणें ज्ञानेश्वराच्या 'आतां विश्वात्मके देवें' या ओव्या किती अल्प बदल करून वृत्तात बसतात हें दाखविलें आहे. ( पान१० ). दोन्ही भाषांची एकात्मता हेंच त्याचें कारण होय. )

पण एकंदरींत संस्कृत काव्याचें, मराठींत भाषांतर करण्यांत अनेक कारणांनीं अवघडपणा येतो. मूळांतला ( अगदीं सर्व नव्हे तरी ) बहुतेक अर्थ त्याच्या वैचित्र्यासह भाषांतरांत आणतां येऊन समवृत्त समश्लोक व तेंहि सयमक जमलें तर तें अर्थातच सर्वोत्तम; पण संस्कृतामध्यें नसलेलें यमकाचें बंधन मराठी कवितेस आहे हा एक अवघडपणा. कर्ता कर्म यांना विभक्ति, संस्कृतात सर्रास लागते त्यामुळे शब्द मागें पुढें झाले तरी अन्वय चुकत नाहीं. 'राम रावण मारतो' म्हणजे कोण कुणास मारतो ? 'मीं चोरी करतांना त्याला पाहिलें' म्हणजे चोरी करणारा मी कीं तो ? असा ढिलेपणा मराठींत संस्कृतापेक्षा अधिक आहे. साध्या संधिनियमांमुळें संस्कृतामध्ये शब्दाची लांबी कमी होते—' कस्य अपि कः अपि ' हीं सात अक्षरें कस्यापि कोऽपि ' या पांच अक्षरांत बसलीं; तेंच मराठींत 'कोणाचें तरी कांहीं तरी ' अशीं नऊ अक्षरें होतात. याहि पलीकडे संस्कृतामध्यें समासामुळें, नुसता पुष्कळ अर्थ थोडक्या जागेंत दाबून बसविता येतो, एवढेंच नव्हे, तर त्यातूनच संधिनियमांच्यामुळें पदलालित्यहि उत्पन्न करतां येतें. याचें उदाहरण पहा—( जगन्नाथ गंगालहरी )—

मरुल्लीलालोलल्लहरिलुलिताम्भोजपटली-
स्खलत्पांसुव्रातच्छुरणविसरत्कौंकुमरुचि ।

हा एवढा दोन ओळीचा एक शब्द (पाण्याचें विशेषण) " वाऱ्याच्या हालचालीमुळें लाटा उसळून, त्यांच्यामुळें पद्मसमुदाय डोलल्यानें, त्यांतून गळणारा रेणुसमुदाय तवंगासारखा पृष्ठभागावर पसरल्यानें, ज्याला कुंकवाचा रंग आला आहे असें " (पाणी) इतका मोठा अर्थ थोडक्यांत तर बसलाच पण संधिनियमाचा लाभ घेऊन मरुत्च्या पुढें व लोलत् च्या पुढें अशा दोन 'ल' ची भर बाकीच्या सात 'ल' मध्यें घालून अनुप्रासांचा नऊ मजली मनोरा उभा करतां आला! अशा मोठ्या समासांच्या भाषांतराबाबत, पुष्कळ प्रयोगांअंतीं मीं एक तंत्र तयार केलें आहे, कीं, तेवढ्याच जागेंत अर्थ आणावयाचा तर

भाषांतरात शक्य तितक्या कमी ( शक्यतोंवर दोनच फार तर तीन ) अक्षराचे शब्द योजावयाचे, व, समासामुळें जोडलेल्या क्रिया तोडून त्यांच्या केवळ क्रमामुळें व अर्धविरामानें त्यांना दुवा साधावयाचा. वरील दोन ओळींचें माझ्या तंत्रामुळें भाषांतर असे—

सुटे वारा ; हाले जल ; झुलुनि जो पङ्कजसरी । गळे रेणू, भासे जणु जळिं तरे कुंकुमवरी ।

यात अधिकात अधिक अर्थ आणला खरा ; समवृत्त समश्लोकी साधली खरी; परंतु, तें ल ल या ललित पदाचें लुसलुशीत कोवळेंपण मराठींत कोठून आणणार ?

पदलालित्याच्या, व संधिसमासाच्या प्रक्रियेमुळे येणाऱ्या अर्थघनतेच्या बाबतींत संस्कृताचें वैभव व मराठीचें दैन्य पाहिलें म्हणजे एक इंद्राचा ऐरावत व दुसरी ग्रामभटाची तट्टाणी म्हटल्याशिवाय राहवत नाहीं.

( '*माझा मऱ्हाटाचि बोल कवतिकें, परि अमृतातेंहि पैजा जिंके*'

असे ज्ञानेश्वरानीं म्हटलें तरी एका संस्कृत श्लोकाचा अर्थ दहा ओव्यात खुलवून फुलवून सांगणें हें निराळे ( तें विवरण होतें— भाषांतर नव्हे ) व समग्र अर्थ मूळ संस्कृताइतक्या जागेंतच बसवून वर मूळातलें लालित्य साधणे निराळे. )

संस्कृताइतकी श्लेषानीं समृद्ध भाषाच दुसरी नाहीं त्यामुळें द्विसंधान, अनेकसंधान काव्यें, व एका श्लोकाचे १०० अर्थ लावण्याचे विक्रम, संस्कृत कवींनीं केल्याचें वर्णन, या प्रस्तावनेच्या प्रथम भागात आलें आहेच. सर्वसाधारणपणें कोणत्याहि भाषेंतल्या कोटियुक्त शब्दाचें भाषांतर दुसऱ्या भाषेत तशाच कोटियुक्त शब्दात करणें बहुधा शक्य होत नाहीं. पण ही अडचण इतर भाषांच्या बाबतींत एकपट असेल तर संस्कृतच्या बाबतींत शतपट आहे असे म्हणावें लागतें. याहि बाबतींत संस्कृत ही 'कोटयधीश' आहे तर मराठी जवळ जवळ अकिंचन आहे याची खेदकारक जाणीव पदोपदीं होत राहते. (प्र. १२ श्लो. १ ) यातील–'दृढतरनिबद्धमुष्टे' याचें भाषांतर ( घट्ट मुठीचा ) केल्यानेंव, (प्र. २९ श्लो. ५३ ) यातील 'पश्चात्पतितैरिनि' याचें ( मागें जे पडले ) असे शुद्ध मराठी केल्यानेंहि मूळ श्लेषातले दोन अर्थ मराठींत ततोतंत आणता आले, तरी अशीं उदाहरणें थोडीं (प्र. २ श्लोक २५ ) यातील –'सरसा, सालंकारा, सुपदन्यासा सुवर्णमयमूर्ति' हीं सर्व आर्येला व भार्येला एकाच वेळीं लागू होणारीं विशेषणें, कोणत्या स्वतंत्र मराठी अनुप्रासयुक्त शब्दानीं भाषांतर करून लावता येतील ?

प्रस्तुत खंडात मीं केलेल्या पद्यापैकीं ३० ते ४० टक्के श्लोक समवृत्त समश्लोकी केले आहेत. पण ( अखेर समग्र किंवा अधिकात अधिक मूळार्थ सहजसुलभ शैलीनें मराठींत आणणें हेंच ध्येय असल्यानें ) बाकीच्या बाबतींत तो आग्रह सोडून मूळापेक्षा थोडें मोठें वृत्त, उदाहरणार्थ—अनुष्टुभाला किंवा उपजातीला वसंततिलका, शिखरिणी हरिणी इ. याना शार्दूलविक्रीडित, शार्दूलविक्रीडिताला आर्येच्या चार ओळी किंवा सुमंदारमाला किंवा स्रग्धरा योजून अर्थ शक्य तितका सुगम करण्याचा कसोशीनें प्रयत्न केला आहे. चित्रश्लोक, उखाण्यासारखे कूटश्लोक, समस्यापूर्तीचे श्लोक व संभाषणी किंवा प्रश्नोत्तरी श्लोक हे संस्कृतमधील प्रकार मराठींत भाषांतर करण्यास अतिशय त्रासदायक व इतर सर्व श्लोकांपेक्षा अवघड जातात. अशा चाहि अनुवाद शक्य झालें तेथें मूळ वृत्तांत (प्र. ५ श्लोक ५३; प्र. २२ श्लो. २–७–८–१५ व १७; प्र. ३० श्लोक. ४० ) व तें न जमलें तेथें वर सांगितल्याप्रमाणें मूळापेक्षा मोठ्या वृत्तांच्या आधारानें (प्र २ श्लो ७५; प्र. ९ श्लो २३, प्र. १० श्लो १७ व १९, प्र २२ श्लो १९; प्र. ३० श्लो ). केला तो चांगला सुगम झाल्याचें दिसून येईल.

माझ्या भाषांतरामध्यें, संस्कृताला दुसरा संस्कृत शब्द देण्याएवजीं त्याचें अधिकात अधिक मराठीकरण करण्याच्या माझ्या प्रयत्नाचें एक उदाहरण देण्यास हरकत नाहीं. जगन्नाथाच्या सिंहान्योक्तिपैकीं एक श्लोक पुढीलप्रमाणें आहे—

स्थितिं नो रे दध्याः क्षणमपि मन्दाधेक्षण सखे । गजश्रेणीनाथ ! त्वमिह जटिलायां वनभुवि ।
असौ कुम्भिभ्रान्त्या खरनखरविद्रावितमहा–गुरुग्रावग्रामः स्वपिति गिरिगर्भे हरिपतिः ॥

याचें वासुदेवशास्त्री खरे यानीं केलेलें भाषांतर, ५० चे वर वर्षे, केसरी पत्राच्या शिरोभागीं असल्यानें अत्यंत प्रसिद्ध आहे तें असे—

| खरेकृत | माझें भाषांतर |
|---|---|
| गजालिश्रेष्ठा ! या निबिडतरकान्तारजठरीं<br>मदान्धाक्षा मित्रा ! क्षणभरिहि वास्तव्य न करीं ।<br>नखाग्रानीं येथें गुरुतरशिला भेदुनि करि–<br>भ्रमानें आहे रे गिरिकुहरिं हा निद्रित हरी ॥ | मदाच्या धुंदीनें भ्रमुनि गजराजा ! क्षणहि या -<br>नको राहू येथें अति गहन रानांत सदया ! ।<br>नखांनीं फोडी जो गजचि समजोनी खडक हा<br>गुहेमध्यें ऐसा प्रबल निजला सिंह बघ हा ! ॥ |

मूळ संस्कृत शब्दांना वरील दोघांनीं कोणते मराठी शब्द दिले हें तुलना करून पहावें—

| संस्कृत | खरे | विंझे |
|---|---|---|
| स्थितिं नो दध्या | वास्तव्य न करीं | नको राहू |
| मदान्धेक्षण | मदान्धाक्षा | मदाच्या धुंदीनें भ्रमुनि |
| जटिलाया वनभुवि | निबिडतरकान्तारजठरीं | अति गहन रानांत |
| कुम्भिभ्रान्त्या | करिभ्रमानें | गजचि समजोनि |
| विद्रावित | भेदुनि | फोडी |
| महागुरुग्रावग्रामः | गुरुतरशिला | खडक |
| स्वपिति | निद्रित | निजला |
| गिरिगर्भे | गिरिकुहरिं | गुहेमध्यें |
| हरिपति | हरि | सिंह |

याप्रमाणें सर्वस्वीं मराठीकरण होऊन, समवृत्त, समश्लोक, व संपूर्ण अर्थ यांत आला आहे. ' मदान्धेक्षण ' ऐवजीं ' मदान्धाक्षा, ' ' जटिलाया वनभुवि ' ऐवजीं ' निबिडतरकान्तारजठरीं ' म्हणणें हें संस्कृतचें संस्कृतच Paraphrase झालें ! पण कै. खऱ्याचे वेळीं किती संस्कृतप्रचुर मराठी खपत असे किंवा समजत असे हें यावरून दिसतें. आज या भाषांतराला संस्कृत कविताच म्हटलें जाईल. त्यांत मराठी असें जवळ जवळ कांहींच नाहीं. (प्र. ४७ श्लो. २२५)

## सुभाषित

सुभाषित म्हणजे " चांगलें बोललेलें " इतका साधा सरळ अर्थ घेतला तर या शब्दाची व्याप्ति जवळ जवळ सर्व चांगल्या वाङ्मयाला गवसणी घालू शकेल. परंतु संस्कृत किंवा मराठीमध्यें एक विशिष्ट मर्यादित अर्थ या शब्दाला आहे. वास्तविक सुभाषित व सूक्ति शब्दशः एकच; सुभाषित काय किंवा सूक्ति काय, पद्याप्रमाणेंच गद्यांतहि आहेत व असावयास हरकत नाहीं. परंतु मराठींत, गद्य किंवा पद्यांतली कांहीं एक सिद्धांतप्रतिपादक एखाद दुसरी ओळ यांना मोघमपणें सूक्ति म्हणण्यांत येतें व एक संपूर्ण श्लोक, कीं ज्याला मागला पुढला संदर्भ सांगण्याची जरूरी नाहीं, जो स्वयंपूर्ण आहे, म्हणजे ज्यांत दर्शविलेला एक विचार, मुद्दा, मतप्रतिपादन, सिद्धांत वगैरे तेवढ्या श्लोकांतच संपतो, पुढच्या श्लोकांत त्याचा अंश किंवा चालू धागा राहात नाहीं किंवा मागच्या श्लोकांतून तो घेऊन येत नाहीं—त्यांना मोघमपणें सुभाषित असें म्हणतात. अर्थात् सूक्ति किंवा सुभाषित यांत त्यांच्या कार्यक्षेत्राची सीमादर्शक अशी लक्ष्मणरेषा काढण्यांत आलेली नाहीं. परंतु रूढीनें बहुतेक सुभाषितसंग्रह पाहिल्यास त्यांत बहुतेक संपूर्ण श्लोकांचाच संग्रह केलेला आढळून येतो पण क्वचित् अशा संग्रहाच्या नांवांत सूक्ति हा शब्द घालण्यांत येत नाहींच असेंहि नाहीं. रेखींव, आटोपशीर, ठाशीव, स्पष्ट असें कांहीं वक्तव्य, व शक्य तर त्याला उपमा दृष्टांतानें पाठिंबा देऊन जोरदारपणा आणलेला, हें सुभाषिताचें मुख्य लक्षण असतें.

उदाहरण—नात्यन्तं सरलैर्भाव्यं गत्वा पश्य वनस्थलीम् । छिद्यन्ते सरला वृक्षा वक्रास्तिष्ठन्ति पादपाः ॥

अर्थ—अतिसरल होऊं नये–रानांत जाऊन पहा–सरळ झाडें तोडिलीं जातात. वाकडीं तेवढीं वांचतात. केव्हां केव्हां

चमत्कृति निर्माण करून वाचकाला धक्का दिला जातो :--या जगात सरल वागणाराना कमीपणा येतो व वाकडे वागणाराना मोठें पणा येतो, या उफराट्या रीतीला दृष्टांत कोठें सांपडेल माहीत आहे ? अगदीं वाचकाच्या कल्पनेबाहेर, छंदःशास्त्रात ! !

"यत्रार्जवं हि लघुता, महिमान वक्रतैव तनुते चेत् । छन्द शास्त्र इवास्मिन् लोके सरल सखे किमपि ? " ॥

"जेथे सरलपणा लघुत्व देतो, व वक्रपणाच गुरुत्व देतो, त्या छंद शास्त्रासारख्या या जगात मित्रा ! सरल का होतोस?" ( पूर्वी संस्कृतमध्यें सरलरेषेनें लघुगण व वक्ररेषेनें गुरुगण दर्शविला जाई अलीकडे मराठींत हीं चिन्हें उलटीं झालीं आहेत. ) असेच एका प्रियकराला पाणिनीनें (!) फसविलें ! 'मन हें नपुंसकलिंगी' या पाणिनीच्या सांगण्यावर विसंबून, बिचाऱ्यानें मनाला आपल्या प्रियेकडे पाठविलें ! पण ( तें चांगलें पुल्लिंगी होऊन ) प्रियेशीं लग्न करीत तेथेंच राहिलें. व हा मात्र तें गमावून बसला !

सुभाषितातले ठासून सांगितलेले सिद्धांत कोणी अंतिम सत्य समजून भ्रांतींत पडू नये ! एक सुभाषित म्हणतें— ( सत्संगात् प्र २१ श्लो. २८ ) "सज्जनाच्या संगतीनें खल साधु होतात पण साधूंना खलसंगानें खलत्व येत नाहीं फुलाचा वास मातीला लागतो.--मातीचा फुलाला लागत नाहीं." आता, हें सांगणाराला, जसें समर्पक उदाहरण सांपडलें, तसें त्याच्या उलट सांगणारालाहि तितकेंच समर्पक उदाहरण तयारच आहे. तो म्हणतो ( असाधु साधुवा प्र. २१ श्लो ३२ ) "असाधु किंवा साधु हे जात्याच असतात संगतीनें कोणालाहि दुर्जनत्व किंवा सुजनत्व येत नाहीं अगदीं जन्मापासून एकमेकाना चिकटून असलेले सर्प आणि मणि पहा.--सर्पाला मण्याचे गुण लागत नाहींत--मण्याला सर्पाचे दोष स्पर्श करीत नाहींत" दोन्ही सुभाषितें सुंदर आहेत त्या त्या दृष्टांतावरून पाहिलें, तर त्या त्या वेळीं, ते सिद्धांत खरेच वाटतात, पण मग या दोघांपैकीं खरा कोण ? याचें उत्तर हेंच, कीं, दोन्ही अंशत सत्य आहेत यावरून सुभाषिताचें एक महत्त्वाचें लक्षण व्यक्त होतें--कीं, सुभाषितकार हा हुषार वकिलाप्रमाणें आपली बाजू खुलवून, सजवून, नटवून, दृष्टांताची पुष्टी देऊन, जोरदारपणें प्रत्ययोत्पादी रीतीनें मांडून दाखवितो एका विख्यात वकिलाची गोष्ट सांगतात, कीं, त्यानें न्यायालयांत, आपल्या पहिल्या अर्ध्या भाषणात, आपल्या पक्षकाराची बाजू मांडून, नतर उत्तरार्धांत त्यानेंच विरुद्ध पक्षाची बाजू इतकी सुरेख मांडली कीं, कोणाला अपराधी ठरवावें अशी न्यायाधीशाना भ्रांत पडली ! वाचकांनीं मात्र, त्या न्यायाधीशाप्रमाणें भ्रांत न होता सुभाषित ही, त्या त्या वेळेपुरती, त्या त्या पक्षाची वकिली हें जाणून, वक्तृत्वस्पर्धेत जसें, एक बाजू सिद्ध करण्यापेक्षा, ती कशी सजविली आहे हेंच पहावयाचें असतें, तसेंच समजून सुभाषिताचा रस चाखावा

वर सांगितल्याप्रमाणें सुभाषिताचें मुख्य स्वरूप म्हटलें, तरी मोठमोठ्या संग्रहातून संगृहीत केलेले श्लोक सर्वच काहीं या स्वरूपाचे नसतात, कारण त्याचे विषय पाहिले ( उदाहरणार्थ, नमन, सृष्टिवर्णन, शोकरस, शृंगार इत्यादि ) म्हणजे या मुख्य स्वरूपापासून दूर दूर जात जात—अगदी व्यापक अर्थ जो "चांगलें बोललेलें" "सुव्यक्त विचार" तो या संग्रहकारानीं मान्य केल्यासारखें दिसतें. एरवीं इतके विविध विषय सुभाषिताखालीं येऊच शकले नसते या ग्रंथातास अनुसरून--सर्व काहीं 'सुव्यक्त' तें तें ज्यांत येतें तें सुभाषित म्हणावयाचें ही व्याख्या या कोशासाठी मींहि स्वीकारली आहे

## कोश—

संस्कृत भाषेत ( व्यापक व्याख्येप्रमाणें ) सुमारें वीस सहस्र सुभाषितें असावींत त्यातलीं या ग्रंथांत अवघीं २२०० म्हणजे केवळ १० % च असल्यानें याला 'कोश' न म्हणता, कोणी 'लघुकोश' म्हटलं तरी माझी हरकत नाहीं. पण यात संस्कृत २२०० तशींच मराठी २२०० मिळून ४४०० इतकीं सुभाषितें असल्यानें ही संख्या काहीं अगदींच लहान उपेक्षणीय नाहीं; आणि आजपर्यंत इतक्या मोठ्या संख्येच्या संस्कृत सुभाषिताचें मराठींत श्लोकबद्ध भाषांतर झालेलें नाहीं म्हणून थोडें कौतुकानें या ग्रंथाला कोश म्हटलें तर तें अगदीं अस्थानीं नव्हे असं वाटतें. मूळ कल्पना, एका खंडातच हा ग्रंथ छापावा, अशी होती. परंतु संपूर्ण ग्रंथाला खर्च फार लागणार व छापखान्याना काम फार म्हणून कालवधीहि लागणार या गोष्टींचा विचार करून पुस्तक दोन खंडात प्रसिद्ध करण्याचा निर्णय घ्यावा लागला. या ग्रंथांत, इतर सुभाषितसंग्रहाप्रमाणेंच विषयांप्रमाणें प्रकरणें केलीं तीं ५० झालीं असून दोन्ही खंडात श्लोकसंख्या साधारण समान ठेवून, पहिल्या खंडात ३० प्रकरणें येतात व बाकीचीं दुसऱ्यात येतील.

चमत्कृति निर्माण करून वाचकाला धक्का दिला जातो'--या जगात सरल वागणाराना कमीपणा येतो व वाकडें वागणाराना मोठें पणा येतो, या उफराट्या रीतीला दृष्टांत कोठें सापडेल माहीत आहे? अगदीं वाचकाच्या कल्पनेबाहेर, छंद शास्त्रात!!

"यत्रार्जवं हि लघुता, महिमान वक्रतैव वनुते चेत्। छन्द शास्त्र इवास्मिन् लोके सरल सखे किमसि?"॥

"जेथें सरलपणा लघुत्व देतो, व वक्रपणाच गुरुत्व देतो, त्या छंद शास्त्रासारख्या या जगात मित्रा! सरल का होतोस?" (पूर्वी सस्कृतमध्यें सरलरेषेनें लघुगण व वक्ररेषेनें गुरुगण दर्शविला जाई. अलीकडे मराठींत हीं चिन्हें उलटीं झालीं आहेत.) असेंच एका प्रियकराला पाणिनीनें (!) फसविलें! 'मन हें नपुसकलिंगी' या पाणिनीच्या सांगण्यावर विसंबून, बिचाऱ्यानें मनाला आपल्या प्रियेकडे पाठविलें! पण (तें चागलें पुल्लिंगी होऊन) प्रियेशीं लगट करीत तेथेंच राहिलें. व हा मात्र तें गमावून बसला!

सुभाषितातले ठासून सांगितलेले सिद्धात कोणी अतिम सत्य समजून भ्रांतींत पडू नये! एक सुभाषित म्हणतें—(सत्संगात् प्र. २१ श्लो. २८) "सज्जनाच्या संगतीनें खल साधु होतात पण साधूंना खलसगानें खलत्व येत नाहीं फुलाचा वास मातीला लागतो. मातीचा फुलाला लागत नाहीं." आता, हे सांगणाराला, जसे समर्पक उदाहरण सापडलें, तसें त्याच्या उलट सांगणारालाहि तितकेंच समर्पक उदाहरण तयारच आहे. तो म्हणतो (असाधु साधुर्वा प्र. २१ श्लो ३२) "असाधु किंवा साधु हे जात्याच असतात संगतीनें कोणालाहि दुर्जनत्व किंवा सुजनत्व येत नाहीं. अगदीं जन्मापासून एकमेकाना चिकटून असलेले सर्प आणि मणि पहा.–सर्पाला मण्याचे गुण लागत नाहींत–मण्याला सर्पाचे दोष स्पर्श करीत नाहींत". दोन्ही सुभाषितें सुंदर आहेत त्या त्या दृष्टांतावरून पाहिलें, तर त्या त्या वेळीं, ते सिद्धात खरेच वाटतात, पण मग या दोघापैकीं खरा कोण? याचें उत्तर हेंच, कीं, दोन्ही अशत सत्य आहेत यावरून सुभाषितांचें एक महत्त्वाचें लक्षण व्यक्त होतें कीं, सुभाषितकार हा हुषार वकिलाप्रमाणें आपली बाजू खुलवून, सजवून, नटवून, दृष्टांताची पुष्टी देऊन, जोरदारपणें प्रत्ययोत्पादी रीतीनें माडून दाखवितो एका विसराळू वकिलाची गोष्ट सागतात, कीं, त्यानें न्यायालयात, आपल्या पहिल्या अर्ध्या भाषणात, आपल्या पक्षकाराची बाजू माडून, नतर उत्तरार्धांत त्यानेंच विरुद्ध पक्षाची बाजू इतकी सुदर माडली कीं, कोणाला अपराधी ठरवावें अशी न्यायाधीशाना भ्रांत पडली! वाचकानीं मात्र, त्या न्यायाधीशाप्रमाणें भ्रांत न होता सुभाषित ही, त्या त्या वेळेपुरती, त्या त्या पक्षाची वकिली हें जाणून, वक्तृत्वस्पर्धेंत जसे, एक बाजू सिद्ध करण्यापेक्षा, ती कशी सजविली आहे हेंच पहावयाचें असतें, तसेंच समजून सुभाषिताचा रस चाखावा

वर सांगितल्याप्रमाणें सुभाषिताचें मुख्य स्वरूप म्हटलें, तरी मोठमोठ्या संग्रहातून सग्रहीत केलेले श्लोक सर्वच काहीं या स्वरूपाचे नसतात, कारण त्याचे विषय पाहिले (उदाहरणार्थ, नमन, ऋतुवर्णन, शोकरस, शृगार इत्यादि) म्हणजे या मुख्य स्वरूपापासून दूर दूर जात जात—अगदी व्यापक अर्थ जो "चागलें बोललेलें" "सुव्यक्त विचार" तो या सग्रहकारानीं मान्य केल्यासारखें दिसतें. एरवीं इतके विविध विषय सुभाषिताखालीं येऊच शकले नसते या ग्रंथातस अनुसरून–सर्व काहीं 'सुव्यक्त' तें तें ज्यांत येतें तें सुभाषित म्हणावयाचें ही व्याख्या या कोशासाठी मींहि स्वीकारली आहे

## कोश—

संस्कृत भाषेत (व्यापक व्याख्येप्रमाणें) सुमारें वीस सहस्र सुभाषितें असावींत त्यातलीं या ग्रथात अवघीं २२०० म्हणजे केवळ १० % च असल्यानें याला 'कोश' न म्हणता, कोणी 'लघुकोश' म्हटलें तरी माझी हरकत नाहीं. पण यांत संस्कृत २२०० तशींच मराठी २२०० मिळून ४४०० ऱ्या वर सुभाषितें असल्यानें ही संख्या काहीं अगदींच लहान उपेक्षणीय नाहीं; आणि आजपर्यंत इतक्या मोठ्या सख्येच्या संस्कृत सुभाषिताचें मराठींत श्लोकबद्ध भाषांतर झालेलें नाहीं म्हणून थोडें कौतुकानें या ग्रथाला कोश म्हटलें तर तें अगदीं अस्थानीं नव्हे असें वाटतें. मूळ कल्पना, एका खडातच हा ग्रथ छापावा, अशी होती. परतु संपूर्ण ग्रथाला खर्च फार लागणार व छापखान्याला कामें फार म्हणून कालवधीहि लागणार या गोष्टींचा विचार करून पुस्तक दोन खडात प्रसिद्ध करण्याचा निर्णय घ्यावा लागला. या ग्रथात, इतर सुभाषितसंग्रहाप्रमाणेंच विषयाप्रमाणें प्रकरणें केलीं ती ५० झालीं असून दोन्ही खडात श्लोकसंख्या साधारण समान ठेवून, पहिल्या खडांत ३० प्रकरणें येतात व बाकीचीं दुसऱ्यांत येतील.

दोन्ही खडमिळून होणाऱ्या या ग्रथात, भर्तृहरीचें संपूर्ण नीतिशतक, अर्धें शृंगारशतक, अर्धें वैराग्यशतक, जवळजवळ सर्व अमरुशतक; जगन्नाथाच्या भामिनीविलासापैकीं बराचसा भाग, कालिदासापैकीं कुमारसंभवातील रतिविलाप व हिमालय-वर्णन; रघुवंशातील अजविलाप, अयोध्या नगरीचा विलाप; त्यागानंतरचा सीतेचा तळतळाट; श्रीशंकराचार्यांचें परापूजा हें स्तोत्र, चर्पटपंजरी — तसेंच विषयानुरोधानें योगवासिष्ठ, रामायण, महाभारत, यातील सुभाषितें, धर्मतत्त्वज्ञानप्रकरणात लोकमान्यांच्या कर्मयोगपर गीतासाराला पोषक श्लोक इतके प्रसिद्ध काव्यखंड असून तीनशेंच्या वर अन्योक्तींचें एक मोठें प्रकरण घातलेलें आहे, तें दुसऱ्या खडात समाविष्ट आहे.

हा ग्रंथ मुख्यत्वें मराठी वाचकासाठींच असल्यानें, संस्कृत श्लोकांचीं वृत्तनामें न दिलीं तरी चालतील असें वाटून पहिल्या २१ प्रकरणातील संस्कृत श्लोकावर वृत्तनामें दिलीं नव्हतीं. पण अनेकांच्या आग्रहावरून तीं पुढें २२ व्या प्रकरणापासून जागच्या जागींच श्लोकावर दिलीं आहेत. व २१ व्या प्रकरणापर्यंतच्या संस्कृत श्लोकांचीं वृत्तनामें दर्शविणारें एक परिशिष्ट शेवटीं जोडलें आहे. प्रत्येक संस्कृत श्लोकाचीं आद्याक्षरें, अ ते ह या क्रमानें, घेऊन तो श्लोक कोठून उद्धृत केला, हें जेथें शक्य झालें तेथें दाखवून प्रत्येक श्लोक या ग्रंथात कोठें सापडेल तें दर्शविणारी सूचि शेवटीं जोडली आहे.

प्रत्येक श्लोक मूळ कोणत्या कवीचा व कोणत्या ग्रंथात आहे ही माहिती मिळण्याबाबत मात्र परिस्थिति अगदीं निराशा-जनक आहे. कोणत्याहि संग्रहकाराचें मत दुसऱ्याशीं जमत नाहीं. महाराष्ट्रात सर्वांमुखीं असलेले कालिदास व भर्तृहरि हे कवि; पण 'भवन्ति नम्रास्तरवः' व 'अनाघ्रात पुष्प' हे कालिदासाचे श्लोक भर्तृहरीच्या शतकत्रयींत आढळतात. भर्तृहरीनंतर अवघ्या ५–६ शतकानीं झालेल्या वल्लभदेवाच्या सुभाषितावलींत तेलंगाच्या नीतिशतकाच्या ११० श्लोकांपैकीं फक्त ४३ च अंतर्भूत आहेत या ४३ पैकीं फक्त ८च श्लोक तो भर्तृहरीचे असे स्पष्ट म्हणतो, २२ श्लोक निनावी (कस्यापि, केषाचित्) म्हणून दर्शवितो. व बाकीचे १३ स्पष्ट नामनिर्देशपूर्वक पुढे दिल्याप्रमाणें दुसऱ्याचे असें म्हणतो – प्रिया न्याय्या वृत्ति (जयादित्य); क्षुत्क्षामोऽपि (रतिसेन); सिंहः शिशुरपि (वज्रायुध), मणि शाणोल्लीढ व शशी दिवस० (भट्टवृद्धि); दुर्जन परिहर्तव्यो (वाल्मीकि); न कश्चिच्चण्डकोपाना (पचतत्र); विपदि धैर्य (मेंठक); इतः स्वपिति (कल्हण), किं तेन हेमगिरिणा (प्रशस्तक); पातितोऽपि करा (क्षेमेन्द्र); शशिदिवाकरयो (फाल्गुनहस्तिनी); नैवाकृतिः फलति (अश्वघोष). एवढी अनिश्चयाची स्थिति बाराव्या शतकात होती तर आज आणखी ८ शतकानंतर कोणताही श्लोक कोणाचा म्हणून दर्शवावा ? त्याला आधार तरी काय ? तेव्हा या बाबतींत फार मोठें संशोधन व्हावयास पाहिजे; व तोंवर ही सर्व माहिती, मिळते तेवढी वाचकापुढें ठेवावयाची इतकेंच करता येण्याजोगें आहे; व तें मी शक्य तेवढें केलें आहे.

सुभाषिताच्या मूळ कर्त्यांविषयीं अशी अंधारमय स्थिति असल्यानें, प्रत्येक श्लोक कोणत्या ग्रंथात, कोणत्या संदर्भात आला आहे तें शोधून त्याला अनुसरून त्याचा अर्थ लावणें हें काम केवढें बिकट आहे याची कल्पना येईलच. माझा स्वतःचा व्यासंग काहींच नाहीं. व निरनिराळीं ग्रंथालयें धुंडाळून हा शोध घेणें, मला माझ्या प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें शक्य झालें नाहीं. तसेंच २२०० श्लोकात सहस्रों पाठभेद असण्याची शक्यता आहे. पाठभेद कसे उत्पन्न होतात याविषयीं एक गमतीची गोष्ट आहे दोन माणसाच्या संवादातील काहीं शब्द ओझरते ५–६ जणानीं ऐकले त्याबद्दल किती पर्याय उत्पन्न झाले पहा. एकजण म्हणतो ते Reindeer (उत्तरध्रुवाकडील एक जनावर) विषयीं बोलत होते. दुसरा म्हणतो, छे ! ते It rained here येथे पाऊस पडला असें म्हणत होते. तिसरा म्हणतो, तसे नव्हे, ते संगीताविषयीं Trained ear सरावलेला कान असे म्हणत होते. चौथा म्हणतो पुढची गाडी केव्हा आहे याविषयी When is the next train, dear ? असा प्रश्न तो असावा ; पाचवा म्हणतो ते Trained deer शिकलेल्या हरिणाविषयीं बोलत होते. पण शेवटीं खरें निघालें, तें असें, कीं, ते एंजिनिअर होते, व तेथें होणाऱ्या धरणात किती क्षेत्रफळाचें पाणी वाहून येईल, त्याचा अदाज, about 50 Sq. miles drained here" असा एकजण दुसऱ्यास सांगत होता ! ! ! ध्वनिसाम्यानें, एका क्षणात, इतके पाठभेद झाले. तर संस्कृतमध्यें, सहस्रों वर्षांच्या काळांत, एका हस्तलिखितावरून दुसरें करताना, एकाचे उच्चार ऐकून दुसऱ्यानें घोकताना, किती अनंत पाठभेद निर्माण झाले असतील, याची कल्पना करवत नाहीं. असे पाठभेद शोधून, चिकित्सा करून, निवड न करतां, हातीं येईल त्या श्लोकाचा माझ्या बुद्धीच्या शक्तीप्रमाणे मी अर्थ लावीत गेलों व त्यामुळें अनेक श्लोकांचा मीं भलताच अर्थ लावलेला असण्याचा संभव आहे. अशी एक चूक नागपूरचे म. म. डॉ. मिराशी यानीं कृपाळू होऊन

दाखविली. (प्र. २ श्लोक ६४) तो श्लोक या ग्रंथात नाहींच असें वाचकांनीं समजावें. पण, पाठभेद तर राहोतच; परंतु मूळ संहिता एकच घेऊनहि, निरनिराळ्या टीकाकारांनीं एकमेकांपासून दोन ध्रुवाइतकें अंतर असलेले, किती निरनिराळे अर्थ लावले, हे पहावयाचें असल्यास, हाल सातवाहनाच्या गाथासप्तशतीतील श्लोकांवरील टीका वाचाव्या. (संदर्भासहित श्लोकाचा कल्पनेनें अर्थ लावण्याचे बाबतींत त्या टीकाकारांपेक्षां मी अधिक दोषी असेन असें वाटत नाहीं) असे, आणखी कित्येक प्रमाद असतील, ते आगाऊच मी पदरात घेतों, व, त्याबद्दल, मी वाचकांची क्षमा याचितों. वाचकांनीं मात्र, अवश्य, असे दोष दाखवावेत. मी त्यांचा आभार स्वीकार करून, पुढच्या आवृत्तीचा योग आल्यास, ते सुधारीन असें आश्वासन देतों.

या ग्रंथाची छपाई चालू असतानाच यातल्या ५० ५० पानांचे संच करून ते अनेक संस्कृत व मराठी भाषाच्या तज्ज्ञांकडे मीं अभिप्रायार्थ पाठविले होते. त्या त्या सज्जनांनीं आपला अमूल्य वेळ खर्चून ते वाचून अभिप्राय पाठविल्याबद्दल त्या सर्वांचा, तसेंच मिथिला इन्स्टिट्यूट (दरभंगा) या संस्थेचे भूतपूर्व संचालक व सध्या पुण्याच्या भांडारकर इन्स्टिट्यूटमध्यें हरिवंशाचें संपादन करीत असलेले विद्वद्वर्य डॉ. प. ल. वैद्य, एम. ए, डी. लिट्. (पॅरिस) यांनीं माझ्या विनंतीस मान देऊन, कार्यबाहुल्यानें त्यांना वेळ नसताहि, लहानशीच का होईना पण प्रस्तावना लिहिल्याबद्दल त्यांचा मी अत्यंत आभारी आहें. या ग्रंथाची छपाई वगैरे कामामध्यें निर्णयसागर प्रेसच्या मंडळींनीं वेळोवेळीं जें सहकार्य केलें त्याबद्दल यांचेहि आभार मानणें अवश्य आहे. छपाई बऱ्याच अंशानें सुबक व शुद्ध झाली आहे, तरी पण शुद्धिपत्रक जोडावेंच लागलें त्याचें कारण प्रुफें तपासण्याचा सराव ग्रंथकर्त्याला नाहीं हेंच होय.

मराठींत सुभाषितांचा ग्रंथ अवश्य झाला पाहिजे म्हणून याच्या छपाईस अत्यंत रुग्णावस्थेंतहि, प्रोत्साहन देणारे, वसई हायस्कूलचे संस्थापक कै. राजारामबापू सामंत हे, याची छपाई पुरी होऊन, ग्रंथ प्रसिद्ध होण्याचे आतच दिवंगत झाले याबद्दल अत्यंत दुःख होतें. त्यांच्या स्मृतीस अभिवादन.

असो. महाराष्ट्रजनता, या भाषांतरित मराठी सुभाषितांचें कसें स्वागत करिते यावरच या ग्रंथाचें यश अवलंबून आहे—

**मंदाक्रान्ता—**

जें जें कांहीं सुरुचिर असे पुस्तकीं या, तयाचें। आहे श्रेय प्रकट सगळें मूळ त्या त्या कवींचें ॥
जें जें कांहीं अनुचित गमे वाचका, दोष तेथे। लागे भाषांतर रचयित्या अज्ञ या लक्ष्मणातें ॥१॥
वाणी नाहीं अजुनि फुटली नीट ज्या, त्या शिशूना। कांहीं अर्थाविणहि बदल्यावांचुनी राहवेना ॥
तन्मातेला मधुर गमती बोबडे बोल तेही। माझे हेही, रसिकजनते! गोड मानून घेई ॥२॥
गीर्वाणाची जरिहि तुलना या मराठीस नाहीं। कृष्णा–गोदा–तटिं जर रुजे यातलें अल्प कांहीं, ॥–
अल्पांशेंही मम कृति, महाराष्ट्रमाते! तुला ही। वाटे माझ्या, तरिहि मजला धन्य मानीन मीही ॥३॥

८२ खटाव बिल्डिंग, लालबाग, मुंबई १२<br>२२–२–६३ महाशिवरात्र

लक्ष्मण गोविंद विंझे

## संस्कृत–मराठी–सुभाषित–कोशाच्या दुसऱ्या खंडास पुरस्कार —

श्री. ल. गो. विंझे यांनी, आजवर इंग्रजी व संस्कृत भाषातील सुंदर सुंदर पद्याचें आणि लघुकाव्याचे पद्यमय भाषांतर मराठी भाषेंत रचून प्रसिद्ध करण्याचा उपक्रम चालविलेला आहे. अशा रचनेचे अनेक संग्रह पुस्तकरूपाने प्रसिद्ध झालेले लोकासमोर आहेतच. श्री. विंझे याचे प्रयत्न अनेक विद्वानाच्या वाजवी प्रशंसेस पात्र झालेले आहेत मीहि त्याची रचना पुष्कळ वर्षापासून पहात आलो आहें त्याच्या संस्कृत–मराठी–सुभाषित–कोशाच्या प्रथम खंडाच्या प्रकाशनसमारंभाचा मी अध्यक्षच होतो. त्यावेळीहि मी व इतर अनेक विद्वानानी उदाहरणें देऊन विंझे याचे यश मुक्तकठानें प्रशंसिलें होते एकवेळ स्वतंत्र रचना करणे साधेल म्हणून तें सोपें आहे. परंतु दुसऱ्यांच्या दुसऱ्या भाषेंतील सुप्रतिष्ठित रचनेचे, मराठीसारख्या भाषेंत यथावत् भाषांतर करणें आणि तेहि पद्यात ही फार अवघड गोष्ट आहे. पूर्वी वामनपंडितानी या कामी यश मिळविले. परंतु श्री विंझे यानी वामनपंडितावरहि ताण केली आहे, हें पाहून मन आनंदानें आणि कौतुकानें भरुन आणि भारून गेल्याशिवाय रहात नाही. विंझे अशी रचना फार जलद करतात, आधिव्याधींनी ग्रस्त असतानाहि करतात. त्याचा व्यवसायहि निराळाच आहे हा सगळा विचार केला, म्हणजे विंझे याच्या ठिकाणी अनुरूप भाषांतर करण्याची एक विशेष शक्ति वास करीत आहे असें वाटतें.

रसिकाची खात्री पटविण्याजोगी उदाहरणे विंझे याच्या प्रकाशित वाङ्मयातून विपुल प्रमाणात आढळून येतील संस्कृत आणि इंग्रजी न जाणणाऱ्यावर विंझे यानी खचित मोठा उपकार केला आहे असे म्हणण्यात अतिशयोक्ति नाही

विशेष समाधानाची गोष्ट अशी की, विंझे यांची पद्यरचना बिलकुल क्लिष्ट नाही प्रासादिक वाटण्याइतकी सोपी आहे

सर्वांनी विंझे याचे ग्रंथ अवश्य संग्रही ठेवण्यासारखे आहेत,

दत्तो वामन पोतदार.
( बी. ए. महामहोपाध्याय
पुणें विद्यापीठाचे भूतपूर्व कुलगुरू भारतीय
संस्कृत समितीचे अध्यक्ष . ...इत्यादि )

## या ग्रंथाच्या प्रथम खंडाविषयी कांहीं विद्वद्रांचे अभिप्राय ( सारांशात्मक ) —

**नागपूरचे म. म. डॉ. मिराशी, M. A. D. Litt.**—" आपलें भाषांतर उत्कृष्ट साधिलें आहे. ते मूळाइतकेंच सरस उतरलें आहे. भाषांतराच्या ( उच्च ) कक्षेटीस आपलें रूपांतर उतरलें आहे, हें लिहिण्यास आनंद होतो. "

**पुणें विद्यापीठ संस्कृतप्रमुख पद्मभूषण डॉ. रा. ना. दांडेकर**—" सुभाषितांची निवड व्यापक दृष्टीची व अभिरुचीची द्योतक आहे. अनुवाद बव्हंशीं मूळार्थग्राही व सुगम झाला आहे. ओढाताण नाहीं. वृत्तभङ्ग व ऱ्हस्वदीर्घ दोष टाळले आहेत. "

**पुणें भांडारकर इन्स्टि. भूतपूर्व प्राचार्य स. प. महाविद्यालय, प्रा. र. दा. करमरकर**—मराठी रूपांतर फारच चांगलें झालें आहे. भाषा ओघवती व प्रसादपूर्ण आहे. संस्कृत व मराठी दोन्ही भाषांवरील ग्रंथकाराचें प्रभुत्व ठायीं ठायीं दिसतें. अशा ग्रंथांना पुणें विद्यापीठानें शक्य तितकें अनुदान देऊन प्रसिद्धिकार्यास मदत करावी.

**म. म. सिद्धेश्वर शास्त्री चित्राव, पुणें**—सुभाषितें निवडक घेऊन, तितकेंच सोपें व ठसठशीत पद्यमय रूपांतर यांत आहे. आशयाशीं प्रामाणिक राहून अत्यंत प्रासादिक शब्दरचना केलेली आढळते. त्यावरून ग्रंथकर्त्याची तन्मयता व भाषाप्रभुत्व व्यक्त होतें. मराठी स्पष्टीकरण देऊन सुभाषितांतील गूढार्थ स्पष्ट केला आहे तो उपयुक्त आहे ग्रंथ लोकप्रिय होईल अशी खात्री वाटते.

**तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ( वाई )**—भाषांतर उत्कृष्ट साधलें आहे. मराठी वाचकाला, संस्कृतमधील हें सुभाषित साहित्य आपल्या या रसिक शैलींतून प्राप्त होणार आहे याबद्दल फार समाधान वाटतें. मार्मिकता, सूक्ष्मव्यवहार-ज्ञान, उच्च नैतिक विचार, व कल्पनाचातुर्य यांचें फार मोठें धन संस्कृत सुभाषितांत साठलेलें आहे. तें या प्रयत्नानें मराठी वाचकांच्या स्वाधीन होणार आहे.

**प्रा. ह. दा. वेलणकर, संस्कृत विभाग प्रमुख, विश्वविद्यालय मुंबई**—भाषांतर, गद्य व पद्य उत्तम साधलें आहे. शक्य तेथें समश्लोकी असून, रस व अर्थ यांची हानि झालेली आढळली नाहीं. सामान्य वाचकाला हें पुस्तक फार उपयुक्त होईल, यांत संशय नाहीं.

**प्रा. र. रा. देशपांडे, रुइया कॉलेज, मुंबई**—श्री. विंझे यांच्या पद्यमय अनुवादाविषयीं एक गोष्ट निःसंदिग्धरीत्या सांगता येईल कीं, तो सुलभ व सरळ आहे हें मूळाशीं ताडून पाहील त्यास पटावें. भाषांतर ' प्रसाद 'मय आहे हें " स्थिर्ति नो रे दध्याः " या एका भाषांतरावरून स्पष्ट होईल.

**प्रा. रा. श्री. जोग पुणें**—निवडक मार्मिक दृष्टि व्यक्त करते. भाषांतराची हातोटी अतुलनीय आहे. भाषेंत सहजता व सफाई आहे. भाषांतर अर्थदृष्ट्या सैल न होण्याबद्दल आपण दक्ष आहां, पण अगदीं शब्दास शब्द ठेवून, भाषांतरात येणारा अवघडपणा, आपण टाळला, ही समाधानाची गोष्ट आहे. धन्यवाद.

**पुणें विद्यापीठ-मराठी प्रमुख प्रा. शं. गो तुळपुळे**—एवढ्या व्यापक सर्वस्पर्शी प्रमाणावर, संस्कृत सुभाषितांचें भाषांतर, मराठी वाचकांना देण्याचा हा उपक्रम अद्वितीयच आहे.

**उपप्रमुख-संस्कृत कोश-डेक्कन कॉलेज-डॉ. राहुरकर पुणें**—ग्रंथ विंझे यांच्या संग्राहकवृत्तीचें, रसिकतेचें व साक्षेपाचें द्योतक आहे. अर्थसौंदर्य, कल्पनासौंदर्य व रचनासौंदर्य अनुवादातही आलें आहे.

**दरभंगा-मिथिला इन्स्टि. भूतपूर्व प्रमुख डॉ. प. ल. वैद्य**—नीतिशतकाच्या वामनपंडितांच्या अनुवादापेक्षां श्री. विंझे यांचा अनुवाद कितीतरी पटीनें सरस व श्रेष्ठ आहे यांत शंका नाहीं.

I have been reading your Sanskrita-Marathi Subhasita-Kosha off and on and I think that is the best way of enjoying Subhashits, and I must say, you have done a wonderfully good job of it. The selection is excellent and the Marathi rendering leaves nothing to be desired. The prose meaning is helpful in the understanding of the original text.

With all good wishes for the success of your edition,

*Dr.* **S. M. Katre** M. A. Ph. D. ( London )
Director Deccan College Post Graduate & Research Institute, Poona 6

# ग्रंथकर्त्याची

## संस्कृत–मराठी–सुभाषित–कोश –दुसऱ्या खंडाची प्रस्तावना.

प्रथम खंडाच्या प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें, जरी हा संपूर्ण कोश एका खंडातच छापण्याचा मूळ विचार होता तरी, खर्च आवाक्याबाहेर जाऊं लागल्यानें एकूण श्लोकसंख्या (सुमारें २२००) पैकीं साधारण ११०० श्लोकापर्यंत ३० प्रकरणावर छपाई थांबवून तेथवर प्रथम खंड करून विक्रीस काढला. निर्णयसागर छापखान्यानें हौशीन पुढाकार घेऊन मुंबईत छापखान्याच्याच जागेंत दि. ५-५-६३ ला या प्रथम खंडाचा छोटासा प्रकाशनसमारंभ केला, याबद्दल त्यांच्या व्यवस्थापकाचा–विशेषत श्री. मोरे यांचा–मी अत्यंत आभारी आहें. पुणें विद्यापीठाचे कुलगुरु म. म. द. वा. पोतदार हे अध्यक्ष लाभले होते. भारतरत्न म म. डॉ. पां. वा. काणे; डॉ. अ. का. प्रियोळकर; कै. प्रा. कृ पां. कुलकर्णी, प्रा. र. रा. देशपांडे; श्री. वा. बा चितळे, श्री. श्री. श. नवरे, श्री. पां बा. गाडगीळ, डॉ. म. वि. सत M S. डॉ. म. वि. सत M D.; डॉ. सौ. सुमन सत. M D, श्री कृ. ह. दमढेरे, श्री. प. चिं. गद्रे, श्री रा. तु. मसुरकर, श्री. अशोक अक्लूजकर इत्यादि निरनिराळ्या क्षेत्रातील प्रमुख व्यक्ति उपस्थित होत्या. "विंझ्याचीं श्लोकबद्ध भाषांतरें हा एक आधुनिक चमत्कार आहे," अशा शब्दात श्री. पां. वा. गाडगीळ यानीं; "हीं भाषांतरें सवाई वामनपंडिताना शोभण्याजोगीं आहेत," अशा शब्दात श्री नवरे यानीं, व "विंझे यानीं, संस्कृत सुभाषितांचें ऋण, तीं मराठी पद्यात व गद्यात आणून, सव्याज फेडिलें आहे" अशा शब्दात कुलगुरु श्री पोतदार यानीं या ग्रंथाचा गौरव केला.

मराठींतील नवशक्ति, मराठा, मार्मिक, केसरी, सकाळ, तरुण भारत, प्रसाद, विवेक, इत्यादींमध्यें या प्रथमखंडावर सविस्तर व उत्कृष्ट अभिप्राय आले; ते साराशानें ग्रंथाच्या शेवटीं दिले आहेत. प्रबोधनकार ठाकरे यानीं मुद्दाम भेटीसाठीं मला बोलावून घेऊन, माझीं पाणपोई आदि सर्व पुस्तकें विकत घेऊन, मार्मिकमध्यें एक पानभर गौरवपूर्ण मजकूर प्रसिद्ध केला. महाराष्ट्राचे विधानसभापति ना. भारदे यानीं मुद्दाम आपल्या कार्यालयात मला बोलावून घेऊन दोन तासपर्यंत माझ्या तोंडून, सुभाषितांचीं माझीं भाषांतरें ऐकून घेतलीं, व कीर्तनसमेलनाच्या आपल्या अध्यक्षीय भाषणात या ग्रंथाचा व माझा आवर्जून उल्लेख करून कीर्तनकार व प्रवचनकारानीं या सुभाषिताचा वापर करण्याची शिफारस केली, व त्यामुळें ह. भ. प. गोविंदबुवा देव, कवीश्वर वगैरे मडळी, मला भेटून या सुभाषिताचा कीर्तनातून उपयोग करण्याचें आश्वासन देऊन गेली. या ग्रंथाचा प्रसार व्हावा, अधिकात अधिक ठिकाणीं हा वाचला जावा यासाठीं व प्रकाशनाच्या खर्चाचा भारहि कमी व्हावा म्हणून मी अनेक व्यक्तींकडे व शालाग्रशालामधून हिंडलों. सर्वत्र या ग्रंथाचें उत्तम स्वागत झालें, ज्याने ज्याने हा ग्रंथ थोडा चाळला तो तो यावर खुश झाला. पाणपोईपासूनच्या माझ्या भाषांतरित श्लोकावर प्रसन्न झालेल्या अनेक रसिकाच्या या मध्यंतरात ओळखी झाल्या (अजूनहि कित्येक अज्ञात असतील). "तुमच्या पुस्तकाच्या वाचनानें मी दुःख विसरलों, व्याधिपरिहार होत गेला" असें लोकनायक मा. श्री. अणे यानीं कळविलें, "तुमच्या पुस्तकाचा Tranquiliser सारखा मन शांतिदायक उपयोग होतो" असें मुंबई विद्यापीठाचे कुलगुरु डॉ. रा. वि. साठे यानीं सांगितलें, "तुमच्या भाषांतरांचा मादक अमल वाचकावर चढतो" असे श्री. विवलकरानीं लिहिलें! आजारपणाच्या काळाचा मीं हा सदुपयोग केला, या घटनेनें प्रभावित होऊन, पूर्वपरिचित असे श्री. चिरपुटकर या गृहस्थानीं किर्लोस्करच्या सप्टेंबर १९६३ अंकात फार मोठ्या माणसाच्या पंक्तीस बसवून माझा अकल्पित असा गौरव केला! "दिशि दिशि निरपेक्षस्तावकीनं विवृण्वन् परिमलमयमन्यो बान्धवो गन्धवाह.।" या किंवा "तरः प्रसूते पुष्पाणि, मरुद्वहति सौरभम्।" या उक्तीप्रमाणें, अचानकपणें, निरपेक्ष, बंधुकृत्य करणाऱ्या, एका गन्धवाहाची भेट झाली. श्री वे. से. गजेन्द्रगडकर हें त्यांचें नांव. महाराष्ट्र राज्य शिक्षणखात्यात हे एक शिक्षणाधिकारी पर्यवेक्षक असून प्रसादमध्यें माझी पाणपोई क्रमशः येत असे, तेव्हापासून, प्रत्येक महत्त्वाची इंग्रजी सूक्ति व तिचें माझें श्लोकबद्ध भाषांतर व आताच्या ह्या सुभाषितकोशाचा बहुतेक भाग, या रसिक, 'विद्याप्रेमी'च केवळ नव्हे,

तर 'विद्यावेड्या' गृहस्थानीं, अगदीं मुखोद्गत केला आहे. व जेथें जेथें हे इन्स्पेक्शनला जातात, तेथें तेथें, विद्यार्थ्यांना माझीं माषांतरित सुभाषितें उतरून देऊन, पाठ करावयास लावतात, ही गोष्ट त्यांनीं, अगदीं अकल्पितपणें झालेल्या आमच्या प्रथम भेटींत जेव्हा मला सांगितली तेव्हा मला केवढा आनंद व अभिमान वाटला हें शब्दानीं सांगणें अशक्य आहे. कवीला, अशा सारखेपी रसिक भेटणें याहून मोठें भाग्य कोणतें?

काहीं सक्रिय सहायकहि भेटले; श्री. भा. ज. ललित; श्री शांताराम गवाणकर; श्री के. रा भिडे; श्री. रा. गो. नवरे; श्री. चरणदास मेघजी इत्यादि विद्याप्रेमी गृहस्थानीं, स्वत साठी केवळ एकेक प्रत न घेतां, प्रसार करण्यासाठी, इतराना भेट देण्यास, या ग्रंथाच्या ५–५ प्रती विकत घेऊन वाटल्या, ही विशेष कौतुकाची गोष्ट होय. संस्कृत विद्यापीठ, पायोनियर हायस्कूल, किंग जॉर्ज गर्ल्स हायस्कूल यानीं 'सुभाषिताचें सौंदर्य' या विषयावर माझीं व्याख्यानें ठेवलीं. विद्यार्थी व शिक्षकाना तीं फार आवडलीं. पायोनियर हायस्कूलनें तर त्याचें टेपरेकॉर्डिंग् ( ध्वनिमुद्रण पट्टिका ) करून ठेवलें! माझ्या पूर्वीच्या इतर पुस्तकाप्रमाणेंच याहि पुस्तकाला डे. व्ह. ट्र. सोसायटीचें पारितोषिक म्हणजेच पेशव्यांच्या हातच्या १०० रु. च्या शालजोडीचा मान मिळाला. महाराष्ट्र टाइम्स पुरस्कृत १९६३ च्या महत्त्वाच्या मराठी पुस्तकाच्या सूचींत या कोशाचा उल्लेख आला. १०० रु. चें इचलकरंजी ग्रंथोत्तेजक पारितोषिकहि या ग्रंथास मिळालें.

ललितलेखन सजविण्यास, संस्कृत सुभाषितें अलंकारासारखीं उपयोगी पडतात. वाङ्मयशोभा, प्रसाद, गोकुळ, मार्मिक यानीं माझीं अनेक सुभाषितें प्रसंगोपात्त छापलीं. कै. लोकमान्यांच्या 'केसरी' सारख्या अग्रगण्य वृत्तपत्रात या सुभाषित-कोशातले अक्षरशः उतारे, अग्रलेख व मध्यस्थ (middle) लेख वगैरे सजविण्यास, गेल्या एक वर्षात अनेक वेळा मुक्तहस्तें वापरण्यात आले. अशा रीतीनें संदर्भ ग्रंथ म्हणून, सुंदर कल्पनाचें हुकमी भांडार असा माझा सुभाषित कोश ठरत आहे, याबद्दल मला धन्यता वाटते. या विषयात 'केसरी' च्या सहसंपादकाचें आलेलें गुणग्रहणपर पत्र अभिप्रायात दिलें आहे. या संदर्भात एकदा असें झालें—

फ्रान्समध्यें एका मोटर अपघातात एका माणसाचें नाक कापलें गेलें, पण तेथील कुशल शस्त्रवैद्यानीं तें अगदीं थोड्या वेळात, होतें तसें, करून दिलें. या विषयावर ललित लेख लिहितांना याच लेखकानीं, पुरुषाच्या नाकावरून स्त्रियांच्या नाका-बद्दल—व पुढें स्त्रियांच्या नासाभूषणविषयीं लिहितांना, "स्त्रियांच्या प्रत्येक अवयवावरील अलंकाराचीं वर्णनें उपलब्ध असता फक्त नाकात घालण्याच्या अलंकाराचा, संस्कृत सुभाषितात उल्लेख नाहीं," असे लिहिलें. मीं लगेच त्याना पत्र लिहून स्त्रियांच्या नासाभूषणाविषयीं सुभाषितकोशात असलेलें सुभाषित व दुसऱ्या खंडात येणारे सुभाषित अशीं दोन्ही सुभाषितें कळविलीं. त्यावरून त्यांनीं लौकरच नंतर लिहिलेल्या लेखात स्त्रीनासाभूषणाच्या त्या सुभाषिताचा उल्लेख तर केलाच, पण, "सुभाषित-कोशांत तुम्हीं विषयवार प्रकरणें केलीं, आद्याक्षराप्रमाणें सूचि दिली, त्याचप्रमाणें सुभाषितातून येणाऱ्या महत्त्वाच्या शब्दाची 'शब्दसूचि' दिली, तर, अमुक वस्तुविषयींचें सुभाषित कोठें सापडेल हें कळल्यानें, सुभाषितकोशाची उपयुक्तता पुष्कळच वाढेल," अशी त्यांनीं मला सूचना केली. सूचना अतिशय चांगली होती. पण या दोन खडापैकीं प्रथम खंड अशा शब्द-सूचीशिवाय छापला गेला आता दुसऱ्या खडापुरतीच 'शब्दसूचि' देणें निजोड ठरणार! तेव्हा सुभाषितकोशाची दुसरी आवृत्ति निघण्याना सुयोग आल्यास ही सूचना अवश्य अमलात आणावयाची एवढेंच सध्या मनाशीं ठरवून ठेविलें आहे.

वक्त्यानीं आपल्या भाषणातून, कीर्तनकारानीं आख्यानातून, लेखकानीं आपल्या लेखातून, शिक्षकानीं विषय समजावून सागताना, विद्यार्थ्यांनीं आपल्या प्रबंधातून व सर्वसाधारण रसिकानीं संवाद संभाषणातून, व गप्पाष्टकाच्या बैठकींतून मुक्तहस्तानें सुभाषिताचा वापर करून त्यातला आनंद लुटावा, यातच इंग्रजी काव्यसूक्तींची पाणपोई व प्रस्तुत संस्कृत-मराठी सुभाषित-कोश अशा पुस्तकाचें सार्थक्य आहे. "सुभाषित मय द्रव्यसंग्रहं न करोति यः। प्रस्तावयज्ञे सम्प्राप्ते, का प्रदास्यति दक्षिणाम्?" ( सु. को. प्र. २ श्लो. ८ पहा. )

मूळ संस्कृत सुभाषित श्लोक रचणाऱ्या मूळ कवींच्या नावाचा शोध आणखी पुष्कळच झाला पाहिजे याबद्दलची माझी रुखरुख, मीं प्रथमखंडाच्या प्रस्तावनेंत प्रकट केलीच होती. दरम्यानच्या काळात मीं भर्तृहरीच्या शतकत्रयीचें संपूर्ण श्लोकबद्ध

भाषांतर पूर्ण केलें असून, सुभाषितकोशाचा हा खड हातावेगळा होताच, मी शतकत्रयी स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध करणार आहें. या निमित्तानें शतकत्रयीच्या अनेक आवृत्त्या पाठभेद वगैरे पाहण्यासाठीं धुंडाळल्या. निदान भर्तृहरी या एकाच कवीचा ध्यास घेऊन, त्याच्याविषयीं अधिकात अधिक सशोधन ग्रथित केलेला, भारतीय विद्याभवनानें प्रसिद्ध केलेला 'भर्तृहरी–सुभाषित–सग्रह' हा ग्रथ वाचण्यात आला. या ग्रथाचे सपादक डॉ. डी. डी. कोसंबी हे वास्तविक गणितशास्त्रातले सुज्ञ. पण त्याच्या आवडीचे विषय संस्कृत व पुराणवस्तुसशोधन! या ग्रथासाठीं त्यानीं जमविलेल्या पोथ्या, हस्तलिखितें व छापील आवृत्त्या वगैरेंची सख्या पाहिली कीं त्याच्या उद्योगाच्या प्रचडपणाची कल्पना येते. या सर्वांच्या मथनानें त्यानी काढलेले निष्कर्ष असे — क्र. १ ते ७ श्लोक त्यानीं unplaced म्हणून दर्शविले आहेत नतर बहुतेक सर्व आवृत्त्यांतून सर्वसाधारण पणें भर्तृहरीचे म्हणून समत (Stanzas generally found in all versions) असे दर्शविलेल्या शतकत्रयींत —६९ श्लोक नीतिशतकाचे, ७१ श्लोक शृगारशतकाचे व ५३ श्लोक वैराग्यशतकाचे मिळून १९३ व ते पहिले ७ मिळून २०० श्लोक आज अस्तित्वात असलेल्या आवृत्त्यातून (आजच्या लोकशाहींतल्याप्रमाणें बेमरवशाच्या) बहुमतानें भर्तृहरी शतकत्रयीचे म्हणा वयाचे. याशिवाय आणखी १५२ श्लोक डॉ कोसबींनीं सशयितश्लोका म्हणून दर्शविले आहेत ते सर्व मिळून एकूण ३५२ श्लोकाचा अतर्भाव करून, प्रस्तुतकाळीं अस्तित्वात असलेल्या शतकत्रयीच्या बहुतेक आवृत्त्या बहुधा बनलेल्या आहेत. त्यात पुन: परस्पर रचनाभेद आहेतच. एकीच्या शृगारशतकातले काहीं श्लोक दुसरीच्या वैराग्यशतकात असे सरमिसळ, उलटसुलट प्रकार दिसून येतात. ( याशिवाय शतकत्रयीव्यतिरिक्त भर्तृहरीच्या नावावर खपणारे आणखीहि ४००-५०० श्लोक या भर्तृहरि–सुभाषित–संग्रहात डॉ. कोसंबींनीं दिले आहेत. )

थोडक्यात असं कीं, आजच्या शतकत्रयीच्या, डॉ. कोसंबींच्या हातीं लागलेल्या आवृत्त्यातील त्याच्याच मतानें सशयित असे १५२ श्लोक वगळता फक्त तीन शतकें मिळून २०० श्लोक जरी Generlly found in all versions असे असले तरी, ते २०० तरी निश्चयानें भर्तृहरीचे असे म्हणता येत नाहीं (भर्तृहरि हा कोण होता, वैय्याकरण होता, कीं, राजा होता कीं, श्रीमताचा, राजाचा वाईट अनुभव आलेला एखादा गरीब शिवभक्त, ब्राह्मण कवि होता, व या सर्वांचा काळ कोणता हें तर विवाद्य आहेच ) परतु डॉ. कोसबींच्या भर्तृहरिसुभाषितसग्रह या ग्रथानतर इ स. १९५७ या वर्षीं हारवर्ड युनिव्हर्सिटी प्रेसनें, विद्याकर यानें सपादित, सग्रहीत (कदाचित् काहीं श्लोक त्यानें स्वत रचिलेले असल्यास तेवढ्यापुरता रचित) अशा सुभाषित–रत्न–कोश नावाचा ग्रथ प्रसिद्ध केला या ग्रथाची मूळ ताडपत्रावर लिहिलेली प्रत राहुल साङ्कृत्यायन यानीं तिबेटातून मिळविली. तीवर, सशोधनाचे, पाठभेदाच्या निवडानिवडीचे, दुर्बोध लिपीच्या वाचनाचे असे अनेक प्रकारचे परिश्रम करून प्रा. व्ही व्ही गोखले व डॉ. डी डी कोसंबी या दोन विद्वानानीं ग्रथरूपानें ती सपादित केली या उभयताच्या मतानें हा विद्याकरकृत सुभाषित–रत्न–कोश इ. स. ११०० व ११३० च्या दरम्यान रचिला असावा म्हणजे, अशा तऱ्हेच्या सुभाषित–संग्रहांपैकीं सर्वांत प्राचीन अशा वल्लभदेवाच्या सुभाषितावलि (इ स. ११६०) पेक्षा हा विद्याकराचा सुभाषित–रत्न–कोश, साधारण पन्नास वर्षांनीं तरी आधींचा आहे, व भर्तृहरीचा स्पष्ट उल्लेख असलेल्या ग्रथात हा, सु र. को. सर्वांत प्राचीन समजला जातो. तेव्हा, या ग्रथात तरी, बहुतेक सर्व शतकत्रयीच्या आवृत्त्यात, भर्तृहरीचे म्हणून अतर्भूत असलेल्या श्लोकाचें कर्तृत्व कोणाकडे दिले आहे, याचा शोध घेता, पुढीलप्रमाणें परिस्थिति दिसते —

डॉ कोसंबींच्या भर्तृहरि–सुभाषित–सग्रहामध्यें बहुमतानें ( Stanzas generally found in all versions) भर्तृहरीच्या मानल्या गेलेल्या २०० श्लोकांपैकीं, केवळ सुमारें ४०-४२ श्लोकच या विद्याकराच्या सुभाषित–रत्न-कोशात अतर्भूत आहेत. यातील अवघे तीनच श्लोक — (१) क्षान्त न क्षमया (२) निदन्तु नीतिनिपुणा (३) त्व राजा ( राजा त्व ),— तो भर्तृहरीचे असे स्पष्टपणें दर्शवितो

ज्याचें स्पष्ट कर्तृत्व ज्ञात होतें (अर्थात् विद्याकराच्या माहितीप्रमाणें) ते श्लोक ( व कसात त्याचा कर्ता) असे — (१) अग्रे गीत (उत्पलराज), (२) अनुचितमिद किंवा इदमनुचितम् (विद्याकालिदास), (३) अमीषा प्राणानां (धर्मकीर्ति), (४) अलमतिचपलत्वात् (धर्मकीर्ति), (५) अवश्य यातार (हरि), (६) असन्तो नाभ्यर्थ्या किंवा प्रिया न्याय्या वृत्ति (धर्मकीर्ति), (७) आरम्भगुर्वी (वाचस्पति), (८) इय बाला मा प्रति (ज्ञानशिव) (९) उदन्वच्छन्ना

भू ) ( राजशेखर ), ( १० ) कुसुमस्तबकस्येव ( व्यास ), ( ११ ) कृमि किंवा क्रिमिकुलचित ( शूल ), ( १२ ) गंगातीरे हिमगिरि० ( कृष्ण ), ( १३ ) गुरुणा स्तनभारेण ( सावर्णि ), ( १४ ) धन्याना गिरिकन्दरेषु ( सत्यबोध ), ( १५ ) भिक्षाशन तदपि ( शिह्लण ), ( १६ ) मातर्लक्ष्मि भजस्व ( लक्ष्मीधर ); आणि सर्वांत आश्चर्याची गोष्ट ही की—( १७ ) यदा किञ्चिज्ज्ञोऽहम् हा श्लोक तो कालिदासाचा म्हणून दर्शवितो ! !

इतर २०–२२ श्लोकांच्या कर्त्यांचा तो उल्लेखच करीत नाहीं. तेव्हा ते भर्तृहरीचेच किंवा निश्चित दुसऱ्या कोणाचे हें विद्याकराला माहीत नव्हतें हें स्पष्ट आहे.

या सु. र. को च्या साक्षेपी संपादकद्वयानीं या संग्रहातील एकेक सुभाषित घेऊन, तें संस्कृत वाङ्मयातील आणखी कोणकोणत्या ग्रथात आढळतें व त्या ग्रथात याचा कोण कर्ता दर्शविला आहे, या सर्वांची अत्यंत परिश्रमपूर्वक माहिती जमवून, ती, या ग्रथाच्या प्रत्येक पानाखालीं, टीपेंत दिली असून, एकेक सुभाषित २ २; ३ ३, केव्हा केव्हा चार चार सुद्धा कवींच्या नावावर निरनिराळे संग्रहकार दर्शवितात भर्तृहरि सोडून इतर सुभाषिताच्या कर्त्यांबद्दल वानगीदाखल माहिती अशी—

( १ ) वपु प्रादुर्भावात् याचे मुञ्ज, रावण व अपराधसुन्दर, (२) यातस्यास्तमनन्तरम् याचे राजशेखर, वसुकल्प व वररुचि, ( ३ ) किं वृत्तान्तै पर० याचे विद्या, तुतातित व मातङ्ग दिवाकर; ( ४ ) कपोले मार्जार याचे भास, विकटनितम्बा, व राजशेखर असे कर्ते कवि म्हणून निरनिराळ्या ग्रथात निरनिराळे उल्लेख येतात. या सर्व धुडाळण्याचा निष्कर्ष असा कीं, बहुमतानें म्हणजे अधिकात अधिक ग्रथात अमुक सुभाषित अमुक कवीचें असे दर्शविलें असल्यामुळें तें सुभाषित त्या कवीचें असें म्हणणें सुरक्षित नाहीं, किंवा अमुक सुभाषित अमुक कवीचें असे निश्चित एखाद्या ग्रथात दाखविलेलें असेल, व इतर कोणत्याहि ग्रथात तें सुभाषित दुसऱ्या कोणाचें असे कोठेंहि दर्शविलेलें नसेल तर तेवढ्यावरून तें सुभाषित त्या कवीच असे समजणें हेंहि सुरक्षित नाहीं. तसेच, केवळ जुन्यात जुना विद्याकर या संग्रहकारानें, " यदा किञ्चिज्ज्ञोऽहम् " हा श्लोक कालिदासाचा म्हटला म्हणजे तो आपणहि कालिदासाचा म्हणणें हेंहि सुरक्षित नाहीं, किंवा " अनाघ्रात पुष्प " व " भवन्ति नम्राः " हे श्लोक आजच्या बहुतेक भर्तृहरि शतकत्रयींत सापडतात म्हणून ते कालिदासाचे नव्हत हें म्हणणेंहि सुरक्षित नाहीं. सारांशानें सागावयाचें तर, तत्त्वज्ञानाचे बाबतींत ओमरखय्यामची जशी स्थिति झाली —

| फिट्झजेराल्डकृत रुबायाचें भाषातर | विंझेकृत मराठी भाषांतर—शा. वि. |
|---|---|
| Myself when young, did eagerly frequent— | विद्वान् साधु अशांचिया कितिकदा मी बाहिंय जात घरीं |
| The Doctor and the saint, and heard great argument, | मोठ्या वादविवादरूप झडल्या कित्येक वर्षांसरी ॥ |
| About it and about, but evermore— | झालीं चर्वितचर्वणें, परि तिथें मी कोरडा राहुनी |
| Came out by the same door, through which I went | ज्या द्वारें शिरलों गृहीं, परतलों मी त्याच दारातुनी ॥ |

तशीच माझी स्थिति, सुभाषिताच्या कर्त्यांचीं नावें शोधण्याच्या विषयात झाली आहे. हा उद्योग करण्यापूर्वी मी ज्या ठिकाणीं होतों तेथेंच अजून आहे.

६

संस्कृत सुभषिताच्या कर्त्यांच्या नावाविषयींची ही दशा पाहूनच, अलीकडील संतकवींनीं आपापल्या कथनांतून " कहत कबीरा, " " मीरा कहे, " " नामा म्हणे, " " तुका म्हणे " असं घालण्याची प्रथा सुरू केली नसेल ना ? अर्थातच इतके करूनहि दुसऱ्या कुणी उपग्सुभानीं स्वत अभंग करून त्यात " तुका म्हणे " हे शब्द घालून आपले अभंग तुकारामाच्या अभंगात घुसडून दिलेच नसतील याचा भरवसा काय ?

सुभाषिताच्या कर्त्यांचा शोध घेण्याच्या या एकदर प्रकारात माझ्या हातीं जी साधनसामग्री आली ती मुख्यत्वें भर्तृहरी-विषयींच असल्यानें या शोधात भर्तृहरीचेंच नाव प्रामुख्याने येतें. पण इतर कोणा कवीविषयीं असाच शोध घेतला तरी

सुभाषिताच्या कर्त्यांच्या बाबतींतल्या अनिश्चितपणाची परिस्थिति विशेष सुधारेल असें वाटत नाहीं या शोधाशोधीमुळे, प्रथम खंडात ११०० पैकीं सुमारें ४०० श्लोकाचें प्राप्तिस्थान देता आलें नव्हतें, ती स्थिति सुधारून या खंडातील ११०० श्लोकांपैकीं १४५ श्लोकाचेंच काय ते प्राप्तिस्थान देता आलें नाहीं. इतर जुन्या सुभाषितसंग्रहाप्रमाणेंच निर्णयसागरचें सुभाषितरत्नभाण्डागारम् हेंहि एक प्राप्तिस्थान म्हणून या खंडाच्या सूचींत निर्देशिलें आहे.

या शोधाशोधीचा दुसरा एक ( मर्यादित का होईना ) लाभ मला झाला तो असा कीं, काहीं सुभाषितातील पाठभेदांवर नवा प्रकाश पडला. भर्तृहरीच्या " शिरः शार्वं स्वर्गात् " या श्लोकात, गंगा ही, स्वर्गांतून 'अधोऽधो' खालीं येत येत, शेवटीं, सागराइतक्या सर्वांत खालच्या पातळीवर उतरली, हा दृष्टांत देऊन अर्थान्तरन्यासानें " विवेकभ्रष्टाना भवति विनिपातः शतमुखः " हा निष्कर्ष कवीनें काढला, तो गंगेच्या बाबतींत इतका विपरीत वाटतो कीं, " गंगेचें उदाहरण फक्त विनिपातापुरतेंच मर्यादित घ्यावें; विवेकभ्रष्ट हें गंगेकडे घेऊ नये " अशी कितीहि मखलाशी केली तरी मनाचें समाधान होत नाहीं. वाल्मीकि-रामायणातल्या कथेप्रमाणे, शंकराच्या जटांत असताना गंगेला गर्व झाला होता, व पुढें जह्नुचा यज्ञ तिने मदोन्मत्तपणे वाहून नेला, या गोष्टी विचारात घेऊन सुद्धा, मूळ स्वर्गांतून ती खाली आली, ती, भगीरथाच्या पूर्वजाचा उद्धार करण्याच्या पवित्र परोपकारी हेतूनेंच;—त्या अर्थी मूळ स्वर्ग सोडताना काहीं ती विवेकभ्रष्ट झाली नव्हती, हा आक्षेप शिल्लक राहतोच म्हणून मी स्वतः "विवेकभ्रष्टाना" या ऐवजी, "स्वधामभ्रष्टाना" किंवा "स्वगेहभ्रष्टाना" हे शब्द सुचविले. ( पहा प्र–४९ श्लोक. ३५) कोणीहि आपल्या मूळ उच्च स्थानावरून उतरला कीं, जगातल्या अत्यंत खालच्या पातळीवर तो उतरू शकतो, हें पुरुषाच्या बाबतींत एकपट खरें, तर स्त्रियांच्या बाबतींत शतपट खरें; ही गोष्ट देशभर महिलाश्रमासारख्या संस्था चालविणाऱ्या सर्व कार्यकर्त्यांना ठाऊक आहे. गंगा ही स्त्री; ( व जात्या निम्नगा ! ) एकदा थोर हेतूनीं का होईना, तिचें उच्च स्थान सुटलें, त्याबरोबर अपरिहार्यपणें, प्रवाहपतितपणें, जगात जितक्या खालच्या पातळीवर उतरणें शक्य ( सागराचा तळ ) तितकी ती खालीं उतरली, म्हणून, गंगेला विवेकभ्रष्ट म्हणावें न लागता, माझे पाठ समर्पक वठतात. आणि अत्यंत आश्चर्याची गोष्ट ही कीं, उपरिनिर्दिष्ट विद्याकराचा जो सुभाषितरत्नकोश ( ज्यातील भर्तृहरीचा उल्लेख कालदृष्ट्या सर्वांत जुना समजला जातो; ) त्यात " विवेकभ्रष्टाना " असा पाठ नसून " पदभ्र [शे] ताना " असा पाठ आहे ! यातील 'ताना 'चा अर्थ लागत नाहीं; तरी तो शब्द कदाचित् ( पुरुष, स्त्री उभयताना लागू असा ) " नृणां " असा तरी असेल किंवा " स्त्रीणां " असा तरी असेल. 'पण विनिपात' हा विवेकभ्रष्टतेशीं संबद्ध न ठेवता पदभ्रष्टाशीं संबद्ध ठेवल्यानें, मी सुचविलेल्या पाठभेदासारखा, ततोतंत अर्थ, यातून निष्पन्न होतो. कै लोकमान्य टिळकाना, एक हरवलेली सांख्यकारिका (टीकेंतल्या जादा शब्दावरून) सापडली तसाच हा प्रकार होऊ पहात आहे. मूळ मीं सुचविले तशाच अर्थाचे शब्द असून ' विवेकभ्रष्टानां ' हा शब्द मागाहून या श्लोकाला चिकटला असें अनुमान यावरून निघतें

मीं माझ्या या द्विखंडात्मक ग्रंथाला ' सुभाषितकोश असें ' नाव भीतभीत दिलें, परंतु विद्याकराच्या सुभाषितरत्नकोशात अवघे ( १७३८ ) श्लोक असून त्याला जर कोश म्हणतात तर माझे मूळ सुमारें २२५० श्लोक व तितकेच मराठी श्लोक मिळून सुमारें ४५०० श्लोकाच्या ग्रंथाला कोश म्हणण्यास संकोच वाटण्याचें कारण आता उरलें नाहीं.

या ग्रंथाचा प्रथम खंड छापून झाल्यावर फलटण संस्थानचे भूतपूर्व दिवाण व 'महाराष्ट्र शाकुंतलाचे ' कर्ते श्री. के. वि गोडबोले याचें मूळ वाल्मीकीच्या रामायणाचें ततोतंत भाषांतर असलेलें ' आर्यारामायण ' हें पुस्तक त्यांनीं मला भेट दिलें. तें वाचून त्यातील संशोधनाचा विचार करता, अनेक सुभाषितातील ( काल्पनिक का होईना ) मूळ कथाचा पायाच उखडला जाऊन, काहीं सुभाषितातील सत्यांश आणखी कमी होणार आहे. श्री. गोडबोल्यांचें रामायणाबाबत संशोधन व निष्कर्ष पुष्कळच विस्तृत आहेत या सर्व निष्कर्षांचा परिणाम, सुभाषिताच्या संदर्भात काय होतो याचा साकल्यानें विचार मीं केलेला नाहीं. केवळ त्यातील तीन निष्कर्षांचा विचार करू.—( १ ) अहल्येला इंद्रानें फसविली नाहीं तर तीच त्याच्यावर भाळली. ( २ ) अहल्या शिला झालीच नव्हती व रामपदरजानीं तिचा उद्धार झाला नाहीं ( ३ ) सीतेचें स्वयंवर झालेंच नाहीं. पैकीं पहिल्या निष्कर्षामुळे ' शुनेव यूना प्रथमं मनोना ' ( प्र. ४१ श्लोक. ३ ) यातला आरोप खोटा ठरतो दुसऱ्या निष्कर्षामुळे रामपदरजानीं शिलेपासून अहिल्या उद्धरिली ही मूलभूत कल्पना असलेले—" शिला बाला जाता " ( प्र. श्लो. ४६ ) ; " शिशिताऽपि सरजिमि " ( प्र. ५० श्लोक १५ ) तसेंच " क्षालयामि तव पादपङ्कजम् " ( प्र. ५० श्लो. १८३ ) या तीन

( व आणखीहि कित्येक ) सुभाषिताचें अधिष्ठान नाहींसे होतें ; तिसऱ्या निष्कर्षानें—सीतास्वयंवराविषयीचा "लज्जा, कीर्तिजनकतनया" (प्र. २५ श्लोक ७) याचा आधार नष्ट होतो. एवढेंच काय पण, वैयक्तिक न्यायापेक्षा राजनीतीप्रणीत लोकाराधन श्रेष्ठ ठरल्यानंतरच्या काळात सीतात्यागाचा भाग रामायणात घुसडला असावा असाहि एक विचारप्रवाह आहे. तें खरें ठरल्यास सबंध उत्तररामचरितसुद्धा निराधार व्हावयाचें ! तें कांहींहि असो , "सुभाषितें हीं पूर्ण सत्य नसून तीं उत्कृष्ट वकिली आहे " अशी अत्यंत सावधगिरीची व वास्तववादी ( प्रथम खंडाची प्रस्तावना पहा ) अशी माझी भूमिका असल्यानें सर्व सुभाषितातील मूलभूत कथा जरी खोट्या ठरल्या तरी सुभाषिताच्या 'सु-भाषित' या गुणात यत्किंचितहि न्यूनता उत्पन्न होते असे मला वाटत नाहीं कित्येक कवींनीं तर, "पुराणातल्या अद्भुतकथा या केवळ कविकल्पना असून आधींच मोठ्या ठरलेल्या कवींनीं लिहिल्या म्हणूनच पचल्या, एरवीं लहान कवींनीं तोलून मापून लिहिलें तरी त्याची टर उडविली जाते; पहा "शैलैर्बन्धयति स्म "(प्र ५० श्लो.२०१) तसेंच " राम वाटतो तितका मोठा नव्हता, रावणहि वाटतो तितका वाईट नव्हता. ती केवळ आद्यकवि वाल्मीकीचीच कामगिरी " "लङ्कापते सङ्कुचितं यशो यत्" (प्र. २ श्लो. ६९)" असें लिहिलें, यावरून " सुभाषितात काय सांगितलें, यापेक्षा कसे सांगितलें यावर वाचकानीं भर द्यावा, कविकौशल्य तेवढें पहावें " या मुद्यावरच संस्कृत कवी येतात सुभाषिताचें रसिकपणें रसग्रहण करण्याच्या वेळीं रुक्ष, क्लिष्ट संशोधनाचे विचार मनात आणणाराना ( प्र. २ श्लोक ४३ ) " काव्यार्थास्वादकाले " या श्लोकात सुभाषितकारानें मारलेल्या फटकाऱ्यानें सावध होऊन वाचकहि सुभाषित वाचताना संशोधनाच्या परिणामाची रुखरुख लावून घेणार नाहींत अशी अपेक्षा आहे.

नागपूरचे संस्कृत पंडित व कवि श्री वर्णेकर यानीं "या कोशात आधुनिक संस्कृत कवींचीं सुभाषितें घेण्यास हवीं होतीं" अशी सूचना केली पण " मालकाच्या परवानगीसह काहीं सुभाषितें पाठवा " असें मीं लगेच त्याना लिहिलें. पण उत्तर नाहीं. त्यानीं स्वकृत काहीं सुभाषितें पाठविलीं असतीं तर मीं या खंडात अवश्य घातलीं असतीं. संस्कृत श्लोकाचें नुसते समश्लोकीच नव्हे तर समवृत्त भाषांतर करण्याचा प्रयत्न अन्योक्ति प्रकरणात केला आहे ३०५ पैकीं २६५ श्लोक समवृत्त केले, ते कसे काय साधले तें रसिकांनीं पहावें

सुभाषित कोशाचा प्रथमखंड प्रसिद्ध झाल्यावर, दुसऱ्या खंडाच्या प्रसिद्धीकरणाच्या मार्गांत अनेक अडचणी व विघ्न उपस्थित झालीं होतीं परंतु म म श्री. द वा. पोतदार, श्री श्री. श. नवरे, श्री न र. फाटक, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी इत्यादि थोर साहित्यिकानीं, मला प्रेमानें, आपुलकीनं, सहानुभूतीनें, विविध प्रकारें मार्गदर्शन केलें, म. म डॉ. वा वि. मिराशी यानी सर्व हस्तलिखित वाचून बऱ्याच चुका दाखवून दुरुस्त्या सुचविल्या, बलवंत पुस्तकभांडाराचे श्री. अण्णासाहेब परचुरे यानीं, सक्रिय व "साथ" साहाय्य केलें, साताऱ्याच्या विमा प्रेसचे मॅ डायरेक्टर श्री. शि गो भावे यानी, वेळ पडल्यास २ महिन्यात सुद्धा पुस्तक छापून देण्याची सिद्धता दाखविली, या सर्वांच्या या साऱ्या साहाय्याबद्दल, तसेंच इतर अनेक ज्ञात, अज्ञात स्नेही चाहत्यांच्या साहाय्यक सदिच्छाबद्दल मी अत्यंत आभारी आहे.

१ ) पुणें विद्यापीठानें या दुसऱ्या खंडास १००० रु. चें प्रकाशन अनुदान संमत केलें, व

२ ) साहित्य, संस्कृति मंडळ, महाराष्ट्र राज्य यानीं १००० रु. चें प्रकाशनार्थ आर्थिक साह्य म्हणून संमत करून प्रत्यक्ष रक्कमहि मला पाठविली.

याबद्दल या दोन्ही संस्थाचा मी अत्यंत ऋणी असून, कृतज्ञतापूर्वक याचा मुद्दाम उल्लेख करीत आहें. या दोन संस्थाच्या अनुदान समितींतील अत्यंत विद्वान् साहित्यिकाना हा ग्रंथ आवडला याबद्दल मला धन्यता वाटते

म. म पोतदारांपाशीं मी अभिप्राय मागितला परंतु प्रस्तावना पुरस्कार शोभण्याइतका मजकूर त्यानीं पाठविला व तोच पुरस्कार म्हणून देण्यास संमतिही दिली ! आधळ्यानें मागितला एक डोळा ! देवानें दिले दोन !

प्रथम खंडाप्रमाणें या खंडाचेंहि महाराष्ट्रात रसिकाकडून स्वागत होईल असा विश्वास आहे.

ल. गो विंझे

८२ खनाथ बिल्डिंग, लालबाग, मुंबई १२
दि १० ऑक्टोबर १९६४

# प्रकरण २१ वें



## प्रवास, विरह, विरही, विरहिणी, विरहोत्तर मीलन—

### (१) प्रवासगमनापूर्वी व नंतर

**मालिनी**

नभसि जलदलक्ष्मीं सास्रया वीक्ष्य दृष्ट्या
प्रवससि यदि कान्तेत्यर्धमुक्त्वा कथंचित् ॥
मम पटमवलम्ब्य प्रोल्लिखन्ती धरित्रीं
यदनु कृतवती सा तत्र वाचो निवृत्ताः ॥१॥

**आर्या**

**विभव नभीं मेघांचें, मम पत्नीनें उदश्रु पाहून ।**
**"करिसी प्रवास नाथा! जर" हें अर्ध्यांत वाक्य सोडून ॥**
**मम वसनातें धरुनी, उकरित भूमी, पदें खुणावीत**
**करती झाली मग ती जें कांहीं तें मला न वर्णवत ॥१॥**

गद्यार्थ—आकाशात, मेघाचें वैभव, खूप भरून आलेलें पाहून माझ्या प्रियेनें, डोळ्यात पाणी आणून, "नाथा! जर तू प्रवासास जाणार—" हें वाक्य, कसे बसे अर्धेच सोडून माझे वस्त्र धरून, पायानी जमीन उकरीत, मला खुणावीत, ती त्यापुढे जें करती झाली, त्याचें वर्णन माझ्यानें करवत नाहीं. ●●●

**शार्दूलविक्रीडित**

गन्तव्यं यदि नाम निश्चितमहो गन्तासि केय त्वरा ?
द्वित्राण्येव पदानि तिष्ठतु भवान्पश्यामि यावन्मुखम् ॥
संसारे घटिकाप्रणालविगलद्वारासमे जीविते
को जानाति पुनस्त्वया सह मम स्याद्वा न वा सङ्गमः ॥२॥

**शार्दूलविक्रीडित**

**जाणें निश्चित हें जरी तव, तरी जाशील ! कां ही त्वरा ?**
**राहा सन्निध तूं उभा; तव मुखा पाहून घेतें जरा ॥**
**कुंभांचें पन्हळांतुनी जळ गळे तैशाच या जीवनीं—**
**होणें मीलन या पुन्हां न अपुलें, जाणील हें कां कुणी ? २**

गद्यार्थ—तुझें जाण्याचें निश्चित झालेंच आहे, तर ठीक आहे. जाशील. एवढी घाई काय आहे! दोन तीन पावलावर तूं उभा राहा. मी तुझें मुख डोळे भरून पाहून घेतें! रहाटगाडगें फिरताना, लोट्यातलें पाणी जसें पन्हळातून सतत वहात जातें, तशासारख्या या जीवनात,—तुझी माझी पुन्हा भेट होईल, कां न होईल, हें कोण जाणूं शकणार ? ●●●

**शार्दूलविक्रीडित**

देशैरन्तरिता शतैश्च सरितामुर्वीभृतां काननै—
र्यत्नेनापि न याति लोचनपथं कान्तेति जानन्नपि ॥
उद्ग्रीवश्चरणार्धरुद्धवसुधः प्रोन्मृज्य सास्रे दृशौ
तामाशा पथिकस्तथापि किमपि ध्यायन्पुनर्वीक्षते ॥३॥

**शार्दूलविक्रीडित**

**आले आड, कितीक देश, सरिता, रानें, अरण्यें गिरि**
**यत्नेंही दिसणें प्रिया न इथुनी, जाणून हें अंतरीं ॥**
**टांचा, मान करून उंच, पुसुनी नेत्रांतले अश्रु ते**
**पाहे त्याच दिशेस पांथ, न कळे चिंतोनिया काय तें ! ॥३॥**

गद्यार्थ—कान्तेपासून पुष्कळ दूर आल्यानें, तिच्या व स्वताच्या मध्यें कित्येक देश, शेंकडों नद्या, डोंगर, अरण्ये आड आलेली आहेत, व या ठिकाणापासून प्रयत्नानींसुद्धा, आपली प्रिया दिसणें शक्य नाहीं, हें कळत असूनहि, हा बिचारा प्रवासी टाचा, मान उंच करून, डोळ्यातले अश्रु पुसीत—कसला विचार करीत, कोण जाणे, त्याच दिशेकडे पुन्हा पहात आहे! ●●●

**अनुष्टुभ्**

हारो नारोपितः कण्ठे मया विश्लेषभीरुणा ।
इदानीमन्तरे जाताः पर्वताः सरिता द्रुमाः ॥४॥

**अनुष्टुभ्**

**तुझ्यामाझ्यांत साहेना हाराचें मज अंतर ।**
**आलें दोघांत गे आतां नद्या, गिरि, वनांतर ॥४॥**

किंवा हेंच आर्येत—

**न घडो वियोग म्हणुनी हारहि मी घातला न कंठांत !**
**आतां आले पर्वत, सरिता, तरु हाय ! आड उभयांत ॥४॥**

गद्यार्थ—(सीताहरणानंतर राम शोक करतो.) गळ्यांत हार घातला, तर सीतेच्या व माझ्या भेटींत हाराच्या जाडीच्या इतकें तरी अंतर राहून, तिलक्या अंशानें, तो वियोगच घडेल; हें सुद्धां मला सहन होत नसे, म्हणून सीतेला भेटतांना, मी हारसुद्धां गळ्यांत घातला नाहीं! आणि, आतां...हाय! हाय! पर्वत, नद्या, अरण्यें इतक्यांचें आम्हां उभयतांत अंतर पडलें आहे! ●●●

आर्या

किमिति सखे! परदेशे गमयसि दिवसान्धनाशयं लब्धुम्?
वर्षति मौक्तिकनिकरं तव भवनद्वारि काञ्चनी वल्ली ॥५॥

आर्या

**कां मित्रा! परदेशीं धनराशीस्तव दिनांस घालविसी?**
**करिते मौक्तिकवृष्टी सुवर्णवल्ली तुझ्याच दाराशीं ॥५॥**

गद्यार्थ—(धनप्राप्तीसाठीं परदेशीं गेलेल्या प्रवाशास—) मित्रा! धनराशींसाठीं परदेशांत, कां दिवस कंठीत आहेस? अरे, तुझ्या दाराशीं, सुवर्णवल्ली (तुझी सुंदर पत्नी) मौक्तिकांची (अश्रूंची) वृष्टि तिकडे करीत आहे! ●●●

अनुष्टुभ्

यदि वा याति गोविन्दो मथुरातः पुनः सखि।
राधाया नयनद्वन्द्वे राधानामविपर्ययः ॥ ६ ॥

अनुष्टुभ्

**मथुरेहून हा कृष्ण जर जाई पुन्हां कुठें।**
**राधेच्या दोन नेत्रांत होई ' राधा ' विरुद्ध तें ॥ ६ ॥**

गद्यार्थ—सखे! जर हा कृष्ण, आतां, पुन्हां, मथुरेहून दूर जाईल, तर, राधेच्या दोन्ही डोळ्यांतून, राधा शब्दाच्या उलट होईल (अश्रूंच्या धारा वाहूं लागतील.) ●●●

आर्या

आलोकयति पयोधरमुपमन्दिरमभिनवाम्बुभरनीलम्।
दयितारचितचितानलधूमोद्गमशङ्कया पथिकः ॥ ७ ॥

आर्या

**स्त्री.पेटवी चिता जी, धूर तिचा काय हाच? शंका ही**
**पथिका ये, जधिं नवजलनीलघना तो घराजवळ पाही ७**

गद्यार्थ—(प्रियेपासून दीर्घकाळ दूर राहिल्यानें, प्रवाशाला वाटतें, कीं, तिनें आपली आशा आतां सोडली असेल.) प्रवाशानें जेव्हां घराजवळ, नवजल भरल्यानें, निळ्याकाळ्या अशा, मेघांस पाहिलें, तेव्हां; (हृदयांत घस्स होऊन) त्याला शंका आली कीं, (माझ्या दीर्घ विरहानें जिवाला कंटाळून, आत्महत्येसाठी) प्रियेनें जी चिता पेटविलेली असेल, तिचा हा धूर तर नसेल! ●●●

## (२) विरही

आर्या

नूनमयं मे पापः कान्ताविरहो रसायनीभूतः।
वर्षसहस्राण्यधिकान्नयामि कथमन्यथा दिवसान्? ॥८॥

आर्या

**कांतेचा विरह मला झाला दिव्यौषधीच जणुं सरस।**
**ना तर कसा जगे मी वर्षशतांहुनि सुदीर्घ हे दिवस ॥८॥**

गद्यार्थ—माझ्या प्रियेचा विरह हाच मला (दीर्घायुषी करणाऱ्या) दिव्य औषधीसारखा झालेला दिसतो! नाहींतर सहस्र वर्षांपेक्षां दीर्घ हे दिवस, मी कसा जगत आहे? ●●●

आर्या

सङ्गमविरहवितर्के वरमिह विरहो न सङ्गमस्तस्याः।
सङ्गे सैव तथैका त्रिभुवनमपि तन्मयं विरहे ॥९॥

आर्या

**संगाहुनी प्रियेच्या, विरह बरा वाटतो विचारान्तीं।**
**संगांत एकटी ती; विरहीं त्रिभुवन भरून राहे ती ॥९॥**

गद्यार्थ—प्रियेचा संगम, व विरह, या दोघांचा विचार करता, संगमापेक्षां, तिचा विरहच बरा, असें वाटतें; कारण, संगमांत ती एकटी एक व्यक्तीच काय ती मला दिसते. पण *विरहांत, मला ती त्रिभुवन व्यापून राहिलेली दिसते.* ●●●

शार्दूलविक्रीडित

"सौमित्रे! ननु सेव्यतां तरुतलं चण्डांशुरुज्जृम्भते"
"चण्डांशोर्निशि का कथा? रघुपते! चन्द्रोऽयमुन्मीलति!"
"वत्सैतद्विदितं कथं नु भवता?" "धत्ते कुरङ्गं यतः"
"क्वासि प्रेयसि हा! कुरङ्गनयने! चंद्रानने! जानकि!" १०

शार्दूलविक्रीडित

**"घे विश्रांतिस लक्ष्मणा! तरुतळीं; चंडांशु तापे पहा!'**
**"रात्रीं कोठुनि सूर्य हे रघुपते? आला नभीं चंद्र हा॥**
**"कैसें जाणसि तूं?" "कुरंगचि तिथें तो स्पष्ट पाहून कीं"**
**"हा! कोठें असशी कुरंगनयने चंद्राननेजानकि? १०**

गद्यार्थ— ( सीताविरहानंतर, सीतेचा शोध करता करता विरहाग्नीच्या दाहामुळें रामाची स्थिति भ्रमिष्टासारखी झाली ! दिवस आहे कीं रात्र ? याची सुद्धा शुद्ध, त्याला राहिली नाहीं ध्यास एक, सीतेचा ! म्हणून, त्याच्या समोर सीतेचें नाव काढावयाचें नाहीं, अशी लक्ष्मण काळजी घेई, पण दुरून, धागा जुळून, अचानक सीतेची त्याला स्मृति होई व त्याचा शोक स्फोट होऊन बाहेर पडे ! ) राम म्हणतो ! "लक्ष्मणा ! ये, या झाडा-खालीं ( सावलीला ) विश्रांति घे ! सूर्य फारच तापला आहे !" लक्ष्मण उत्तरतो, "रघुपते ! अरे, रात्रीं सूर्याची गोष्ट का काढतोस ? अरे हा चंद्र प्रकाशत आहे !" राम विचारतो "वत्सा, हें तू कशावरून ओळखलेस ?" लक्ष्मण म्हणतो "त्यावर कुरंगाची ( हरिणाची ) आकृति दिसते त्यावरून !" ( सूर्यावर ती कधीं दिसते काय ? ) या संवादात कुरंग, चंद्र हे शब्द आल्यानें रामाला सीतेची आठवण होऊन शोकविव्हल-पणें तो विचारतो "हाय ! हाय ! प्रिये, कुरंगनयने ! चंद्रानने ! जानकि, तू कोठ आहेस ?" ●●●

स्वागता

मन्दरेण मथितोऽसि न पापिन्ग्रासितोऽसि तमसा न दुरात्मन् !
त्वा शरेण शतधा ह्यकरिष्य जानकीमुखसमो यदि न स्या ११

वसंततिलका

कां मंदरें घुसळिलें न तुला जलात
कां राहुनें न गिळिलें तुजला नभांत ? ॥
सीतामुखासि नसलें जर साम्य तूस
मारून बाण शतधा करितोंच खास ॥ ११ ॥

गद्यार्थ— ( विरहाग्नीचा दाह, चंद्र अधिकच वाढवितो, हें पाहून, राम, त्यावर संतापून म्हणतो— ) अरे चांडाळा ! ( समुद्रमंथनाच्या वेळीं, त्यातून तुला वर येऊ न देतां पाण्यातल्या पाण्यातच ) मंदरपर्वतान घुसळून घुसळून तुला नष्ट कसा केला नाहीं ? ( आकाशात ) राहूनें ( संपूर्णपणें ) तुला गिळून का टाकलें नाहीं ? तुझ सीतेच्या मुखाशीं साम्य नसतें तर मीच तुला बाणानी मारून तुझ्या शंभर चिंध्या करून टाकल्या असत्या ! ●●●

अनुष्टुभ्

सीताचिन्ताकुले रामे निद्रा निरगमद्रुषा ।
कथमेकाकिन जह्यामित्येत्र न जहौ निशा ॥ १२ ॥

शार्दूलविक्रीडित

सीतेला जधि राम चिंतित वसे, नेतां तिला रावणें,
निद्रा सोडुनि जाइ त्यास, जणुं कीं मात्सर्यरुष्टे मनें ॥
रामाला परि दीर्घ दीर्घचि कशा रात्री जहाल्या पहा–
सोडी त्यास निशा न, वाटुनि दया कीं, "एकला
राम हा !" ॥ १२ ॥

गद्यार्थ— ( सीताविरहात रामाला झोंप का येईना व त्याला रात्री एवढ्या दीर्घ व अनंत का वाटल्या याचें साधारण मानवाहून निराळेच कारण, कविदृष्टीला दिसलें ! श्यामसुंदर रामावर दोन सुंदरी भाळलेल्या होत्या व सीता एकदाची केव्हा दूर होते याची त्या वाटच पहात होत्या ! ) राम सीतेचाच ध्यास घेऊन बसलेला ( व आपल्याकडे बघत सुद्धा नाहीं हें ) पाहून निद्रा ( ही एक सुंदरी ) त्यावर, ( मत्सरानें ) रागा-वून, त्याला सोडून चालती झाली. ( दुसरी सुंदरी ) निशा जरा दयाळू होती. रामाची शुश्रूषा, सेवा करायला, सीता नाहीं,– निद्राहि गेली, त्या बिचाऱ्याला एकटा कसा टाकावा, म्हणून निशा त्याला न सोडता, त्याची दीर्घकाळ सोबत करीत असे. ●●●

आर्या

उपनिषद: परिपीता गीताऽपि च हन्त मतिपथ नीता !
तदपि न हा ! विधुवदना मानससदनाद्बहिर्याति ॥ १३ ॥

आर्या

प्यालों उपनिषदें तीं, केली गीताहि पाठ ती सारी !
तरिहि न विधुवदना ती मनसदनातून जाइ बाहेरी १३

गद्यार्थ—( विरहास विसरण्यास ) उपनिषद कोळून प्यालों, गीता अगदी मुखोद्गत केली, तरीहि ती सुंदर चंद्रवदना, माझ्या मनरूपी सदनातून, बाहेर जात नाहीं ! ●●●

उपजाति

विलासिनी काञ्चनपट्टिकायां पाटीरपङ्केर्विरही विलिख्य ।
तस्या: कपोले व्यलिख'प'वर्गमोष्ठे 'त'वर्गं चरणे 'ट'वर्गम् ॥

उपजाति

स्त्रीचित्र गंधेंच सुवर्णपृष्ठीं
मनोविनोदा विरहीच काढी ॥
गालीं तियेच्या लिहिला 'प'वर्ग
'त'वर्ग ओष्ठीं, चरणीं 'ट' वर्ग ' ॥ १४ ॥

गद्यार्थ— एका विरही पुरुषानें, सोन्याच्या पाटावर, चंदनाच्या गधानें, आपल्या प्रियेचें चित्र काढलें. आणि गालावर 'प'; ओष्ठावर 'त'; व पायावर 'ट'; अशीं अक्षरें काढलीं! ('प' हें 'प' वर्गाचें (ओष्ठ्य). दोन्ही ओठ मिटल्याशिवाय 'प' म्हणता येत नाहीं. अर्थात, 'प' वर्ग हा चुंबनाचा सूचक म्हणून तो गालावर काढला. 'त' हें दतव्य! म्हणून, दतव्रण करण्याच्या जागीं, म्हणजे ओष्ठावर, 'त' वर्ग लिहिला. 'ट' हें मूर्धन्य. म्हणजे टाळूशीं, डोक्याशीं संबद्ध, व डोकें टेकण्याचें सूचक! प्रियेचा अनुनय करताना, ज्या जागीं मूर्ध टेकावयाचें त्या पायावर, यासाठीं 'ट' हें मूर्धन्य लिहिलें.)

●●●

अनुष्टुभ्

यदि स्मरामि तन्वङ्गीं जीविताशा कुतो मम?।
अथ विस्मृत्य जीवामि जीवितव्यसनेन किम् ॥ १५ ॥

वसंततिलका

जेव्हां प्रिये! तुजसि मी स्मरतों मनांत
आशा तदा नुरतसे मज जीवनांत ॥
राहूं वधें तुजसि विस्मरनीच जेव्हां
गोडीच जीवनिं नुरे मजलागिं तेव्हां ॥ १५ ॥

गद्यार्थ—प्रियेचें स्मरण करीत जगावें, तर, विरहानें, दुःखानें कोणत्याहि क्षणीं मृत्यु येईल, म्हणून, जीवनतली आशाच खुंटून जाते. बरें, तिला विसरून जगावें, तर, जगण्याचें सकट ज्यासाठीं सोसावें, असा अर्थ, अशी गोडीच त्यात उरत नाहीं! ●●●

द्रुतविलंबित

अहमिहैव वरानपि तावकस्त्वमपि तत्र वसन्नपि मामका ॥
हृदयसङ्गम एव सुसङ्गमो न तनुसङ्गम एव सुसङ्गमः॥

द्रुतविलंबित

तवचि मी, वसतों जरि हा इथें
ममचि तूं असती वसुनी तिथें ॥
हृदयमीलन हेंच सुमीलन
न तनुमीलन मात्र सुमीलन ॥ १६ ॥

गद्यार्थ—हे प्रिये, मी जरी (तुझ्यापासून दूर) इथें रहात आहें तरी तुझाच आहें. तू तिथें (दूर) रहातेस, तरी, माझीच आहेस. हृदयमीलन, हेंच उत्तम मीलन, केवळ तनुमीलन, हेंच काहीं उत्तम मीलन नसतें. ●●●

आर्या

कृष्णा ते कचसंहतिरम्बुजनयने तवाधरः शोणः।
त्वं सुरतरङ्गिणी कथमभितस्तापी न ते वियोगः स्यात्? १७

आर्या

वेणी तव ही कृष्णा, हे कमलाक्षी तुझा अधर शोण!
तूं सुरनदी स्वयें मग तापी तव कां वियोग व्हावा न? १७

गद्यार्थ— हे कमलाक्षि! तुझी वेणी ही कृष्णा (काळी; किंवा कृष्णानदी) तुझा अधर हा शोण (लाल; किंवा शोण नावाचा नद) तू स्वतः सुरनदी (गगानदी; स्वच्छ, सुदर, शीतल, पवित्र,) मग तुझा विरह तापी (तापदायक; किंवा तापी नदी) का होणार नाहीं? (एक बाजूनें सौंदर्यवर्णन व दुसरीकडून नद्यांचीं नावें आणलीं आहेत)

●●●

अनुष्टुभ्

स्मर्तव्योऽहं त्वया कान्ते! न स्मरिष्याम्यहं तव।
स्मरणं चेतसो धर्मस्तच्चेतो भवदाहृतम् ॥ १८ ॥

अनुष्टुभ्

स्मृति माझी धरीं कांते! मी तुझी ठेवणार न!
स्मृति हा धर्म चित्ताचा तें तूं नेलेंस चोरुन ॥ १८

गद्यार्थ— कान्ते! आठवण ठेवावयाची, ती, तूच माझी ठेव; मी काहीं तुझी ठेवणार नाहीं! कारण, आठवण हा हृदयाचा धर्म आहे; आणि, माझें हृदय तर तूच चोरून नेलें आहेस! (किंवा २ ते ४ ओळीत प्रियेचें उत्तरहि असू शकेल.)

●●●

वसंततिलका

द्यूते पणः प्रणयकेलिषु कण्ठपाशः
क्रीडापरिश्रमहरं व्यजनं रतान्ते ॥
शय्या निशीथसमये जनकात्मजायाः
प्राप्तं मया विधिवशादिदमुत्तरीयम् ॥ १९ ॥

शार्दूलविक्रीडित

द्यूतीं जो पण; कण्ठपाश, रमतां प्रेमांत, जो जाहला
झाला जो सुरतश्रमापहरणा पंखा रतान्तीं भला ॥
रात्रीं आळस वाटतां कधिंकधीं शय्येपरी योजिला
सीतेचा मज तोच दैवगतिनें शेला अहा लाभला ॥ १९ ॥

गद्यार्थ—(रामाला सीतेचा शेला सापडला तेव्हाचे त्याचे उद्गार) प्रेमाच्या खेळात आम्ही द्यूत खेळताना, जो शेला, पण म्हणून लावीत असू, एकमेकाना जवळ ओढण्यासाठीं, ज्याचा कळपाश आम्हीं केला सुरतश्रमानंतर उकाडा घालविण्यासाठीं, ज्याचा पंखा म्हणून उपयोग, आम्ही केला, कधीं, रात्रीं, आळस आला, तर ज्यावरच आम्ही झोंपत असू, असा तो (इतक्या प्रेमळ स्मृतींनीं भरलेला व भारलेला) सीतेचा शेला, आज, दैवयोगानें, माझ्या हातीं आला, हें केवढे भाग्य?

●●●

मन्दाक्रान्ता

भित्त्वा सद्य किसलयपुटान्देवदारुद्रुमाणा
ये तत्क्षीरस्रुतिसुरभयो दक्षिणेन प्रवृत्ता ॥
आलिङ्ग्यन्ते गुणवति! मया ते तुषाराद्रिवाता
पूर्वं स्पृष्टं यदि किल भवेदङ्गमेभिस्तवेति ॥ २० ॥

मन्दाक्रान्ता

पानापानातुनि घुसुनि, जो दक्षिणेच्या दिशेनें
वाहे वारा सुरभि बनुनी देवदारू चिकानें ॥
आलिंगी मी पवनहि सखे! तो हिमाद्रीवरील—
वाटे, यातें प्रिय तव तनुस्पर्श झाला असेल ॥ २० ॥

गद्यार्थ— (मेघदूतातील यक्ष आपल्या प्रियेला कळवितो—) हे गुणी प्रिये! देवदाराच्या चिकामुळें सुगंधित झालेले, आणि, कोवळ्या पानाच्या झुपक्यातून घुसून, वाट काढीत, उत्तरेकडून, दक्षिणेच्या दिशेनें वहात येणारे, हिमालयाकडील वारे, त्याना निश्चितपणें, तुझा अंगस्पर्श घडलेला असणार, या कल्पनेनें, मी अंगावर घेऊन आलिंगीत असता!

●●●

मन्दाक्रान्ता

प्रासादे सा दिशि दिशि च सा पृष्ठत सा पुर सा
पर्यङ्के सा पथि पथि च सा तद्वियोगातुरस्य ॥
हहो चेत प्रकृतिरपरा नास्ति मे काऽपि सा सा
सा सा सा सा जगति सकले कोऽयमद्वैतवाद ॥ २१

मन्दाक्रान्ता

प्रासादीं ती! दशदिशिंहि ती! मागुती ती! पुढें ती
शय्येला ती! विरह घडता मार्गमार्गीं दिसे ती!॥
चित्ता! माझी प्रकृति न दुजी अन्य कोणीहि ती! ती!
ती! ती! ती! ती! सकल जगतीं काय अद्वैत चित्तीं!

गद्यार्थ—प्रासादात ती! सर्व दिशात ती! मागे ती! पुढे ती! शय्येवर ती! विरहातुर मला मार्गामार्गांतून सर्वत्र तीच दिसते. हे माझ्या चित्ता! माझी प्रकृति दुसरी कुठली नाहीं, तीच! ती ती! ती! ती! ती! सर्व जगभर ती! काय हा विलक्षण अद्वैतवाद! (प्रकृति व पुरुष एकरूप झाले!)

●●●

## (३) विरहिणी

शार्दूलविक्रीडित

आहारे विरति समग्रविषयग्रामे निवृत्ति परा
नासाग्रे नयन तदेतदपर यच्चैकतान मन ॥
मौन चेदमिद च शून्यमखिल यद्विश्वमाभाति ते
तद् ब्रूया सखि योगिनी किमसि भो किंवा वियोगिन्यसि २२

शार्दूलविक्रीडित

खाशी अन्न मुळीं न सर्व विषयीं आली निवृत्ती पुरी
नासाग्रीं नयनें धरून बसली एकाग्रचित्तापरी ॥
घेसी मौनचि विश्व सर्व तुजला हें शून्यसें भासतें
तू का योगिनि वा वियोगिनि सखे झालीस गे साग तें॥

गद्यार्थ—मुळीं अन्न खात नाहींस सर्व विषयाचे ठायीं तू निवृत्त झाली आहेस! नाकाच्या शेंड्यावर दृष्टि लावून, तू एकाग्रचित्त बसली आहेस! इकडे, मौन धारण केलें आहेस, आणि, सारें विश्व तुला शून्य भासत आहे! सखे! तू काय योगिनी झाली आहेस, कीं, वियोगिनी, तें साग बरें!

●●●

शार्दूलविक्रीडित

पक्ष्माग्रग्रथिताश्रुबिन्दुनिकरैर्मुक्ताफलस्पर्धिभि
कुर्वन्त्या हरहासहारि हृदये हारावलीभूषणम् ॥
बाले! बालमृणालनालवलयालङ्कारकान्ते करे
विन्यस्याननमायताक्षि सुकृती कोऽय त्वया स्मर्यते? २३

शार्दूलविक्रीडित

डोळ्यातून सुमौक्तिकापरि सखे! अश्रू तुझे वाहुन
झाले ते शिवहासशुभ्रहृदयीं हारापरी भूषण॥
टेकोनी मुख, पद्मतन्तुवलयें सौंदर्यशाली, करीं
सागे! आठविसी सुधन्यचि अशा कोणास तू सुंदरी?

गद्यार्थ—मोत्याशीं स्पर्धा करणाऱ्या, पापण्याच्या टोकाशीं लटकून टपटप खाली पडणाऱ्या अश्रूंनी, शंकराच्या हास्याइतक्या

शुभ्र तुझ्या हृदयावर, हाराच्या रागांची शोभा आणीत, बिसतन्तूच्या वलयांनीं, सौंदर्यशाली झालेल्या, हातामध्यें, आपलें मुख टेकून, हे सुंदरि ! तू कोणा सुधन्य पुरुषाचें स्मरण करीत आहेस ?

●●●

शार्दूलविक्रीडित

धम्मिल्लं न परिष्करोति कुसुमैर्नालङ्करोत्याननं
लीलाकीरकिशोरमादरतया नालापयत्याकुला ।।
नोल्लासं प्रतिपद्यते न तनुते सलापमालीजनै—
म्लाना चम्पकमालिकेव विरहे स्त्रीणां सदा वर्तनम् ।।२४।।

शार्दूलविक्रीडित

**शृंगारी नच केश माळुनि फुलें, ना शोभवी आनन**
**बोले कीरशिशूस आकुलमनें खेळांतही शब्द न ॥**
**होई भाषण ना सख्यांप्रति, मना उल्हास वाटेच न**
**चांफा होइ मलूल, तेवि, विरहीं स्त्रीचें सदा वर्तन ॥२४॥**

गद्यार्थ—फुलें घालून केस शृंगारीत नाहीं, मुखाला शोभा आणीत नाहीं, खेळायच्या पोपटाच्या पिल्लाशीं, आस्थेनें, दोन शब्द बोलावयाचे, तेहि अतर्व्यग्रतेनें बोलत नाहीं, जिवाला उल्हास वाटत नाहीं,— सख्यांशीं सुखसंवाद होत नाहीं,—एकाद्या कोमेजलेल्या चंपकमालेसारखें विरही स्त्रीचें वागणें असतें.

●●●

अनुष्टुभ्

या पश्यन्ति प्रियं स्वप्ने धन्यास्ता खलु योषितः ।
अस्माकं तु गते कान्ते गता निद्राऽपि वैरिणी ।।२५।।

अनुष्टुभ्

**प्रियातें जी बघे स्वप्नीं सखे ! स्त्री धन्य ती खरी ।**
**नाथासवेंच गेली गे मन्निद्रा वैरिणी परी ॥ २५ ॥**

गद्यार्थ—(सखे !) ज्या स्त्रिया, स्वप्नात का होईना, (विरहात,) आपल्या प्रियकराचें मुख पाहतात त्या धन्यच ! परंतु, माझी निद्रा वैरिणी, माझ्या प्रियासमवेतच माझ्यापासून दूर गेली ! ( स्वप्न पडायला झोंप तर आली पाहिजे ना ! )

●●●

द्रुतविलंबित

अयमसौ दिवसो न पुनर्निशा ननु निशैव वरं न पुनर्दिनम् ।
उभयमेतदुपैत्वथवा क्षयं प्रियजनेन न यत्र समागमः ।।२६।।

द्रुतविलंबित

**दिनचि गे बरवा; परि रात्र न**
**मज बरी रजनी, न लगे दिन ॥**
**क्षय असो परि या उभयांप्रति**
**प्रियजना न घडे जर संगति ॥ २६ ॥**

गद्यार्थ—विरहिणीला, केव्हा केव्हा, वाटतें, दिवसच बरा ! रात्र नको. ( दिवस कसाहि सखीजनासमवेत किंवा कार्यव्यापृतत्वात काढता येतो. ) केव्हा वाटतें, आपली रात्र बरी ! ( निर्वेधपणें प्रियकराचें चिंतन करता येतें. दिवसा तें जमत नाहीं, म्हणून- ) दिवस नको. पण, दिवसा काय किंवा, रात्रीं काय, केव्हाच जर प्रियजनाच मीलन व्हायचें नसेल, तर आग लागो, दिवस व रात्र, दोघानाहि !

●●●

द्रुतविलंबित

कति न सन्ति जना जगतीतले तदपि तद्विरहाकुलितं मनः ।
कति न सन्ति निशाकरतारकाः कमलिनी मलिनी रविणा विना ।। २७ ।।

द्रुतविलंबित

**किति न कां जगतीं असती जन ?**
**परि सख्याविण आकुल हें मन ॥**
**नभि शशी न न कां किति तारका ?**
**कमलिनी मलिनी रविवीण कां ? ॥ २७ ॥**

गद्यार्थ—जगभर माणसें थोडीं का आहेत ? पण एका प्रियकरावाचून ( एकलकोंडें ) मन व्याकुळ होतें खरें ! आकाशात चंद्र तारे काय थोडे आहेत ? पण, एका सूर्याविना कमलिनी मलिन होत नाहीं का ?

●●●

शिखरिणी

" इदानीं तीव्राभिर्दहन इव भाभिः परिवृत
किमाश्चर्यं सूर्य, किमु सखि रजन्यामुदयति ? " ।।
" अयि मुग्धे चन्द्र " " किमिति मयि तापं प्रकटय—"
" त्वनाथानां बाले ! किमिव विपरीतं न भवति ?" ।।२८।।

शिखरिणी

**" कसा आतां रात्रीं रवि उगवुनी चंडकिरण**
**सखे ! जाळी मातें सतत जणुं आश्चर्य घडुन ? " ॥**
**" शशी हा गे मुग्धे ! " " मग मजचि कां ताप प्रकटे ? "**
**" अनाथांना, बाले ! जगतिं न घडे काय उलटें ? " २८**

गद्यार्थ— (१० व्या श्लोकातल्या रामाप्रमाणेंच या विरहिणीची अवस्था झाली आहे.) ती म्हणते "काय ग सखे, ज्वाळानीं वेढलेल्या अग्नीप्रमाणें, उष्ण किरणानीं वेष्टिलेला हा सूर्य, रात्रीं उगवला, हें केवढें आश्चर्य?" सखी सांगते "अग हा चंद्र!" विरहिणी विचारते, "मग हा माझ्यावर आग का ओकतोय?" सखी सांगते, "बाले! अनाथाच्या (नाथ जवळ नसलेल्याच्या) बाबतींत सर्वच घटना उलट्या घडत असतात! (मग चंद्र भाजणारच!)" ●●●

मन्दाक्रान्ता

भस्मीभूत कुसुमविशिख शम्भुनेत्राग्निनाऽभू—
ज्ज्वालादायी तदनु मनसि प्राप्तजन्मा बभूव॥
भूयस्तस्मिन्विरहदहनैर्दाहितोऽसौ मयैव
कुत्रोत्पन्नो व्यथयति पुनर्मामहो तन्न वेद्मि ॥ २९ ॥

मन्दाक्रान्ता

**नेत्राग्नीनें स्मर जरि शिवें जाळुनी भस्म केला**
**जन्मा येई मम मनिं पुन्हां जाळण्याला जिवाला॥**
**मीही त्यातें विरहदहनें जाळिलेलें असून**
**अद्यापीही मजसि न कळे पीडितो तो कुठून? ॥२९॥**

गद्यार्थ—शंकरानें, आपल्या डोळ्यातल्या अग्नीनें, मदनाला जाळून भस्म केलें, तरी, पुन्हा, त्यानें मला जाळण्यासाठीं, हृदयात जन्म घेतला मीहि, माझ्या विरहाग्नीनें त्याला भाजून काढलेंच आहे, तरी, तो, आणखी कोठे उत्पन्न होऊन, मला पुन्हा पीडा देत आहे, तें कांहीं कळत नाहीं! ●●●

शिखरिणी

जटा नेयं वेणीकृतकचकलापो, न गरलं
गले कस्तूरीयं; शिरसि शशिलेखा न, कुसुमम्॥
इयं भूतिर्नाङ्गे, प्रियविरहजन्मा धवलिमा!
पुरारातिभ्रान्त्या कुसुमशर! किं मां व्यथयसि?॥३०॥

शिखरिणी

**जटा ही ना, वेणीमधिल कच हे, ना विष गळां,**
**परी कस्तूरी रे, शिरिं कुसुम हें, ना शशिकला!॥**
**वियोगें झालें मी भुरकट, न हें भस्म तनुसी**
**स्मरा! कां रे मातें, शिव समजुनी व्यर्थ छळिसी? ३०**

गद्यार्थ— (शृंगारविहीन विरहिणीचा अवतार आणि शंकराचा अवतार यांत साम्य भासून मदन, तिला शंकर समजून तिच्यावर हल्ला चढवितो कीं काय!) विरहिणी म्हणते "अरे ही जटा नाही तर (तेल न लावता जगाळलेला) वेणींत गुडाळलेला हा केशकलाप आहे. गळ्याशीं काळें दिसतें, ती कस्तूरी आहे, शंकराचें हालाहल नव्हे. डोक्यावर शुभ्र फुलाची वेणी आहे. ती तुला चंद्रकोर वाटली कीं काय? माझ्या अंगाला, वियोगामुळें, भुरकट रखरखीतपणा आला आहे! तुला काय वाटलें तें शंकराचें चिताभस्म? अरे मदना! चुकून मला शंकर समजून का उगाच छळीत आहेस?" ●●●

वसंततिलका

अङ्गानि मे दहतु कान्तवियोगवह्निः
संरक्ष्यतां प्रियतमो हृदि वर्तते यः।
इत्याशया शशिमुखी गलदश्रुबिन्दु—
धाराभिरुष्णमभिषिञ्चति हृत्प्रदेशम्॥ ३१ ॥

वसंततिलका

**जाळोच देह विरहाग्नि! परी हृदिस्थ**
**राहो सुरक्षित सदा हृदयात नाथ॥**
**ही स्त्री जणूं मनिं धरून अशीच आशा**
**शिंपून अश्रु निववी हृदयप्रदेशा॥ ३१॥**

गद्यार्थ—विरहाग्नीनें माझा इतर सर्व देह जळून जावो! पण माझ्या हृदयांत वसणारा, माझा प्राणनाथ, तरी, तिथें सुरक्षित राहो, अशा हेतूनें व आशेनें, जणू काय, ही चंद्रानना विरहिणी, आपल्या उष्ण हृदयप्रदेशाला आपले अश्रु शिंपून निववीत आहे! (आग लागल्यावर, जेवढा भाग आपल्याला वाचवावयाचा असेल तेवढ्यावर पाणी मारीत रहावें लागतें. ●●●

द्रुतविलंबित

मधुरया मधुरैरपि कोकिला कलकलैर्मलयस्य च वायुभिः।
विरहिणः प्रतिहन्ति शरीरिणो विपदि हन्त सुधाऽपि विषायते॥ ३२॥

द्रुतविलंबित

**ऋतु वसंत हि कोकिलकूजनें**
**मलयही निज शीतल वायुनें।**
**तनुस पीडितसे विरहीं सदा**
**विपदिं हा! विषरूपचि घे सुधा॥ ३२॥**

गद्यार्थ—वसंत ऋतु (आपल्या पुष्पफळांच्या वैभवानें), कोकिल आपल्या कूजनानें आणि मलय, आपल्या, चंदनसंपर्कानें शीतल अशा वायूनें, विरहीजनाच्या देहाला नेहमीच

पीडा देतात! माणसावर एकदा विपत्ति येऊ लागल्या कीं अमृत-सुद्धा विषासारखें होतें. ●●●

शार्दूलविक्रीडित

पाटीरद्रुभुजङ्गपुङ्गवमुखायाता इवातापिनो
वाता वान्ति, दहन्ति लोचनममी ताम्रा रसालद्रुमा: ॥
एते हन्त किरन्ति कूजितमय हालाहल कोकिला
बाला बालमृणालकोमलतनु: प्राणान्कथ रक्षतु ? ॥३३॥

शार्दूलविक्रीडित

**वारे चंदनसर्पसंग घडुनी संतत हे वाहती**
**आम्रांचे नवरक्तपल्लव जणूं नेत्रांस यां जाळिती ॥**
**हेही कोकिल, कूजनें चहुंकडे हालाहला फेंकिती**
**बाला पद्मकलीसमा मृदुतनू रक्षो कशी प्राण ती ?॥३३॥**

गद्यार्थ —( मलयावरून येणारे ) वारे, तेथील चदन वृक्षावरील सर्पाच्या विषारी नि श्वासामुळे तापून गलेले असे वहात आहेत आम्रवृक्षाना फुटलेली ताबुस नवी पालवी ( अग्नीच्या रगाची ) जणू नेत्राना जाळीत आहे आणि हाय! हाय! हे कोकिल आपले कूजितरूपी हालाहल सर्वत्र शिंपीत आहेत! तेव्हा कमलाच्या कोमल कळीसारख्या मृदुतनु बालेनें आपले प्राण कसे वाचवावे ? ●●●

मालिनी

कथय कथमिवाशा जायता जीविते मे
मलयभुजगवान्ता वान्ति वाता कृतान्ता ॥
अयमपि खलु गुञ्जन्मञ्जु माकन्दमौलौ
चुलुकयति मदीया चेतनां चञ्चरीक: ॥ ३५ ॥

मालिनी

**वद मजसि असावी जीविताशा कशी ती**
**यमच अहिमुखींचे वात जेथें वहाती ॥**
**मृदुरणन करोनी आम्रवृक्षावरी तो**
**पिउनिच जणुं माझें, भृंग, चैतन्य घेतो ॥ ३५ ॥**

गद्यार्थ– मलयावरच्या सर्पांनीं फूत्कारलेले, जणू यमस्वरूपच असे वारे जेथें वहात आहेत— आणि आम्रवृक्षावर मजुल गुंजारव करीत तो भ्रमर, जेथें, माझं जणु चैतन्य पिऊन घेत आहे तेथें मी जीविताशा कशी धरून रहावें? साग! ●●●

शार्दूलविक्रीडित

सायं नायमुदेति वासरमणिश्चन्द्रो न चण्डद्युति—
र्दावाग्नि कथमम्बरे ? किमशनि: स्वच्छान्तरिक्षे स्थित: ? ॥
हन्तेद निरणायि पान्थरमणीप्राणानिलाशाशया
धावद्घोरविभावरीविषधरीभोगस्य भीमो मणि: ॥३६॥

शार्दूलविक्रीडित

**ना सूर्योदय रात्रि; तापकर, त्याअर्थी शशी हा नसे**
**दावाग्नी कुठुनी नभीं ? अशनि कां स्वच्छांतरिक्षीं वसे**
**"रात्रीरूपचि सर्प पांथरमणीप्राणांस भक्षावया**
**धावे, तच्छिरिंचाच घोर मणि हा!" या पातलें निर्णया**

गद्यार्थ— ( विरहिणी, चद्र तापद का? याविषयीं तर्क वितर्क करीत आहे ) हा सूर्य म्हणावा, तर तो रात्रीं कसा उगवेल? ताप देतो, त्याअर्थी, हा चद्रहि नाहीं! दावाग्नि म्हणावा, तर तो आकाशात कसा? जळजळती वीज किंवा वज्र म्हणावें, तर ढग नसता, स्वच्छ आकाशात तें कुठून? हा! ( आता कल्पना बरोबर जमली! ) ज्याचे प्रिय प्रवासास गेले आहेत, अशा पाथाच्या स्त्रियांचे प्राण भक्षण करावयास धावणारी, जी रात्र-रूपी नागीण, तिच्या शिरावरील हा भयकर मणि आहे! या निर्णयाप्रत मी आले आहे! ●●●

पृथ्वी

न नीतमुपनासिक परिमलव्ययाशङ्कया
न हन्त विनिवेशित विरहवह्निकुण्डे हृदि ॥
दृशोर्महिरिति श्रुतौ न निहित प्रियप्रेषित
करे कमलमर्पित मृगदृशा दृशा पीयते ॥ ३७ ॥

शार्दूलविक्रीडित

**नाकाशीं न धरी, सुगंधहि कमी होईल या भीतिनें**
**भाजो ना विरहाग्नि, यास्तव हृदीं तें ठेविलें ना तिनें ॥**
**धाडी वल्लभ, दृष्टिआड नसण्या खोवी न कानावरी**
**दृष्टीनेंच पिते मृगाक्षि कमला, ठेवोनिया तें करीं ॥ ३७ ॥**

गद्यार्थ— ( एका विरहिणीला ) तिच्या वल्लभानें एक कमल पाठविलं. तें तिनें, त्याचा दुगूलदुगूल सुगध कमी होइल, या भीतीनें, नाकाशीं नेलं नाहीं. विरहाग्नीचें जणु कुड अशा हृदयावरहि तिनें तें ठेविलं नाहीं! ( त्या अग्नीनें त करपेल या भीतीनें! ) आपल्या प्रियानें धाडलेलं, तें कमल, दृष्टीआड क्षणभर सुद्धां न व्हावें, म्हणून, तिनें तें कानावरसुद्धा खोवलं

नाहीं. तर आपल्या हातात ठेवून, ती मृगाक्षी तें केवळ दृष्टीनेंच पीत राहिली. ●●●

इंद्रवज्रा

काचिन्मृगाक्षी प्रियविप्रयोगे गन्तु निशापारमपारयन्ती ॥
उद्गातुमादाय करेण वीणामेणाङ्कमालोक्य शनैरहासीत् ३८

उपजाति

**जाऊं शके पार न जी निशेच्या**
**अशी कुणी स्त्री विरहीं प्रियाच्या ॥**
**गाण्यास वीणा स्वकरांत घेई**
**मृगांक पाहून हळूंच ठेवी ॥ ३८ ॥**

गद्यार्थ—रात्र जाता जात नाहीं, अशी प्रियविरहानें जिची स्थिति झाली आहे, अशी कुणी एक मृगनयना, गायन करण्या साठीं वीणा हातीं घेती झाली ! परंतु, इतक्यात चंद्र व त्याच्या वरचा तो मृग तिच्या दृष्टीस पडला व तिनें पुन्हा ती वीणा हळूच खालीं ठेवली. ( कारण मृग ( हरिण ) हा फार गान लुब्ध, आपलें गायन ऐकण्यासाठीं तो व त्याच्यापायीं अर्थात् चंद्रहि थांबून राहील व गायन चालू आहे, तोंवर रात्र कमी न होता थबकून राहील ! अशी भीति तिला वाटली. ) ●●●

आर्या

पूर्वे जलदजलाकुलदिङ्मण्डलवद् वियोगिनीवदनम् ।
गलदविरतसलिलभर पश्चादिव जायते गगनम् ॥३९ ॥

आर्या

**आधीं वियोगिनीमुख वर्षाऋतुजलदपूर्ण जणुं गगन ।**
**संतत अश्रुपरी जळ गळुनी जाई पुनश्च निवळून ॥३९॥**

गद्यार्थ—विरहिणीचें मुख हें पावसाळी गगनासारखें असतें, प्रथम, तें पाण्यानें भरलेल्या मेघानीं दशदिशा व्यापल्यासारखें असतें, नंतर सतत अश्रुरूपी जळ गळून गेल्यावर ( पावसा नंतरच्या ) आकाशासारखें स्वच्छ होतें ( वियोग संपताच. ) ●●●

आर्या

कालागुरुद्रव सा हालाहलवद्विजानती नितराम् ।
अपि नीलोत्पलमाला बाला व्यालावलिं किलामनुते । ४० ।

आर्या

**विरहीं स्त्री कालागुरुलेपन हालाहलापरी मानी ।**
**नीलकमलमालेला व्यालावलि समजुनी घसे भिउनी ४०**

गद्यार्थ—विरहामध्य स्त्री ही कालागुरूच्या लेपाला हालाहल समजते ( रंगसादृश्यामुळ व अधिकच दाहक होतो म्हणून ) आणि नीलकमलाच्या मालेला सर्पावलि समजून भिते. ●●●

शार्दूलविक्रीडित

साक्षी पाणिनिपीडनस्य कुचयोराजन्मबन्धुश्च मे
मुद्राङ्कोऽयमनङ्गलेखविधिषु द्यूतकलहे बन्धकः ॥
अन्तः शून्यमिव प्रियेण हृदय मूर्तं मयि प्रेषित
चक्षुर्मङ्गलमङ्गुलीयकमणिः सोऽय चिराद्वीक्ष्यते ॥४१॥

शार्दूलविक्रीडित

**साक्षी मत्कुचमर्दनीं, मजसि जी आजन्म बंधूजन**
**मुद्रा ही स्मरलेखनावर; तशी द्यूतीं अहाली पण ॥**
**अत शून्यचि मूर्त या स्वहृदया कांतें मला धाडिल**
**नेत्रां मगल अगुठी, मणि, किती काळें बघाया मिळे ४१**

गद्यार्थ—( प्रियकरानें, प्रियेच्या समाधानासाठीं, आपल्या बोटातली अंगुठी, तिला पाठविली, ती पाहून ती म्हणते ) माझ्या कुचमर्दनाची साक्षीदार, आजन्म मला बांधवासारखी, मदनलेखावर जणू मुद्राच, द्यूतात पण, ( विरहानें आम्हा दोघांचींहि हृदय शून्य तेव्हा ) जणू हृदयाचें मूर्तिमंत चित्रच अशी ही अत शून्य ( मध्यभागीं पोकळ ) अंगुठी प्रियानें मला पाठविली आहे. माझ्या डोळ्याना मगल, अशी ही व तीवरील रत्न किती दीर्घ कालानंतर आज माझ्या दृष्टीस पडलीं आहेत ! ●●●

अनुष्टुभ्

यदीयबलमालोक्य गतः प्रेयान् वियुज्यते ।
आलोकये कथ सख्यस्तस्य चन्द्रमसो मुखम् ? ॥४२॥

आर्या

**ज्याचें बळ पाहोनी, प्रिय गेला-मी वियोगिनी झालें ।**
**पाहूं कैसें सखये त्या चंद्राचेंच तोंड मी काळें ? ॥४२॥**

गद्यार्थ— ( प्रवासाला जाताना मुहूर्तासाठीं ज्योतिषी चंद्र-बळ पाहतात त्यावर कोटि ) हे सख्यानों ( बघ, कसा सुंदर चंद्र उगवला आहे, असें तुम्ही म्हणता खरें, पण ) ज्याचें बळ पाहून माझा प्रियकर प्रवासाला गेला व मी विरहिणी झालें, त्या मेल्या चंद्राचें तोंड तरा मी कशी पाहीन ? ●●●

मालिनी

व्यजनमरुतः श्वासश्रेणीमिमामुपचिन्वते
मलयजरसो धाराबाष्पं प्रपञ्चयितुं प्रभुः ॥
कुसुमशयनं कामास्त्राणां करोति सहायतां
द्विगुणगरिमा कामोन्मायः कथं नु विरंस्यति ॥४३॥

आर्या

पंख्याचा वारा हा अधिकचि निःश्वास हाय! वाढवितो।
चंदनरसही मम या अधिकाधिक आंसवांस वाहवितो ॥
पुष्पांची शय्या ही मदनशरांनाच साह्य जणुं करिते !
द्विगुणित छळ मदनाचा मिटे कशानें मुळीं न मज कळतें ॥४३॥

गद्यार्थ—विरहिणी आपली दशा सांगते—पंख्याचा वारा घ्यावा तर उष्ण निःश्वास आणखी आणखी वाढत जातात! चंदनरसानें (शांति न वाटता) अश्रुधारा मात्र अधिकाधिक वाहूं लागतात. पुष्पांची शय्या ही (सुखनिद्रा आणण्याऐवजीं) मदनाच्या शस्त्रांत भरच टाकिते (पुष्प हा मदनाचा बाणच) अशा तऱ्हेनें दुप्पट शक्ति झालेल्या मदनानें केलेला छळ कसा थांबणार कोण जाणे! ●●●

## (४) विरहोत्तर पुनर्मीलन

पुष्पिताग्रा

अनधिगतमनोरथस्य पूर्वं शतगुणितेव गता मम त्रियामा ॥
यदि तु तव समागमे तथैव प्रसरति सुभ्रु ततः कृती भवेयम् ४४

वसंततिलका

होते मनोरथ जधीं मम गे अपूर्ण
रात्री सुदीर्घ जणुं शंभरनें गुणून ॥
आतां समागम असाच तुझा घडून
त्या वाढतील तर धन्यचि मी बनेन ॥ ४४ ॥

गद्यार्थ—हे प्रिये! तुझी भेट होण्याचे माझे मनोरथ पूर्ण झाले नव्हते, तेव्हां माझ्या रात्रीं, त्यांना शंभरनें गुणल्यासारख्या, दीर्घच दीर्घ झालेल्या होत्या! आता तुझा समागम घडल्यावरहि जर त्या तशाच लांबत राहतील तर मी धन्य धन्य होईन! ●●●

मालिनी

किमपि किमपि मन्दं मन्दमासक्तियोगा—
दविचलितकपोलं जल्पतोरक्रमेण ॥
अशिथिलपरिरम्भव्यापृतैकैकदोष्णो—
रविदितगतयामा रात्रिरेव व्यरंसीत् ॥ ४५ ॥

आर्या

कांहींतरि, कांहींतरि, हळूं हळूं, प्रणयरंग वाढोनी।
हालवितां न कपोलहि, मधुर असंबद्ध शब्द बोलोनी॥
दोनहि कर गढलेले परस्परां कवळण्यांत दृढ भारी।
घटिकाप्रहर न कळतां, वार्ता उरल्या नि संपल्या रात्री ॥ ४५ ॥

गद्यार्थ—(श्रीराम व सीता यांची रावणवधानंतरची भेट.) प्रणय, आसक्ति, औत्सुक्य, यांच्या ओढीनें, एकमेकांना गाढ आलिंगन देण्यात बाहू गढून गेलेले आहेत—आणि गालसुद्धां न हालविता, कांहींतरी कांहींतरी, हळूहळू असंबद्ध बोलण्यात, घटकाप्रहर केव्हा गेले, याचा पत्ता न लागता त्यांची रात्र तेवढी संपली—(आणि गोष्टी कांहीं संपल्या नाहींत.) ●●●

## प्रकरण ३२ वें

### यश, कीर्ति, दुष्कीर्ति, स्तुति, प्रसिद्धि, निंदा, निंदक, आत्मश्लाघा—

अनुष्टुभ्

देहे पातिनि का रक्षा यशो रक्ष्यमपातवत् ॥
नरः पतितकायोऽपि यशःकायेन जीवति ॥ १ ॥

वसंततिलका

रक्षूं नये पतनशील अशा तनूस
रक्षा अपात्य असल्या अपुल्या यशास ॥
झाला जरी पतित, देहचि हा मरून
राहे समुन्नत यशस्तनु तो धरून ॥ १ ॥

गद्यार्थ– देह हा पतनशीलच आहे, त्याचें रक्षण कशाला करीत असतां? कधीं न पडणारें असे जें यश त्यानें रक्षण करणें योग्य. मनुष्य, देहानें जरी पतित (मृत) झाला, तरी, तो यशःशरीरानें जगत असतो.

●●●

पुष्पिताग्रा

यदि समरमपास्य नास्ति मृत्यो—
भयमिति युक्तमितोऽन्यतः प्रयातुम् ।
अथ मरणमवश्यमेव जन्तोः
किमिति मुधा मलिनं यशः कुरुध्वे ॥२॥

मालिनी

त्यजुनि जर रणातें, मृत्युची भीति नाहीं
तरचि इथुनी जाणें क्षम्य होईल कांहीं ॥
जर मरण चुकेना जन्मला जो तयातें
उगिच पळुनि काळें फासितां कां यशातें ? ॥ २ ॥

हैंच फटक्याच्या चालीवर–

पळुनी जातां, रणांतुनी, जर पुढें मृत्युची भीति नसे ।
इथुनी दुसरीकडेस जाणें तरचि तुम्हांला योग्य असे ॥
परी जन्मला जो जो त्याच्या पाठिस मृत्यू खडा वसे ।
व्यर्थ कशाला यश मळवितां, पळुनि जाउनी तुम्ही असे ॥ २ ॥

गद्यार्थ– जर रणांगण सोडून गेल्यानें, मृत्यूपासून भयच नसेल, तरच तुम्ही इथून अन्यत्र जाणें युक्त होईल. पण, ज्याअर्थी, प्रत्येक प्राण्याला, मरण हें अटळच आहे, तर, कां उगाच यश मलिन करतां ?

●●●

शार्दूलविक्रीडित

लोभश्चेदगुणेन किं पिशुनता यद्यस्ति किं पातकै ?
सत्यं चेत्तपसा च किं, शुचि मनो यद्यस्ति तीर्थेन किम् ? ॥
सौजन्यं यदि किं गुणैः सुमहिमा यद्यस्ति किं मण्डनैः ?
सद्विद्या यदि किं धनैरपयशो यद्यस्ति किं मृत्युना ? ॥३॥

आर्या

लोभ असे तर दुर्गुण–कशास–पातक, असून दुष्टपण ?
सत्य असे तर तपही–कशास–तीर्थे, असून शुद्ध मन ॥ ?
असुनि भलेंपण गुण ते–कशास–मंडन, असेल जर कीर्ति ?
सद्विद्या असतां धन–कशास–मृत्युहि, असून दुष्कीर्ति ३

गद्यार्थ—एक लोभ असेल, तर, आणखी दुसरा दुर्गुण कशाला हवा ? एक दुष्टपणा असेल, तर, निराळें पातक करायला नको. एक सत्य असेल, तर, निराळी तपश्चर्या काय करायची ? मन शुद्ध असेल, तर तीर्थे धुंडण्याचें प्रयोजन काय ? एक भलेंपण असेल, तर, इतर सद्गुण नसले तरी चालतील. एक सत्कीर्ति असेल, तर, अलंकार कशाला ? सद्विद्या असेल, तर, धनाची महती काय ? एक दुष्कीर्ति असेल तर आणखी मरण तें निराळें काय असतें ?

●●●

द्रुतविलंबित

अयि कठोर यशः किल ते प्रियं किमयशो ननु घोरमतः परम् ॥
किमभवद्विपिने हरिणीदृशः कथय नाथ कथं बत मन्यसे ? ४

द्रुतविलंबित

तुज, कठोर ! यश प्रिय हें खरें
अयश याहुनि घोरचि काय रे ? ॥
वनिं मृगेक्षण केविं कशी वसे
तुजसि वाटत नाथ न कां कसें ? ॥ ४ ॥

गद्यार्थ— (कीर्तिपालनार्थ रामानें सीतेचा त्याग केल्यानंतर त्यास विचारण्यात येत आहे —) हे निष्ठुरा ! तुला यश फार प्रिय असे तू म्हणतोस खरें, पण, सांग पाहू या (सीतात्यागा) पेक्षा अधिक घोर अयश तें काय असावयाचें ! त्या मृगाक्षीला रानात सोडलीस, तिचें काय झालें या विषयीं तुला काहींच कसें वाटत नाहीं ?

●●●

शार्दूलविक्रीडित

का विद्या कविता विनाऽर्थिनि जने त्याग विना श्रीश्च का ?
कः सूनुर्विनयं विना, कुलवधूः का स्वामिभक्तिं विना ? ॥
को धर्मः स दयां विना, नरपतिः को नाम नीतिं विना ?
भोगाः के रमणीं विना क्षितितले किं जन्म कीर्तिं विना ?

सुमदारमाला

कवित्वाविना काय विद्या ? दिलें ना
कधीं याचकां, तें कशाचें धन ?
न नम्रत्व ज्या पुत्र तो काय ? पत्नी
कशाची जिला स्वामिभक्तीच न ?
दयेवीण कां धर्म होईल ? राजा
म्हणावा कसा राजनीतीविना ?
कशाचे प्रियेवीण हो भोग लोकीं,
किती व्यर्थ हो जन्म कीर्तीविना ? ॥ ५ ॥

गद्यार्थ—कवितेवाचून विद्या व्यर्थ; याचकाला दिलें न जाणारें धन तें कसलें धन ? विनयरहित मुलाला मुलगा म्हणता येईल ? पतिनिष्ठा नसेल तर ती काय कुलस्त्री म्हणता येईल ? दयेशिवाय कधीं धर्म होतो काय ? राजनीतीवाचून राजा तो कसला राजा ? इहलोक सुखोपभोग प्रियेसह भोगू तेच ! इतर कसले भोग ? या जगीं कीर्तिविना जन्म सार्थ कसा म्हणता येईल ? ●●●

आर्या

अद्यापि दुर्निवारं स्तुतिकन्या वहति कौमारम् ॥
सद्भ्यो न रोचते सा, सन्तोऽप्यस्यै न रोचन्ते ॥ ६ ॥

आर्या

'स्तुति' ही मुलगी अजुनी अटळ असें पाळिते कुंवारपण।
न रुचे ही सुजनाला; कुजन हिला, हेंच नित्य चालून ॥

गद्यार्थ—स्तुति नावाची एक उपवर मुलगी आहे; (तिचें लग्न जमवण्याचे पुष्कळ प्रयत्न जगाच्या आरंभापासून आता-पर्यंत झाले;) परंतु, तें अजून न जमल्यानें ती बिचारी अपरिहार्य-पणें कुंवारपण पाळीत आहे;—कारण—सज्जनांना ती आवडत नाहीं; व दुर्जन तिला आवडत नाहींत; (असें सतत चाललें आहे !)

●●●

अनुष्टुभ्

घटं भिन्द्यात्पटं छिन्द्यात्कुर्याद्रासभरोहणम् ।
येन केन प्रकारेण प्रसिद्धः पुरुषो भवेत् ॥ ७ ॥

अनुष्टुभ्

घडा फोडा-वस्त्र फाडा गाढवावरही वसा ।
'प्रसिद्ध' मात्र व्हा लोकीं मग मार्ग असो कसा ॥७॥

गद्यार्थ—(लोकांचें लक्ष वेधण्यासाठीं) घडा फोडा, वस्त्र फाडा, वाटल्यास गाढवावर सुद्धा बसा; मार्ग कसला का असेना, कोणीकडून 'प्रसिद्ध' पुरुष व्हा म्हणजे झालें ! ●●●

पुष्पिताग्रा

निजगुणगरिमा सुखाकरः स्या—
त्स्वयमनुवर्णयतां सतां न तावत् ॥
निजकरकमलेन कामिनीनां
कुचकलशास्फालनेन को विनोदः ? ॥८॥

वसंततिलका

मोठे स्वकीय गुण वानुनिया, स्वयें, तें
होई कधीं न सुखकारक सज्जनांतें ॥
पुष्टस्तनांस अपुल्या अपुल्याच हातें
मर्दून मोद कधि होइल कामिनीतें ? ॥८॥

गद्यार्थ—स्वताचे मोठे गुण, स्वताच वर्णून (स्तवून) सज्जनांना कधीं आनंद वाटत नाहीं. स्वतःचे पुष्ट स्तन स्वतांच्या हातानीं मर्दून कामिनीला कधीं आनंद वाटतो काय ? ●●●

वसंततिलका

शक्रादरक्षि यदि पक्षयुगं तथापि
मैनाक सन्ति तव नेह गतागतानि ॥
निःसत्त्वता च निरपत्रपता च किन्तु
पाथोनिधौ निवसता भवताऽर्जिताऽत्र ॥ ९ ॥

आर्या

इंद्रापासुनि, अपुल्या दोन्ही पंखांस, रक्षिलेंस जरी।
मैनाका! तुज नुरलें जाणेंयेणें कुठें इथून परी ॥
येथें उदधितळाशीं बुडुनि सुरक्षित असा जरी वससी।
निःसत्त्वतेसवें तूं निर्लज्जत्व-प्रसिद्धि मिळवीसी ॥९॥

गद्यार्थ— (मैनाक हा हिमालयाचा मुलगा. पूर्वी सर्व पर्वताना पख होते, ते इंद्रानें तोडले; त्या वेळीं इंद्राशीं, बापासाठी लढण्याचें सोडून, मैनाक, भयानें उडून समुद्रात जाऊन दडला. त्यामुळे त्याचे पख वाचले, पण दुष्कीर्ति पदरीं आली.) — हे मैनाका! इंद्रापासून तू आपले दोन्ही पख वाचविलेस खरें, पण, येथून कोठेंहि जाणें किंवा येणें तुला शक्य नाहीं (कारण इंद्राचें भय कायमच आहे. मग पखाचे फळ काय?) तू येथे, समुद्राच्या तळाशीं, बुडून, जरी सुरक्षित वसला असलास, तरी तू निस्तेज व निर्लज्ज आहेस, ही कुप्रसिद्धि मात्र तू मिळविली आहेस!

●●●

अनुष्टुभ्

बहुनिष्कपटद्रोही बहुधान्योपघातकः ।
रन्ध्रान्वेषी च सर्वत्र दूषको मूषको यथा ॥ १० ॥

अनुष्टुभ्

बहुनिष्कपटद्रोही बहुधान्योपघातक ।
शोधितो रंध्र सर्वत्र मूषकापरि निंदक ॥ १० ॥

गद्यार्थ—(यातील मूळ संस्कृत शब्दात दोन तऱ्हेनें पदे पाडण्यानें दोन अर्थ उत्पन्न केलेले असल्यानें भाषांतरात तेच शब्द ठेवणें भाग पडले. पदे पाडण्यानें होणारी चमत्कृति समजण्यासाठींच (भाषांतर म्हणून नव्हे) हा श्लोक दिला आहे) निंदक हा उदराप्रमाणें आहे. दोघेहि बहुनिष्कपटद्रोही. उदीर बहु-निष्क-पट-द्रोही (निष्क=एक नाणें) फार पैसे पडणाऱ्या पटाचा (वस्त्राचा) द्रोही = शत्रु असतो. निंदक हि बहु-निष्कपट-द्रोही = अगदीं निष्कपट माणसांचा द्वेष्टा असतो उदीर बहु-धान्योपघातक म्हणजे पुष्कळ धान्याचा सत्यानाश करणारा असतो. निंदक हा बहुधा-अन्योपघातक असतो. उदीर सर्वत्र रन्ध्र म्हणजे बीळ शोधीत असतो. निंदक रन्ध्र म्हणजे माणसाचे दोष शोधीत असतो.

●●●

इंद्रवज्रा

जीवन्तु मे शत्रुगणाः सदैव तेषां प्रसादात्सुविचक्षणोऽहम् ।
ये ये यथा मां प्रति बाधयन्ति ते ते तथा मा प्रतिबोधयन्ति ११

उपजाति

जगोत माझे रिपु सर्वदा ते मी जाहलों सुज्ञचि तत्प्रसादें
जे जेवि बाधा मजला करीती ते बोध तैसे मजलागिं देती

गद्यार्थ—माझे सर्व शत्रू (माझे निंदक व टीकाकार) सदैव जगोत; कारण त्यांच्या कृपेनेंच मी सुज्ञ झालों आहे. ते, ज्या ज्या प्रमाणात, माझी हानि करतात, त्या त्या प्रमाणात, त्यापासून मला बोध मिळून (माझ्या चुका, माझे दोष, मला कळून) माझें हित होत असतें.

●●●

शार्दूलविक्रीडित

इन्दु निन्दति चक्रवाकयुगल, भास्वा निधि कौशिक
स्वादु क्षीरमरोचकी, सुकृतिन पापी, जडः पण्डितम् ॥
त्यक्त सर्वजनै खलः कटुवचा ग्राम्यः पुमान्नागर
कः पैतामहगोलकेऽत्र सकलैः समानितो वर्तते ? ॥ १२ ॥

शार्दूलविक्रीडित

चंद्रा निंदिति चक्रवाक, घुबडे सूर्या, दुधा रुग्ण तो
पापी पुण्यकृतीस आणि जड तो सुज्ञा नरा निंदितो
सर्वत्यक्त खलास दुष्ट, शहरी लोकांस खेडूतही
सारे मानिति ज्या, असा नर कुठें ब्रह्माण्डगोलांतही?

गद्यार्थ—चक्रवाकाचें जोडप चंद्राची निंदा करत (कारण चंद्राचा उदय होताच कमले मिटून त्यांचा वियोग होतो). घुबडें सूर्याची निंदा करतात (कारण त्याना दिवसा दिसत नाहीं.) तोंडाला चव नसलेला रोगी गोड दुधाची निंदा करतो; पापी, पुण्यवताची; व मूर्ख, पंडिताची; सर्वांनीं टाकलेल्या माणसाची, दुर्जन, व नागरी माणसाची खेडवळ निंदा करतो! (अशा तऱ्हेनें कोणी ना कोणी कोणा ना कोणाकडून निंदित असतोच त्यामुळें) सर्व ब्रह्मांडात, सर्वांनीं मान्य ठरविलेला असा माणूस कोठें सांपडणार!

●●●

हरिणी

यदि परगुणा न क्षम्यन्ते यतस्व तदार्जने
न हि परयशो निन्दाजालैरलं परिमार्जितुम् ॥
विरमसि न चेदीर्ष्याद्वेषप्रसक्तमनोरयो
दिनकृत्करान्पाणिच्छत्रैर्नुदन् श्रममेष्यसि ॥ १३ ॥

आर्या

वघवे परगुण न तुला तर तो मिळवावयास कर यत्न
परयश बहुनिंदेनें पुसणें कोणा कधींहि शक्यच न ॥
ईर्ष्याद्वेषप्रेरित, तव निंदा ही न सोडशील जर-।
करछत्रें रवितापा वारित वसशील तूं वृथाच तर ॥१३॥

गद्यार्थ—तुला दुसऱ्याचे गुण वघवत नसतील तर (योग्य मार्ग म्हणजे) ते मिळविण्याचा यत्न कर. दुसऱ्यांची कीर्ति, निंदेची धुळवड उडवून, पुसून टाकणें, कोणाला कधीं शक्य होणार नाहीं. ईर्ष्या-द्वेषांनीं प्रेरित होऊन, तूं चालविलेली ही निंदा जर थांबविली नाहींस, तर, हातांची छत्री करून उन्हापासून वचाव करू पाहणाऱ्याप्रमाणें तूं नुसत्या श्रमाचा मात्र धनी होशील. ●●●

अनुष्टुभ्

न भीतो मरणादस्मि केवलं दूषितं यशः ।
विशुद्धस्य हि मे मृत्युः पुत्रजन्मसमः किल ॥१४॥

अनुष्टुभ्

न मला भय मृत्यूचें—यशाचें मात्र दूषित ।
पुत्रजन्मापरी मृत्यु मातें जों मी अदूषित ॥ १४ ॥

गद्यार्थ— मला मृत्यूचें भय वाटत नाहीं, तर, केवळ कीर्तीला कलंक लागेल, या गोष्टीचें भय वाटतें. माझ्या कीर्तीला कलंक न लागतां, मी विशुद्ध आहें, तोंवर, आलेला मृत्यु, मला पुत्रजन्मासारखा आहे. ●●●

# प्रकरण ३२ वें

## सेवा, सेवक-स्वामी-सेवक संबंध.

मन्दाक्रान्ता

मौनान्मूकः प्रवचनपटुश्चाटुलो जल्पको वा
धृष्टः पार्श्वे वसति, नियतं दूरतश्चाप्रगल्भः ।
क्षान्त्या भीरुर्यदि न सहते प्रायशो नाभिजातः
सेवाधर्मः परमगहनो योगिनामप्यगम्यः ॥ १ ॥

शार्दूलविक्रीडित

मौनें मूक ठरे, वदे तर म्हणे वाचाळ गप्पिष्ट वा
पार्श्वी उद्धट; तोच मूर्ख, ठरतो राहे दुरी तेधवां
सोसे तो भितरा ठरे, नि हलका, सोसे न तेव्हां ठरे
सेवाधर्म असा महागहन; जो योग्यांहि ना गम्य रे १

गद्यार्थ—(नोकर म्हणजे वागला, तरी, त्यांत खोड काढावयाचीच, असा जगाचा नियम आहे) गप्प बसला, तर म्हणे तो मुकाच आहे; बोलला, तर बडबड्या किंवा लाळघोट्या; धन्याच्या जवळ असला तर उद्धट, दूर गेला तर मूर्ख; (धन्याचीं कुवचनें) सहन करील तर भित्रा; न सहन करील तर बहुधा जातकुळी हलकी, (म्हणून उलटून बोलतो)! अशा तऱ्हेनें सेवाधर्म हा अत्यंत गहन असून, योग्याला सुद्धां अगम्य आहे! ●●●

अनुष्टुभ्

स्वाभिप्रायपरोक्षस्य परचित्तानुवर्तिनः ।
स्वयं विक्रीतदेहस्य सेवकस्य कुतः सुखम् ! ॥२॥

अनुष्टुभ्

करी दुजा म्हणे तैसें—स्वतांचें मत ज्यास न ।
विकी जो स्वतनूही त्या सेवका सुख कोठुन ॥२॥ ?

गद्यार्थ—ज्याला स्वतःचें असें मन नाहीं ( अमुक उपयोगीहि नाहीं, ) व दुसरा म्हणेल तसें करावें लागतें, ज्यानें स्वताचा देहच विकून टाकलेला आहे, त्या सेवकाला सुख कोठलें? ●●●

अनुष्टुभ्

चलेषु स्वामिचित्तेषु, सुलभे पिशुने जने।
यदि जीवन्त्यहो चित्रं क्षणमप्युपजीविन ॥३॥

आर्या

स्वामी चचल असुखी, भरींस खलही जिथें सुकाळाचे।
क्षणभर सेवक जगला, तर, तें आश्चर्य का न हो साचें! ३

गद्यार्थ— स्वामी मनानें चचल, आणि त्याच्या भरीला दुष्टांचा सुकाळ असलेल्या या जगात, सेवक क्षणभर जरी जगला, तरी, तें केवढ आश्चर्य म्हटलें पाहिजे ? ●●●

अनुष्टुभ्

सेवया धनमिच्छद्भि सेवकै पश्य किं कृतम्।
स्वातन्त्र्य यच्छरीरस्य मूढैस्तदपि हारितम् ॥ ४ ॥

अनुष्टुभ्

केलें काय पहा भृत्यीं सेवुनी इच्छित्या धन।
देहस्वातत्र्यही मूर्ख बसले कीं गमावुन ॥ ४ ॥

गद्यार्थ—नोकरी करून धन मिळवू इच्छिणाऱ्या सेवकानीं, काय केलें पहा! देहाचें म्हणून जें स्वातत्र्य असतें, तें सुद्धा मूर्ख बिचारे गमावून बसले ! ●●●

अनुष्टुभ्

वर वन, वर भैक्ष्य वर भारोपजीवनम्।
पुसा विवेकहीनाना सेवया न धनार्जनम् ॥५॥

अनुष्टुभ्

हमालीहि बरी वाटे-बरी भिक्षा, बरें वन।
नको परतु मूर्खाचें सेवामार्गे धनार्जन ॥ ५ ॥

गद्यार्थ— रानात राहणें बरें, भिक्षा मागितलेली बरी, हमालीसुद्धा परवडली, पण, मूर्ख होऊन नोकरीनें धनार्जन नको ●●●

अनुष्टुभ्

या प्रकृत्यैव चपला निपतत्यशुचावपि।
स्वामिनो बहु मन्यन्ते दृष्टिं तामपि सेवका ॥६॥

अनुष्टुभ्

हीन स्वामीदृष्टि जात्या, जी घाणीवरही पडे।
मान देती तिलाही हे भृत्य पोटार्थ बापुडे ॥ ६॥

गद्यार्थ—स्वतः ज्या स्वामीची निसर्गत हीन, अशी जी दृष्टि घाणीवर सुद्धा पडते, तिला सुद्धा, बिचारे नोकर, पोटार्थ मान देतात! ●●●

अनुष्टुभ्

नाश्नाति सेवयौत्सुक्याद्विनिद्रो न प्रबुध्यते।
न नि शङ्क वचो ब्रूते सेवकोऽप्यत्र जीवति ॥७॥

आर्या

अन्न न खाती रुचिनें,
निजति न, यास्तव कुणी न उठवीती।
निर्भय शब्द न वदती,
सेवक, ऐसें असूनही जगती ॥ ७ ॥

गद्यार्थ— नोकरीपायीं, नोकर, बिचारा अन्न रुचीनें खात नाहीं त्याला झोंपच लागत नाहीं, तेव्हा, त्याला उठविण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं निर्भयपणें, स्पष्टपणें ( खरेंसुद्धा ) बोलत नाहीं,— आणि, असें असूनहि नोकर जगतो ! ( आहे कीं नाहीं आश्चर्य ? ) ●●●

अनुष्टुभ्

शीततापादिकष्टानि सहते यानि सेवक।
धनाय तानि चाल्पानि, यदि धर्माय, मुच्यते ॥ ८ ॥

आर्या

कष्ट करी सेवक जे, शीतोष्णादिक करोनिया सहन।
देते धर्मी मुक्तिच, परि अपुरे ते मिळावयास धन ॥

गद्यार्थ– थडी ऊन इत्यादि सहन करून जेवढे श्रम नोकर, नोकरींत करतो, तेवढे धर्ममार्गात केले, तर खरोखर मुक्तीच मिळेल. पण हाय ! हाय ! धन मिळावयास मात्र तेहि अपुरे पडतात. ●●●

अनुष्टुभ्

द्यूतेन धनमिच्छन्ति मानमिच्छन्ति सेवया।
भिक्षया भोगमिच्छन्ति ते दैवेन विडम्बिता ॥९॥

आर्या

द्यूतानें धन इच्छिति, सेवेनें मान इच्छिती चित्तीं।
इच्छिति भोग भिकेनें- ते दैवानें विटंबिले जाती ॥ ९ ॥

गद्यार्थ— द्यूत खेळून पैसे मिळविण्याची अपेक्षा ठेवणारे, नोकरी करून मान मिळवू पाहणारे, भीक मागून सुखोपभोग

घेण्याची आशा धरणारे- हे दैवाकडून फजीत केले जातात. ●●●

अनुष्टुभ्

सेवा श्ववृत्तिर्यैरुक्ता न तैस्सम्यगुदाहृतम् ।
स्वच्छन्दचारी क्षुत्र श्वा विक्रीतासुः क्व सेवकः ? ॥१०॥

वसंततिलका

जें श्वानवृत्ति म्हणती, कधि, नोकरीस
तें ना उदाहरण, योग्य, गमे मनास ॥
कुत्रें स्वतंत्र भटकें सकलत्र, कोठें ?
प्राणां विकी निज, असा वद भृत्य कोठें ? ॥१०॥

गद्यार्थ—ज्या कुणी, "नोकरी हें कुत्र्याचें जिणें आहे" असें म्हटलें आहे त्याचें तें उदाहरण मनाला पटत नाहीं. कुठें तें सर्वत्र स्वच्छंद भटकणारें कुत्रें आणि कुठें तो, स्वतःचे प्राण विकून बसलेला सेवक ! ●●●

आर्या

प्रणमत्युन्नतिहेतोर्जीवितहेतोर्विमुञ्चति प्राणान् ।
दुःखीयति सुखहेतोः को मूढः सेवकादन्यः ? ॥११॥

आर्या

नमतो वर चढण्यास्तव, जगण्यासाठींच अर्पितो प्राण।
भोगे दुःख, सुखास्तव; मूर्ख दुजा सेवकाहुनी कोण ? ११

गद्यार्थ—( सेवकाइतकें विपरीत जीवन कुणाचेंच नसेल-पहा- ) वर चढण्यासाठीं जो नमतो, जगण्यासाठीं प्राण देतो आणि सुखप्राप्तीसाठीं दुःख भोगतो असा मूर्ख, सेवकाशिवाय दुसरा कोणी असेल काय ? ●●●

मन्दाक्रान्ता

नैषां सन्ध्याविधिरविकलो नाच्युतार्चाऽपि साङ्गा
न स्वे काले हवननियमो नापि वेदार्थचिन्ता ।
न क्षुद्वेलानियतमशनं नापि निद्रावकाशो
न द्वौ लोकावपि तनुभृतां राजसेवापराणाम् ॥ १२ ॥

मंदाक्रांता

यांची संध्या कधि न पुरती; सांग पूजा कधीं ना
ना वेळेला हवन, कधिही तत्त्वचिंता घडे ना ॥
खाणें वेळीं नियत न, मिळे वेळ झोंपेसही ना
होतीं कोठें इहपर-सुखें राजसेवारतांना ? ॥१२॥

गद्यार्थ—राजसेवकाना, नोकरीच्या काचापायीं, ना इहलोक, ना परलोक ! याची कधीं संध्या पुरी व्हावयाची नाहीं, ( मध्येंच राजाचें बोलावणें ! ) निर्विघ्नपणें, सांगोपाग, पूजा व्हावयाची नाहीं; नेमल्या वेळीं हवन नाहीं; वेदार्थचिंतन नाहीं. जेवणाच्या वेळीं जेवण नाहीं—आणि झोंपेला तर फुरसतच नाहीं ! ●●●

अनुष्टुभ्

दाता, क्षमी, गुणग्राही स्वामी दुःखेन लभ्यते ।
शुचिर्दक्षोऽनुरक्तश्च जाने भृत्योऽपि दुर्लभः ॥१३॥

अनुष्टुभ्

दाता, क्षमी, गुणग्राही विरळाच असा धनी ।
स्वच्छ, दक्ष, स्वामिभक्त भृत्य दुर्मिळ तो जनीं ॥१३॥

गद्यार्थ—उदार, क्षमाशील, गुणज्ञ असा स्वामी मिळणें कठीण; तसेंच, स्वच्छ, तत्पर, निष्ठावंत नोकर सापडणेंहि कठीण. ●●●

अनुष्टुभ्

सुवर्णपुष्पां पृथिवीं चिन्वन्ति पुरुषास्त्रयः ।
शूरश्च कृतविद्यश्च यश्च जानाति सेवितुम् ॥१४॥

अनुष्टुभ्

जगीं फुलेंच सोन्याचीं वेंचिती जन हे तिन्ही ।
गृहीतविद्या अन् शूर, आणि जो तज्ज्ञ सेवनीं ॥१४॥

गद्यार्थ—नीट विद्या ग्रहण केलेला, शूर, आणि सेवाकर्मांत प्रवीण, अशीं तीन माणसें या जगात ( साधीं नव्हे ) सोन्याचीं फुलें वेंचतात. ●●●

अनुष्टुभ्

यस्मिन्कृत्यं समावेश्य निर्विशङ्केन चेतसा ।
आस्यते, सेवकः स स्यात्कलत्रमिव चापरम् ॥१५॥

अनुष्टुभ्

कार्य सोंपवितां ज्यातें चित्त निश्चिंत राहतें ।
धन्यास भृत्य तो वाटे दुजें जणुं कलत्र तें ॥ १५ ॥

गद्यार्थ—ज्याच्यावर कार्य सोंपवून धन्याच्या मनाला निश्चिंतपणा वाटतो, तो नोकर त्या धन्याला, जणुं, दुसरी बायकोच ( इतका प्रिय ) होऊन बसतो. ●●●

# प्रकरण ३४

**धर्म, तत्त्वज्ञान, सत्य–असत्य, हिंसा–अहिंसा, आत्मा, आत्मौपम्यबुद्धि, कर्म, संन्यास, आश्रमधर्म, पाप, पुण्य, स्थितप्रज्ञ, मन, काम, विषय, नीति, भावभक्ति, मोक्ष, स्वर्ग, नरक, मूर्तिपूजा :—**

कै. लोकमान्यप्रणीत कर्मयोग तत्त्वज्ञानाला धरून या प्रकरणातील श्लोक निवडले आहेत. आत्यंतिक तत्त्वांचीं दोन्ही टोकें सोडून, तेजस्वीपणें, स्वाभिमानानें, वैभवानें जगण्याचें हें तत्त्वज्ञान आहे. कोणावरहि अन्याय न करता व स्वतःवरहि अन्याय होऊं न देता सज्जनाचें रक्षण व दुष्टांचें निर्दालन साधण्यासाठीं तत्त्वांना घातलेली योग्य, समयानुकूल मुरड हाच धर्म ! ●●●

उपजाति

तर्कोऽप्रतिष्ठः श्रुतयश्च भिन्ना नैको मुनिर्यस्य वचः प्रमाणम्
धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायां महाजनो येन गतः स पन्थाः १

वसंततिलका

**तर्का स्थिरत्व न दिसे; श्रुति भिन्न भिन्न**
**नाहीं कुणीच मुनि, यद्वचन प्रमाण ॥**
**राहे गुहांत जणुं धर्मरहस्य गुप्त**
**गेले महाजन जयें, पथ तोच युक्त ॥१॥**

धर्मतत्त्व

गद्यार्थ — तर्कशक्तीनें आकलन करावें, तर, तर्कच मूळांत स्थिर नसतो. वेदांत, मतमतान्तरें दृष्टीस पडतात. असा एकहि मुनि नाहीं कीं, ज्याचें म्हणणें, प्रमाण मानावें; (त्याला अप्रमाण ठरविणारे दुसरे आहेतच !) धर्मांचें तत्त्व, म्हणजे खरें, मूळभूत, स्वरूप, गुहेंत लपल्यासारखें गूढ आहे. (तेव्हां-आपली मति चालेनाशी झाली कीं) थोर लोक ज्या मार्गानें गेले त्यानें जावें हेंच (साधारण माणसांना) योग्य. ●●●

अनुष्टुभ्

धारणाद्धर्ममित्याहुर्धर्मेण विधृताः प्रजाः ।
यः स्याद्धारणसंयुक्तः स धर्म इति निश्चयः ॥२॥

अनुष्टुभ्

**धारणें म्हणती धर्म धरी धर्म प्रजांप्रति ।**
**जो असे धारणायुक्त धर्म तो हीच निश्चिति ॥२॥**

गद्यार्थ—सृष्टि, स्थिति व, लय, या जगाच्या ज्या तीन अवस्था, त्यापैकीं, स्थितीचें कार्य उत्तम प्रकारें चालविणें हें धारण. धर्म, हें धारण करतो, म्हणून तो धर्म. या धारणानेंच प्रजा एकत्र बांधलेल्या आहेत; नाहींतर, समाज विस्कळित होईल. तेव्हां जगाचा संसार उत्तम चालविण्याची धारणाशक्ति ज्यात असेल, तोच धर्म; हें निश्चयानें समजावें. (पण प्रत्येक परिस्थितींत तदनुकूल वृत्ति ठेवणें अवश्य असल्यानें, अमुक एक धर्मकर्तव्य, शाश्वत, असें म्हणता येत नाहीं, म्हणूनच, हें निश्चयाचें सांगणें, ध्येय जें धारण, त्यापुरतेंच खरें; आचाराच्या बाबतींत, म्हणूनच पहिल्या श्लोकांत धर्माला गूढ म्हटलें आहे.) ●●●

अनुष्टुभ्

इज्याऽध्ययनदानानि तपः सत्यं क्षमा शमः ।
अलोभ इति मार्गोऽयं धर्मस्याष्टविधः स्मृतः ॥ ३ ॥

अनुष्टुभ्

**तप, सत्य, क्षमा शांति, यज्ञ, दान, नि शिक्षण ।**
**अलोभ; मार्ग धर्माचे घ्या हे आठहि जाणुन ॥ ३ ॥**

गद्यार्थ—यज्ञ, अध्ययन, दान, तप, सत्य, क्षमा, शांति, निर्लोभवृत्ति हे धर्मांचे आठ मार्ग आहेत. ●●●

अनुष्टुभ्

न तत्परस्य सन्दध्यात्प्रतिकूलं यदात्मनः ।
एष संक्षेपतो धर्मः कामादन्यः प्रवर्तते । ४ ॥

अनुष्टुभ्

**करूं नये दुज्याला तें, जें स्वतांला नको असे।**
**थोडक्यांत असा धर्म – दुजा कामेंच होलसे॥४॥**

गद्यार्थ—जें ( दुसऱ्यानें आपणास केलें असता ) आपणास आवडणार नाहीं तें आपण दुसऱ्याला करू नये ( आत्मौपम्यबुद्धि यालाच म्हणतात. ) थोडक्यात सागावयाचें तर धर्माचें हें सुटसुटीत वर्णन आहे. दुसरें काहीं करणें हें स्वार्थप्रेरित ! ●●●

अनुष्टुभ्

अधर्मरूपो धर्मो हि कश्चिदस्ति नराधिप ।
धर्मश्चाधर्मरूपोऽस्ति तच्च ज्ञेयं विपश्चिता ॥ ५॥

अनुष्टुभ्

**अधर्मरूप घे धर्म, धर्मरूप अधर्महीं।**
**कुठें कुठें, तर सुज्ञें जाणावी स्थिति नीट ही ॥५॥**

गद्यार्थ—याचे दोन अर्थ होऊं शकतील ! साधारण ज्याना धर्म म्हणतात त्यातले कचित् अधर्मरूपच असतात व अधर्म म्हणतात तेच कचित् धर्म ठरतात. किंवा दुसरा अर्थ – धर्म म्हणजे कर्तव्य हें परिस्थितिसापेक्ष असल्यानें, धर्मानें ( साधारण परिस्थितीसाठीं ) सागितलेलें कर्म, अधर्म ठरतें; व अधर्म म्हटलेलें धर्म ठरवें ही स्थिति कधीं कधीं येऊ शकते; हें शाहण्यानें नीट समजून घ्यावें. श्लोक १ व २ यात याच धोरणाचे अर्थ आहेत. ●●●

अनुष्टुभ्

एक एव चरेद्धर्मं नास्ति धर्मे सहायता।
केवल निधिमास्थाय; सहायः किं करिष्यति ?॥ ६॥

अनुष्टुभ्

**एकट्याच करी धर्म विधियुक्तचि जो असे ॥**
**धर्मांत साह्य ना कोणी. साह्याचें फल कायसें ? ॥६॥**

गद्यार्थ—विधियुक्त धर्म खुशाल एकट्यानेंच आचरावा. धर्मांत कोणी साहाय्यास नसते. आणि साहाय्य असून त्याचा उपयोग काय ? ●●●

उपजाति

आदित्यचन्द्रावनिलानलौ च द्यौर्भूमिरापो हृदयं यमश्च ।
अहश्च रात्रिश्च उभे च सन्ध्ये धर्मोऽपि जानाति नरस्य वृत्तम्

इंद्रवज्रा

**सूर्यासवें चंद्र, नि अग्नि, वात**
**भू, स्वर्ग, पाणी, यम, आणि चित्त ॥**
**संध्याहि दोन्ही, दिन, रात्र, धर्म**
**सर्वां, नराचें कळतेंच कर्म ॥ ७ ॥**

गद्यार्थ—सूर्य, चद्र, अग्नि, वायु, स्वर्ग, भूमि, हृदय, यम, दिवस रात्र, उभय सध्यासमय, व धर्म ह्या सर्वांना नराचें चरित्र समजतें ! ! ( या सर्वांची दृष्टि चुकवून कोणतें पाप करता येईल ? तेव्हा सावधान ! ) ●●●

उपजाति

यस्मिन्यथा वर्तते यो मनुष्यस्तस्मिंस्तथा वर्तितव्यं स धर्मः ।
मायाचारो मायया बाधितव्य साध्वाचार साधुना प्रत्युपेयः ८

इंद्रवज्रा

**जो ज्यापरी ज्याप्रति वृत्ति ठेवी**
**त्याशीं तशी वृत्तिच धर्म्य होई ॥**
**खोट्यास खोटेंपण हीच तोड**
**सौजन्य साधूप्रति योग्य जोड ॥ ८ ॥**

गद्यार्थ—ज्याची, आपल्याशीं, जशी वृत्ति असेल, तसेच, त्याच्याशीं वागणें, हा धर्म. मायावी खोटेपणावर, मायावीपणा ही तोड. उलट, सुजनाशीं सौजन्यानें वागणें, हेंच योग्य. ●●●

इन्द्रवज्रा

आहारनिद्राभयमैथुनं च सामान्यमेतत्पशुभिर्नराणाम् ॥
धर्मस्तु तेषामधिको विशेषो धर्मेण हीना. पशुभिः समानाः ९

इंद्रवज्रा

**आहारनिद्राभयमैथुनांत सामान्यता हो पशुमानवांत ।**
**धर्मामुळें तो पशुहून भिन्न धर्माविना तो पशुच्या समान ९**

गद्यार्थ—खाणें, झोप घेणें, भय वाटणें, प्रजोत्पादन करणें, या गोष्टी पशु व मानव याना सामान्यच आहेत. मानवाचें मोठें वैशिष्ट्य म्हणजे धर्म; धर्मविहीन मानव व पशु सारखेच. ●●●

उपजाति

धर्मं प्रसङ्गादपि नाचरन्ति पाप प्रयत्नेन समाचरन्ति ।
आश्चर्यमेतद्धि मनुष्यलोकेऽमृतं परित्यज्य विषं
पिबन्ति ॥ १० ॥

उपजाति

**धर्मे प्रसंगींहि कुणी करी न**
**पापाप्रती मात्र करी प्रयत्न ॥**
**आश्चर्य हें कीं, नर या जगांत**
**सुधा त्यजोनी विषची पितात ॥ १० ॥**

गद्यार्थ– आवश्यक प्रसगींसुद्धा, कोणी धर्म करीत नाहीं; पण पाप मात्र, मुद्दाम प्रयत्न करून करतो; हें केवढें आश्चर्य, कीं, मनुष्य, अमृत टाकून विष पितात.

अनुष्टुभ्

अजरामरवत्प्राज्ञो विद्यामर्थं च चिन्तयेत् ।
गृहीत इव केशेषु मृत्युना धर्ममाचरेत् ॥ ११ ॥

शार्दूलविक्रीडित

**" नाहीं मृत्यु, जरा, कधींच मज " ही वृत्ती धरोनी सदा**
**विद्या, अर्थ, सुदूर दृष्टि धरुनी अर्जीत जा सर्वदा ॥**
**" केसांनीं धरिलें यमें " समज, कीं, येणार ना संधि ही**
**घाईनें कर धर्म शक्य तितुका, हे मानवा ! प्रत्यहीं ११**

गद्यार्थ—विद्या व संपत्ति मिळवितांना माणसानें, आपणाला म्हातारपण व मृत्यु येणारच नाहीं अशा भावनेनें दूरावर दृष्टि ठेवून, धिमेपणानें, ती मिळवावी. पण धर्म करताना, मात्र, प्रत्यक्ष यमानें आपलें केस धरले आहेत, असें समजून, शक्य तितक्या लौकर, शक्य होईल तेवढा धर्म, कसली वाट न पहाता करावा.

अनुष्टुभ्

चला लक्ष्मीश्चलाः प्राणाश्चल जीवितयौवनम् ।
चलाचले च संसारे धर्म एको हि निश्चलः ॥१२॥

आर्या

**लक्ष्मी चंचल, चंचल जीवित तारुण्य, चंचल प्राण ।**
**संसारांत चलाचल, धर्मचि तो एकलाच चंचल न १२**

गद्यार्थ—लक्ष्मी चचल असते, प्राण चचल, जीवित, तारुण्य हेंहि चचल, संसार कांहीं अंशीं चल व कांहीं अंशीं अचल; पण यात अचल असा काय तो एकटा धर्म.

अनुष्टुभ्

पुण्यस्य फलमिच्छन्ति, पुण्यं नेच्छन्ति मानवाः ।
न पापफलमिच्छन्ति, पापं कुर्वन्ति यत्नतः ॥१३॥

अनुष्टुभ्

**इच्छितो फल पुण्याचें, न पुण्य, नर तो परी ।**
**न पापफल तो इच्छी यत्नें पाप करी तरी ॥ १३ ॥**

गद्यार्थ—मनुष्य, पुण्य करू इच्छीत नाहीं; पण, पुण्याचें फल मात्र इच्छितो; उलट पापाचे फळ इच्छीत नाहीं, पण, पाप मात्र आवर्जून करीत असतो.

अनुष्टुभ्

मातृवत्परदारेषु परद्रव्येषु लोष्टवत् ।
आत्मवत्सर्वभूतेषु यः पश्यति स पश्यति ॥ १४ ॥

वसततिलका

**मातेसमान बघतो परक्या स्त्रियेला**
**मातीसमान समजे परक्या धनाला ॥**
**साऱ्या जिवांस गणितो अपुल्यासमान**
**त्या सत्यदृष्टि घडते परमोच्च ज्ञान ॥ १४ ॥**

गद्यार्थ—परस्त्रीला मातेसमान पाहतो; परधन हें मातीसमान पाहतो, सर्व भूताना स्वतःप्रमाणें पाहतो; त्याला सर्वोच ज्ञानदृष्टि आली, असें म्हटलें पाहिजे.

अनुष्टुभ्

अरण्ये विजने न्यस्तं परस्वं दृश्यते यदा ।
मनसाऽपि न हिंसन्ति ते नराः स्वर्गगामिनः ॥१५॥

अनुष्टुभ्

**एकांतीं, पडलें रानीं, परवित्त जधीं दिसे ।**
**न चोरी तें मनानेंही, तो स्वर्गी नर जातसे ॥ १५ ॥**

गद्यार्थ—कोणी पाहणारें नाहीं, अशा निर्जन रानात, परधन पडलेलें पाहून जे त्याची मनानेंहि चोरी करीत नाहींत, ते स्वर्गाला जातात.

अनुष्टुभ्

अश्वमेधसहस्रं च सत्यं च तुलया धृतम् ।
अश्वमेधसहस्रेभ्यः सत्यमेवातिरिच्यते ॥ १६ ॥

अनुष्टुभ्

**सहस्र अश्वमेधांशीं जोखतां नित्य सत्य तें ।**
**त्यांच्याहुनीहि सत्याचें पारडें जाय खालतें ॥ १६ ॥**

गद्यार्थ—(अश्वमेध यज्ञ, हा महापुण्यदायी समजतात,) पण, असे सहस्र यज्ञ एका पारड्यात, व, सत्य दुसऱ्या पारड्यांत, घालून जर त्यांचें वजन केलें, तर दोघात सत्याचें पारडेच जड ठरेल.

●●●

अनुष्टुभ्

नासत्यवादिनः पुण्यं, न सख्यं न यशो भुवि।
दृश्यते नापि कल्याणं कालकूटमिवाश्नतः ॥ १७ ॥

अनुष्टुभ्

**वदे खोटें, न त्या पुण्य, स्नेह वा यशाही तसें।**
**दिसे कल्याणही त्या न, विष खाई तया जसें ॥१७॥**

गद्यार्थ—जो खोटें बोलतो, त्याला पुण्य नाहीं; स्नेहप्राप्ति नाहीं; कीर्तिहि नाहीं! विष प्यायलेल्या माणसाला (भ्रम होऊन,) ज्याप्रमाणें स्वतःचें कल्याण कशात, हें समजत नाहीं, तसेंच खोटें बोलणाराला!

●

अनुष्टुभ्

न हि प्रतिज्ञां कुर्वन्ति वितथां सत्यवादिनः।
लक्षणं हि महत्त्वस्य प्रतिज्ञापरिपालनम् ॥ १८ ॥

अनुष्टुभ्

**सत्यवादी, प्रतिज्ञेला कधीं खोटी करीच न।**
**प्रतिज्ञा पाळणें लोकीं महत्तेचेंच लक्षण ॥ १८॥**

गद्यार्थ— सत्य बोलणारा, हा आपली प्रतिज्ञा, किंवा, एकदा दिलेला शब्द, कधीं खोटा करीत नाहीं. प्रतिज्ञापालन हें जगात फार मोठेपणाचें लक्षण आहे.

●●●

अनुष्टुभ्

सत्यस्य वचनं श्रेय. सत्यादपि हितं वदेत्।
यद्भूतहितमत्यन्तं तत्सत्यमिति धारणा ॥ १९ ॥

अनुष्टुभ्

**बोलणें सत्य हें योग्य; सत्याहुनि वदे हित।**
**अत्यंत हित भूतांचें, सत्य तें, हेंच निश्चित ॥१९॥**

गद्यार्थ— सत्य बोलणें हें योग्य असलें, तरी (त्यालाहि अपवाद आहेत;) सत्यापेक्षाहि हितकर असेल, तें बोलावें. भूतमात्राच्या जें हिताचें,—अत्यत हिताचें— तें सत्य हें निश्चित! (नेहमींच्या व्यवहारांत ज्याला आपण खरें म्हणतो तें केवळ वाचिक सत्य; हिताचें असेल तें बोलणें; मग तें वाचिक सत्य असो वा नसो, त्यालाच खरेंखुरें सत्य, पारमार्थिक सत्य, म्हणतात.)

●●●

अनुष्टुभ्

यदि संन्यासतः सिद्धिं राजन्कश्चिदवाप्नुयात्।
पर्वताश्च द्रुमाश्चैव क्षिप्रं सिद्धिमवाप्नुयुः ॥२०॥

अनुष्टुभ्

**जर सिद्धि मिळे कोणा मात्र संन्यास घेउनी।**
**झाडांना पर्वतांनाही सिद्धिप्राप्ति घडे क्षणीं ॥२०॥**

गद्यार्थ— जर केवळ सन्यास घेण्यानें (कर्मत्याग केल्यानें,) हे राजन्! कोणाला मोक्ष मिळत असेल, तर, तो पर्वताना व झाडाना फारच लौकर मिळाला पाहिजे.

●●●

अनुष्टुभ्

संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ।
तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥२१॥

अनुष्टुभ्

**कर्मयोग नि संन्यास मोक्षदायक दोनही।**
**संन्यासाहुनि हि श्रेष्ठ कर्मयोगचि त्यांतही ॥२१॥**

गद्यार्थ— सन्यास व कर्मयोग दोन्ही मोक्षदायक असले, तरी, त्यातल्या त्यात कर्मयोगच श्रेष्ठ!

●●●

अनुष्टुभ्

कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन।
मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि ॥ २२ ॥

अनुष्टुभ्

**कर्मांचीच तुला सत्ता; फलांवर नसे कधीं।**
**फलहेतु नसो कर्मीं; अकर्म न रुचो हृदीं ॥ २२॥**

गद्यार्थ— केवळ कर्मावरच तुझी सत्ता आहे; फलावर कधींच नव्हे. फलहेतु धरून कर्म करणारा तू होऊं नकोस; अकर्माची तुला आवड नसो.

●●●

अनुष्टुभ्

न हि पश्यामि जीवन्तं लोके कश्चिदहिंसया।
सत्त्वैः सत्त्वा हि जीवन्ति दुर्बलैर्बलवत्तराः ॥२३॥

अनुष्टुभ्

**जगीं कोणी अहिंसेनें जगे हें न दिसे मला।**
**प्राणी एक दुज्यां खाती–बलवंतचि दुर्बलां ॥२३॥**

गद्यार्थ– या जगात, कोणीहि अहिंसेनें जगतो, असें कांहीं मला दिसत नाहीं. प्राण्यांना खाऊनच प्राणी जगतात. दुर्बलांना खाऊन बलवंत जगतात. (जीवो जीवस्य जीवनम् हा जगाचा निरपवाद नियम आहे. शुद्ध अहिंसा ही केवळ अशक्य आहे.)

●●●

अनुष्टुभ्

*अहिंसायां तु निरता यतयो द्विजसत्तम।*
*कुर्वन्त्येव हि हिंसां ते; यत्नादल्पतरा भवेत् ॥ २४ ॥*

अनुष्टुभ्

**अहिंसारत ऐसाही यति हिंसाच आचरी।**
**परंतु शक्य तों तीतें यत्नांनीं अल्प तो करी ॥२　॥**

गद्यार्थ— हे ब्राह्मणश्रेष्ठा! अहिंसेविषयी फार प्रेम असलेले मुनिसुद्धां, नीट पाहिलें, तर, हिंसाच करतात. इतकेंच कीं, ते, प्रयत्नानीं शक्य तितकी कमी करतात.

●●●

अनुष्टुभ्

के न हिंसन्ति जीवान्वै लोकेऽस्मिन् पुरुपर्षभ।
बहु संचिन्त्य मे भाति नास्ति कश्चिदहिंसकः॥ २५॥

अनुष्टुभ्

**पुरुषश्रेष्ठ! या लोकीं जीवा हिंसिति कोण न?।**
**विचारांतींच वाटे, कीं, अहिंसक कुणीच न ॥२५॥**

गद्यार्थ— हे पुरुषश्रेष्ठा! या जगात जीवाची हिंसा कोण करीत नाहींत? पूर्ण विचार करूनच वाटतें, कीं, अहिंसक असा कोणीच नाहीं.

●●●

अनुष्टुभ्

इन्द्रियाणि पराण्याहुरिन्द्रियेभ्यः परं मनः।
मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः॥ २६॥

अनुष्टुभ्

**इंद्रियें जरि हीं मोठीं—मन मोठेंच त्याहुनी।**
**त्याहुनी बुद्धि; अन् आत्मा श्रेष्ठ या सकलांहुनी ॥ २६ ॥**

गद्यार्थ—इंद्रियें मोठीं आहेत असें म्हणतात; पण, मन हें इंद्रियांहून मोठे, व, मनाहून बुद्धि मोठी, व सर्वांहून आत्मा मोठा!

●●●

उपजाति

वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि ॥
तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही ॥ २७ ॥

उपजाति

**स्वजीर्ण वस्त्रें त्यजुनी जशीं तीं**
**दुजीं नवीं मानव नित्य घेती ॥**
**हा देह जातां थकुनी तसा तो**
**आत्माहि देहांत नव्याच जातो ॥ २७ ॥**

गद्यार्थ—ज्याप्रमाणें मनुष्य, वस्त्रे जीर्ण झालीं, कीं ती टाकून नवीं धारण करतो, त्याप्रमाणें, देही = देहाचा स्वामी = आत्मा, हे देह जीर्ण झाले, कीं त्याना टाकून देऊन नव्या देहांत प्रवेश करतो.

●●●

अनुष्टुभ्

देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा।
तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ २८ ॥

अनुष्टुभ्

**नरदेहास ये जैशी बाल्य, तारुण्य, वृद्धता।**
**दुजा देह मिळे तैसा—चळे धीर न पाहतां ॥२८॥**

गद्यार्थ—मनुष्याला ज्याप्रमाणें, याच देहाला, बालपण तारुण्य, व म्हातारपण, क्रमानें येतें; अगदीं त्याप्रमाणें, दुसऱ्या देहाची प्राप्ति हेंहि. (सहजन्मास धरूनच असतें.) व तें पाहून धैर्याचा पुरुष चलित होत नाहीं.

●●●

अनुष्टुभ्

जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च।
तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ २९ ॥

अनुष्टुभ्

**मृत्यु निश्चित, जन्मे त्या; मृताचा जन्म निश्चयें।**
**तेव्हां अटळ वस्तूचा शोक तूंहि करूं नये ॥२९॥**

गद्यार्थ—जो जो जन्माला आला, त्याला त्याला, मृत्यु हा येणारच ! तसेच जो जो मेला, त्याला त्याला पुनर्जन्म आहेच. तेव्हा या दोन्हींचा क्रम, असा अपरिहार्य असल्यानें, याचा, तू शोक करणें शोभत नाहीं. ●●●

अनुष्टुभ्

नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सत: ।
उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥ ३० ॥

अनुष्टुभ्

**जें नसे, त्या न अस्तित्व, असे जें, नाश त्या नसे।**
**दोघांचाहि परी अंत तत्त्वज्ञें पाहिला असे ॥ ३० ॥**

गद्यार्थ—मूलत जें सृष्टींत नाहीं, त्याला अस्तित्व कधींच मिळणार नाहीं. तसेच, जें आहे, त्याचा अभाव कधींहि होणार नाहीं. (पदार्थविज्ञानातील Conservation of Matter हें तत्त्व ततोतत हेंच सागतें) पण या दोघाचाहि (किंवा दोन्ही नियमाचाहि) अत, तत्त्वज्ञानें पाहिलेला आहे. (म्हणूनच तर भौतिक शास्त्रापेक्षा तत्त्वज्ञान पुष्कळ पुढें गेलेलें आहे.) ●●●

अनुष्टुभ्

आदावन्ते च यन्नास्ति कीदृशी तस्य सत्यता ? ।
आदावन्ते च यन्निस्य तत्सत्य नाम, नेतरत् ॥ ३१ ॥

अनुष्टुभ्

**आधीं, अंतींहि जें नाहीं, सत्यता त्यांत कोठुन ? ।**
**आद्यन्तांतहि जें नित्य, सत्य तें एक, अन्य न ॥ ३१ ॥**

*गद्यार्थ—जें आरभीं नव्हतें, व शेवटींहि असणार नाहीं, त्याला सत्यता कसली ? आरभीं होतें, व अंतींहि असणार, तें एकच सत्य, दुसरें नाहीं.* ●●●

अनुष्टुभ्

आदावेव हि नोत्पन्न यत्तस्येहास्तिता कुत: ?
कुतो मरौ जलसरिद् द्वितीयेन्दौ कुतो ग्रह ? ३२

वसंततिलका

**मूळांत ज्या न कधि जन्मचि लाभला, तें**
**'अस्तित्वयुक्त' म्हणणें कधि युक्त होतें ? ॥**
**रेताड भूमिंत झरे निघतील कैसे**
**चंद्रास या ग्रहणही द्वितियेस कैसें ? ॥ ३२ ॥**

*गद्यार्थ—मूळात, ज्याला जन्म नाहीं, त्याला अस्तित्व आहे, असें कसें म्हणता येईल ? रेताड प्रदेशात पाण्याचे झरे कसे निघतील ? द्वितीयेच्या चद्राला ग्रहण कसें लागेल ?* ●●●

अनुष्टुभ्

अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।
अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ? ॥ ३३ ॥

अनुष्टुभ्

***अव्यक्त जन्म सृष्टीचा व्यक्त मध्यचि केवळ ।***
***अतही गूढ सृष्टीचा तेथ शोकचि निष्फळ ३३***

गद्यार्थ—जीवसृष्टीचा जन्म अव्यक्त आहे, अंतहि अव्यक्तच आहे; केवळ मध्यभागच व्यक्त असतो. (इग्रजींत Life is an isthmus between two eternities) तेव्हा या परिस्थितींत शोक कशाचा ? ●●●

अनुष्टुभ्

नैन छिन्दन्ति शस्त्राणि नैन दहति पावक: ।
न चैन क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुत: ॥ ३४ ॥

अनुष्टुभ्

***न यातें छेदितीं शस्त्रें; न यातें अग्नि जाळितो***
***न या भिजवितें पाणी, सुकवी या न वायु तो ॥ ३४ ॥***

गद्यार्थ—याला (आत्म्याला) शस्त्रें छेदू शकत नाहींत; अग्नि जाळू शकत नाहीं, पाणी भिजवू शकत नाहीं, वारा सुकवूं शकत नाहीं. ●●●

अनुष्टुभ्

य एन वेत्ति हन्तार यश्चैन मन्यते हतम् ।
उभौ तौ न विजानीतो नाय हन्ति न हन्यते ॥ ३५ ॥

अनुष्टुभ्

**जो यास मानितो हंता, जो वा या समजे हत ।**
**त्या दोघासहि न ज्ञान, न हा मारी, न हा मृत ॥ ३५ ॥**

*गद्यार्थ—हा आत्मा मारणारा आहे, असें जो मानतो, किंवा, हा मारला गेलेला आहे, असें जो समजतो, त्या दोघां*नाहि याचें नीट आकलन झालेलें नाहीं. हा कोणाला मारीत नाहीं, हा मरतहि नाहीं. ●●●

उपजाति

न जायते म्रियते वा कदाचिन्नाय भूत्वा भविता वा न भूयः।
अजो नित्यः शाश्वतोऽय पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ३६

इंद्रवज्रा

**जन्मे न हा, या, न मरे कधींच**
**झाला न, होणारहि ना पुनश्च ॥**
**हा नित्य, हा शाश्वत, जन्महीन**
**प्राचीन, हा देहवधें मरे न ॥ ३६ ॥**

गद्यार्थ—हा आत्मा जन्मत नाहीं, मरतहि नाहीं; पूर्वी होऊन गेला असेंहि नाहीं, पुन्हा पुढ होणार असेहि नाहीं. हा *अजन्म, नित्य, चिरजीव, प्राचीन असून,* ज्या देहात हा असतो, तो देह वधिल्यानें, हा मारला जात नाहीं. ●●●

अनुष्टुभ्

उद्धरेदात्मनाऽऽत्मानं नात्मानमवसादयेत् ।
*आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ३७ ॥*

अनुष्टुभ्

**उद्धरावें 'स्व' नें 'स्वा' ला, गळूं देऊं कधीं नये ।**
**बंधु स्वतां स्वतांचा हा स्वतांचा शत्रुहि स्वयें ॥ ३७ ॥**

गद्यार्थ—स्वताचा उद्धार स्वताच केला पाहिजे. धीर खचूं देता कामा नये. आपले बंधु आपणच असतों; व आपणच आपले शत्रु असतों. (श्लोक ६ पहा–नास्ति धर्मे सहायता — एक एव चरेद्धर्मम् ।) ●●●

अनुष्टुभ्

बीजात्कारणत कार्यमङ्कुरः किल जायते ।
न बीजमपि यत्रास्ति तत्र स्यादङ्कुरः कुत ? ॥ ३८ ॥

अनुष्टुभ्

**बीज या कारणांतून कार्य अंकुर होतसे ।**
**बीजेंच नसती तेथें येती अंकुर ते कसे ? ॥ ३८ ॥**

गद्यार्थ—बीज या कारणातून, अंकुर हें कार्य उत्पन्न होतें. जेथें बीजच नसेल तेथे अंकुर कोठला ? ●●●

वसंततिलका

मुख्याङ्कुरं सुभग ! विद्धि मनो हि पुंसां
देहास्ततः प्रविसृतास्तरुपल्लवाभा ॥
नष्टेऽङ्कुरे पुनरुदेति न पल्लवश्री–
र्नैवाङ्कुरः क्षयमुपैति दलक्षयेषु ॥ ३९ ॥

वसंततिलका

**मुख्यांकुरासम मनासचि जाणुनीया**
**देहेन्द्रियांस तरुपल्लव मान तूं यां ॥**
**ये पालवी न, कधिं, अंकुर नष्ट होतां**
**लोपेल अंकुर न, पल्लव नष्ट होतां ॥ ३९ ॥**

गद्यार्थ—हे सुज्ञा ! माणसाच्या मनाला, तू, मुख्य अंकुराप्रमाणें; देहेंद्रियाना, त्या अंकुरातून फुटणाऱ्या रोपाप्रमाणें; व *पालवीप्रमाणें, मान; अंकुर नष्ट झाला, तर, पालवी कधीं येणार* नाहीं. पण पल्लव नष्ट झाल्यानें, अंकुर मात्र क्षय पावत नाहीं. (तेव्हा देहापेक्षा मनाचें महत्त्व लक्षात घेऊन इंद्रियापेक्षा त्याचेंच दमन करणें अवश्य.) ●●●

अनुष्टुभ्

उत्थितानुत्थितानेतानिन्द्रियाहीन्पुनः पुनः ।
हन्याद्विवेकदण्डेन वज्रेणेव हरिर्गिरीन् ॥ ४० ॥

उपजाति

**पुन्हां पुन्हां इंद्रियसर्प जेव्हां**
**फणा उभारून उठेल तेव्हां ॥**
**विवेकदण्डे वध तू तयास**
**वज्रें जसा इंद्र वधी गिरीस ॥ ४० ॥**

गद्यार्थ—हे इंद्रियरूपी सर्प पुन्हा पुन्हा, जेव्हा फणा उभारून उठतील, तेव्हा तेव्हा, त्यांना विवेकरूपी, दंडानें, इंद्रानें जसें पर्वताना वज्रानें मारिलें, तसें तू मार. ●●●

अनुष्टुभ्

अहङ्कारो धियं ब्रूते "मा सुप्तं प्रतिबोधय ।
उदिते परमानन्दे न त्वं, नाहं, न वा जगत्" ॥ ४१ ॥

उपजाति

**वदे अहंकार सदा मतीस**
**कीं "निद्रिता त्या उठवूं नकोस ॥**
**तो उच्च आनंद जधीं उठेल**
**'मी' 'तूं' सवें हें जगही बुडेल" ॥ ४१ ॥**

गद्यार्थ—अहंकार हा बुद्धीला म्हणतो, "तो जो निजलेला (आत्मा) आहे, त्याला तू उठवू नकोस. कारण परमानंद स्वरूपी तो (आत्मा) एकदा जागृत झाला, की, 'तू' व 'मी' व सारें जगत् नष्ट होईल." (या रूपकात फार मोठा अर्थ साठवलेला आहे. बुद्धि व अहंकाराचें प्रेमलग्न लागलेलें असतें

व त्याना आपले प्रणयाचे चाळे स्वच्छंद खेळावयास मिळावे, म्हणून, (बुद्धि आत्म्याला जागृत करायला जाईल, म्हणून,) अहकार तिला बदी करतो. कारण एकदा तो पूर्णानदस्वरूप आत्मा जागृत झाला कीं, अहकार, बुद्धि, व या संसाराचें अस्तित्वच राहणार नाही।")

अनुष्टुभ्

इन्द्रियाण्येव तत्सर्वं यत्स्वर्गनरका भौ।
निगृहीतविसृष्टानि स्वर्गाय नरकाय च ॥ ४२ ॥

अनुष्टुभ्

नरक स्वर्ग हे दोन्ही इंद्रियांचीच या कृति।
बांधितां, सोडितां नेती स्वर्गा वा नरकाप्रति ॥ ४२ ॥

गद्यार्थ—ज्याला आपण स्वर्ग, व, नरक म्हणतों, ते दोन्ही, केवळ इद्रियाचे चाळे आहेत. नीट सयमात ठेवलेलीं इद्रियें, हीं माणसाला स्वर्ग दाखवितात; तर बधनातून सुटलेलीं इद्रियें हींच माणसाला नरक दाखवितात.

अनुष्टुभ्

न मोक्षो नभसः पृष्ठे, न पाताले न भूतले।
मोक्षो हि चेतो विमल सम्यग्ज्ञानविबोधितम् ॥ ४३ ॥

अनुष्टुभ्

न आकाशीं, न पातालीं, न राहे मोक्ष भूतलीं।
वसे निर्मलशा चित्तीं-ज्या ये सुज्ञानजागृति ॥ ४३ ॥

गद्यार्थ—मोक्ष मोक्ष ज्याला म्हणतात, तो, कांहीं कोठें आकाशात, पाताळात, किंवा, पृथ्वीतलावर नसतो. तर चागल्या ज्ञानानें जागृति आलेल्या, निर्मल अशा हृदयातच, तो असतो.

अनुष्टुभ्

न शास्त्रैर्नापि गुरुणा दृश्यते परमेश्वरः।
दृश्यते स्वात्मनैवात्मा स्वया सत्त्वस्थया धिया ॥ ४४ ॥

अनुष्टुभ्

न शास्त्र, गुरु, या, कोणा दावी ईश्वर तो कधीं।
स्वात्म्यानेंच दिसे आत्मा जधीं सात्त्विक होइ धी ४४

गद्यार्थ—शास्त्राच्या साहाय्यानें, किंवा, सद्गुरूच्या साहाय्यानें, कोणालाहि परमेश्वराचें दर्शन घडत नाहीं तर जेव्हां बुद्धि सात्त्विक होते, तेव्हा आत्म्यानेंच (परमेश्वरस्वरूप) आत्म्याचें दर्शन घडतें.

अनुष्टुभ्

श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परन्तप।
सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥ ४५ ॥

अनुष्टुभ्

द्रव्ययज्ञाहुनी श्रेष्ठ, ज्ञानयज्ञचि अर्जुन।
*ज्ञानात लोपुनी जातें सगळें कर्मबंधन ॥ ४५ ॥*

गद्यार्थ— अर्जुना! द्रव्ययज्ञापेक्षा ज्ञानयज्ञच श्रेष्ठ होय. सर्व सर्व कर्मबधन ज्ञानात सपून जातें.

अनुष्टुभ्

यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन।
ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥ ४६ ॥

अनुष्टुभ्

जसा चेतविलेला अग्नि करी भस्मचि सर्पणा।
तसा ज्ञानाग्निही भस्म करितो कर्मबन्धना ॥ ४६ ॥

गद्यार्थ—ज्याप्रमाणें चागला फुलविलेला अग्नि, हा, सर्पणाचें भस्म करून टाकतो, त्याप्रमाणें, ज्ञानाग्नि हा कर्मांचीं सारीं बधनें जाळून भस्म करतो.

अनुष्टुभ्

श्रद्धावाल्लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः।
ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति ॥ ४७ ॥

अनुष्टुभ्

श्रध्दावान् मिळवी ज्ञान वशेन्द्रिय नि तत्पर।
ज्ञानापुढें महाशांति मिळते त्यास सत्वर ॥ ४७ ॥

गद्यार्थ—श्रद्धा, ज्ञानाचा ध्यास घेणें, व इद्रियें ताब्यात ठेवणें, या तिघाच्या साह्यानें, ज्ञान प्राप्त होतें, व ज्ञानप्राप्तीनतर, त्यास, लौकरच परमशांति प्राप्त होते.

अनुष्टुभ्

उभाभ्यामेव पक्षाभ्यां यथा खे पक्षिणां गतिः ।
तथैव ज्ञानकर्मभ्यां जायते परमं पदम् ॥ ४८ ॥

अनुष्टुभ्

**पक्षद्वयेच आकाशीं पक्षी हे उडती जसे ।**
**ज्ञानकर्मद्वयी तैशी सर्वोच्च पद देतसे ॥ ४८ ॥**

गद्यार्थ—दोन्ही पंखांनींच जसे पक्षी आकाशांत संचार करतात, तद्वतच, ज्ञान व कर्म यांची जोडी ही माणसाला सर्वोच्च पद देते! ●●●

अनुष्टुभ्

योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् ।
आत्मवन्तं न कर्माणि निबध्नन्ति धनंजय ॥ ४९ ॥

अनुष्टुभ्

**योगें कर्मफलें सोडी, ज्ञानें गलितसंशय ।**
**आत्मज्ञास अशा कर्मे बाधती न धनंजय ॥ ४९ ॥**

गद्यार्थ—योगानें, जो कर्मफलबुद्धीचा संन्यास करतो; व ज्ञानानें, सर्व संशय फेडून घेतो, अशा आत्मज्ञान झालेल्या मनुष्याला, हे अर्जुना ! कर्मे बंधनकारक होत नाहींत. ●●●

अनुष्टुभ्

न केचन जगद्भावास्तत्त्वज्ञं रञ्जयन्त्यमी ।
मर्कटा इव नृत्यन्तो गौरीलास्यार्थिनं हरम् ॥५० ॥

अनुष्टुभ्

**चाळे जगाचे ना मोद देती तत्त्वज्ञशा नरा ।**
**नाचरी माकडें जैशीं गौरीनृत्येच्छु शंकरा ॥ ५० ॥**

गद्यार्थ—पार्वतीचें नृत्य पाहण्यास हपापलेल्या शंकराला, ज्याप्रमाणें, नाचरी माकडें आनंद देत नाहींत, तद्वत्, जगाचे चाळे, तत्त्वज्ञ माणसाला मनोरंजक होत नाहींत. ●●●

अनुष्टुभ्

यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः ।
इंद्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५१ ॥

अनुष्टुभ्

**चौफेर हा जशीं चोरी निजांगें कांसवापरी ।**
**इंद्रियें विषयांतून, त्याची प्रज्ञा स्थिरा खरी ॥ ५१ ॥**

गद्यार्थ—कासव आपले सर्व अवयव, सर्व बाजूंनीं, (आपल्या पाठीखालीं) आखडून घेतें, त्याप्रमाणें, मनुष्य जेव्हां आपलीं सर्व इंद्रियें विषयापासून चोरून घेतो, तेव्हां त्याची प्रज्ञा नीट *स्थित झाली, तो स्थितप्रज्ञ झाला असे म्हणतात.* ●●●

अनुष्टुभ्

सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।
ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥ ५२ ॥

आर्या

**लाभालाभ जयाजय, सुखदुःखहि तूं समान मानोनी ।**
**घेइ युद्धांत उडी, पाप न लागेल तुज असें करुनी ॥ ५२**

गद्यार्थ—( हे अर्जुना ! ) सुख दुःख, लाभ, हानि; जय, पराभव *हीं सर्व समान मानून तू युद्धांत उडी घे; असें करण्यानें तुला* पाप लागणार नाहीं ●●●

अनुष्टुभ्

सुखं वा यदि वा दुःखं प्रियं वा यदि वाऽप्रियम् ।
प्राप्तं प्राप्तमुपासीत हृदयेनापराजितः ॥ ५३ ॥

अनुष्टुभ्

**प्रियाप्रिय, सुखें दुःखें जें जें येईल वाढुनी ।**
**तें तें सेवा योग्यभावें हृदीं हार न खाउनी ॥ ५३ ॥**

गद्यार्थ—जें काय कर्माचें, भोक्तव्याचें, ताट आपल्यापुढें वाढून आलें असेल, मग तें सुखाचें असो दुःखाचें असो, आवडणारें असो, नावडतें असो;—जसें असेल तसें सममावानें, हृदयानें हार न खाता, सेवन करावें. ●●●

अनुष्टुभ्

अन्तर्नैराश्यमादाय बहिराशोन्मुखः स्थितः ।
बहिस्तप्तोऽन्तरा शीतो लोके विहर राघव ॥ ५४ ॥

उपजाति

**नैराश्य दाबोनि पुरें मनांत**
**वरोनि आशा धरुनी जनांत ॥**
**बाहेरुनी तप्त, मनांत शीत**
**रामा ! असा वावर तूं जगांत ॥ ५४ ॥**

गद्यार्थ—निराशा सर्व हृदयांत दाबून ठेवून, बाहेरून पूर्ण *आशावादी वृत्ति ठेवून, बाहेरून तप्त असलास, तरी आंत थंड* अशा ( स्थितप्रज्ञ ) वृत्तीनें, हे रामा ! तू जगांत वावर. ●●●

अनुष्टुभ्

नगर्यां दह्यमानाया भूषितायां तथोत्सवे ।
सम एव महीपालो जनको भूभृता वरः ॥ ५५ ॥

अनुष्टुभ्

उत्सवार्थ सजो किंवा भडको नगरी कधीं ।
दोन्ही वेळीं स्थितप्रज्ञ जनकाची समान धी ॥५५

गद्यार्थ—नगरी उत्सवाच्या निमित्तानें सजविलेली असो, किंवा, आगीनें भडकलेली असो, नृपश्रेष्ठ स्थितप्रज्ञ जनकाची दोन्ही प्रसंगीं समान दृष्टि असते. ●●●

अनुष्टुभ्

नोदेति नास्तमायाति सुखदुःखे मुखप्रभा ।
यथाप्राप्तस्थितेर्यस्य जीवन्मुक्त स उच्यते । ५६ ।

अनुष्टुभ्

मुखचंद्र सुखीं दु.खीं उदयास्त न दावितो ।
जशी स्थिति तसा वागे—जीवन्मुक्त खराच तो ॥५६॥

गद्यार्थ—सुख, दु ख, कोणत्याहि प्रसगी ज्याचा मुखचद्र, उदय किंवा अस्त झाल्याप्रमाणें, प्रफुल्लहि होत नाहीं, किंवा म्लानहि होत नाही,—व जो जशी स्थिति येईल तसें वागतो, त्याला जीवन्मुक्त म्हणतात ( जिवत असून मुक्तावस्थेस पोंचलेला !) ●●●

अनुष्टुभ्

दु खेष्वनुद्विग्नमना सुखेषु विगतस्पृहः ।
वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ ५७

अनुष्टुभ्

जो विपण्ण न दु खांनीं, ज्या सुखात स्पृहा नसे ।
प्रेमक्रोधभयावीण मुनि तो स्थिरधी असे ॥ ५७ ॥

गद्यार्थ—दु खानीं जो खिन्न होत नाहीं, सुखाविषयीं ज्याला विशेष आस्था नसते, ज्यानें प्रेम, भय, कोप हीं सर्व हृदयातून हद्दपार केलीं आहेत, त्याला स्थितप्रज्ञ मुनि म्हणतात. ●●●

अनुष्टुभ्

न हि प्राणात्प्रियतर लोके किञ्चन विद्यते ।
तस्माद् दया नर कुर्यात्यथाऽऽत्मनि तथा परे ॥ ५८॥

अनुष्टुभ्

प्राणाहुनी कुणा कांहीं प्रिय नाहींच भूवरी ।
तस्मात् स्वतांवरी तैशी दया कर दुज्यावरी ॥ ५८ ॥

गद्यार्थ—जगात कोणालाहि प्राणाहून अधिक प्रिय असें, काहींच नाहीं. यास्तव जशी व जितकी, तू स्वतावर दया करतोस, तशी व तितकी दया, तू दुसऱ्यावरहि कर. ●●●

अनुष्टुभ्

आत्मौपम्येन सर्वत्र सम पश्यति योऽर्जुन ।
सुखं वा यदि वा दुःख स योगी परमो मतः ॥ ५९ ॥

अनुष्टुभ्

आत्मौपम्येच जो पाहे सम सर्वत्र अर्जुन ।
सुखादु.खांस, तो योगी थोर हें ठेव जाणुन ॥ ५९ ॥

गद्यार्थ—जो, आत्मौपम्य (स्वताचीच उपमा दुसऱ्यास देऊन त्यानुसार वर्तन ) बुद्धीनें, सर्वत्र सुखदु खास सम, पाहतो तो मोठा योगी असे समजा ●●●

अनुष्टुभ्

या निशा सर्वभूताना तस्या जागर्ति सयमी ।
यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥ ६० ॥

अनुष्टुभ्

जी रात्र सर्व जीवांना, संयमी तेथ जागृत ।
जागती सर्व, ती रात्र तत्त्वदर्शी मुनीप्रत ॥ ६० ॥

गद्यार्थ—( नेहमींच्या दिवसरात्रीविषयीं हें बोलणें नव्हे.) सर्व जीवाची रात्र असते ( ज्या विषयाच्या बाबत बहुजन बेसावध असतात ) तेव्हा संयमी जागा असतो आणि सर्व प्राणी जागत असतात ( ज्या क्षुद्र विषयानात बहुजनाना फार आस्था वाटते, त्याबाबत ) तेव्हा सयमी झापलेला असतो. ( कारण तो तत्त्वज्ञ असल्यानें बहुजनाचे व त्याचे आवडीचे विषय बरोबर उलट असतात. ) ●●●

अनुष्टुभ्

यदिद ब्रह्मणो रूप ब्रह्मचर्यमिति स्मृतम् ।
पर तत्सर्वधर्मेभ्यस्तेन यान्ति परां गतिम् ॥ ६१ ॥

अनुष्टुभ्

ब्रह्माचें रूप हें जें, त्या ब्रह्मचर्यचि बोलती ।
सर्व धर्मांत तें श्रेष्ठ तेणें लाभे परा गति ॥६१॥

गद्यार्थ— हें जें वरील १० श्लोकात स्थितप्रज्ञाच्या ब्राह्मी स्थितीचें, रूप वर्णिलें; त्यालाच ब्रह्मचर्य म्हणतात. हें सर्व कर्तव्यधर्मांत श्रेष्ठ असून त्यामुळें मनुष्य परमपदास पोंचतो. ●●●

अनुष्टुभ्

न देवो विद्यते काष्ठे न पाषाणे न मृण्मये ।
भावे हि विद्यते देवस्तस्माद्भावो हि कारणम् ॥६२॥

अनुष्टुभ्

**न वसे देव काष्ठांत, न पाषाणीं, न मातिंत ।**
**भावांत ( भक्तींत ) नित्य तो राहे**
**तेव्हां कारण भाव हें ॥ ६२ ॥**

गद्यार्थ— देव काहीं लाकडात नसतो, दगडात नसतो, मातींत नसतो. तो भक्तिभावात असतो ( भाव तेथें देव. ) तेव्हां देव कल्पनेचें मूळ कारण भाव हेंच होय. ●●●

अनुष्टुभ्

पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।
तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मन. ॥ ६३ ॥

अनुष्टुभ्

**पत्र, पुष्प, फलें, पाणी, देई जो मज भक्तिनें ।**
**सेवीं मी तें स्वभक्तानें आणितां संयमी मनें ॥६३॥**

गद्यार्थ— ( भगवान् म्हणतात— ) भक्तानें सयमी मनानें व भक्तिभावानें, जें काय, पानें, फुलें, फळें, पाणी मला अर्पण केलें असेल, तें, मी सेवन करतों. ( मला तें अत्यत प्रिय असतें. ) ●●●

अनुष्टुभ्

ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।
मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्या पार्थ सर्वशः ॥ ६४ ॥

अनुष्टुभ्

**ज्या भावें जो मला सेवी, त्या मी तैसाच वर्ततों ।**
**सर्वत्र नर या माझ्या मार्गा धरुनि चालतो ॥ ६४ ॥**

गद्यार्थ— ( भगवान् म्हणतात, भक्त काहीं सर्व सारखे नसतात; काहीं खरोखर हृदयापासून भक्ति धरणारे, काहीं बरवरचे भक्त, काहीं ढोंगी ! ) जो कोणी ज्या भावानें मजकडे येतो, त्याच्या त्याच्या भक्तीप्रमाणें मी त्याच्याशीं वागतों. (त्याच्या त्याच्या भक्तीप्रमाणें त्याला त्याला फल देतों. ) आणि मानव या माझ्या मार्गाला धरूनच पूर्णपणें चालत असतात. (आणि न चालतील तर नाश पावतील. ) ●●●

अनुष्टुभ्

परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ६५ ॥

अनुष्टुभ्

**रक्षणा सज्जनांच्या; मी, दुर्जनांच्या विनाशना ।**
**युगोयुगीं जन्म घेतों धर्म स्थापावया पुन्हां ॥ ६५ ॥**

गद्यार्थ—( भगवान् म्हणतात )— सज्जनाच्या सरक्षणासाठीं आणि दुर्जनाचा विनाश करण्यासाठीं आणि धर्माची पुन्हां पुन्हा स्थापना करण्यासाठीं, मी युगायुगातून अवतार घेतों. ●●●

उपजाति

धर्मार्थकामाः सममेव सेव्या यो ह्येकभक्तः स नरो जघन्यः ।
तयोस्तु दाक्ष्यं प्रवदन्ति मध्यं स उत्तमो योऽभिरतस्त्रिवर्गे ६६

वसंततिलका

**धर्मार्थकाम सम मानुनि ठेव वृत्ति**
**एकामधेंच परि नीच धरील भक्ति ॥**
**दोघांत जो कुशल, मध्यम त्या म्हणावें**
**घेई तिघांत रस, उत्तम त्या गणावें ॥ ६६ ॥**

गद्यार्थ—चार पुरुषार्थांपैकीं जे तीन धर्म, अर्थ, काम, त्या सर्वांना समान महत्त्व देऊन वागणें उत्तम; यापैकीं एकाचीच म्हणजे धर्माची तर धर्माचीच, सपत्ति मिळविण्याची तर संपत्तीच मिळविण्याची, कामाची आराधना, तर केवळ तीच, अशा रीतीनें करणारा, हा नीच; यापैकीं दोघांची आराधना मध्यम; व तिघांचीहि समतोलपणें उपासना करणारा तो उत्तम ! ●●●

अनुष्टुभ्

आश्रमास्तुलया सर्वान् धृतानाहुर्मनीषिणः ।
एकतश्च त्रयो राजन् गृहस्थाश्रम एकतः ॥ ६७ ॥

अनुष्टुभ्

**सर्वेही आश्रमां, सुज्ञ, वदे, तोलुनि पाहतां ।**
**तुल्य अन्य तिघांना त्यां गृहस्थाश्रम एकटा ॥ ६७ ॥**

गद्यार्थ—ब्रह्मचर्याश्रम, गृहस्थाश्रम, वानप्रस्थाश्रम, व सन्यासाश्रम हे चारहि आश्रम जर तराजूत घालून पाहिले, तर, सुज्ञ लोक असें म्हणतात, कीं एका पारड्यात बाकी तिन्ही आश्रम व दुसऱ्या पारड्यात एकटा गृहस्थाश्रम घातल्यास हे राजा ! कदाचित् तुला होऊ शकेल. ●●●

अनुष्टुभ्

यथा नदीनदाः सर्वे सागरे यान्ति संस्थितिम्।
एवमाश्रमिणः सर्वे गृहस्थे यान्ति संस्थितिम् ॥ ६८ ॥

अनुष्टुभ्

**जैसे, नद, नद्या, सारीं लीन होतात सागरीं।**
**सारे आश्रम त्या रीतीं गृहस्थांत समावतीं ॥ ६८ ॥**

गद्यार्थ—नद, नद्या, सर्व ज्याप्रमाणें समुद्रात जाऊन विलीन होतात; त्याप्रमाणें, चारहि आश्रम गृहस्थाश्रमांत एकत्रित होतात. (एवढी मोठी, जगाचें हित करण्याची पात्रता गृहस्थाश्रमांत असते.)

●●●

अनुष्टुभ्

यथा मातरमाश्रित्य सर्वे जीवन्ति जन्तवः।
एवं गार्हस्थ्यमाश्रित्य वर्तन्त इतराश्रमाः ॥ ६९ ॥

अनुष्टुभ्

**सारेच जीव मातेच्या आश्रयें जगती जसे।**
**अन्याश्रम गृहस्थाच्या आश्रयें राहती तसे ॥ ६९ ॥**

गद्यार्थ— मनुष्यमात्रास मातेची जेवढी महती, तेवढी, इतर तिन्ही आश्रमांना, गृहस्थाश्रमाची आहे. मातेप्रमाणें, तो, अक्षरशः इतर आश्रमांचा जन्मदाता व पोषणकर्ताहि आहे. ब्रह्मचारी हा गृहस्थाश्रमी गुरूच्या आश्रयें, व वानप्रस्थाश्रमी व संन्यासी हे भिक्षाभोजी; दोन्ही गृहस्थाश्रमी जनांच्या आश्रयाशिवाय जगूच शकत नाहीत.

●●●

अनुष्टुभ्

यत्कर्म कुर्वतोऽस्य स्यात्परितोषोऽन्तरात्मनः।
तत्प्रयत्नेन कुर्वीत विपरीत तु वर्जयेत् ॥ ७० ॥

अनुष्टुभ्

**अंतरात्म्यास, जें कर्म करितां तुष्टि वाटते।**
**कष्टूनहि करावें तें, सोडावें त्या विरुद्ध तें ॥ ७० ॥**

गद्यार्थ— जें कर्म करिताना आपल्या अन्तरात्म्याला समाधान वाटेल, तें कर्म, कष्ट करूनसुद्धा करावें. जें त्याच्याविरुद्ध, तें करू नये.

●●●

अनुष्टुभ्

यदन्येषां हितं न स्यादात्मनः कर्म पौरुषम्।
अपत्रपेत वा येन न तत्कुर्यात्कथञ्चन ॥ ७१ ॥

अनुष्टुभ्

**स्वतांच्या शौर्यकर्मे ज्या, अन्यां हित घडेल न।**
**वाटेल लाज वा ज्याची, करावें तें कधींच न ॥ ७१ ॥**

गद्यार्थ—ज्या स्वतांच्या शौर्यकर्मांनें दुसऱ्याचें हित साधत नाहीं; किंवा ज्यामुळें आपली आपल्यालाच लाज वाटेल, तें कर्म कधींच करू नये.

●●●

अनुष्टुभ्

न हि सर्वहितः कश्चिदाचारः संप्रवर्तते।
तस्यैवान्यः प्रभवति सोऽपरं बाधते पुनः ॥ ७२ ॥

अनुष्टुभ्

**सदा सर्वां हिताचा जो, आचार न कुठेंच तो।**
**दुजा श्रेष्ठ तयाहून — तोहि अन्यांस बाधतो ॥ ७२ ॥**

गद्यार्थ—कायमचाच सर्वांच्या हिताचा म्हणून कोणताहि आचार दाखविता येणार नाहीं. त्याच्याहून कोणता तरी श्रेष्ठ अन्य आचार आहे, असे कोणाला तरी वाटेल, व, तो जरी पत्करला, तरी, तो दुसऱ्या कोणत्या तरी शिष्टसमत आचाराला विरुद्ध वा बाधक तरी असेल. (म्हणून गीतेंत "किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः" असे म्हटलें आहे. विवेकानें, तारतम्यानें व कौशल्यानें कार्य करण्याला योग म्हणतात — पुढील श्लोक पहा.)

●●●

अनुष्टुभ

बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते।
तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥ ७३ ॥

अनुष्टुभ्

**पापपुण्यांतुनी मुक्त समबुद्धि नरा, करी॥**
**कार्यकौशल्य जो योग, कास त्याचीच तूं धरी ॥ ७३ ॥**

गद्यार्थ—माणसाला समत्वबुद्धि आली, कीं, तो पापपुण्याच्या बंधातून सुटतो! (बंधातून मुक्त राहून) कार्य करण्याचें जें कौशल्य, त्याला योग म्हणतात; त्या योगाचा तू आश्रय कर.

●●●

अनुष्टुभ्

यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः।
भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात् ॥ ७४ ॥

अनुष्टुभ्

**यज्ञशिष्टचि जे खाती पापमुक्तचि होति ते।**
**स्वार्थी शिजविती अन्न, खाती केवळ पाप ते ॥ ७४ ॥**

गद्यार्थ—यज्ञ, म्हणजे, त्यागमय कर्तव्यें पूर्ण करून, उरेल तें, जे खातात, ते, सर्व पापांपासून मुक्त होतात. केवळ स्वार्थासाठीं जे अन्न शिजवितात, ते अन्न खात नाहींत, तर प्रत्यक्ष पाप खातात.

●●●

अनुष्टुभ्

ब्रह्मण्याधाय कर्माणि सङ्गं त्यक्त्वा करोति य ।
लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवाम्भसा ॥ ७५ ॥

अनुष्टुभ्

**ब्रह्मार्पण स्वकर्मांतें संग सोडून जो करी ।**
**स्पर्शी न पाप त्या, जैसें जल पद्मदलावरी ॥ ७५ ॥**

गद्यार्थ—जो मनुष्य, आसक्ति सोडून, कर्म करून, तें ब्रह्मार्पण करतो, त्याला कमळाच्या पानाला जसे पाणी, तसें पाप स्पर्शीत नाहीं.

●●●

अनुष्टुभ्

तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर ।
असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ ७६ ॥

अनुष्टुभ्

**म्हणून, संग सोडून नित्य कर्तव्य तूं करी ।**
**करी असक्त जो त्यातें परप्राप्ति घडे खरी ॥ ७६ ॥**

गद्यार्थ—म्हणून, तू, सर्व कर्तव्यामधली आसक्ति (फलापेक्षा व तें फल मिळाल्यानें हुरळणें व न मिळाल्यानें दुःखी होणें हें) सोडून सतत कर्तव्य कर; संग सोडून कार्य करणारा परम पदाला पोंचतो.

●●●

अनुष्टुभ्

यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।
स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ॥ ७७ ॥

अनुष्टुभ

**जन्मले जीव ज्यांतून, निर्मिलें सर्व हें जयें ।**
**त्या स्वकर्मेंच पूजून, मानवा पूर्ण सिद्धि ये ॥ ७७ ॥**

गद्यार्थ—सर्व जीव ज्यापासून निघाले, ज्यानें हें सर्व निर्माण केलें त्या परमेश्वराची पूजा (इतर कोणत्याहि पूजाद्रव्यानीं न करतां) आपल्या सत्कर्मांनीं केली असता, मानव सिद्धि प्राप्त करतो.

●●●

उपजाति

कायेन वाचा मनसेन्द्रियैर्वा बुद्ध्याऽऽत्मना वाऽनुसृतस्वभावात् ।
करोति यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयेत्तत् ॥ ७८

आर्या

**देहानें, वाणीनें, निजचित्तानें, निजेन्द्रियांनीं वा ।**
**बुद्धीनें, आत्म्यानें, स्वभावधर्मानुसार सहजीं वा ॥**
**जें जें करितो मानव जन्मापासून मृत्युपावेतों ।**
**श्रीपरमेश्वर नारायणा करो सर्व तें, समर्पण तो ॥ ७८**

गद्यार्थ—देहानें, वाणीनें, मनानें, इंद्रियानीं, बुद्धीनें, आत्म्यानें, स्वभावधर्मानुसार जें जें काहीं मनुष्य करतो; तें तें सर्व काहीं, त्यानें श्रीपरमेश्वर नारायणास अर्पण करावें.

●●●

रथोद्धता

अक्षरावगमलब्धये यथा स्थूलवर्तुलशिलापरिग्रहः ।
शुद्धबुद्धिपरिलब्धये तथा दारुमृण्मयशिलामयार्चनम् ॥ ७९

वसततिलका

**होण्या जसें सुलभ शिक्षण अक्षरांचें**
**गोटे खडेहि उपयोजिति हो शिलांचे ॥**
**होण्या प्रबोधहि तसा, जन पूजिताती**
**मातीशिलामय नि काष्ठमयीहि मूर्ति ॥ ७९ ॥**

गद्यार्थ—अक्षर, आकडे इत्यादींचें ज्ञान सुलभ करण्यासाठीं ज्याप्रमाणें, दगडाच्या खड्यागोट्याचा उपयोग करतात, त्याप्रमाणें, विशुद्ध ज्ञानाची प्राप्ति होण्यासाठीं मनुष्य, माती, दगड, लाकूड याच्या मूर्तीची पूजा करतो.

●●●

अनुष्टुभ्

बीजान्यग्न्युपदग्धानि न रोहन्ति यथा पुनः ।
ज्ञानदग्धैस्तथा क्लेशैर्नात्मा सम्पद्यते पुनः ॥ ८० ॥

अनुष्टुभ्

**अग्नीनें जाळितां, बीजें रुजतीं न जशीं पुन्हां ।**
**ज्ञानानें जळतां क्लेश आत्म्या बाधति ना पुन्हां ॥ ८० ॥**

गद्यार्थ—बी, अग्नींत जळल्यावर, जसे, पुन्हा उगवणें शक्य नाहीं, तद्वत्, (आत्म्याला बाधण्याऱ्या) उपाधि, ज्ञानाग्नीनें जळल्या कीं, मग, त्या आत्म्याला, पुन्हा उपद्रव करू शकत नाहींत.

●●●

अनुष्टुभ्

अष्टादश पुराणाना सारं सारं समुद्धृतम् ।
परोपकारः पुण्याय पापाय परपीडनम् ॥ ८१ ॥

अनुष्टुभ्

**अठराहि पुराणांचें काढिलें सार मंथुन ।**
**परोपकार दे पुण्य, दे पाप परपीडन ॥ ८१ ॥**

गद्यार्थ—अठरा पुराणाचें सार काढलें, तर, हेंच कीं, परोपकार हा पुण्यदायक; व दुसऱ्यास पीडा देणें हें पापकारक होय.

अनुष्टुभ्

श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रंथकोटिभिः ।
ब्रह्म सत्य, जगन्मिथ्या, जीवो ब्रह्मैव, नापरः ॥ ८२ ॥

अनुष्टुभ्

**वदले ग्रंथ कोटी जें, तें श्लोकार्धांत सांगतों ।**
**जग खोटें; खरें ब्रह्म; जीव ब्रह्मचि, नान्य तो ॥ ८२ ॥**

गद्यार्थ—कोटि कोटि ग्रंथानीं मिळून जें सांगितलें, तें मी अर्ध्या श्लोकात सांगतों; कीं, ब्रह्म ( हेंच काय तें ) सत्य; जग खोटें, व जीव हा ब्रह्मच आहे; अन्य कोणी नाहीं.

अनुष्टुभ्

प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु साधनानामनेकता ।
उपास्यानामनियम एष धर्मः सनातनः ॥ ८३ ॥

आर्या

**वेदां प्रमाण गणणें, मोक्षसाधनें अनेकविध असणें ।**
**पूज्य न निश्चित म्हणणें, धर्म सनातन असा विशालपणें ॥ ८३ ॥**

गद्यार्थ—वेदांना प्रमाणभूत मानणें; मोक्षसाधनें प्रकृतिभेदानें अनेकविध समजणें; पूजा अमुकच देवाची करावी असा आग्रह नसणें; अशा विशाल उदार, सर्वसंग्रही वृत्तीनें धर्म सनातन होतो.

अनुष्टुभ्

सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।
अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥ ८४ ॥

आर्या

**साऱ्या धर्मां त्यजुनी, येईं मज एकट्यास तूं शरण**
**शोक नको ! तुजला मी, सर्वेहि पापांमधून सोडविन ८४**

गद्यार्थ—( भगवान् अर्जुनाला म्हणतात, म्हणजे त्याला निमित्त करून सर्व मानवजातीला म्हणतात— ) इतर सर्व धर्मांचा त्याग करून तू मला एकट्याला शरण ये. घाबरू नको ! मी तुला सर्व पापापासून मुक्त करीन.

अनुष्टुभ्

सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनन्दनः ।
पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥ ८५ ॥

आर्या

**उपनिषदें या गायी, त्यांतें गोपालकृष्ण दुहणार !**
**अर्जुन वत्स, पिणारे**
**सुधी, नि गीतामृतचि पय थोर ( मधुर ) ॥ ८५ ॥**

गद्यार्थ—सर्व उपनिषदें या गायी, त्यांची धार काढणारा साक्षात् गोपालकृष्ण, अर्जुन हा वासरू, दूध पिणारे सुज्ञ व गीतामृत हेंच तें महामोलाचें सुमधुर दूध !

अनुष्टुभ्

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदाऽऽत्मानं सृजाम्यहम् ॥ ८६ ॥

अनुष्टुभ्

**जेव्हां केव्हांहि धर्माला, अर्जुना ! ग्लानि येतसे ।**
**अधर्महि उठे जेव्हां, तेव्हां मी जन्म घेतसें ॥ ८६ ॥**

गद्यार्थ—( भगवत आश्वासन देतात )—हे अर्जुना ! जेव्हा जेव्हा म्हणून, धर्माला अवकळा येते व अधर्म डोकें वर काढतो, तेव्हा मी अवतार घेतों.

अनुष्टुभ्

श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।
स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ८७ ॥

आर्या

**युक्ताचरितहि परक्या धर्माहुनि आपुला बरा विगुण ।**
**परधर्म हा भयावह-निजधर्मी राहुनी बरें मरण ॥८७॥**

गद्यार्थ—योग्य रीतीनें आचरिलेल्या परधर्मापेक्षा, आपला स्वतःचा धर्मच बरा,—मग आपला धर्म गुणानीं जरा कमी का असेना. स्वधर्मांत ( किंवा स्वधर्मासाठीं ) मरणें सुद्धा श्रेयस्कर. पण परका धर्म केव्हांहि भयावहच ●●●

अनुष्टुभ्

ऊर्ध्वबाहुर्विरौम्येष न च कश्चिच्छृणोति माम् ।
धर्मादर्थश्च कामश्च स धर्मः किं न सेव्यते ? ॥ ८८ ॥

अनुष्टुभ्

ऊर्ध्वबाहु रडे मी हा, कुणी न मज ऐकतो ! ।
अर्थ कामहि देई जो, सेविता का न धर्म तो ? ॥ ८८ ॥

गद्यार्थ—( व्यास मुनि म्हणतात )–हे मानवानां ! हात उंच करून, हा मी ( केव्हांचा ) आक्रोश करून सांगत आहें, पण, माझं कुणीच ऐकत नाहीं बाबांनो, ( तुम्हास भारी प्रिय ते ) अर्थ कामहि जो देतो, त्या धर्माची सेवा का करीत नाहीं ?

●●●

अनुष्टुभ्

यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।
यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ ८९ ॥

अनुष्टुभ्

करिसी भक्षिसी, देशी, जें जें टाकिसि होमुन ।
यदर्थ तप, ते मातें अर्जुना कर अर्पण ॥ ८९ ॥

गद्यार्थ—अर्जुना ! जें जें तू करतोस, भक्षितोस, यज्ञांत आहुति म्हणून टाकतोस देतोस, ज्यासाठीं तप करतोस, तें तें सारें, मला अर्पण कर ! ( त्यात कसलाहि स्वार्थ व फलाशा ठेवू नकोस )

●●●

---

# प्रकरण ३५ वें

## तृप्ति, तुष्टि, संतोष, समाधान, शमसुख, शांति, त्यक्तस्पृह

मालिनी

वयमिह परितुष्टा वल्कलैस्त्वं च लक्ष्म्या
सम इह परितोषो निर्विशेषो विशेषः ॥
स हि भवति दरिद्रो यस्य तृष्णा विशाला
मनसि च परितुष्टे कोऽर्थवान् को दरिद्रः ? ॥ १ ॥

मालिनी

धन मिळुनि जसा तूं, तुष्ट मी वल्कलानें
समगुण वनलों हे तुष्टिच्या सद्गुणानें ॥
हृदयिं विपुल तृष्णा तो दरिद्रीच खास
अधन, धनि कुणी का तृप्ति येता मनास ? ॥ १ ॥

गद्यार्थ—हे श्रीमता ! तूं संपत्तीनें तुष्ट तर मी वल्कलानें तुष्ट ! तुष्टीचा गुण दोघांत समान असल्यानें, आपण दोघेहि आता सारखेच झालों ज्याची तृष्णा मोठी तो खरा दरिद्री. पण, मन संतुष्ट असल्यावर, श्रीमंत कोण व दरिद्री कोण ? ●●●

वसंततिलका

सर्पाः पिबन्ति पवनं, न च दुर्बलास्ते
शुष्कैस्तृणैर्वनगजा बलिनो भवन्ति ॥
कन्दैः फलैर्मुनिवराः क्षपयन्ति कालं
सन्तोष एव पुरुषस्य परं निधानम् ॥ २ ॥

वसंततिलका

वायू पितो तरिहि सर्प नसे अशक्त
शुष्कें तृणें गज बलिष्ठचि काननांत ॥
कंदें फलें मुनिहि नेति सुखांत काळ
संतोष हेंच पुरुषास निधान थोर ॥ २ ॥

गद्यार्थ—साप वायु पितात, पण, ते काहीं दुर्बल नव्हेत. शुष्क गवत खाणारे रानहत्ती, हे सर्वांत बलवान् असतात. कंद फळें खाऊन, मुनि सुखानें कालक्रमणा करतात. संतोष हें माणसाला संपत्तीच्या मोठ्या ठेव्यासारखें आहे. •••

अनुष्टुभ्

अकृत्वा परसन्तापमगत्वा खलनम्रताम् ।
अनुत्सृज्य सतां वर्त्म यत्स्वल्पमपि तद्बहु ॥ ३ ॥

वसंततिलका

देतां न ताप लवमात्र कधीं दुज्यांस
पायां कधीं न पडतां खलदुर्जनांस ॥
देतां न सोडुनि कधीं पथ सज्जनांचे
थोडें मिळेल तरि तें अतिथोर साचें ॥ ३ ॥

गद्यार्थ—दुसऱ्या कोणाला त्रास न देता, दुर्जनाच्या पाया न पडता, सज्जनाचा मार्ग न सोडता जें काय थोडेसे मिळेल, तेंच पुष्कळ; (समजून समाधान मानणे हिताचें आहे.) •••

अनुष्टुभ्

दारिद्र्यानलसन्तापः शान्तः सन्तोषवारिणा ।
याचकाशाविघातान्तर्दाहः केनोपशाम्यति ? ॥ ४ ॥

वसंततिलका

दारिद्र्य अग्नि भडके जधिं अंतरांत
शिंपून तुष्टिजल त्या करितोंच शांत ॥
देणें कधीं न घडणें गरिबास दान
हा दाह मात्र मनिंचा शमवील कोण ? ॥ ४ ॥

गद्यार्थ—(आधीं श्रीमंत व दाता असून, आता दरिद्री झालेल्याची व्यथा कवि सांगतो) माझ्या दारिद्र्याचा अग्नि जो दाह करतो, त्यावर तुष्टीचें जल शिंपडून तो मी शांत करीत आहें. पण याचक (पूर्वीची कीर्ति ऐकून) माझ्या दारी येतात, त्यांची निराशा मला करावी लागण्यानें, होणारा, हा मनाचा दाह कसा शमावा ? •••

शिखरिणी

अवश्य यातारश्चिरतरमुषित्वाऽपि विषया
वियोगे को भेदस्त्यजति न जनो यत्स्वयममून् ॥
व्रजन्तः स्वातन्त्र्यादतुलपरितापाय मनसः
स्वयं त्यक्ता ह्येते शमसुखमनन्तं विदधति ॥ ५ ॥

शिखरिणी

किती भोगा ! जाणें अटळचि असे सर्व विषयां
स्वयें ना सोडी त्यां नर; किति वियोगीं फरक या—
स्वयें जातां देती विषय हृदया दुःखचि अति
तयां टाकी, त्यातें, अमित शमसौख्यें वितरती ॥ ५ ॥

गद्यार्थ—बहुतकाळपर्यंत भोगून झाले, तरी, विषय हे निघून जाणार, हें अटळ आहे; पण, तरा माणूस त्याना सोडीत नाही. तेव्हा वियोगावियोगात काय भिन्नता आहे ! (तें पहा—) विषय जेव्हा स्वेच्छेनें माणसाला सोडतात (तो आधिव्याधिग्रस्त इत्यादि झाल्यानें,) तेव्हा तो वियोग माणसाला अत्यंत दुःखदायी होतो. पण, (मन संयमादि योगानें) माणसानें आपण होऊन त्याना सोडलें, तर, त्या वियोगानें माणसाला अनंत शांतितृप्तीचें सुख मिळतें. •••

अनुष्टुभ्

सर्वत्र सम्पदस्तस्य सन्तुष्टं यस्य मानसम् ।
उपानद्गूढपादस्य ननु चर्मावृतेव भूः ॥६॥

आर्या

जग विभवपूर्ण त्यातें ज्याच्या संतोष अंतरीं दाटे ।
जोडा ज्याच्या पायीं, त्या चर्मावृत समग्र भू वाटे ॥ ६ ॥

गद्यार्थ—ज्याचें मन संतुष्ट, त्याला, सर्वत्र वैभवपूर्ण जग दिसतें. ज्याच्या पायात जोडा असेल, त्याला, जमिनीवर, कातड्याच्या पायघड्या घातल्यासारखेच आहे, नव्हे का ? •••

शार्दूलविक्रीडित

गन्धाढ्यां नवमल्लिकां मधुकरस्त्यक्त्वा गतो यूथिकां
तां दृष्ट्वाऽऽशु गतः स चन्दनवनं पश्चात्सरोजं गतः ।
बद्धस्तत्र निशाकरेण सहसा रोदित्यसौ मन्दधी
सन्तोषेण विना पराभवपदं प्राप्नोति सर्वो जनः ॥ ७ ॥

शार्दूलविक्रीडित

सोडी गंधित मल्लिका, अलि उडे त्या यूथिकांच्या गणीं
पाहे ती, झणिं जाइ चंदनवनीं, पद्मास त्या मागुनी ॥
रात्रीं पद्म मिटून, हा अडकला; वेडा करी रोदन !
संतोषाविण हो, पराभव मिळे साऱ्या जनालागुन ॥७॥

गद्यार्थ—सुगंधी नवमालिकेला सोडून भ्रमर हा यूथिकेकडे गेला. तिला पाहिली न पाहिली, तों, चंदनवनात गेला व

तेथून कमलाकडे गेला. एवढ्यात अचानक रात्र झाल्यानें तें कमल मिटलें व त्यात हा अडकला व मग बसला हा वेडा रडत! संतोष नसला, की, सर्वांनाच पराभूत होण्याची पाळी येते.

●●●

अनुष्टुभ्

परिज्ञातोपभुक्तो हि भोगो भवति तुष्टये।
विज्ञाय सेवितो मैत्रीमेति चोरो न शत्रुताम्॥८॥

अनुष्टुभ्

**जाणुनी भोगतां भोग, नराला देति तुष्टता।**
**जाणुनी सेवितां चोर, धरी मैत्री न शत्रुता॥८॥**

गद्यार्थ—नीट जाणून जर भोग भोगले तर, ते माणसाला तुष्टता देतात. नीट ओळखून, चोराशीं परिचय केला, तर तो मैत्री धरतो; शत्रुत्व धरीत नाहीं.

●●●

शिखरिणी

स्थितिः पुण्येऽरण्ये सह परिचयो हन्त हरिणैः
फलैर्मेध्या वृत्तिः प्रतिनदि च तल्पानि दृषदः॥
इतीयं सामग्री भवति हरभक्तिं स्पृहयतां
वनं वा गेहं वा सदृशमुपशान्त्यैकमनसाम्॥९॥

आर्या

**पुण्य वनांतचि वसणें, परिचय करणें गरीब हरिणांसी,**
**पावन वृत्ति फळांनीं, नद्यानद्यांच्या शिळाच शयनासी॥**
**हरभक्ति जे अपेक्षिति त्यां सामग्री अशीच सात्त्विक ही**
**शमसुखचि इच्छित्यांना वन वा गृह या समान दोन्हीही**

गद्यार्थ—पवित्र अशा अरण्यात राहावें; निष्पाप हरिणांशी सगत करावी; फलाशनानें पवित्र उपजीविका करावी; नद्यान द्यांच्या किनाऱ्यावरच्या शिळानाच आपली शय्या करावी;—शंकराची भक्ति करू पाहणाऱ्यांना इतकी साधी सात्विक सामग्री पुरेशी आहे. ज्याच्या मनानें शांतिसुखाचाच ध्यास घेतला आहे, त्यांना रान काय, व घर काय, दोन्ही सारखेच!

●●●

मन्दाक्रान्ता

भूः पर्यङ्को निजभुजलता कंदुकं, खं वितानं
दीपश्चन्द्रो विरतिवनितालब्धसङ्गप्रमोदः॥
दिक्कान्ताभिः पवनचमरैर्वीज्यमानः समन्ताद्
भिक्षुः शेते नृप इव भुवि त्यक्तसर्वस्पृहोऽयम्॥१०॥

शार्दूलविक्रीडित

**भूमीचाच पलंग, बाहुच उशी, आकाश हेंची छत**
**झाला चंद्र दिवा, विरक्तिवनितासंगांत आनंदित॥**
**दिक्कान्ता, चवरी करून पवना, ज्या वारिती विंझण**
**भिक्षू हा निजला नृपासम जगीं, साऱ्या स्पृहा सोडुन १०**

गद्यार्थ—भूमीचा पलंग केलेला आहे, दडाची उशी केलेली आहे, व, आकाशाची मच्छरदाणी लावलेली आहे, विरक्तिरूपी रमणीला कुशीत घेतल्याचा आनंद मिळत आहे—दिग्वधू, वाऱ्याच्या चवऱ्या करून विंझण वारीत आहेत,—अशा थाटात, साऱ्या इच्छा सोडून, हा भिक्षु एखाद्या राजासारखा निजला आहे.

●●●

अनुष्टुभ्

भिक्षा कामदुघा धेनुः कन्था शीतनिवारिणी।
अचला तु शिवे भक्तिर्विभवैः किं प्रयोजनम्?॥११॥

अनुष्टुभ्

**ज्या कामधेनु भिक्षा ही, गोधडी शीतवारण।**
**शिवभक्ति तरी ज्याची दृढ, त्या कासया धन?॥११॥**

गद्यार्थ—भिक्षा हीच ज्याला कामधेनु, व गोधडी हीच थंडी निवारणारी, पण ज्याची शिवभक्ति अचल त्याला वैभवांची पर्वा काय?

●●●

अनुष्टुभ्

अकिञ्चनस्य दान्तस्य शान्तस्य समचेतसः।
सदा सन्तुष्टमनसः सर्वाः सुखमया दिशः॥१२॥

अनुष्टुभ्

**जो शांत, दान्त, निर्द्रव्य, समवृत्तचि अंतरीं**
**सदा तृप्त मनीं त्यातें भरे सुख दिगंतरीं॥१२॥**

गद्यार्थ—शमसुख, दमसुख असलेला द्रव्यहीन, पण सर्वत्र समवृत्तीचा, सदा संतुष्ट, अशा माणसाला, सर्व दिशा सुखपूर्णच असतात.

●●●

अनुष्टुभ्

अश्नीमहि वयं भिक्षामाशावासो वसीमहि।
शयीमहि महीपृष्ठे कुर्वीमहि किमीश्वरैः?॥१३॥

अनुष्टुभ्

**खातों भिक्षान्न हें, आम्ही, दिशा हें वस्त्र नेसतों।**
**भूवरी निजतों—आम्हां हवा धीश कशास तो?॥१३॥**

*गद्यार्थ*—जे आम्ही भिक्षान्न खातों; दिगंबर नेमतों; भूमीवर निजतों; त्या आम्हाला श्रीमान् कशाला हवेत ?

शार्दूलविक्रीडित

पुण्यैर्मूलफलैः प्रिये प्रणयिनीं वृत्तिं कुरुष्वाधुना
भूशय्यां नववल्कलैः कुरु तृणैरुत्तिष्ठ यामो वनम् ॥
क्षुद्राणामविवेकमूढमनसां यत्रेश्वराणां कदा
वित्तव्याध्यविवेकसङ्कुलगिरां नामापि न श्रूयते ॥ १४ ॥

शार्दूलविक्रीडित

हो संतुष्ट फळामुळांवर अतां जाऊं प्रिये गे वनीं
शय्या भूमि करी सुवल्कल नवें पानें तृणें घालुनी ॥
वित्तव्याधि जडोनिया वरळती श्रीमंत जे मूढधी
क्षुद्रांचें असल्या, न नांवहि जिथें पेकावया ये कधीं॥१४॥

*गद्यार्थ*—चल ऊठ, प्रिये ! आपण वनीं जाऊ; तू आतां पवित्र फळें मुळें यावरच संतोष मान; जमिनीवर गवत व नवीं वल्कलें अंथरून शय्या कर ; अशा स्थळीं जाऊ कीं, धनरोगानें पीडित व विवेकहीन होऊन वरळणाऱ्या, श्रीमंत क्षुद्रांचें, जेथें कधीं नांवसुद्धा ऐकू येणार नाहीं.

---

# प्रकरण ३६ वें

## संसाराचा पश्चात्ताप-विवेकांजन

वसंततिलका

व्याघ्रीव तिष्ठति जरा परितर्जयन्ती
रोगाश्च शत्रव इति प्रहरन्ति देहम् ॥
आयुः परिस्रवति भिन्नघटादिवाम्भो
लोकस्तथाऽप्यहितमाचरतीति चित्रम् ॥ १ ॥

वसंततिलका

व्याघ्रीपरी जणुं जरा भिववीत राहे
देहा रिपु प्रहरिती जणुं रोगही हे ॥
आयू झरे जल जसें फुटतां घडा तो
आश्चर्य कीं, जन तरी अहिता करीतो ॥ १ ॥

*गद्यार्थ*—एकीकडून वार्धक्य हें एखाद्या वाघिणीसारखें माणसाला भेवडावीतच राहतें-दुसरीकडून शत्रूसारखे रोग हे माणसाच्या देहावर प्रहार करीत असतात ! तिसरीकडे, फुटून चीर पडलेल्या घटातून जसे पाणी, तसें आयुष्य पाझरून चाललें आहे...आणि तरीहि ( डोळे न उघडतां ) माणूस स्वताच्या अहिताच्याच कृति करीत बसतो हें केवढें आश्चर्य म्हणावें ?

शिखरिणी

अजानन्माहात्म्यं विशति शलभस्तीव्रदहने
स मीनोऽप्यज्ञात्वा बडिशयुतमश्नाति पिशितम् ॥
विजानन्तोऽप्येते वयमिह विपज्जालजटिलान्
न मुञ्चामः कामानहह ! गहनो मोहमहिमा ॥ २ ॥

शिखरिणी

महाज्वालांमध्यें न कळुनि असा टोळ पडतो
जळीं मासा तैसा, गळ न दिसतां, मांस, गिळितो ॥
परी जाणोनी कीं, " इथ सकल दुःखेंच वसती, "
न सोडूं या कामा तर गहन हो मोहमहती ॥ २ ॥

*गद्यार्थ*—अग्नीनें आपण भाजून जाऊं, हें कळत नाहीं, म्हणून, अज्ञानानें, बिचारा टोळ महाज्वाळामध्यें जाऊन पडतो; आत गळ आहे हें माहीत नसतें, म्हणून मासा आमि-

पाचें मास ( व त्याबरोबर गळ ) गिळून बसतो पण, कामाच्या सगतींत, केवळ दुखें, आपत्तीच, भरलेली आहेत, हें नीट कळत असून सुद्धा, आम्ही मनुष्यप्राणी, कामाचा त्याग करीत नाहीं, तर, मोहाचा महिमान फार प्रबल असे म्हणावयाच । दुसरें काय ? ●●●

वसततिलका

विस्तारित मकरकेतनधीवरेण
स्त्रीसज्ञित बडिशमत्र भवाम्बुराशौ ॥
तेनाचिरात्तदधरामिषलोलमर्त्य—
मत्स्यान्विकृष्य स पचत्यनुरागवह्नौ ॥ ३ ॥

वसततिलका

**स्त्रीरूप जाल पसरी भवसागरीं या**
**कोळी अनग अधरामिष लावुनीया ॥**
**झाले क्षणात नरमत्स्य, तयास खेची**
**प्रेमाग्निमाजि मग त्या शिजवी सुखेंची ॥ ३ ॥**

गद्यार्थ—मदन नावाच्या कोळ्यान, स्त्रीरूपी जाळे या भव सागरावर पसरिल आहे त्यातल्या अधररूपी आमिषाला भुलून पुरुषमत्स्य जाळ्यात आले, की, त जाळें तो ओढून त्या मत्स्याना प्रेमरूपी अग्नींत घालून शिजवितो ! ●●●

स्रग्धरा

स्थाल्या वैदूर्यमय्या पचति तिलकणाश्चन्दनैरिन्धनाद्यैः
सौवर्णैर्लाङ्गलाग्रैर्विलिखति वसुधामर्कमूलस्य हेतो ॥
छित्त्वा कर्पूरखण्डान्वृतिमिह कुरुते कोद्रवाणा समन्तात्
प्राप्येमा कर्मभूमिं न चरति मनुजो यस्तपो मन्दभाग्य ॥४

स्रग्धरा

**जाळोनी चदनातें, तिळचि शिजवितो रत्नपात्रीं अमोल**
**सोन्याच्या नागरानें जगभर उकरी लाभण्या अर्कमूळ ॥**
**तोडोनी कापराच्या तरस, चहुकडे पेरितो कोद्रवास**
**सेवीना जो अभागी तप,जनु मिळुनी कर्मभूमींत खास ४**

गद्यार्थ—(चौऱ्यायशी लक्ष योनींच्या फेऱ्याच सार्थक्य साधू शकेल, असा सोन्यामोलाचा, ) मानवजन्म, या कर्मभूमींत लाभला असत, जो हतभागी, तप, पुण्याचरण न करता, क्षुद्र ससारसुख भोगत बसतो, तो रत्नाच्या पात्रामध्ये चदनासारख सरपण जाळून क्षुद्र तीळ भाजीत शिजवीत बसतो ! किंवा क्षुल्लक रुईच्या झाडाचें मूळ सापडण्यासाठीं, जगभर, सोन्याच्या नाग रानें उकरुन बसतो, किंवा मौल्यवान् कापराचा वृक्ष छाटून, त्या जागीं सर्वत्र कोद्रवासारख्या ( हरीक ) भिकार धान्याच पीक काढीत बसतो, असच म्हटल पाहिजे ! ●●●

शार्दूलविक्रीडित

या साधूश्च खलान् करोति, विदुषो मूर्खान् हितान्द्वेषिण
प्रत्यक्ष कुरुते परोक्षममृत हालाहल तत्क्षणात् ॥
तामाराधय सत्क्रिया भगवतीं भोक्तु फल वाञ्छित
हे साधो ! व्यसनैर्गुणेषु विफलेष्वास्था वृथा मा कृथा ॥५॥

शार्दूलविक्रीडित

**दुष्टा सुष्ट, सुमित्र शत्रुस करी, विद्वान मूर्खासही**
**आणी दृष्टिस जी परोक्षहि, सुधा काढी विषातूनही**
**ती देवी भज सत्क्रिया, मिळविण्या तू इच्छिसी तें फळ**
**हे साधो ! विविधा गुणास्तव नको सायास हे निष्फळ ५**

गद्यार्थ—जी दुष्टाना सज्जन करते मूर्खांना पडित करते, शत्रूना मित्र करते परोक्ष वस्तूचेंहि दर्शन घडविते, हालाहलाचें हि अमृत करते, त्या सत्कर्मरूपी देवतेचीच हे साधो ! तू आराधना कर ! इतर नाना सिद्धि प्राप्त करण्यासाठीं कष्ट करून, उगाच नाना खटाटोप तू करू नकोस

या श्लोकाच्या रचनेविषयी व पाठभेदाविषयी फार मतभेद असू शकतात मी स्वीकारलेला ‘ सत्क्रिया भगवती ’ हा पाठ पुढील ‘ भोक्तु फल वाञ्छितम् ’ याशीं नीट जुळतो पण पहिल्या दोन ओळींतल्या दोन दोन द्वितीयायुक्त जोड्याचा क्रम उलटा करावा लागतो म्हणजे साधूना खल करिते या ऐवजीं खलाना साधु करते असा अन्वय लावावा लागतो म्हणजे मूळ भर्तृ हराची रचना सदोष मानावी लागते सस्कृतमध्ये वाटेल तसा अन्वय लावलेला चालतो म्हटलें, तरी पाच जोड्या उलट्या कराव्या लागण हें युक्त नव्हे ! वर वामन पडितानी “ मल्याना दुर्जन करते, विद्वानास मूढ करित अमृताच विष करते, —अशी चण्डिका ” म्हटल आहे त पटत नाहीं. व चागल्याच वाईट करणारा चडिका वाञ्छित फल कशी देणार ? याशिवाय ‘सत्क्रिया’ एवजी *चण्डिका भगवतीं = कालचक्ररूपिणीं प्रकृति* रूपभवानी असा पाठभेद किंवा चण्डिका = सरस्वती असाहि पाठभेद घतला तरी भवानी किंवा सरस्वती या दोन्ही देवता चागल्याचें वाईट करतात की काय ? व तस करीत असल्यास चागल्याच वाईट हे वाञ्छित फल कस असू शकेल ! शेवटीं ‘सत्क्रिया’ हाच पाठ ठीक वाटतो, व, त्यासाठीं द्वितीयायुक्त शब्दाच्या पाच जोड्या उलट्या कराव्या लागतात, हा दोष पत्करावा लागतो, पण, अर्थ तरी नीट लागतो ●●●

आर्या

पतित पशुरपि कूपे नि सर्तुं चरणचालन कुरुते ।
धिक् त्वा चित्त ! भवाब्धेरिच्छामपि नो बिभर्षि नि सर्तुम् ? ६

आर्या

**पडता कुव्यात पशुही निघण्या धडपड करीच चरणाची**
**धिक् तुज चित्त ! भवाब्धींतुन इच्छाही न काय निघण्याची ? ॥ ६ ॥**

गद्यार्थ– विहिरीत पडला, तर, यत्किंचित् पशुसुद्धा, बाहेर निघण्यासाठी, पायाना धडपड करतो हे माझ्या मना ! तू तर (ल्हानश्या विहिरीत नव्हे तर,) अफाट ससारसागरात पडून बुडत आहेस ! पण बाहेर पडण्यासाठ,(धडपड तर राहोच पण) नुसती इच्छासुद्धा, तुला होऊ नये ?

अनुष्टुभ्

कामिनीकायकान्तारे स्तनपर्वतदुर्गमे ।
मा सञ्चर मन पान्थ ! तत्रास्ते स्मरतस्कर ॥ ७ ॥

वसंततिलका

**स्त्रीदेहरूप अतिघोर अशा वनात,**
**त्या उच्च उच्च कुच दुर्गम पर्वतात ॥**
**पाथापरि भटकणें न तुवा मना ! हे,**
**त्याच्यामधें लपुनि मन्मथ चोर राहे ॥ ७ ॥**

गद्यार्थ—स्तनरूपी पर्वतानीं, दुर्गम बनलेल्या, अशा, स्त्री देह रूपी भयकर अरण्यामध्य, हे मनरूपी पाथा ! तू सचार करूं नकोस ! त्यामध्य, मदनरूपी चोर दबा धरून बसलेला आहे !

पृथ्वी

कुचौ तु परिचर्चितु परिचित चिर चन्दन
कृता परमुरोजयो परिसरेऽरविन्दस्रज ॥
स्तुतिर्नतिरपि स्मृतिर्विरलनो कृतैरादरा—
दिद तु निखिल पुनर्विरचित मया नेश्वरे ! ॥ ८ ॥

आर्या

**चदन वापरिलें मी केवळ लेपन कुचास करण्याला !**
**स्तनपरिसरींच केवळ कमलाच्या नित्य घातल्या माला॥**
**स्तुति नति वा स्मृति केली आदरभावें सदैव रमणीची**
**कृति यातिल एकहि परि, केली नाहीं कधींच ईशाची ८**

गद्यार्थ—आजवर माझा चदनाशीं परिचय केवळ, स्त्रीच्या स्तनावर विलेपन करण्यापुरताच होता कमळाच्या माला केवळ स्त्रीच्या स्तनाभोवतींच काय त्या घातल्या. स्तवन, नमन, स्मरण सव काहीं केलें तें मोठ्या आस्थेनें केवळ कामिनीचेंच केले ! (हाय ! हाय ! आता पश्चात्ताप होतो कीं ) मी यातील एकहि कृति–(चदन लावणें, कमल वाहणें, स्तवन, नमन, स्मरण) परमेश्वराबाबत का केली नाहीं ?

मालिनी

अलमतिचपलत्वात्स्वप्नमायोपमत्वा—
त्परिणतिविरसत्वात्सङ्गमेनाङ्गनाया ॥
इति यदि शतकृत्वस्तत्त्वमालोकयाम—
स्तदपि न हरिणाक्षीं विस्मरत्यन्तरात्मा ! ॥ ९ ॥

मालिनी

**क्षणभर टिकणारा, स्वप्न, माया, जणू तो,**
**विरसचि परिणामीं सगम स्त्रीसवें तो ॥**
**हृदिं जरि शतदा हें तत्त्व गेलें ठसून,**
**तरि मन विसरे हें कामिनीला कधीं न ॥ ९ ॥**

गद्यार्थ—अगदीं क्षणभगुर असल्यानें, स्वप्नासारखा, माये सारखा आणि परिणामीं विरस करणारा, असाच, स्त्रीचा सगम असतो, हें सर्व तत्त्व, शभरदा ठसलें असूनहि,अतरात्मा कामिनीला विसरत नाहीं !

वैतालीय

निखिल जगदेव नश्वर पुनरस्मिन्नितरा कलेवरम् ॥
अथ तस्य कृते नियानय क्रियते हन्त मया परिश्रम ! ॥ १० ॥

वैतालीय

**जग नश्वर सर्व त्यातुनी, तनु ही फारचि, हेंहि जाणुनी॥**
**परि तीस्तव कष्ट केवढे करिती मानव हाय ! बापुडे ॥**

गद्यार्थ—सर्व जगत नश्वर आहे य त्यातल्या त्यात, हा देह तर विशेषच नश्वर आहे आणि हें जाणूनहि या असल्या देहासाठी मी हे केवढे परिश्रम करात आहें ! हाय ! हाय !

शिखरिणी

त्रपन्ते तीर्थानि त्वरितमिह यस्योद्धृतिविधौ
करं कर्णे कुर्वन्त्यपि किल कपालिप्रभृतयः ॥
इमं तं मामम्ब त्वमियमनुकम्पार्द्रहृदये
पुनाना सर्वेषामघमथनदर्पं दलयसि ॥ ११ ॥

शिखरिणी

जयाच्या उद्धारीं त्वरित जगिं तीर्थें शरमती
करां कानीं ठेवी सुरगण महादेव प्रभृति ।
असा जो मी त्याचा सदयमति उद्धार करिशी
तयानें सर्वांच्या अघमथनदर्पास हरिशी ॥ ११ ॥

गद्यार्थ— ( जगन्नाथकृत गंगाप्रार्थना ) ( ज्या माझीं भयकर पापें पाहून ) ज्याचा उद्धार करण्याच्या कामीं ( आपल्याला तें जमणार नाहीं म्हणून ) जगातलीं सारीं तीर्थें लज्जित होतात; प्रत्यक्ष शंकरादि देवहि कानावर हात ठेवतात अशा मला, हे सदयहृदये माते गंगे ! तू पावन करतेस व अशा रीतीनें पापाचा नाश करण्याचा इतर सर्वांचा गर्व तू हरण करतेस ! ●●●

शिखरिणी

श्ववृत्तिव्यासङ्गो नियतमथ मिथ्या प्रलपन
कुतर्केष्वभ्यासः सततपरपैशुन्यमननम् ॥
अपि श्रावं श्रावं मम तु पुनरेवं गुणगणान्
ऋते त्वत्को नाम क्षणमपि निरीक्षेत वदनम् ॥ १२ ॥

शिखरिणी

प्रवृत्ति श्वानाची, अनृत वदणें नित्य वदनीं
दुज्याचा दुष्टावा-सतत करणें-तर्कट जनीं ॥
गुणांची मत्कीर्ती पुनरपि पुन्हां ही परिसुन
तुझ्यावीणें कोण क्षणहि मम पाहील वदन ? ॥ १२ ॥

गद्यार्थ— ( जगन्नाथकृत गंगाप्रार्थना. ) कुत्र्यासारखें माझें वागणें; मुखानें सतत खोटें बोलणें, तर्कटीपणाचा मोठा अभ्यास, परक्याचा नेहमीं दुष्टावा करुन चहाड्या वगैरे करणें, इत्यादि माझ्या असलेल्या या गुणसमुदायाची कीर्ति (!) पुन्हा पुन्हा ऐकून, हे गंगामाई ! तुझ्यावाचून जगात असे दुसरें कोण आहे की, जें माझें क्षणभर तरी तोंड पाहील ? ●●●

हरिणी

अभिमतमहामानग्रन्थिप्रभेदपटीयसी
गुरुतरगुणग्रामाम्भोजस्फुटोज्ज्वलचन्द्रिका ॥
विपुलविलसल्लज्जावल्लीवितानकुठारिका
जठरपिठरी दुष्पूरेयं करोति विडम्बनम् ॥ १३ ॥

आर्या

प्रिय अभिमानाच्याही गांठी जी तोडण्यांत बहु कुशल
बहुगुणरूपी कमला म्लान करायास चंद्रिका उजळ ॥
सुंदर लज्जावल्ली छेदायातें कुऱ्हाड जी होते
भरण्या दुष्कर खळगी पोटाची, बहु विटंबना करिते १३

गद्यार्थ—मनुष्याला विशेष प्रिय अशा स्वाभिमानाच्या गाठी तोडून टाकण्यात जी अतिशय पटाईत असते; थोर गुणरूपी कमलांना ( सूर्यविकासी कमलांना ) म्लान करून टाकणारे स्वच्छ चांदणेंच जणू जी ठरते; ( हृदयक्षेत्रात ) स्वच्छंदपणें वाढून फोफावलेल्या लज्जारूपी वेलीच्या विस्ताराला छेदणारी कुऱ्हाडच जी होते; ती भरण्यास कठिण अशी पोटाची खाच अत्यत विटंबना करते. ●●●

शार्दूलविक्रीडित

भिक्षाहारमदैन्यमप्रतिहतं भीतिच्छिदं सर्वदा
दुर्मात्सर्यमदाभिमानमथनं दुःखौघविध्वंसनम् ॥
सर्वत्रान्वहमप्रयत्नसुलभं साधुप्रियं पावनं
शम्भोः सत्रमवार्यमक्षयनिधिं शंसन्ति योगीश्वराः ॥ १४ ॥

शार्दूलविक्रीडित

भिक्षाहार; अखंड, दीन न करी; भीतीस उच्छेदितें
मारी मत्सर, गर्व, मान मनिंचे, दुःखास विध्वंसितें ॥
साधूंना प्रिय, पुण्य, रोज कुठही कष्टाविना जें मिळे
शंभूसत्र अवार्य, अक्षय असें योगीश्वरीं वानिलें ॥१४॥

शार्दूलविक्रीडित

भोगे रोगभयं, कुले च्युतिभयं, वित्ते नृपालाद्भयं
माने दैन्यभयं, बले रिपुभयं, रूपे जराया भयम् ॥
शास्त्रे वादभयं, गुणे खलभयं, काये कृतान्ताद्भयं
सर्वं वस्तु भयान्वितं भुवि नृणां, वैराग्यमेवाभयम् ॥ १५ ॥

शार्दूलविक्रीडित

भोगाला भय रोग, पातहि कुला, वित्ता नृपाचें भय
मानाला भय दैन्य, शत्रुहि बला, रूपा जरेचें भय ॥
शास्त्राला भय वाद, दुष्टहि गुणा, देहा यमाचें भय
भीतिग्रस्तचि सर्व वस्तु जगतीं वैराग्य हें निर्भय १५

*गद्यार्थ*—जगातल्या सर्व वस्तूच्या मागे कशाचें ना कशाचें तरी भय हे लागलेलेंच असते (व त्यापासून त्याचा नाशहि संभवतो. उदाहरणार्थ—) विषयोपभोग घेणाराला रोगापासून भय असतें, सत्कुलाला (नीतितत्त्वापासून) पतन हें भय आहे, संपत्तीला राजा (तें कधीं हरण करील) हें भय असतें, स्वाभिमानी स्वभावाला दैन्य स्वीकारण्याचा प्रसंग म्हणजे मरणच; बलवताला शत्रूचें भय असते, सौंदर्याला वार्धक्यापासून भय असतें, उच्च शास्त्रज्ञानप्राप्तीस (वितंड) वाद हें भय, गुणाला दुष्ट माणसापासून भय, देहाला मृत्यूचें भय असत. वैराग्य हें मात्र पूर्ण भयरहित असतं.

●●●

शार्दूलविक्रीडित

भोगास्तुङ्गतरङ्गभङ्गचपलाः प्राणा क्षणध्वंसिनः
स्तोकान्येव दिनानि यौवनसुखं, प्रीतिः प्रियेष्वस्थिता ॥
तत्संसारमसारमेव निखिलं बुद्ध्वा बुधा बोधका
लोकानुग्रहपेशलेन मनसा यत्नः समाधीयताम् ॥ १६ ॥

शार्दूलविक्रीडित

लाटा चचल तेवि भोग चल हे, प्राण क्षणें लोपती
थोडेची दिन यौवनीं सुख, टिके प्रीति प्रियांची न ती ॥
तेव्हां संसृति ही असार सगळी, सुज्ञें असें जाणुनी
यत्नें नित्य परोपकार करणें हा ध्यास घ्यावा मनीं १६

*गद्यार्थ*—विषयोपभोग हे उच्च लाटा जितक्या लौकर फुटतात तितक्या लौकर नष्ट होतात; प्राण हे क्षणभंगुर असतात, तारुण्याचें सुख थोडे दिवसाचें सोबती, प्रेमिकाचें प्रेम हेंहि अस्थिर; तेव्हा हे शहाण्यासुरत्या मानवाना, लोकाचें भले करण या गोष्टीकडेच प्रयत्नानें मनाला वळवा.

●●●

शार्दूलविक्रीडित

भोगा मेघततीलसच्चपलया तुल्यास्तया प्राणिना——
मायुर्वायुविघट्टिताभ्रपटलीलोलाम्बुवद्भङ्गुरम् ॥
लोला यौवनलालसास्तनुभृतामित्याकलय्य द्रुत
योगे धैर्यसमाधिसिद्धिसुलभे बुद्धिं विदध्व बुधाः ॥ १७ ॥

शार्दूलविक्रीडित

जैशी वीज घनीं क्षणैक झळके, हे भोग तैसे गण
झोडी वायु तदा घनस्थ झरत्या पाण्यापरी जीवन ॥
तारुण्यातिल लालसा क्षणिक या जाणून हें सत्वर
लावा धैर्यसमाधिनें सुलभ त्या योगाकडे अंतर ॥ १७ ॥

*गद्यार्थ*— भोग हे मेघातल्या चमकऱ्या विजेसारखे व वाऱ्यानें झोडलेल्या ढगातून झरणाऱ्या जलबिंदूप्रमाणे मानवी जीवन क्षणभंगुर आहे; तारुण्यातील लालसाहि चंचल आहेत हें ध्यानीं घेऊन, धैर्य समाधीनें सुशक्य अशा योगाकडे सुज्ञानीं मन वळवावें.

●●●

स्रग्धरा

आयु कल्लोललोल कतिपयदिवसस्थायिनी यौवनश्री–
रर्थाः संकल्पकल्पा घनसमयतडिद्विभ्रमा भोगपूगाः ॥
कण्ठाश्लेषोपगूढ तदपि च न चिर यत्प्रियाभिः प्रणीत
ब्रह्मण्यासक्तचित्ता भवत भवभयाम्भोधिपार तरीतुम् ॥ १८ ॥

सुमंदारमाला

जणूं आयु हें लोल लाटा जळींच्या,
टिके यौवनश्रीहि थोडे दिन
विजा नाचऱ्या तेवि हे भोग सारे
मनांतील संकल्प तैसें धन ॥
गळां घातलेली मिठी वल्लभांनीं
बहुप्रीतिनें, ती टिकेना चिर
तरोनी भवाब्धींतुनी पार जाण्या
रमावें, नरें ब्रह्ममार्गीं तर ॥ १८ ॥

*गद्यार्थ*— आयुष्य हें लाटइतकें चंचल आहे; यौवनाचें वैभव हें थोडे दिवसच टिकतें, संपत्ति ही विचारतरंगासारखी आहे; मेघातील विजेच्या नर्तनाइतके भोग हे क्षणिक आहेत; प्रेमिकांनीं प्रेमभरानें मारलेल्या मिठ्या फार काल टिकणाऱ्या नसतात. म्हणून भवभयाच्या समुद्रातून पार जाण्यासाठी ब्रह्मामध्यें चित्त जडविणें अवश्य आहे.

●●●

स्रग्धरा

कृच्छ्रेणामेध्यमध्ये नियमिततनुभिः स्थीयते गर्भवासे
कान्ताविश्लेषदुःखव्यतिकरविषमे यौवने विप्रयोगः ॥
वामाक्षीणामवज्ञाविहसितवसतिर्वृद्धभावोऽप्यसाधुः
संसारे रे मनुष्या वदत यदि सुखं स्वल्पमप्यस्ति किंचित् ॥ १९

सुमंदारमाला

**तनू आकसोनीच घाणींत कष्टें**
**रहाणें पडे भाग गर्भांतरीं**
**वियोगांचिया संभवें दुःखदायी**
**घडावी तुटी यौवनाभीतरीं ॥**
**अवज्ञें हंसोनी वदावें स्त्रियांनीं**
**जळो ती अशी वृद्धता वाटते**
**वदे मानवा ! सौख्य तें जीवनीं या**
**दिसे अल्पही काय तूतें कुठें ?॥ १९ ॥**

गद्यार्थ— ( जन्मापूर्वीच दुःखाची सुरुवात म्हणून ) अवयवाचा संकोच करून, घाणींत, मोठ्या कष्टानें गर्भात राहावें लागतें. तारुण्य हें तर प्रियेच्या वियोगाच्या संभवामुळें ( वर तरवार टांगल्यासारखें ) दुःखदायी—आणि त्यांत ( खरोखरीच ) स्त्रीचा वियोग घडावा. तरुण स्त्रियानीं अपमानगर्भ हसावें असें तें वार्द्धक्य ! तेंहि सुखकर नव्हे ! मग ( हें सर्व ध्यानीं घेऊन, ) हे मानवानो ! सांगा पाहू या संसारात अल्पतरी सुख आहे काय ?

●●●

शार्दूलविक्रीडित

भोगा भङ्गुरवृत्तयो बहुविधास्तैरेव चायं भव-
स्तत्कस्येव कृते परिभ्रमत रे लोकाः कृत चेष्टितैः ॥
आशापाशशतोपशान्तिविशदं चेतः समाधीयता
कामोच्छित्तिवशे स्वधामनि, यदि श्रद्धेयमस्मद्वचः ॥ २० ॥

शार्दूलविक्रीडित

**होती भंगुर भोग हे विविध रे; त्यांचाच संसार हा**
**तेव्हां कां भ्रमतां वृथाच नरहो ! आतां पुरे खेळ हा ॥**
**आशापाश शमून काम झडुनी होतां विशुद्धान्तर**
**तें स्वात्म्यांत करा विलीन; जर कां विश्वास माझ्यावर**

गद्यार्थ—विषयभोग हे स्वभावतःच क्षणभंगुर असून, त्यांचाच मिळून हा संसार बनलेला आहे तर हे नरानो ! कशासाठीं हे भ्रमत् आहा ? पुरे आता हे खेळ. आशापाश गळून, कामाचा उच्छेद होऊन विशुद्ध झालेलें आपलें मन, माझें ऐकावयाचें असेल, तर, स्वात्म्याचे ठायीं विलीन करा !

●●●

शार्दूलविक्रीडित

ब्रह्मेन्द्रादिमरुद्गणांस्तृणगणान् यत्र स्थितो मन्यते
यत्स्वादाद्विरसा भवन्ति विभवास्त्रैलोक्यराज्यादयः ॥
भोगः कोऽपि स एक एव परमो नित्योदितो जृम्भते
भो साधो क्षणभङ्गुरे तदितरे भोगे रतिं मा कृथाः॥ २१ ॥

शार्दूलविक्रीडित

**जो लाभून नरा तृणासम गमे ब्रह्मेन्द्रदेवादिक**
**यत्स्वादें विभवांस वेचव गणी त्रैलोक्य राज्यादिक ॥**
**ऐसा एकच उच्च भोग परि जो नित्यप्रकाशा धरी**
**साधो! त्याविण तूं कधीं न दुसऱ्या भोगांत इच्छा करी २१**

गद्यार्थ—ज्याचा लाभ झाला असता, ब्रह्मा इन्द्र इत्यादि सर्व देवतास मनुष्य तृणसमान मानितो; ज्याच्या रुचीपुढें, त्रिलोकाचें राज्य इत्यादि भोगसुद्धा वेचव वाटू लागतात. असा सर्वोच्च, नित्यप्रकाशी, अवर्णनीय ( ब्रह्मानंद नावाचा ) भोग आहे ! हे सज्जना त्या एका भोगाव्यतिरिक्त इतर कोणत्याहि क्षणिक भोगाची इच्छा धरू नको.

●●●

शार्दूलविक्रीडित

न ध्यात पदमीश्वरस्य विधिवत्संसारविच्छित्तये
स्वर्गद्वारकपाटपाटनपटुर्धर्मोऽपि नोपार्जितः ॥
नारीपीनपयोधरोरुयुगलं स्वप्नेऽपि नालिङ्गितं
मातुः केवलमेव यौवनतरुच्छेदे कुठारा वयम् ॥ २२ ॥

सुमंदारमाला

**तुटायास संसार, शास्त्रा धरोनी,**
**न मी चिंतिलें ईश्वराच्या पदा**
**पटु स्वर्गिचें द्वार उद्घाटणारा**
**न वा धर्महो आर्जिला मी कदा ॥**
**न आलिंगिली पुष्ट ऊरुस्तनांची**
**कधीं स्वप्निंही मी कुणी सुंदरी**
**जहालों परी मातृतारुण्यवृक्षास**
**उच्छेदणाऱ्या कुऱ्हाडीपरी ॥ २२**

गद्यार्थ—संसारांतून सुटण्यास, विधियुक्त, मी कधीं ईशपदाचें ध्यान केलें नाहीं. स्वर्गाचें द्वार उघडून देण्यांत पटाइत अशा धर्माचेंहि आचरण कधीं केलें नाहीं; पुष्ट ऊरुस्तन असलेली तरुणीहि कधीं स्वप्नातसुद्धा आलिंगिली नाहीं. ( अशा रीतीनें न पारमार्थिक, न ऐहिक सुखें भोगल्यानें ) मी केवळ माझ्या मातेच्या तारुण्यरूपी वृक्षाचा उच्छेद करणाऱ्या कुऱ्हाडीप्रमाणें झालों ! ( प्रसूतीमुळें स्त्रीचें तारुण्य नष्ट होतें. )

●●●

शिखरिणी

वयं येभ्यो जाताश्चिरपरिगता एव खलु ते
समं यैः संवृद्धाः स्मृतिविषयतां तेऽपि गमिताः ॥
इदानीमेते स्मः प्रतिदिवसमासन्नपतनाद्
गतास्तुल्यावस्थां सिकतिलनदीतीरतरुभिः ॥२३ ॥

शार्दूलविक्रीडित

**गेले दूर पुढें कधींच निघुनी ज्यांपासुनी जन्मलों**
**झाले ते स्मृतिशेष सर्व जनही ज्यांच्यासवें वाढलों ॥**
**आला पात समीप हा अनुदिनीं-साजे खरी आजला**
**वाळूंतील नदीतटस्थ तरु जे,त्यांचीच आम्हां तुला ॥२३॥**

गद्यार्थ— ज्याच्यापासन आम्ही जन्मलों ते तर कधींच निघून गेले. ज्याच्या संगतींत वाढलों त्याची आता आठवण काढायची इतकेंच. आमचें स्वतःचेंहि पतन प्रत्येक दिवशीं जवळ जवळ येत चालल्यानें नदी किनाऱ्यावरील वाळूतील झाडाचीच तुल्ना आम्हास शोभते ( वाळूमुळे मुळें खोल नसल्यानें असे वृक्ष केव्हा उन्मळून पडतील याचा नेम नसतो. ) ●●●

वैतालीय

न नटा, न विटा, न गायका, न परद्रोहनिबद्धबुद्धयः ।
नृपमीक्षितुमत्र के वयं स्तनभारानमिता न योषितः ॥ २४ ॥

वसततिलका

**आम्ही नसूं नट, न गायक, जार नाहीं**
**बुद्धया दुज्यांप्रति मनांतुन वा न द्रोही ॥**
**भेटावया नृपतिला इथ कोण आम्ही ?**
**पुष्टस्तनें नत अशा युवती न नामी ॥ २४ ॥**

गद्यार्थ— राजाचें दर्शन घडावयाला आम्ही असे कोण लागून गेले आहों ? आम्ही काहीं नट नाही, —जार नाहीं, *गायक नाहीं, दुसऱ्याचे वाईट करण्यास टपलेले चुगलखोर नाहीं,* किंवा पुष्टस्तनभारानें नमलेल्या तरुणीहि नाहीं. [ राजाची या असल्या गाळीव रत्नांशिवाय इतराना भेट घडत नाहीं. राजे राजे आपण म्हणतों ते किती क्षुद्र असतात पहा. ] ●●●

हरिणी

निपुलहृदयैर्धन्यै कैश्चिज्जगज्जनितं पुरा
विधृतमपरैर्दत्तं चान्यैर्विजित्य तृणं यथा ॥
इह हि भुवनान्यन्ये धीराश्चतुर्दश भुञ्जते
कतिपयपुरस्वाम्ये पुंसां क एष मदज्वरः ॥ २५ ॥

आर्या

**धन्य महोदारानीं जग निर्मियलें कधींतरी कोणी ।**
**कुणि शासिलें, दुज्यांनीं जिंकुनि दिधलें तृणापरी गणुनी ॥**
**चौदा भुवनें पेशीं दूर दुजे भोगिती इथें कोणी ।**
**स्वल्प पुरांचे राजे-परि असती केवढे प्रमत्त मनीं ॥२५॥**

गद्यार्थ— फार पूर्वी कोणीसे फार थोर धन्य होऊन गेले त्यानीं हें जग निर्मिलें. दुसऱ्या कुणी त्यावर अधिसत्ता गाजविली; तर दुसऱ्या कुणी तें जिंकून, तृणासम तुच्छ समजून दुसऱ्याना तें दान दिलें ! *अजूनसुद्धा चौदा भुवनाचें राज्य करणारे शूर* दुसरे आहेत ! ( याच्याशी तुल्ना करिता क्षुद्र अशा ) काही नगराचे राज्य करणाऱ्या मनुष्याना केवढा गर्व ! ●●●

शिखरिणी

*अभुक्तायां यस्यां क्षणमपि न यातं नृपशतै-*
भुवस्तस्या लाभे क इव बहुमानः क्षितिभृतां ॥
तदंशस्याप्यंशे तदवयवलेशेऽपि पतयो
विषादे कर्तव्ये विदधति जडाः प्रत्युत मुदम् ॥२६॥

आर्या

**जी भू न राहिली क्षण शतनृपतींकडुनि भोगल्यावीण**
***न कळे तिच्याहि लाभें-नृपां गमे काय केवि बहुमान !***
**अशांशाचाहि तिच्या अवयवलव भोगिती असे नृपति**
**मूर्ख विषादावदलीं आनंदचि उलट मानिती चित्तीं ॥२६**

गद्यार्थ— जिचा ( एकाच वेळी ) शमर शमर राजानी *उपभोग घेतल्याशिवाय एक क्षणहि गेला नाहीं, अशा* ( पूर्ण ) पृथ्वीचा लाभ होऊन सुद्धा पृथ्वीश म्हणविणाऱ्याना काय बहुमान वाटतो कोण जाणे ! मग तिच्या अशाच्या एखाद्या *ल्हानशा भागाचे राजे, वास्तविक खेद वाटावयाचा त्याऐवजी* मूर्ख कसे आनद मानतात कोण जाणे ! ●●●

शार्दूलविक्रीडित

एतस्माद् विरमेन्द्रियार्थगहनादायासदादाशु च
श्रेयोमार्गमशेषदुःखशमनव्यापारदक्षं क्षणात् ॥
शान्तं भावमुपैहि सन्त्यज निजां कल्लोललोलां गतिं
*मा भूयो भज भङ्गुरां भवरतिं चेतः प्रसीदाधुना ॥२७॥*

शार्दूलविक्रीडित

**चित्ता ! कष्टद घोर रानसम या हो मुक्त कामांतुन**
**कल्याणप्रद, सर्व दुःख शमवी, ती शांति घे तूं क्षण ।**
***लाटांच्या सम चंचला गति तुझी सोडून दे सत्वरीं***
**आतां भंगुर या भवीं न रमणें पेशी कृपा तूं करी ॥२७॥**

गद्यार्थ—हे माझ्या मना ! इन्द्रियविषयरूपी त्रासदायक अरण्यातून तू लौकर बाहेर पड आणि क्षणभर, कल्याणकारी,

सर्व दु:ख शमविणारी अशी—शांति धारण कर. लाटासारखी स्वत:ची चंचल गति सोडून दे आणि क्षणिक अशा या संसाराची पुन्हा रुचि धरू नको एवढी आता कृपा कर. ●●●

वसंततिलका

भक्तिर्भवे मरणजन्मभयं हृदिस्थं
स्नेहो न बन्धुषु न मन्मथजा विकाराः ॥
संसर्गदोषरहिता विजना वनान्ता
वैराग्यमस्ति किमतः परमर्थनीयम्? ॥ २८ ॥

शार्दूलविक्रीडित

**चित्तीं शंकरभक्ति, जन्ममरणासाठीं हृदीं भीतिही ॥**
**कामाचे न विकार, ना अति अशी आसक्ति बंधूंतही**
**रानीं निर्जन वास दूर जनतासंपर्कदोषाविण**
**अन् वैराग्य, वदा हवें तरि कुणा हो काय तें याहुन?॥२८॥**

गद्यार्थ— शंकराची भक्ति, हृदयांत जन्ममरणाचे भय, नातेवाइकाविषयीं अति आसक्ति नसणे, कामविकार नाहींत, (क्षुद्र) लोकांच्या संसर्गापासून दूर वनांत एकांतांत राहणें आणि याच्या जोडीला वैराग्य असावें! मग याहून अधिक (देवापाशीं) काय मागावयाचें? ●●●

वसंततिलका

पातालमाविशसि यासि नभो विलङ्घ्य
दिङ्मण्डलं भ्रमसि मानस! चापलेन ॥
भ्रान्त्वाऽपि जातु विमलं कथमात्मनीनं
न ब्रह्म संस्मरसि निर्वृतिमेषि येन ॥ २९ ॥

वसंततिलका

**पाताळिं जासि, नभ लंघिसि तू समग्र**
**दिग्मंडळीं फिरसि हे मन! तूंच शीघ्र ॥**
**हिंडून, आत्महितकारक शुद्ध जें, तें—**
**कां ब्रह्म नाठविसि—जें तुज मोक्ष देतें ॥ २९ ॥**

गद्यार्थ— हे माझ्या मना! तू पाताळांत शिरतेस, आकाश ओलांडून जातेस, शीघ्र वेगानें दशदिशांत भ्रमण करतेंस! पण इतकें सर्वत्र फिरूनहि, तुला परमसौख्य मोक्ष देणाऱ्या आत्महितकारक, विशुद्ध, अशा ब्रह्माचें स्मरण कां करीत नाहींस? ●●●

मन्दाक्रान्ता

आसंसारं त्रिभुवनमिदं चिन्वतां तात तादृङ्
नैवास्माकं नयनपदवीं श्रोत्रमार्गं गतो वा ॥
योऽयं धत्ते विषयकरिणीगाढरूढाभिमान—
क्षीबस्यान्तःकरणकरिणः संयमालानलीलाम् ॥ ३० ॥

मन्दाक्रान्ता

**या संसारीं त्रिभुवनिं उभ्या शोधितांही अम्हांसी**
**ऐकूं आली न च, न दिसली एकही व्यक्ति ऐशी ॥—**
**कीं जी बांधी विषयकरिणी-संग-गाढाभिमानें—**
**मत्ता अंतःकरणकरितें संयमी शृंखलेनें ॥ ३० ॥**

गद्यार्थ—या संसारापासून सर्व त्रिभुवनें शोधूनहि, बाबारे! आम्हाला असा एकहि माणूस दृष्टीस पडला नाहीं, वा, ऐकूं आला नाहीं, कीं, जो, विषयरूपी हत्तिणीच्या संगानें प्रमत्त झालेल्या अंतःकरणरूपी हत्तीला, संयमाचें बंधन लावू शकेल. ●●●

शार्दूलविक्रीडित

जीर्णा एव मनोरथाः स्वहृदये यातं च तद् यौवनं
हन्ताङ्गेषु गुणाश्च वन्ध्यफलतां याता गुणज्ञैर्विना ॥
किं युक्तं? सहसाऽभ्युपैति बलवान् कालः कृतान्तोऽक्षमी
हा ज्ञातं! मदनान्तकाङ्घ्रियुगलं मुक्त्वाऽस्ति नान्या गतिः ॥३१॥

शार्दूलविक्रीडित

**स्वप्नें तीं मनिचीं मनींच जिरलीं, गेलेंच तें यौवन**
***अंगींच्याहि गुणीं फलें न धरिलीं त्यांच्या गुणज्ञांविण ॥***
***काळ क्रूर बलिष्ठ ये क्षणभरें, आतां करावें कसें ?***
***आलें ध्यानिं, गती दुजी शिवपदाचांचूनि कांहीं नसे ३१***

गद्यार्थ—मनोरथ हृदयांतल्या हृदयांतच जिरले; तें तारुण्यहि निघून गेलें, गुणज्ञ कोणी नसल्यानें अंगांतल्या गुणांचें कांहीं फल आलें नाहीं. काय करावें? बलवान् क्रूर यम लौकरच झडप घालणार! हां आलें ध्यानीं—एक मदनांतक शंकराच्या पायांवाचून दुसरी गति नाहीं. ●●●

शिखरिणी

वितीर्णे सर्वस्वे तरुणकरुणापूर्णहृदयाः
स्मरन्तः संसारे विगुणपरिणामां विधिगतिम् ॥
वयं पुण्येऽरण्ये परिणतशरच्चन्द्रकिरणै—
स्त्रियामां नेष्यामो हरचरणचित्तैकशरणाः ॥ ३२ ॥

शिखरिणी

दुज्यांना सारेंही अतिकरुणभावें वितरनी
गती संसाराची अति अहितकारी उमजुनी ॥
जधीं पुण्यारण्यीं उजळिति शरच्चंद्रकिरण
कधीं नेऊं रात्री हरचरण मानून शरण ? ॥ ३२ ॥

गद्यार्थ—अत्यत दयापूर्ण हृदयाने आपलें सर्वस्व इतरांना देऊन, संसार हा किती भयकर अहितकारी आहें हें उमजून, पवित्र अशा अरण्यामध्यें शिवचरणाना अतिम आसरा करून, शरच्चद्राच्या चादण्यानें उज्ज्वल झालेल्या अशा रात्री आम्ही कधीं घालवू ? ( अशी ओढ वाटते ) •••

शिखरिणी

न भिक्षा दुष्प्रापा पथि मम महाऽऽरामरचिते
फलै सम्पूर्णा भूर्द्विपमृगसुचर्मापि वसनम् ॥
सुखैर्वा दुःखैर्वा सदृशपरिपाकः खलु तदा
त्रिनेत्रं कस्त्यक्त्वा धनलवमदान्धं प्रणमति ? ॥ ३३ ॥

शिखरिणी

ही भिक्षा मिळण्या नसे जड मला उद्यानपूर्णा पथीं
वस्त्रातें मृग-हस्ति-चर्म; भरली पृथ्वी फलांनीं किती ! ।
होणारा परिणाम एक जर कां दुःखासुखांचा खरा
वित्तान्धा नमणार कोण जगतीं सोडूनियां शंकरा ? ३३

गद्यार्थ—या मार्गावर एवढीं उद्यानें आहेत तेव्हा ( अर्थातच त्याचे स्वामी श्रीमान उदार असणार ) मला भिक्षा मिळणें अवघड नाहीं. फलानीं पृथ्वी भरलेली आहे, हत्तीचें किंवा हरिणाचें कातडें वस्त्राचें काम भागविनात. ( या सर्व ऐहिक ) सुखाचा वा दुःखाचा परिणाम ( आध्यात्मिक दृष्ट्या ) सारखाच ( म्हणजे शून्य ) होणार असेल तर शकराचे चरण सोडून अल्पधनानें मदान्ध झालेल्याना लोटागण कोण घालणार ? •••

शिखरिणी

अनावर्ती कालो व्रजति स वृथा तत्र गणितं
दशास्तास्ताः सोढा व्यसनशतसन्तापविधुराः ॥
कियद्वा वक्ष्यामः किमिव बत नात्मन्यपकृतं
किमस्माभिर्यावत्पुनरपि तदेव व्यवसितम् ॥ ३४ ॥

शार्दूलविक्रीडित

येई काल पुन्हां न, मी न गणिला तो व्यर्थ गेला तरी
आपत्ती शत कोसळून पडल्या त्या साहिल्या अतरीं ॥
केली हानिहि मी स्वयेंच अपुली तें काय सांगूं किती !
*जाई खोड न ती, अजून करितों कर्मे पुन्हां तींच तीं* ३४

गद्यार्थ—काल एकदा गेला कीं फिरून परत येत नाहीं. ( असा मोलाचा तो असूनहि ) माझा तो व्यर्थ चालला आहे याची मला दखल नाहीं—आणि ( त्यामुळें ) शेंकडों सकटें ( आज पर्यंत ) येऊन कोसळलीं तीं तीं ( निमूटपणें ) सोसलीं ( कारण गत्यतरच नव्हतें. ) माझ्या स्वतःच्या अहिताच्या गोष्टी किती प्रकारें मी करीत आलों याची कर्मकहाणी तरी कोठवर सागावी ? आणि इतके असून सुद्धा पुन्हा मी त्याच त्याच गोष्टी ( तेच सर्व प्रमाद ) आचरीत आहें हा प्रकार तरी काय आहे ? •••

शिखरिणी

यदा मेरु श्रीमान् निपतति युगान्ताग्निनिहतः
समुद्राः शुष्यन्ति प्रचुरमकरग्राह-निलयाः ॥
धरा गच्छत्यन्त धरणिधरपादैरपि धृता
शरीरे का वार्ता करिकलभकर्णाग्रचपले ॥ ३५ ॥

शिखरिणी

महा मेरू जेथें प्रलयसमयाग्नींत पडतो
महानक्रांनाही गृहसमचि अब्धीहि सुकतो ॥
धरा जाई नाशा, जरि गिरिपदांनींहि धरिली
करीकर्णापेक्षा तरल तनुची गोष्ट कसली ? ३५

गद्यार्थ— जिथें मोठा सोन्याचा पर्वत जो मेरू, तो सुद्धां प्रलयाच्या अग्नींत कोसळून पडावयाचा आहे, मोठमोठ्या नक्रांना आश्रय देणारे समुद्र सुद्धा आटून सुकून जावयाचे आहेत, मोठ्या पर्वतांनीं आपल्या पायानीं आधार देऊन ज्या पृथ्वीला स्थिर केली ती पृथ्वी सुद्धा जिथे नाश पावणार तेथें हत्तीच्या पिल्लाच्या कानाइतक्या चचल मानव देहाची कथा काय ? •••

अनुष्टुभ्

महता पुण्यपण्येन क्रीतेयं कायनौस्त्वया ।
पारं दुःखोदधेर्गन्तुं तर यावन्न भिद्यते ॥ ३६ ॥

आर्या

तूं घेतली विकत जी तनुनौका थोर पुण्य देऊन ।
दुःखोदधिपार तिला वल्हवितने जों न जाय भंगून ३६

गद्यार्थ— मोठ्या पुण्याचें मोल देऊन, तू जी ही देहरूपी होडी विकत घेतली आहेस, ती जोंवर फुटली नाहीं तोंवरच दुःखसागराच्या पार जाण्यास तिला वल्हवीत ने. ●●●

अनुष्टुभ्

आदानस्य प्रदानस्य कर्तव्यस्य च कर्मण।
क्षिप्रमक्रियमाणस्य कालः पिबति तद्रसम् ॥ ३७ ॥

अनुष्टुभ्

**घेणें, देणें, नि कर्तव्य कर्म केलें न सत्वर। —**
**जर कां, रस त्यांतील काल प्राशी स्वयें तर ॥३७॥**

*गद्यार्थ*— घेणें असो, देणें असो, किंवा केलेंच पाहिजे असे काम असो, हें सारें जर झटपट उरकलें नाहीं तर काल हा त्यातला 'रस' पिऊन टाकतो—म्हणजे या तिन्ही कामात गोडी राहात नाहीं — (घेण्याचे बाबत बाधे पडतात, देणेकरी तगादे लावून कटु शब्द ऐकवतात, आणि उशीर झाल्यानें अवश्य कर्तव्य कदाचित् होणार नाहीं किंवा सुखानें न होता कष्टाचें होईल ) ●●●

आर्या

धनिनि जने चटुपटुता जल्पतु रसना रसाशने लुब्धा।
त्वमशनपानरिक्त मस्तक! चरणे कथं लुठसि? ॥३८॥

आर्या

**रसलुब्ध जीभ वरळो**
**चाटुवचातें धनीजनांपुढतीं।**
**तुज अशन, पान, नसतां**
**मस्तक! कां लोळसी पदांवरतीं ॥ ३८॥**

गद्यार्थ—मधुरस खाण्यापिण्याला चटावलेली जीभ, श्रीमंतापुढें (वृथा स्तुतीचे) लाळघोटेपणाचे (लाचार) शब्द बडबडो; परंतु हे मस्तका! तुला तर खाण्यापिण्यात काहींच सुखदुःख नाहीं मग तूं का (श्रीमंताच्या) पायावर लोळण घेतेंस? ●●●

अनुष्टुभ्

आलोड्य सर्व शास्त्राणि विचार्यैव पुनः पुनः।
इदमेकं सुनिष्पन्नं ध्येयो नारायणः सदा ॥३९॥

अनुष्टुभ्

**मंथुनी सर्व शास्त्रांतें, चिन्तुनीया कितीकदां।**
**निष्पन्न हेंच झालें कीं, ध्यावें नारायणा सदा॥ ३९॥**

गद्यार्थ—सर्व शास्त्राचें मथन करून, आणि वारवार चिन्तन करून शेवटीं एकच गोष्ट निष्पन्न झाली ती ही कीं, सदा सर्वकाळ भगवताचेंच चिन्तन करीत राहिलें पाहिजे. ●●●

शार्दूलविक्रीडित

क्षान्तं न क्षमया, गृहोचितसुखं त्यक्तं, न सन्तोषतः
सोढा दुःसहशीतवाततपनक्लेशा, न तप्तं तपः॥
ध्यातं वित्तमहर्निशं नियमितप्राणैर्न शम्भोः पदं
तत्तत्कर्म कृतं यदेव मुनिभिस्तैस्तैः फलैर्वञ्चिताः ॥४०॥

सुमंदारमाला

**न केली क्षमा क्षान्तिनें, मी गृहींच्या**
**सुखां सोडिलें तें न तुष्टीमुळें।**
**अतीशीतवातातपां साहिलें मी**
**परी तें तपाच्या न हौशीमुळें॥**
**सदा चिंतिलें वित्त, रोधोनिया प्राण**
**ना चिंतिलें शंकराचें पद**
**मुनींचेंच मी सर्वही कर्म केलें,**
**परी हाय! त्या त्या फलें वंचित ॥ ४० ॥**

गद्यार्थ—मी क्षमा केली पण ती क्षमावृत्ति (हृदयात बाणली) होती म्हणून नव्हे (तर प्रतिकार करण्याची शक्ति नव्हती म्हणून.) संसारसुखें सोडलीं पण संतोषवृत्तीमुळ नव्हे (तर बहुधा ती मिळविण्याची शक्ति नव्हती किंवा भोगण्याची शक्ति उरली नव्हती म्हणून!) असह्य थंडी वारा, ऊन याचे तडाखे सोसले पण तें काहीं तपश्चर्येचें अंग म्हणून नव्हे (तर ते निवारण्याचीं साधनें नव्हतीं म्हणून!) ध्यान केलें पण प्राणायाम पूर्वक शंकराच्या पदाचें नव्हे तर संपत्तीचें! अशा रीतीनें (वरवर दिसण्यास) मुनिलोक जीं जीं कर्मे (क्षमा, संतोष, तपश्चर्या, ध्यान, इत्यादि) करतात तींच कर्में मींहि केलीं परंतु हाय! त्या त्या कर्मांचें फल जें त्याना मिळतें त्या त्या फलापासून मी मात्र वंचित राहिलों (कारण अर्थातच दोघाच्याहि त्या कर्मांचे हेतूच परस्परविरुद्ध. भिकाऱ्याला उपवासाचें फल लाभत नाहीं.) ●●●

# प्रकरण २७ वैराग्य

## श्लोक १ ते २७ ( श्री शंकराचार्यरचित चर्पटपञ्जरीपैकीं ); वैराग्यशतक भर्तृहरि; शेवटीं ४ श्लोक गंगालहरि.

१ ते २७ श्लोकाचें वृत्त सवाई ( मात्रा. )

मूढ! जहीहि धनागमतृष्णा कुरु सद्बुद्धिं मनसि वितृष्णाम् ॥
यल्लभसे निजकर्मोपात्तं वित्तं तेन विनोदय चित्तम् ॥ १ ॥

मूढ! सोड वित्तास्तव हांव
सुबुद्धि धर मनिं अलोभभाव ॥
कर्मफलें निज जें लाभे धन
तुष्ट तयानें होवो तव मन ॥ १ ॥

गद्यार्थ— मूर्खा! धनाची हाव सोड. सद्बुद्धीची कास धरून मन निर्लोभ कर. स्वताच्या कर्मानें जें धन मिळेल त्यानेंच तू आपल्या मनाला रमव. ( समाधान मान. ) ●●●

अर्थमनर्थं भावय नित्यं नास्ति ततः सुखलेशः सत्यम् ॥
पुत्रादपि धनभाजां भीतिः सर्वत्रैषा विहिता रीतिः ॥ २ ॥

अर्थ अनर्थांचें कर चिंतन
मिळे न लवसुखही परि त्यांतुन ॥
धनिका भय निजपुत्रांचेंही
साऱ्या जगभर रीति अशी ही ॥ २ ॥

गद्यार्थ— अर्थ अनर्थ याचा तू नीट विचार कर पण त्यापासून थोडी सुद्धा सुखप्राप्ति खरोखरच नाही. श्रीमन्तांना, आपल्या मुलापासूनसुद्धा भय असतें–अशीच जगाची रीत आहे. ●●●

का ते कान्ता कस्ते पुत्रः संसारोऽयमतीव विचित्रः ॥
कस्य त्वं कः कुत आयातस्तत्त्वं चिन्तय तदिदं भ्रातः ॥ ३ ॥

कुठली कान्ता, कुठला पुत्र ?
संसारचि हा अती विचित्र ॥
कोण कुणाचा, येशी कोठुन ?
या तत्त्वाचें कर तूं चिंतन ॥ ३ ॥

गद्यार्थ—कोण तुझी पत्नी, कोण तुझा मुलगा ? असा हा संसारच मोठा विचित्र आहे. तू कुणाचा, कोण, कोठून आलास याचा, हे बन्धो! मूलगामी विचार कर. ●●●

मा कुरु जन! धनयौवनगर्वं हरति निमेषात्कालः सर्वम् ॥
*मायामयमिदमखिलं हित्वा ब्रह्मपदं त्वं प्रविश विदित्वा ॥४॥*

नरा! न कर धनयौवनगर्व काळ हरी हें क्षणांत सर्व ॥
मायामय हें सर्व सोडुनी ब्रह्मपदीं जा नीट उमजुनी ॥ ४ ॥

गद्यार्थ— हे नरा! धनतारुण्याचा गर्व वाहू नको [ कारण] काळ हें सारें क्षणात हरण करतो. तेव्हा मायेनें भरलेलें हें सर्व सोडून नीट उमजून ब्रह्मपदी प्रवेश कर. ●●●

काम क्रोध लोभ मोह त्यक्त्वाऽऽत्मानं भावय "कोऽहम् ?" ।
आत्मज्ञानविहीना मूढास्ते पच्यन्ते नरकनिगूढाः ॥ ५ ॥

त्यजुनी काम क्रोधा मोहा विचार कर "मी कोण असें ?" हा ॥
आत्मज्ञानाविण मूढमति नरकामध्यें पडुनी शिजती ५

गद्यार्थ— काम क्रोध मोहलोभ सोडून "मी कोण?" हा विचार कर. आत्मज्ञानविरहित मूर्ख हे नरकात पडून शिजविले जातात. ●●●

सुरमन्दिरतरुमूलनिवासः शय्या भूतलमजिनं वासः ।
सर्वपरिग्रहभोगत्यागः कस्य सुखं न करोति विरागः ॥ ६ ॥

स्वर्गतरुच्या तळीं राहणें भूवर निजणें चर्म नेसणें ॥
त्यजणें सारी मिळकत, भोग सुख न कुणा देतसे विराग ? ॥६॥

गद्यार्थ— स्वर्गतरुच्या खालीं राहावें, जमिनीवर निजावें, चर्म नेसावें, सारी ऐहिक संपत्ति व तिचे भोग सोडावे. वैराग्य कोणाला सुख देत नाहीं ? ●●●

शत्रौ मित्रे पुत्रे बन्धौ मा कुरु यत्नं विग्रहसंधौ ॥
भव समचित्तः सर्वत्र त्वं वाञ्छस्यचिराद्यदि विष्णुत्वम् ॥७॥

शत्रु मित्र अन् पुत्र बंधुजन
यांत न कर तडजोड न भांडण ॥
सर्वांशीं धर समचित्तत्व
झणीं इच्छिसी जर विष्णुत्व ॥ ७ ॥

गद्यार्थ— शत्रु, मित्र, पुत्र, बांधव, यात [ उगाच ] तडजोड किंवा भांडण लावण्याचे खटाटोप करू नको. सर्वत्र समभाव धरून वाग — जर तुला त्वरित विष्णुपद हवें असेल तर. ●●●

त्वयि मयि चान्यत्रैको विष्णुर्व्यर्थं कुप्यसि सर्वसहिष्णुः ॥
सर्वस्मिन्नपि पश्यात्मानं सर्वत्रोत्सृज भेदाज्ञानम् ॥ ८ ॥

तूं मी या सर्वांतचि विष्णु; कोपूं नको; हो सर्वसहिष्णु ॥
स्वतांस बघ तूं सर्व ठिकाणीं सर्व भेद अज्ञान सोडुनी ८

गद्यार्थ—तुझ्यात माझ्यात आणि सर्वत्र विष्णु भरलेला आहे. सर्व सहन करणारा हो. व्यर्थ रागावू नकोस. सर्व ठिकाणीं, तू स्वतास पहा. सर्व ठायीं भेदरूप अज्ञान सोडून दे. ●●●

नलिनीदलगतसलिलं तरलं तद्वज्जीवितमतिशयचपलम् ॥
विद्धि व्याध्यभिमानग्रस्तं लोकं शोकहतं च समस्तम् ॥९॥

कमलदलावर हले जसें जल
तसेंच जीवित अतिशय चंचल ॥
रोग गर्व यांनीं भरले जन
शोकपूर्ण जग सर्वचि जाण ॥ ९ ॥

गद्यार्थ—जसे कमळाच्या पानावर हलणारें जल, तितकेंच हें जीवित अत्यन्त चंचल आहे. रोग, गर्व यानीं लोक ग्रस्त असून सारें जग शोकपूर्ण आहे हें नीट जाण. ●●●

गुरुचरणाम्बुजनिर्भरभक्तः संसारादचिराद्भव मुक्तः ॥
सेन्द्रियमानसनियमादेवं द्रक्ष्यसि निजहृदयस्थं देवम् ॥१०

गुरुपदकमलीं हो दृढभक्त
संसारांतुनि हो झणिं मुक्त ॥
देहमनांचें नियमन करिशी
हृदिस्थ देवा तधिं तूं बघशी ॥ १० ॥

गद्यार्थ—गुरुचरणकमलीं दृढ भक्ति ठेवून या संसारातून लौकर मुक्त हो. इंद्रियासह मनाचे नियमन करशील तेव्हा तुझ्या हृदयस्थ देवाचें तुला दर्शन घडेल. ●●●

दिनमपि रजनी सायं प्रातः शिशिरवसन्तौ पुनरायातः ॥
कालः क्रीडति गच्छत्यायुस्तदपि न मुञ्चत्याशावायुः ॥११॥

प्रभात, संध्या, रात्र दिनान्तीं
शिशिर जाउनी वसंत येती ॥
काळ खेळतो-पळतें आयु
तरिहि न सोडी आशावायु ॥ ११ ॥

गद्यार्थ—दिवस, रात्र, संध्याकाळ, सकाळ शिशिर वसंत हीं एकामागून एक पुन्हा येतात. काळ खेळत आहे. आयुष्य संपत आहे—तरी माणसाला आशावायु सोडीत नाहीं. ●●●

अग्रे वह्निः पृष्ठे भानू रात्रौ चिबुकसमर्पितजानुः ॥
करतलभिक्षा तरुतलवासस्तदपि न मुञ्चत्याशापाशः ॥

अग्नि पुढें, रवि मागें; रात्रीं हनुवटीहि टेकुनि जानुवरी ॥
वसति तरुतळीं, भिक्षा हातीं, तरी न आशापाश
सोडिती ॥ १२ ॥

गद्यार्थ—दिवसा पुढ्यात धुनी पेटलेली; पाठीमागून ऊन ; रात्रीं गुडघ्यात हनुवटी टेकून बसावयाचें; झाडाखालीं राहणें, आणि हातीं भिक्षान्न, ( एवढी भयंकर दुर्दशा प्राप्त झाली ) तरी आशेचा पाश माणसाला सोडीत नाहीं ! ●●●

यावद्वित्तोपार्जनसक्तस्तावन्निजपरिवारो रक्तः ॥
पश्चाद्धावति जर्जरदेहे वार्तां पृच्छति कोऽपि न गेहे ॥१३॥

जोंवर नर धन मिळवी तोंवर,
प्रेम दाविती गृहजन त्यावर ॥
मग जर्जर तो देह धांवतां,
घरीं न पुशिती कुणि तद्वार्ता ॥ १३ ॥

गद्यार्थ—मनुष्य धन मिळविण्यास समर्थ असतो तोंवर त्याच्या घरचीं सारीं त्यावर प्रेम दाखवितात. मागून तो म्हातारा

होऊन हिंडू लागला की, त्याच्या घरात त्याची कोणी वास्तपुस्त करीत नाहीं. ●●●

जटिलो मुण्डी लुञ्चितकेश. काषायाम्बरो बहुकृतवेश ।
पश्यन्नपि च न पश्यति मेष उदरनिमित्तं बहुकृतवेशः ॥ १४

जटाल, मुंडित, कापुनि, केश भगवीं वस्त्रें नाना वेश ॥
मेष, दिसे, तरिही न पहात, करितो सोंगें हीं उदरार्थ१४

गद्यार्थ—जटा ठेवील, मुंडन करील, केंस कापून घेईल, भगवीं वस्त्रें व नाना वेश धारण करील. मेषपात्रासारखें दिसतें तेंहि न दिसल्यासारखें (निर्लज्जासारखें) करील अशीं नाना सोंगे मनुष्य पोटासाठी करतो. ●●●

भगवद्गीता किञ्चिदधीता गङ्गाजललवकणिका पीता ॥
सकृदपि यस्य मुरारिसमर्चा तस्य यम. किं कुरुते चर्चाम्

भगवद्गीता थोडी शिकुनी, गगाजल थोडेसें पिउनी ॥
एकदांहि जो हरिस पूजितो तद्वार्ता यम कशास करतो।

गद्यार्थ—थोडी भगवद्गीता शिकून, थोड गगाजल पिऊन एकदाहि जो हरिपूजा करतो त्याची चर्चा यम करतोच कशाला ! ●●●

अङ्ग गलित पलित मुण्ड दन्तविहीन जात तुण्डम् ॥
वृद्धो याति गृहीत्वा दण्ड तदपि न मुञ्चत्याशा पिण्डम् ॥ १६॥

अवयव गळले, केंसहि पिकले
मुखामधें त्या दांतहि नुरले ॥
काठी टेकित वृद्ध जाइ हा
तरिहि ना सोडी आशा देहा ॥ १६ ॥

गद्यार्थ— अवयव गळले, केंस पिकले, तोंडाचें बोळकें झालें—आणि काठी टेकीत म्हातारा चालतो तरी आशा देहाला सोडीत नाहीं. ●●●

बालस्तावत्क्रीडासक्तस्तरुणस्तावत्तरुणीरक्त ॥
वृद्धस्तावच्चिन्तामग्नः परे ब्रह्मणि तु कोऽपि न लग्नः ॥ १७॥

बाळ तोंवरी राहे खेळत तरुण तोंवरी रतिरंगांत ॥
वृद्ध तोंवरी करी चिंतना ब्रह्माची परि आस्था न कुणा ॥ १७ ॥

गद्यार्थ— ल्हानपणीं खेळात, तरुणपणीं रतिरगात, म्हातारपणीं चिंतेंत, माणूस मग्न असतो परंतु परब्रह्माविषयीं कुणालाच आस्था नाहीं. ●●●

पुनरपि जननं पुनरपि मरणं पुनरपि जननीजठरे शयनम् ॥
इह संसारे खलु दुस्तारे कृपयाऽपारे पाहि मुरारे ॥ १८ ॥

पुन्हां जन्मणें पुनश्च मरणें
पुनश्च जननी जठरीं निजणें ॥
अपार दुस्तर या संसारीं
कृपया तारी मजसि मुरारि ! ॥ १८ ॥

गद्यार्थ— पुन्हापुन्हा जन्माला येणें, पुनःपुन्हा मरणें, पुन्हा पुन्हा आईच्या गर्भात वास करणें ! या अपार, दुस्तर ससारसागरातून, हे कृष्णा, माझे तू रक्षण कर. ●●●

पुनरपि रजनी पुनरपि दिवसः पुनरपि पक्षः पुनरपि मास. ॥
पुनरप्ययनं पुनरपि वर्षं तदपि न मुञ्चत्याशामर्षम् ॥१९॥

पुनरपि रजनी पुनरपि दिवस
पुनरपि पक्ष नि पुनरपि मास ॥
पुन्हां अयन अन् वर्षे जातीं
आशा क्रोध न तरी सोडिती ॥ १९ ॥

गद्यार्थ—पुन्हा रात्र, पुन्हा दिवस, पुन्हा पधरवडा, पुन्हां महिना, पुन्हा सहामाही, पुन्हा वर्षे येतात आणि जातात पण आशा आणि क्रोध हे देहाला सोडीत नाहींत. ●●●

वयसि गते कः कामविकारः शुष्के नीरे कः कासारः ? ॥
नष्टे द्रव्ये कः परिवारो ज्ञाते तत्त्वे कः संसारः ? ॥ २० ॥

काम कोठला वय गेल्यावर ?
तळें कोठलें जल सुकल्यावर ? ॥
धन सरतां कुठला परिवार ?
तत्त्वज्ञा कुठला संसार ? ॥ २० ॥

गद्यार्थ— तारुण्य निघून गेल्यावर कामविकार कोठला ? पाणी वाळल्यावर तळें कोठलें ? सपत्ति संपल्यावर परिवार कोठला ? व तत्वाचें ज्ञान झाल्यावर संसार कोठला ? ●●●

नारीस्तनभरनाभिनिवेशं मिथ्यामायामोहावेशम् ॥
एतन्मांसवसादि विकारं मनसि विचारय वारंवारम् ॥२१॥

तरुणीदेह-स्पर्शसुखें तीं मिथ्या मायामोहचि असतीं ॥
मांसमेदकृत विकृतिच सारी पुनःपुन्हां हें मनीं विचारी ॥२१॥

गद्यार्थ— तरुणीच्या नाना अवयवांना स्पर्श करून मिळणारें सुख मिथ्या माया मोहच आहे— ती केवळ मांस, चरबी याची विकृति आहे याचा मनीं वारवार विचार कर. ●●●

कस्त्वं ? कोऽहं ? कुत आयात. का मे जननी ? को मे तातः ? ।
इति परिभावय सर्वमसारं विश्वं त्यक्त्वा स्वप्नविचारम् २२

**कोण तूं नि मी, आलों कुठुनी ?**
**कोण कोण मम तात नि जननी ? ॥**
**असें जाण हें सर्व असार**
**सोड विश्व — तें स्वप्नविचार ॥ २२ ॥**

गद्यार्थ— कोण तू ? कोण मी ? कोठून आलों ? कोण माझी आई ? कोण माझा बाप ? अशा रीतीनें हें सर्व असार आहे, याची नीट प्रतीति घेऊन हें विश्व सोड. तें सर्व स्वप्नातल्या विचारासारखें आहे. ●●●

गेयं गीतानामसहस्रं ध्येयं श्रीपतिरूपमजस्रम् ।
नेयं सज्जनसङ्गे चित्तं देयं दीनजनाय च वित्तम् ॥२३॥

**गीतानामसहस्रा गावें विष्णुरूप हें अपार ध्यावें ।**
**सुजनसंगमीं स्वचित्त न्यावें दीनजनांना स्ववित्त द्यावें ॥ २३ ॥**

गद्यार्थ— गीता, नामसहस्र याचें गायन करावें, अनंत विष्णुरूपाचें ध्यान करावें. सज्जनसंगाकडे मनाला वळवावें, दीन जनाना स्ववित्त द्यावें. ●●●

यावज्जीवो निवसति देहे तावत्कुशलं पृच्छति गेहे ।
गतवति वायौ देहापाये भार्या बिभ्यति तस्मिन्काये ॥२४॥

**वसतो जोंवर जीव शरीरीं कुशल घरीं पुसतात तोंवरी ।**
**सोडुनि जातां प्राण तनूतें त्या देहा मग पत्नीहि भिते २४**

गद्यार्थ— शरीरांत जीव आहे तोंवर घरांत माणसाची कोणी वास्तपुस्त करतात. प्राण देहांतून निघून गेल्यावर त्याच देहाला त्याची खुद्द पत्नीहि भिते. ●●●

सुखतः क्रियते रामाभोगः पश्चाद्धन्त शरीरे रोगः ।
यद्यपि लोके मरणं शरणं तदपि न मुञ्चति पापाचरणम् ॥ २५ ॥

**स्वैर भोगुनी रतिसुख, नंतर**
**हाय ! शरीरीं रोग भयंकर ॥**
**जरी जीवनीं अटळचि मरण**
**तरी न सुटतें पापाचरण ॥ २५ ॥**

गद्यार्थ— सुखासाठीं म्हणून स्त्रीचा उपभोग घेतला जातो आणि हाय ! मागून देहांत रोगाचें ठाणें बसतें. जीवनाला मरण हें अटळ आहे तरी माणूस पापाचरण सोडीत नाहीं. ●●●

कुरुते गङ्गासागरगमनं व्रतपरिपालनमथवा दानम् ।
ज्ञानविहीने कार्येऽनेन मुक्तिर्न भवति जन्मशतेन ॥ २६ ॥

**सागर-गंगास्नानें करिती व्रत पाळिति वा दानें देती ॥**
**ज्ञानविना परि या सर्वांनीं मुक्ति न मिळते जन्मशतांनीं ॥ २६ ॥**

गद्यार्थ— कोणी मुमुक्षु गंगा-सागर-स्नानें करितात, व्रतें पाळतात, दानें देतात, परंतु ज्ञानविहीन अशा या सर्व कर्मांनीं मुक्ति, शंभर जन्मानींहि मिळणें शक्य नाही. ●●●

रथ्याचर्पटविरचितकन्थः पुण्यापुण्यविवर्जितपन्थः ।
नाहं न त्वं नायं लोकस्तदपि किमर्थं क्रियते शोकः ॥ २७

**चिंध्यांची गोधडी पांघरून ज्या मार्गीं ना पाप, पुण्य न**
**न मी, न तू, ना लोक असे जर काय म्हणुनि तूं शोक करिसि तर ? ॥ २७ ॥**

गद्यार्थ— ( तुझ्यापाशीं असणार काय ? ) रस्त्यातल्या चिंध्या गोळा करून, हातानें त्याची शिवलेली गोधडी ! तुला जेथे पाप किंवा पुण्य काहींच लागणार नाहीं असा मार्ग धर ! मीहि नाहीं ! तूहि नाहींस. हें जगहि नाहीं ! आणि तरीहि तू कां शोक करतोस ? ●●●

अनुष्टुभ्

त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।
कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥२८॥

अनुष्टुभ्

**आणिती आपणां नाश—नरकद्वार हे तिन्ही ।**
**काम क्रोध तसा लोभ—देणें यास्तव सोडुनी ॥२८॥**

गद्यार्थ— काम क्रोध व लोभ हीं तिन्ही आपणास नाशकारक व नरकाचें दार उघडून देणारीं आहेत तेव्हा यांचा त्याग करावा. ●●●

वसंततिलका

यां चिन्तयामि सततं मयि सा विरक्ता
साप्यन्यमिच्छति जनं स जनोऽन्यसक्तः ॥
अस्मत्कृते च परितुष्यति काचिदन्या
धिक् तां च तं च मदनं च इमां च मां च ॥ २९ ॥

वसंततिलका

ध्यातों जिला सतत मी, मज ती विरक्त—
इच्छी दुज्यास, परि तो दुसरींत सक्त ॥
माझ्यावरी प्रणयिनी दुसरी कुणी ही
धिक् तीस, त्यास, मदनास, हिला, मलाही॥२९॥

गद्यार्थ— (या श्लोकासबंधीं एक दंतकथा सांगतात ती अशी कीं, राजा भर्तृहरीला त्याच्या गुरूनें प्रसाद म्हणून एक फळ दिलें, तें त्यानें आपल्या प्रियेला दिलें. त्या स्त्रीचा कोणी प्रियकर होता; त्याला तें फळ तिनें दिलें, पण त्या पुरुषाची वल्लभा निराळीच कोणी स्त्री होती तिला त्यानें तें फळ दिलें. इकडे या शेवटच्या स्त्रीचें राजा भर्तृहरीवर प्रेम होतें म्हणून तिनें तें फळ राजाला दिलें व असें हें प्रेमाचें वर्तुळ पुरें होऊन ज्याचें फळ त्याचेकडे परत आलें व या प्रकाराला विटून राजाला वैराग्य आलें !) मी जिचा सतत ध्यास घेतलेला आहे, तिचें माझ्यावर प्रेम नसून, दुसऱ्या कोणावर आहे पण त्या तिच्या वल्लभाचें प्रेम, मात्र हिच्यावर नसून, आणखी कोण्या स्त्रीवर आहे ! इकडे माझ्यासाठीं प्रेमामुळें झुरणीला लागणारी आणखी एक स्त्री आहे !— धिक्कार असो तिला, त्याला, मदनाला, हिला आणि मला स्वतालाहि !

●●●

शिखरिणी

कदा वाराणस्याममरतटिनीरोधसि वसन्
वसानः कौपीनं शिरसि निदधानोऽञ्जलिपुटम् ॥
अये गौरीनाथ ! त्रिपुरहर ! शम्भो ! त्रिनयन !
प्रसीदेत्याक्रोशन् निमिषमिव नेष्यामि दिवसान् ? ॥३०॥

शिखरिणी

अहा ! काशीक्षेत्रीं, सुरनदितटीं वास करुनी
वसोनी लंगोटी जुळवुनि शिरीं हात धरुनी ॥
करावा मी धांवा "कर मज दया हे त्रिनयन !
असें आक्रंदोनी क्षणसम कधीं जातिल दिन ? ॥ ३० ॥

गद्यार्थ—काशी क्षेत्रीं गंगेच्या काठीं राहावें, लंगोटी नेसावी दोन्ही हात जुळवून डोक्यावर धरून मी शंकराला आळवावें कीं हे पार्वतीपते ! हे त्रिपुरांतका ! हे शंभो ! हे त्रिनयना ! या दीनावर प्रसन्न हो !" अशा रीतीनें क्षणभरांत माझे दिवस कधीं जातील ?

●●●

शार्दूलविक्रीडित

रात्रिः सैव पुनः स एव दिवसो मत्वाऽबुधा जन्तवो
धावन्त्युद्यमिनस्तथैव निभृतप्रारब्धतत्तत्क्रियाः ॥
व्यापारैः पुनरुक्तभूतविषयैरेवंविधेनामुना
संसारेण कदर्थिता' कथमहो मोहान्न लज्जामहे ! ३१॥

शार्दूलविक्रीडित

रात्री तीच ; तसाच हा दिवसही हें मूर्ख ची मानतो
धांवे कार्यवशें , मुकाट कृतिही ती तीच आरंभितो ॥
कर्मे तींच तशींच नित्य, असल्या संसारिं कंटाळुनी
वाटे लाज न कां जनास–कुठल्या मोहास हो गुंतुनी ?

गद्यार्थ—गेली रात्र, तीच (पुन्हा आली आहे), गेला दिवस तोच ( पुन्हा उगवला आहे, ) असें मानून मूर्ख लोक, क्षुद्र कीटकासारखे काहींतरी उद्योग पाठीशीं लावून घेऊन निमूटपणें, अनेकविध कर्में करण्यासाठीं, धावत आहेत ! पुन्हा पुन्हा चर्वितचर्वणासारखे, ते तेच उद्योग करण्यास लावणाऱ्या, या संसारानें इतके आम्ही पिडिलेले असून ( त्या बैलघाण्यात राबण्याची ) आम्हास लाज वाटू नये, अशी कसली मोहिनी आम्हास पडली आहे ?

●●●

शार्दूलविक्रीडित

आशा नाम नदी ; मनोरथजला तृष्णातरङ्गाकुला
रागग्राहवती, वितर्कविहगा धैर्यद्रुमध्वंसिनी ॥
मोहावर्तसुदुस्तराऽतिगहना प्रोत्तुङ्गचिन्तातटी
तस्या' पारगता विशुद्धमनसो नन्दन्ति योगीश्वरा ॥३२॥

शार्दूलविक्रीडित

आशारूप नदी मनोरथजळीं लाटा जिथें तृष्णिका
प्रेमाच्या सुसरी, कुतर्क खग, जी धैर्यद्रुमा नाशिका ॥
मोहाचे भवरे सखोल जळिं त्या ; चिंता उभा त्या तट
योगी शुद्धमनें तरे तिस, मिळे आनंद हो त्याप्रत ॥३२॥

*गद्यार्थ*—आशारूपी नदी, मनोरथ हें तिचें पाणी, त्यात तृष्णा या लाटा, त्यात प्रेमाच्या सुसरी मगरी, कुतर्क हे त्यात खेळणारे पक्षी, जी नदी किनाऱ्यावरील धैर्यरूपी वृक्ष आपल्या पुरात वाहून नेते, जिच्या भयकर खोल पाण्यात मोहरूप भोंवरे असल्यानें जी दुस्तर ,( त्यातूनहि कोणी पोहणारा निघालाच तर ) चितारूपी उभा कड्यासारखा किनारा ! अशी ही भयकर नदी, शुद्ध हृदयाचा जो योगी तरून जातो त्याला, महदानदाची प्राप्ति होत असते !

●●●

वसंततिलका

गङ्गातरङ्गकणशीकरशीतलानि
विद्याधराध्युषितचारुशिलातलानि ।
स्थानानि किं हिमवतः प्रलयं गतानि ॥
यत्सावमानपरपिण्डरता मनुष्याः ॥३३॥

वसंततिलका

**गंगातुषार करिती स्थल जें सुशीत**
**विद्याधरांहि रुचतें वसण्यास जेथ ॥**
**स्थानें अशीं नुरति काय हिमाद्रिचीं तीं ?**
**कीं लाज सोडुनि मनुष्य पराच खाती ! ॥३३॥**

हेंच मदारमालेंत

**जिथें शैत्य आलें सभोंवार, गगा—**
**तरगांतल्या त्या तुषारांमुळें**
**शिलापृष्ठभागांस पावित्र्य जेथील**
**विद्याधरांच्या निवासामुळें ॥**
**अशीं काय हो सर्वही नष्ट झालीं**
**हिमाद्रींतलीं रम्य तीं तीं स्थळें ?**
**पराचांत ओशाळलेल्या रमावें**
**नरें सोडुनी मानही ज्यामुळें ? ॥३३॥**

गद्यार्थ—गगेच्या लाटांनीं उडालेल्या तुषारांनी, शीतल झालेलीं, विद्याधरादि गधर्वांनीं, जेथें वसून, जेथल्या शिलाना पावित्र्य आणलेलें आहे, अशीं हिमालयावरील सर्व स्थानें नाहींशीं झालीं कीं काय ? कीं ज्यामुळें माणूस अपमान सोसून ओशाळलें पराच खातो !

●●●

शिखरिणी

तपस्यन्तः सन्तः किमधि वसामः सुरनदीं ?
गुणोदारान्दारान् किमु परिचरामः सविषयान् ? ॥
पिबामः शास्त्रौघानुत विविधकाव्यामृतरसान् ?
न विद्मः किं कुर्मः कतिपयनिमेषायुषि जनौ ! ३४

शिखरिणी

**तपश्चर्येमध्यें किति समय गंगातटिं वसूं ?**
**गुणी स्त्रीच्या संगें विषयसुख कां भोगत वसूं ? ॥**
**पिणें शास्त्रौघा कीं अमृतरस काव्यांतिल पिणें ?**
**कळेना कीं, जन्मीं क्षणिक असल्या काय करणें ? ३४**

गद्यार्थ—काही थोड्या क्षणापर्यंतच टिकणाऱ्या या जीवनामध्यें ( करणार तरी काय काय ? ) काय करावें तेंच काहीं कळत नाहीं ! काय तपश्चर्या करीत गगेच्या किनाऱ्यावर राहूं ? कीं, गुणी स्त्रीच्या सगतींत विषयसुख भोगत बसूं ? शास्त्रांच्या सुविचारधारांचें प्राशन करू कीं काव्यातील विविध अमृतरस पीत राहू ?

●●●

शार्दूलविक्रीडित

रम्यं हर्म्यतलं न किं वसतये ? श्राव्यं न गेयादिकं ?
किं वा प्राणसमासमागमसुखं नैवाधिकं प्रीतये ? ॥
किन्तु भ्रान्तपतङ्गपक्षपवनव्यालोलदीपाङ्कुर—
च्छायाचञ्चलमाकलय्य सकलं सन्तो वनान्तं गताः ३५

शार्दूलविक्रीडित

**नोहे मंदिर रम्य काय वसण्या ? कीं ऐकण्या गायन ?**
**किंवा प्राणसखी-समागमसुखें त्याहूनही रम्य न ? ॥**
**घेतां झेंप पतंग ज्योत हलुनी छाया पडे नाचरी**
**तैसें जाणुनि सर्व, सज्जन परी जाती वनीं सत्वरीं ३५**

गद्यार्थ—सुदर राजमदिरासारखे घर मिळालें, तर, त्यत राहणें का कोणाला गोड वाटणार नाहीं ? गायन ऐकायला मिळालें तर काय तें आनद देणार नाहीं ? किंवा प्राणप्रियेच्या समागमांत राहण्याचें सुख या दोघाहूनहि रम्य कोणाला वाटणार नाहीं ? परतु विचारी सत मात्र, हे सर्व विषय, पतगानें, सुकून, दिव्यावर झेंप घेतली असता, त्याच्या पखाच्या वाऱ्यानें, दिव्याची ज्योत हलून, पदार्थांची छाया जितकी चचल पडते, तितकें चचल समजून, त्वर, अरण्याची वाट धरतात.

●●●

स्रग्धरा

किं कन्दाः कन्दरेभ्यः प्रलयमुपगता निर्झरा वा गिरिभ्यः
प्रध्वस्ता, वा तरुभ्यः सरसफलभृतो वल्कलिन्यश्च शाखाः ?
वीक्ष्यन्ते यन्मुखानि प्रसभमुपगतप्रश्रयाणां खलानां
दुःखोपात्ताल्पवित्तस्मयपवनवशान्नर्तितभ्रूलतानि ! ॥ ३६॥

स्रग्धरा

गेले कां कंद रानीं कुजुनि ? गिरिवरी
आटले ते झरे कां ?
झाल्या कां नष्ट साऱ्या सुफलित तरुच्या
वल्कलेंयुक्त शाखा ? ॥
पाहावीं कीं मुखें तीं-धनलव मिळुनी
दस पैसा खलांचीं
झाले मोठे वळेंची-नयन उडवितीं
जे मदानें, अशांचीं ॥ ३६ ॥

गद्यार्थ— काय रानावनातले सारे कन्द कुजून गेले ? काय पर्वतावरून वाहात येणारे निर्झर आटून गले ? काय सरस फलानीं भरलेले वृक्ष व वल्कलानीं युक्त त्यांच्या शाखा सर्व नष्ट झाल्या ? ( असें अनायासलब्ध खाद्य, पेय, वस्त्र यांचीं सोय असता ) का कोण जाणे हे ( लाचार ) मनुष्य ( कीन्क, ) धनलवप्राप्तीनें चढून गेलेल्या, व मदानें भृकुटी उडवणाऱ्या, दुष्ट जनाचीं तोंडें, ( आद्याळमूतपणें ) पाहात असतात ? ●●●

शार्दूलविक्रीडित

सत्यत्वे न शशाङ्क एष वदनीभूतो न वेन्दीवर-
द्वन्द्वे लोचनतां गते, न कनकैरप्यङ्गयष्टिः कृता ॥
किन्त्वेवं कविभिः प्रतारितमनास्तत्त्वं विजानन्नपि
त्वङ्मांसास्थिमयं वपुर्मृगदृशां मन्दो जनः सेवते ॥ ३७ ॥

शार्दूलविक्रीडित

नाहीं चंद्र खराखुरा वदनिं वा पद्मेंहि नेत्रांत न
किंवा कांचन घालुनी घडविला स्त्रीदेह हें सत्य न ॥
जाणे तत्त्व तरी फसून कविच्या वाणीस खोट्या पहा
रक्तास्थीमय देह हा तरणिचा भोगी कसा मूर्ख हा ! ३७

गद्यार्थ— " प्रत्यक्ष चद्रानें, स्त्रीमुखाचें रूप घेतलें, नीलकमल-द्वयच तिचे नेत्र झाले, सुवर्णापासून स्त्रीची अंगयष्टि बनविली गेली, " ( या सर्व कल्पना आहेत, ) यात सत्य कांहींच नाहीं ! परंतु मूर्ख मनुष्य प्राणी, कवीनीं त्यांच्या मनात भरविलेल्या या खोट्या कल्पनानीं फसून, निव्वळ त्वचा, मास, हाडें यांनीं बनलेला तरुणीचा देह भोगीत असतो ! ●●●

शार्दूलविक्रीडित

तुङ्गं वेश्म, सुताः सतामभिमताः सख्यातिगाः सम्पदः
कल्याणी दयिता, वयश्च नवमित्यज्ञानमूढो जनः ॥
मत्वा विश्वमनश्वरं निविशते संसारकारागृहे
संदृश्य क्षणभङ्गुरं तदखिलं धन्यस्तु सन्न्यस्यति ॥ ३८ ॥

शार्दूलविक्रीडित

वाडा उंच ! मुलें बुधां प्रिय; कुणी मोजूं शकेना धन !
स्त्री कल्याणकरी, नवें वय, अशा अज्ञानमोहें जन ॥
विश्वा मानुनि या चिरायु, शिरतो संसारकारागृहीं
सारें भंगुर सुज्ञ जाणुनि परी घे धन्य संन्यासही ३८

गद्यार्थ— मोठा उंच ( सातमजली ) वाडा; मुलें सर्व सुज्ञाना आवडण्याजोगीं; संपत्ति न मोजता येण्याइतकी; पत्नी कल्याण-कारी; वय तारुण्याचें; या अशा सर्वांनीं युक्त, हें विश्व माणूस, समजू लागतो, कीं, चिरजीवच आहे ! आणि, या अज्ञानाच्या मोहानें तो संसाराच्या कारागृहात प्रवेश करतो. तर, सुज्ञ, विचारी, धन्य, ( एखादा ) हें सर्व क्षणभंगुर आहे, हें जाणून सन्यास घेतो ! ●●●

शिखरिणी

अहौ वा हारे वा बलवति रिपौ वा सुहृदि वा
मणौ वा लोष्ठे वा कुसुमशयने वा दृषदि वा ॥
तृणे वा स्त्रैणे वा मम समदृशो यान्ति दिवसाः
कदा पुण्येऽरण्ये शिव शिव शिवेति प्रजपतः ? ॥ ३९ ॥

शिखरिणी

सुमित्रा-शत्रूला प्रबल, — अहि वा हार उभयां
शिला वा पुष्पांचें शयन — मणि मातीस उभयां ॥
तृणाला वा स्त्रीला सकल समदृष्टीच बघुन
कधीं पुण्यारण्यीं शिवभजनिं जाती मम दिन ?॥३९॥

हेंच मंदारमालेंत —

असो सर्प वा हार तो; शत्रु मोठा
बली, मित्र वा तो असो चांगला ।
असो रत्न, ढेंकूळ तें वा, फुलाची
असो शेज ती वा असो ती शिला ॥
तृणाची असो बाहुली सुंदरी वा,
समा दृष्टि सर्वांवरी ठेवुन ।
कधीं पुण्य रानीं, शिवाचा करोनी
मुखें घोष, जातील माझे दिन ? ॥ ३९ ॥

गद्यार्थ— सर्प असो किंवा हार असो, बलिष्ठ शत्रु असो किंवा मित्र असो, रत्न असो कीं माती असो, पुष्पशय्या असो कीं दगड असो, तृण असो कीं स्त्री असो, या सर्वांना समदृष्टीनें पाहात, पवित्र अरण्यामध्य, शिवनाम जपत, माझे दिवस कधीं जातील ? ( याची मला ओढ लागली आहे. ) ●●●

अनुष्टुभ्

धर्माख्याने स्मशाने च रोगिणा या मतिर्भवेत्।
सा सर्वदैव तिष्ठेच्चेत्को न मुच्येत बन्धनात् ? ॥४०॥

वसततिलका

आख्यान धर्मविषयीं जधिं येइ कानीं
रोगी मनुष्य असता, फिरता स्मशानीं ॥
जी चित्तवृत्ति घनसे, जर ती टिकेल
बन्धांतुनी तर न मुक्ति कुणा घडेल ? ॥ ४० ॥

गद्यार्थ— धर्मविषयक व्याख्यान ऐकताना, रोगी असताना, स्मशानात फिरताना, माणसाची जी चित्तवृत्ति होते, ती (विरक्तीची भावना) जर कायम टिकेल, तर, या (भवाच्या) बधनातून कोण मुक्त होणार नाहीं ? ●●●

आर्या

प्रतिदिनमखिलान्लोकान्मृत्युमुख प्रविशतो निरीक्ष्यापि ।
हा हन्त चित्तमेतद्विरमति नाद्यापि विषयेभ्यः ! ॥ ४१ ॥

आर्या

मृत्युमुखीं शिरतांना प्रतिदिन लोकांस सर्व पाहून ।
हा! हाय! चित्त अजुनी विषयातुनि कां निवृत्त होई न ? ॥ ४१ ॥

गद्यार्थ— प्रत्येक दिवशीं, लोक मृत्यूच्या मुखात जाताहेत, हें दृश्य पाहत असून सुद्धा हाय! हाय! हें माझें चित्त अजून विषयातून निवृत्त कसे व का होत नाहीं ? ●●●

शिखरिणी

भवारण्य भीम ननु गृहमिद छिद्रबहुल
बली कालश्चोरो नियतमसिता मोहरजनी ॥
गृहीत्वा ज्ञानासिं, निरतिफलक, शीलकवच
समाधान कृत्वा स्थिरतरदृशो जाग्रत जना ॥४२॥

आर्या

भवरान भयकर, तनु हें गृह सर्वांगास पूर्ण छिद्रांनीं
चोरचि बलिष्ठ कालहि; सतत काळीच मोह ही रजनी ॥
सुज्ञान खड्ग, ढालहि विरक्ति ही, कवच शील घेऊन
स्थिरदृष्टीनें सावध जनहो! राहा सदैव जागून! ४२

गद्यार्थ—संसार हें भयकर अरण्य आहे; देहरूपी घर हें सर्वबाजूनीं छिद्रानीं परिपूर्ण आहे! काल हा बलिष्ठ चोर (टपून बसलेला) आहे; मोहरूपी रात्र ही नेहमीं अधारीच राहणारी आहे; तेव्हां हे जन हो! ज्ञानरूप खड्ग व वैराग्यरूपी ढाल हातीं घेऊन, शीलाचें कवच अगावर चढवून, सावधान चित्तानें, डोळे स्थिर करून जागे रहा! ●●●

अनुष्टुभ्

एक एव पदार्थस्तु त्रिधा भवति वीक्षितः।
कुणपः कामिनी मास योगिभिः कामिभि श्वभि ४३

उपजाति

ज्या वस्तुला प्रेत म्हणेल योगी
कामी तिला स्त्री म्हणुनीच भोगी ॥
कुत्र्यास ती केवळ होय मांस
एक त्रिधा वस्तु दिसे तिघांस ॥ ४३ ॥

गद्यार्थ—पदार्थ एकच असला तरी तीन निराळ्या दृष्टिकोणातून पाहिला, कीं, तीन प्रकारचा होऊ शकतो. स्त्रीचा देह पाहून योगी त्याला प्रेत म्हणेल, कामी त्याला कामिनी म्हणेल; कुत्रा म्हणेल, हें केवळ मास आहे! ●●●

अनुष्टुभ्

प्रमदा मदिरा, लक्ष्मीर्विज्ञेया त्रिविधा सुरा ।
दृष्ट्वैवोन्मादयत्येका पीता चान्याऽतिसचयात् ॥४४॥

आर्या

प्रमदा, मदिरा, लक्ष्मी, जगीं सुरेचे प्रकार हे तीन ।
बघतां पितां, जमवितां, अनुक्रमें मोहिती नरा पूर्ण ४४

गद्यार्थ—मदमत्त तरुणी, मदिरा, व लक्ष्मी हे, मदिरेचे तीन प्रकार आहेत, अनुक्रम पहिली, नुसती पाहिल्यानें, दुसरी, प्याल्यानें, तिसरी, फार साठवल्यानें, —माणसाला मोहित करतात. ●●●

अनुष्टुभ्

न जातु काम कामानामुपभोगेन शाम्यति ।
हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ॥ ४५ ॥

अनुष्टुभ्

कामांच्या उपभोगानें काम होई न शांत तो।
आहुतीनें जसा अग्नि उलटा फार वाढतो ॥४०॥

गद्यार्थ—कामाच्या उपभोगानें, काम कधीं शात होत नाहीं, तर उलट, अग्नीत आहुति दिल्यानें, जसा तो वाढतो, तसाच कामहि वाढतो. ●●●

अनुष्टुभ्

कामनाम्ना किरातेन विकीर्णा मुग्धचेतसाम्।
नार्यो नरविहगानामङ्गबन्धनवागुराः ॥ ४६ ॥

अनुष्टुभ्

किरात फामनामा हा फैलावी पकडावया।
वेश्या पुरुपपक्ष्यांना जाळेंच जणुं कीं स्त्रिया ॥ ४६ ॥

गद्यार्थ—काम नावाच्या पारध्यानें, स्त्रियारूपी जाळें, वेश्या पुरुषपक्ष्याना पकडण्यासाठीं, पसरलेलें आहे.

●●●

अनुष्टुभ्

बाल्यमल्पदिनैरेव यौवनश्रीस्ततो जरा।
देहेऽपि नैकरूपत्वं काऽऽस्था बाह्येषु वस्तुषु ॥ ४७ ॥

उपजाति

बालत्व थोड्याच दिनांत जाई
तारुण्य वार्धक्यहि शीघ्र येई ॥
ना एकरूपत्व दिसे तनूस
बाह्यांत आस्था धरणें कशास ? ॥ ४७ ॥

गद्यार्थ—बाळपण थोड्याच दिवसात निघून जातें, तारुण्य व वार्धक्य पाठोपाठ येतात. देहात अशा तऱ्हेनें एकरूपत्व नसल्यामुळें, माणसानें, बाह्य वस्तूत आस्था, कशाला धरावी ?

●●●

अनुष्टुभ्

श्मशानमापदं दैन्यं दृष्ट्वा को न विरज्यते ?।
तद्वैराग्य परं श्रेयः स्वतो यदभिजायते ॥ ४८ ॥

उपजाति

आपत्ति अन् दैन्य, तसें स्मशान
पाहून वैराग्य घडे कुणा न ? ॥
वैराग्य कल्याणद तें न होतें
निघे स्वतांतून खरेंखुरें तें ॥ ४८ ॥

गद्यार्थ— आपत्ति, दैन्य आणि स्मशान पाहून, वैराग्याची भावना, कोणाच्या हृदयात येत नाहीं ? (पण, तें वैराग्य कल्याण-प्रद नव्हे;) तर स्वतांतूनच जें उद्भूत होतें; तें वैराग्य खरें. ●●●

मालिनी

इह हि मधुरगीतं नृत्यमेतद्रसोऽयं
स्फुरति परिमलोऽयं स्पर्श एष स्तनानाम् ॥
इति हतपरमार्थैरिन्द्रियैर्भ्राम्यमाणः
स्वहितकरणधूर्तैः पञ्चभिर्वञ्चितोऽस्मि ॥ ४९ ॥

मालिनी

मधुर रस इथें हा, नृत्य हें, गान साचें
परिमल पसरे हा, स्पर्श हे या स्तनांचे ॥
परमहित वधोनी पांचही स्वार्थधूर्त
भ्रमवुनि मजला हीं इंद्रियें वंचितात ॥ ४९ ॥

गद्यार्थ—येथें, हें मधुरगायन ऐकवून (श्रवणेंद्रियाला;) हें नृत्य दाखवून (चक्षुरिंद्रियाला;) हा रस चाखवून (रसनेंद्रियाला;) हा मधुरवास हुंगवून [घ्राणेंद्रियाला;] स्तनाचे स्पर्श घडवून [स्पर्शेंद्रियाला] सुखवीत पण वस्तुतः माझ्या अंतिम हिताचा घात करीत, हीं स्वार्थधूर्त पाचहि ज्ञानेंद्रियें मला भ्रमवीत फसवीत, आहेत-

●●●

शार्दूलविक्रीडित

उन्मीलत्त्रिवलीतरङ्गवलया प्रोत्तुङ्गपीनस्तन—
द्वन्द्वेनोद्यतचक्रवाकमिथुना वक्त्राम्बुजोद्भासिनी ॥
कान्ताऽऽकारधरा नदीयमभितः क्रूराशया नेष्यते
संसारार्णवमज्जनं यदि ततो, दूरेण सन्त्यज्यताम् ॥ ५० ॥

शार्दूलविक्रीडित

लाटा या त्रिवलीस्वरूप जिथल्या, अन् उंच पुष्ट स्तन—
दोन्ही हे जणुं चक्रवाक, कमलापेरें जिथें आनन ॥
नारीरूप नदी त्यजी झणिं दुरी ही क्रूर पेशी तर
संसाराब्धित हीमुळेंच बुडण्या, तूं इच्छिसी ना जर ५०

गद्यार्थ— स्त्रीदेह हा नदीप्रमाणें आहे. त्रिवली या तिच्यातल्या लाटा; उंच पुष्ट स्तन हें चक्रवाकाचें जोडपें, स्त्रीमुख हें तिच्यांतलें कमल; अशा या क्रूर नदीच्या प्रवाहात (वाहात वाहात,) हे पुरुषा ! संसाराच्या समुद्रात जाऊन बुडण्याची जर तुला इच्छा नसेल तर, या नदीपासून दूर रहा. ●●●

उपेन्द्रवज्रा

प्रशान्तशास्त्रार्थविचारचापलं
निवृत्तनानारसकाव्यकौतुकम् ॥
निरस्तनि शेषविकल्पविस्तरं
प्रपत्तुमन्विच्छति शंकरं मनः ॥ ५१ ॥

वसंततिलका

**शास्त्रार्थवादपटुताश्रम शांतवून**
**नानारसात्मक सुकाव्यकला त्यजून ॥**
**सारे विकल्प मनिंचे करुनी निरस्त**
**श्रीशंकरा मिळविण्या मन होइ आर्त ॥ ५१ ॥**

गद्यार्थ—शास्त्रविषयक वादविवाद करण्याचे सारे श्रम, आता, शांत करून ; नाना रसात्मक काव्याविषयींची आवड, आता, कमी करून मनाला चलित करणारे सारे कल्पविकल्प काढून टाकून, शंकराची प्राप्ति करून घेण्यासाठीं, मन, आता आर्त झालें आहे ! ●●●

शिखरिणी

*अपि प्राज्यं राज्यं तृणमिव परित्यज्य सहसा*
*विलोलद्वानीरं तव जननि तीरं श्रितवताम् ॥*
*सुधातः स्वादीयः सलिलभरमातृप्ति पिबतां*
*जनानामानन्दः परिहसति निर्वाणपदवीम् ॥५२॥*

शिखरिणी

**महासाम्राज्याही तृणसम क्षणीं जे त्यजुनिया**
**जिथें वेत्रांच्या त्या तति डुलति तीरीं वसति या ॥**
**सुधेपेक्षां स्वादू जल पिउनि जैं तृप्त बनती**
**तदा त्या आनंदापुढति जन मोक्षास हंसती ॥ ५२ ॥**

गद्यार्थ—(गंगास्तुति) जे राजे स्वतःच्या मोठ्या राज्याचा तृणवत् त्याग करून, वेतसतरु डुलत आहेत अशा तुझ्या तीराचा आश्रय घेतात, ते अमृताहून मधुर तुझें जल पोटभर पितात, तेव्हांचा त्यांचा आनंद निर्वाणपदाला तुच्छ समजून हसतो ! ●●●

शिखरिणी

*स्मृतं सद्यः स्वान्तं विरचयति शान्तं सकृदपि*
*प्रगीतं यत्पापं झटिति भवतापं च हरति ॥*
*इदं तद् गङ्गेति श्रवणरमणीयं खलु पदं*
*मम प्राणप्रान्ते वदनकमलान्तर्विलसतु ॥ ५३ ॥*

शिखरिणी

**स्मृतीनेंही एका, क्षणि निजमना शांति वितरी**
**जया गातां पापा, त्वरित भवतापासहि हरी ॥**
**अहा 'गंगा ! गंगा !' श्रुतिमधुर हें नाम तव गे**
**मुखीं राहो माझ्या मरणसमयीं, हे त्रिपथगे ! ॥ ५३ ॥**

गद्यार्थ— हे गंगामय्या ! एकदाच स्मरण केल्यानें, जें, मन शांत करतें; गाइलें असतां, जें, पाप व भवताप क्षणात नष्ट करतें, असे, तुझें कर्णमधुर 'गंगा' हें नाम, मरणसमयीं, माझ्या मुखीं राहो ! ●●●

शिखरिणी

*यजन्त्येके देवान्कठिनतरसेवांस्तदपरे*
*वितानव्यासक्ता यमनियमरक्ताः कतिपये ॥*
*अहं तु त्वन्नामस्मरणकृतकामस्त्रिपथगे*
*जगज्जालं जाने जननि तृणजालेन सदृशम् ॥ ५४ ॥*

शिखरिणी

**व्रतें भारी सेवां भजति कुणि देवां; परि कुणी**
**धरी यागीं श्रद्धा; इतर रत इच्छानियमनीं ॥**
**परी मी त्वन्नाम स्मरुनि कृतकर्तव्य बनुनी**
**जगज्जाला साऱ्या गणित तृणजालापरि मनीं ॥ ५४ ॥**

गद्यार्थ— कित्येक लोक, ज्यांची पूजा कठिण अशा देवांना भजतात, दुसरे कुणी यज्ञाच्या मागें लागतात; इतर कुणी, व्रतें, वैकल्य, इंद्रियदमनामागें लागतात. पण हे गंगामाते ! मी मात्र, केवळ, तुझें नाम स्मरत राहून, कृतकृत्य होतों; व सर्व जगाला तृणवत् तुच्छ मानतों. ●●●

शिखरिणी

*पयः पीत्वा मातस्तव सपदि यातः सहचरैः —*
*विमूढैः सरन्तु क्वचिदपि न विश्रान्तिमगमम् ।*
*इदानीमुत्सङ्गे मृदुपवनसञ्चारशिशिरे*
*चिरादुन्निद्रं मां सदयहृदये शायय चिरम् ॥ ५५ ॥*

शिखरिणी

**खुळ्या मित्रांसंगें, तव पय पिऊनी, झडकरी**
**पळें मी खेळाया, नच मिळत शांति क्षणभरी ॥**
**तुझ्या तीरोत्संगीं, जिथ पवन शीतत्व पसरी**
**कधींचा मी जागा—मज सुचिर तूं निद्रित करी ॥५५॥**

गद्यार्थ— हे गंगामाते ! तुझें पयःपान करून घाईघाईनें, मी माझ्या खुळ्या मित्रांसंगें, खेळायला दूर गेलों; पण, मला कुठेंहि विश्रांति लाभली नाहीं. कधींचा मी जागा आहें. आता हे सदयहृदये ! मृदुवायूनें शीतल केलेल्या तुझ्या तीररूपी मांडीवर मला पुष्कळ वेळ झोपव. ●●●

## प्रकरण ३८ वें

## निवृत्ति—शांतिरस.

पृथ्वी

परिभ्रमसि किं वृथा क्वचन चित्त विश्राम्यतां
स्वयं भवति यद्यथा भवति तत्तथा नान्यथा ॥
अतीतमपि न स्मरन्नपि न भावि संकल्पय—
न्नतर्कितगमागमाननुभवस्व भोगानिह ॥ १ ॥

पृथ्वी

**प्रशांत क्षणिं हो मना ! फिरसि कां कुठेंही वृथा ?**
**जसें नियत तें तसेंच घडतें, कधीं नान्यथा ॥**
**गतास विसरी, करी न कधि भावि संकल्प ते**
**अतर्क्यगति येइं जें सहज भोग्य तूं भोग तें ॥ १ ॥**

गद्यार्थ—हे मना ! कां उगाच वाटेल तसें भ्रमत आहेस ? शांत हो ! जें नियत, तें, तसेंच घडावयाचें. अन्यथा होत नाहीं. गेले त्याच्या आठवणी काढीत बसू नको—भावी, त्याचे संकल्प करीत बसू नको. ज्याचें येणें का, व जाणें कां, हें मानवाला कळणें शक्य नाहीं, असे जें काय मोक्तव्य तुला लाभेल, तें तूं निमूटपणें भोग.

●●●

शार्दूलविक्रीडित

मोहं मार्जयतामुपाश्रय रतिं चन्द्रार्धचूडामणौ
चेतः स्वर्गतरङ्गिणीतटभुवामासङ्गमङ्गीकुरु ॥
को वा वीचिषु बुद्बुदेषु च तडिल्लेखासु च स्त्रीषु च
ज्वालाग्रेषु च पन्नगेषु च सरिद्वेगेषु च प्रत्ययः ? ॥ २ ॥

शार्दूलविक्रीडित

**चित्ता ! सोडुनि मोह तूं रति धरी श्रीशंकराचे प्रति,**
**थोडासा तरि वास तूं कर मना ! गंगानदीच्या तटीं ॥**
**लोकीं चंचल वस्तु या—बुडबुडे, स्त्री, सर्प, सौदामिनी**
**लाटा, जाळ, नद्या !—धरील कधि कां विश्वास यांचा कुणी ? ॥ २ ॥**

गद्यार्थ—हे चित्ता ! मोह झाडून टाकून, तूं श्रीशंकराचे ठायीं भक्ति धर; स्वर्गनदी गंगेच्या काठीं, थोडासा तरी वास कर. अरे—पाण्यांचे तरंग, बुडबुडे, विजेचें चमकणें, स्त्रिया, ज्वाला, सर्प, नदीचा वेग या सर्व चंचल वस्तूंचा विश्वास, कुणी धरूं शकेल का ?

●●●

शार्दूलविक्रीडित

रम्याश्चन्द्रमरीचयस्तृणवती रम्या वनान्तस्थली
रम्यः साधुसमागमः शमसुखं, काव्येषु रम्याः कथाः ॥
कोपोपाहितबाष्पबिन्दुतरलं रम्यं प्रियाया मुखं
सर्वं रम्यमनित्यतामुपगते चित्ते न किञ्चित्पुनः ॥ ३ ॥

शार्दूलविक्रीडित

**चंद्राचे कर रम्य ते, हिरवळी त्या रम्य, रानांतल्या !**
**साधूसंगति, रम्य, शांतिहि, कथा त्या रम्य, काव्यांतल्या**
**रागानें रडुनी भिजोनि मुख तें स्त्रीचें दिसे सुंदर !**
**सारें रम्यचि—भंगुरत्व ठसलें चित्तांत ना जोंवर ॥३॥**

गद्यार्थ—चंद्राचीं किरणें रम्य, रानांतल्या 'हरित तृणांच्या मखमाली' रम्य, सज्जनसंगति रम्य, शांतीचें सुख रम्य; काव्यांतल्या कथा रम्य, रागानें रडून अश्रूंनी भिजलेलें प्रियेचें मुखकमलहि रम्य ! हीं सर्व रम्य खरीं. पण कोठवर ? या सर्वांचें क्षणभंगुरत्व चित्तांत ठसलें नाहीं, तोंवर ! ( तें ठसलें कीं रम्यत्व फसलें !)

●●●

शिखरिणी

दुराराध्यः स्वामी, तुरगचलचित्ताः क्षितिभृतो
वयं च स्थूलेच्छाः सुमहति पदे बद्धमनसः ॥
जरा देहं मृत्युर्हरति दयितं जीवनमिदं
सखे ! नान्यच्छ्रेयो जगति विदुषोऽन्यत्र तपसः ॥ ४ ॥

शिखरिणी

**धनी भारी खाष्ट क्षितिप-मन धांवें हयगति !**
**मला इच्छा मोठी 'गुरुपदिं चढावें' म्हणुनि ती ॥**
**जरा देहा, मृत्यु प्रिय मम हरी जीवन असें**
**तपाहूनी सुज्ञा जगिं न दुसरें श्रेयचि दिसे ॥ ४ ॥**

**गद्यार्थ**—मला धनी मिळाला तो खाष्ट, त्याला तुष्ट करणें महाकर्म कठीण ! राजांची सेवा करावी तर त्यांचें मन घोड्याइतकें चंचल ! इकडे माझी तर मोठी इच्छा, की, आपण महत्पदाला चढावें ! पण दुसरीकडून वार्धक्य देहाला (खात आहे) व मृत्यु माझे प्रिय जीवन हरण करण्यास टपला आहे ! तेव्हां हें सर्व सोडून सुज्ञानें तप आचरावें याशिवाय अन्य कांहीं श्रेयस्कर दिसत नाहीं. ●●●

शार्दूलविक्रीडित

*किं कन्दर्प ! वृथा कदर्थयसि मां कोदण्डटङ्कारितैः ?*
*रे रे कोकिल, कोमलं कलरवं किं त्वं वृथा वल्गसे ? ॥*
*मुग्धे, स्निग्धविदग्धमुग्धमधुरैर्लोलैः कटाक्षैरलं !*
*चेतः सम्प्रति चन्द्रचूडचरणध्यानामृते वर्तते ॥ ५ ॥*

शार्दूलविक्रीडित

**टंकारून धनू, कशास मदना ! मातें वृथा पीडिसी ?**
**कां रे कोकिल ! तूं 'कुहू' रव तुझे हे व्यर्थची काढिसी ? ॥**
**मुग्धे ! गोड तुझे कटाक्षहि पुरे, मात्रा न त्यांची इथें**
**ईशाच्या स्मरणामृतांत मन हें आतां पहा डुंबतें ॥ ५ ॥**

**गद्यार्थ**— हे मदना, आपल्या धनुष्याचे टणत्कार करून का मला निष्कारण त्रास देत आहेस ? हे कोकिला, तुझे कोमल 'कुहू' चे स्वर कां व्यर्थ काढीत आहेस ? हे मुग्धे ! तुझे ते प्रेमाचे चातुर्याचे मुग्ध भावाचे मधुर कटाक्ष टाकणें आता पुरे कर. ( त्यांची आता माझ्यावर कांहीं मात्रा चालणार नाहीं. कारण ) माझें मन आतां श्रीशंकराच्या ध्यानामृतात यथेच्छ डुंबत आहे ! ●●●

शिखरिणी

*यदाऽऽसीदज्ञानं स्मरतिमिरसञ्चारजनितं*
*तदा सर्वं नारीमयमिदमशेषं जगदभूत् ॥*
*इदानीमस्माकं पटुतरविवेकाञ्जनदृशां*
*समीभूता दृष्टिस्त्रिभुवनमपि ब्रह्म मनुते ॥ ६ ॥*

शिखरिणी

**स्मराच्या अंधारें जनित जधिं अज्ञान वसतें**
**तदा वाटे सारें जगहि जणुं नारीमयचि तें ॥**
**समा होई दृष्टी पडुनि सुविवेकांजन जधीं**
**त्रिलोका आतां मी अखिल समजें ब्रह्मचि तधीं ६**

**गद्यार्थ**—मदनाच्या अंधारानें उत्पन्न केलेलें अज्ञान, जोंवर, मनांत वसत होतें, तोंवर सर्व जग मला स्त्रीमय वाटत होतें ! पण आतां मुझ विवेकाचें चरचरीत अंजन पडून, माझी दृष्टि सम झाल्यामुळें, सर्व त्रिभुवन मला ब्रह्मस्वरूप वाटत आहे. ●●●

शार्दूलविक्रीडित

*मातर्लक्ष्मि ! भजस्व कञ्चिदपरं मत्काङ्क्षिणी मा स्म भूः—*
*भोगेभ्यः स्पृहयालवो न हि वयं, का निःस्पृहाणामसि ? ॥*
*सद्यः स्यूतपलाशपत्रपुटके पात्रे, पवित्रीकृते*
*भिक्षासक्तुभिरेव सम्प्रति वयं, वृत्तिं समीहामहे ॥ ७ ॥*

शार्दूलविक्रीडित

**माते लक्ष्मि ! दुज्या कुणास भज तू ! इच्छा न माझी धरी !**
**भोगेच्छा नुरलीच; निःस्पृह मला**
**पर्वा तुझी कां तरी ? ॥**
**भिक्षाप्राप्तचि सक्तु, पूत करुनी द्रोणीं पलाशाचिया**
**खावोनी जगणें अशीच उरली इच्छा मनीं माझिया ॥ ७ ॥**

**गद्यार्थ**—हे माते लक्ष्मि ! आता तू दुसऱ्या कोणाला तरी नादीं लाव ! मला लावू नको ! आता मला भोगाची लालुच राहिली नाहीं. मग निःस्पृहांना तुझी पर्वा काय ? भिक्षा मागून सातू आणावे, पळसाची पानें टाचून त्याच्या द्रोणात ते घेऊन ( परमेश्वराला नैवेद्य दाखवून ) ते पवित्र करावे, व, त्यांच्यावर जगावें, एवढीच, मला इच्छा राहिली आहे. ●●●

शार्दूलविक्रीडित

*धन्यानां गिरिकन्दरेषु वसतां ज्योतिः परं ध्यायता—*
*मानन्दाश्रुकणान्पिबन्ति शकुना निःशङ्कमङ्केशयाः ॥*
*अस्माकं तु मनोरथोपरचितप्रासादवापीतट—*
*क्रीडाकाननकेलिकौतुकजुषामायुः परं क्षीयते ॥ ८ ॥*

शार्दूलविक्रीडित

**ब्रह्मध्यानिं गुहांत धन्य वसती; अंकीं तयांच्या अहा !**
**आनंदाश्रु पिती शकुंत बसुनी निःशंकचित्तें पहा ॥**
**आम्हीं मात्र मनोरथीं उठवितों प्रासाद ! वापीतटें !**
**क्रीडोद्यान !...मनांत खात मनिंचे मांडे-सरे आयु तें ८**

**गद्यार्थ**— जे धन्य मानव आहेत ते गिरिकन्दरांतून राहतात; व ब्रह्मरूपी ज्योतीचें ध्यान करीत, इतके तन्मय होऊन परमानंद पावतात, कीं त्यांच्या डोळ्यांतून घळघळ आनंदाश्रु

वाहत येऊन त्यांच्या मांडीवर टपटप पडतात, व ते, शकुंतपक्षी येऊन, निर्भयपणें खुशाल त्यांच्या मांडीवर बसून पितात!

आणि आम्ही क्षुद्र जंतु! केवळ मनोरथांतच प्रासाद, विहीर-भोंवतीं क्रीडोद्यान—उठवितों व त्याच्यांतच रममाण होऊन, असले मनचे मांडे मनांत खात, आमचें महान् आयुष्य संपून जात आहे! (आणि त्याची आम्हाला काडीची खंत नाहीं!) ●●●

मन्दाक्रान्ता

ये वर्धन्ते धनपतिपुरः प्रार्थनादुःखभाजो
ये चाल्पत्वं दधति विषयाक्षेपपर्यस्तबुद्धेः ॥
तेषामन्तःस्फुरितहसितं वासराणां स्मरेयं
ध्यानच्छेदे शिखरिकुहरग्रावशय्यानिषण्णः ॥ ९ ॥

मन्दाक्रान्ता

दुःखें, श्रीशांपुढतिं, दिन जे प्रार्थितां दीर्घ झाले
होतां बुद्धी विकृत विषयें वाटले अल्प सारे ॥
गेले; त्यांचें स्मरण करुनी हांसतों मी मनांत
ध्यानांध्यानांमधुनि वसतां मी शिलान्तीं गुहेंत ॥ ९ ॥

गद्यार्थ—श्रीमंताच्यापुढें भीक मागत राहण्याच्या दुःखामुळें, जे दिवस लांबच लांब वाटले; आणि, विषयांनी विकृत केल्यामुळे व मन त्यात गर्क झाल्यामुळे, जे दिवस अगदीं लहान झाल्यासारखे भासले, त्या सर्वांची आठवण, एक ध्यान संपून दुसरें ध्यान लावण्याच्या मध्यंतरात—या गुहेंत शिलाशय्येवर मी बसलें असता, मला झाली, कीं, आतून मला हास्याची उकळी फुटते (कीं एकवेळ मी केवढा मूर्ख होतों!) ●●●

वसंततिलका

रे रे मनो मम मनोभवशासनस्य
पादाम्बुजद्वयमनारतमामनन्तम् ॥
किं मां निपातयसि संसृतिगर्तमध्ये
नैतावता तव गमिष्यति पुत्रशोकः ॥ १० ॥

वसंततिलका

माझ्या मना! मनसिजान्तक शंकराचें
मीं ध्यातसें सुपदपंकज तें सदाचें ॥
कां पाडिसी मज पुन्हां भवसागरांत
ना पुत्रशोक तव तेंहि करील शांत! ॥ १० ॥

गद्यार्थ— (मदन हा मनसिज म्हणजे मनात जन्मणारा= मनाचा पुत्र.) हे माझ्या मना! मदनाला जाळणाऱ्या श्रीशंकराच्या पदकमलद्वयाचें, संतत ध्यान करणाऱ्या मला, कां पुन्हां संसाराच्या खड्डयांत पाडीत आहेस! त्यामुळे तुझा पुत्रशोक (मदन मेल्याबद्दलचा) कांहीं शांत होणार नाहीं! (कारण मदन माझ्यापुरता तरी मेला—तो पुन्हां आतां जिवंत होत नाहीं.) ●●●

अनुष्टुप्

एकाकी निःस्पृहः शान्तः पाणिपात्रो दिगम्बरः ।
कदा शम्भो! भविष्यामि कर्मनिर्मूलनक्षमः ? ॥ ११

आर्या

कर पात्र करुनि, निःस्पृह, शांत असा एकला, कधीं, नग्न।
होइन समर्थ शंभो! कर्मफला उपटण्या मुळांतून ॥ ११ ॥

गद्यार्थ—एकटा, निःस्पृह, शांत, हाताचेंच भिक्षापात्र केलेला, (जवळजवळ) नग्न (वस्त्राची क्षिति नसलेला) असा मी, हे शंकरा! कर्माच्या परिणामांना समूळ उपटून नष्ट करण्यास केव्हां समर्थ होईन? (अशी ओढ लागली आहे.) ●●●

शार्दूलविक्रीडित

पाणिं पात्रयतां, निसर्गशुचिना भैक्ष्येण संतुष्यतां
यत्र क्वापि निषीदतां बहुतृणं विश्वं मुहुः पश्यताम् ॥
अत्यागेऽपि तनोरखण्डपरमानन्दावबोधस्पृहां
मर्त्यः कोऽपि शिवप्रसादसुलभां सम्पत्स्यते योगिनाम् ॥ १२

शार्दूलविक्रीडित

भिक्षा, पात्रकरीं स्वयंशुचि मिळे, त्यानेंच जे तोषती
कोठेंही वसती, तृणासम उभ्या विश्वास जे पाहती ॥
त्या योग्यांतिल, याचदेहिं, परमानंदावबोधस्पृहा
मर्त्याला विरळाच ती शिवकृपें लाभे कुणाला पहा ॥ १२ ॥

गद्यार्थ—हाताच्या केलेल्या भिक्षापात्रांत, पवित्र अशी जी काय भिक्षा पडेल तिच्यातच संतोष मानणाऱ्या, कुठेंहि पडावें बसावें, अशा वृत्तीच्या, विश्वाला तृणवत् मानणाऱ्या, योगीजनांच्या हृदयात जी असते तशी परमानंद जाणण्याची तळमळ, याच देहीं (याच डोळा) शंकराच्या कृपेनें प्राप्त होणारी, विरळाच कुण्या (भाग्यशाली) मर्त्याला लाभत असते. ●●●

शिखरिणी

परेषां चेतांसि प्रतिदिवसमाराध्य बहुधा
प्रसादं किं नेतुं विशसि हृदय क्लेशकलिलम् ? ॥
प्रसन्ने त्वय्यन्तः स्वयमुदितचिन्तामणिगुणे
विमुक्तः संकल्पः किमभिलषितं पुष्यति न ते ? ॥ १३ ॥

आर्या

दुसऱ्यांच्या चित्तांतें,
अनुदिन अनुनय करीत बहुरीतीं।
करण्या प्रसन्न, झटतां,
हृदया! कां कष्ट करिसि तूंच अती॥
तूंचि प्रसन्न होतां,
चिन्तामणिगुण तुझे प्रकट बनुन।
मोक्ष विचारें, ईप्सित
तव काय न तेच करिति परिपूर्ण?॥ १३॥

गद्यार्थ— हे माझ्या हृदया, नाना तऱ्हांनीं आराधना करून दुसऱ्याच्या चित्ताना प्रसन्न करण्यास्तव तूं काय म्हणून क्लेशाच्या जंजाळात पडत आहेस? आधी तूच स्वतः प्रसन्न होऊन त्यामुळें तुझ्यांतले अंगभूत असलेले चिन्तामणिसारखे (जें चिन्तावें ते देणारे) गुण एकदां प्रकट झाले, आणि तुझे विचार मुक्तीच्या मार्गी चालू झाले की, काय असेल नसेल ते तुझे सारें अभीप्सित तेच पूर्ण करून टाकणार नाहींत काय? ●●●

शार्दूलविक्रीडित

चेतश्चिन्तय मा रमां सकृदिमामस्थायिनीमास्थया
भूपालभ्रुकुटीकुटीरविहरव्यापारपण्याङ्गनाम्॥
कन्थाकञ्चुकिताः प्रविश्य भवनद्वाराणि वाराणसी–
रथ्यापङ्क्तिषु पाणिपात्रपतिता भिक्षामपेक्षामहे॥ १४॥

शार्दूलविक्रीडित

लक्ष्मी चंचल; तूं तिला न भजणें प्रेमें कधींही मना!
भूतालावर नाचते नृपतिच्या ती क्षुद्र वेश्यांगना॥
चिंध्या पांघरुनी, शिरून भवनद्वारांत, काशीपुरीं
इच्छूं पात्रकरीं पडेल तितुकी भिक्षाच मार्गांतरीं॥१४॥

गद्यार्थ— हे मना, या चंचल लक्ष्मीचा एकवारसुद्धा तूं विचार करूं नकोस कारण ही नृपाच्या (श्रीमंताच्या) भ्रुकुटीच्या तालावर नाचणारी वेश्याच आहे. चिंध्या नेसून, हाताची ओंजळ हीच भिक्षापात्र करून, काशीक्षेत्रामध्यें, रस्त्यारस्त्यातून, मोठमोठ्या वाड्यात शिरून, जी मिळेल ती भिक्षा घेऊन, निर्वाह करावयाचीच केवळ, अपेक्षा आम्ही धरीत आहों. ●●●

वसंततिलका

तस्मादनन्तमजरं परमं विकासि
तद् ब्रह्म चिन्तय किमेभिरसद्विकल्पैः!॥
यस्यानुषङ्गिण इमे भुवनाधिपत्य–
भोगादयः कृपणलोकमता भवन्ति॥ १५॥

शार्दूलविक्रीडित

तेव्हां, उच्च, अनंत ज्यास न जरा, नित्यप्रकाशी असें
चिंती ब्रह्मचि तें, कुकल्प धरिशी चित्तीं कशाला असे?
ज्याचे सर्वहि आनुषंगिक असे पृथ्वीपतित्वादिक
क्षुद्रां आवडतात जे बहुपरी ते भोग, तें तें सुख॥१५॥

गद्यार्थ—तेव्हां, हे नरा! सर्वोच्च, अनंत, ज्याला वार्धक्य नाहीं, जें नित्यप्रकाशी आहे त्या ब्रह्माचेंच तू चिंतन कर. हे भलतेसलते इतर विकल्प कशाला मनात आणतोस? कारण भुवनाचें राज्य आदि क्षुद्रांना आवडणारे जे अनेकविध भोग ते सर्व त्या ब्रह्मापाठोपाठ आपोआप येणारे होत. ●●●

शार्दूलविक्रीडित

किं वेदैः स्मृतिभिः पुराणपठनैः शास्त्रैर्महाविस्तरैः
स्वर्गग्रामकुटीनिवासफलदैः कर्मक्रियाविभ्रमैः॥
मुक्त्वैकं भवदुःखभाररचनाविध्वंसकालानलं
स्वात्मानन्दपदप्रवेशकलनं, शेषा वणिग्वृत्तयः॥ १६॥

शार्दूलविक्रीडित

शास्त्रें, वेद, पुराण, त्या स्मृति अशीं सारीं कशाला हवीं?
देतीं स्वर्गनिवास हें फल, अशीं कर्में कशाला हवीं?।
संसारांतिल दुःख नष्ट करण्या कालाग्निसा जो सजे
स्वात्मानंदद मार्ग तो वगळितां वाणिज्य सारें दुजें १६

गद्यार्थ—वेद, स्मृति पुराणाचें पठन, शास्त्राचे (टीकादि) विस्तार याचा काय उपयोग आहे? किंवा स्वर्गातील एखाद्या गावातील झोपडींत राहणें हे फल देणारें नानाविध कर्मकांड तरी कशाला हवें? संसारदुःखाचा कालाग्नीप्रमाणें नाश करणारा स्वात्मानंद पदाची प्राप्ति करून मार्ग एक सोडला तर इतर सर्व वाणिज्य (म्हणजे किंमत द्यावी व वस्तु विकत घ्यावी असा व्यापारच) होय. ●●●

वंशस्थ

महेश्वरे वा जगतामधीश्वरे जनार्दने वा जगदन्तरात्मनि।
न वस्तुभेदप्रतिपत्तिरस्ति मे तथापि भक्तिस्तरुणेन्दुशेखरे १७

उपजाति

विश्वेश पेशा शिव शंकरांत
आत्मा जगाचा असल्या हरींत॥
जाणे न मी भेद मुळींच कांहीं
परंतु मी भक्ति शिवास वाहीं॥ १७॥

गद्यार्थ—जगतांचा ईश्वर अशा महेश्वर शंकरांत, किंवा जगाचा अंतरात्मा अशा विष्णूत मी मूलभूत कांहीं भेद आहे असें मानीत नाहीं. तरीपण श्रीशंकराविषयींच मला (विशेष) भक्ति वाटते.

शिखरिणी

स्फुरत्स्फारज्योत्स्नाधवलिततले क्वापि पुलिने
सुखासीनाः शान्तध्वनिषु रजनीषु द्युसरितः ॥
भवाभोगोद्विग्नाः शिव शिव शिवेत्यार्तवचसः
कदा स्यामानन्दोद्गमबहुलबाष्पाकुलदृशः ? ॥ १८ ॥

शिखरिणी

सुखानें कोठेंही, ध्वनिरहित रात्रींत वसुनी—
तटीं स्वर्गंगेच्या धवलपुलिनीं चंद्रकिरणीं ॥
विटोनी संसारा 'शिव शिव' अशा आर्त वचनीं
कधीं आनंदाश्रू भरुनि मम येतील नयनीं ? ॥ १९ ॥

गद्यार्थ—झगझगीत चांदण्यानें शुभ्रमय करून टाकलेल्या गंगेच्या किनाऱ्यावरील वाळूत कुठेंतरी, नीरव शांत अशा रात्रीं बसून, संसाराला विटून शिव शिव असे आर्त उद्गार काढीत, माझ्या नेत्रांत आनंदाश्रु केव्हां दाटून येतील ? (त्या दिवसाची मी आतुरतेनें वाट पाहात आहें.)

स्रग्धरा

स्नात्वा गाङ्गैः पयोभिः शुचिकुसुमफलैरर्चयित्वा विभो ! त्वां
ध्येये ध्यानं निवेश्य क्षितिधरकुहरग्रावशय्यानिषण्णः ॥
आत्मारामोऽफलाशी गुरुवचनरतस्त्वत्प्रसादात्स्मरारे !
दुःखं मोक्ष्ये कदाऽहं समकरचरणे पुंसि सेवासमुत्थम् ?॥१९॥

स्रग्धरा

गंगास्नाना करोनी, शुभकुसुमफलें ईश ! तूतें पुजून
ध्येयीं ध्याना धरोनी, गिरिकुहरिं शिलापृष्ठभागीं वसून ॥
संतुष्टात्मा, अकामी, रत गुरुवचनीं, तूंच होतां प्रसन्न !
दुःखें जीं नीचसेवाजनित, वद कधीं त्यांतुनी मी सुटेन ? ॥१९॥

गद्यार्थ— गंगेच्या जळानें स्नान करून; पवित्र पुष्पफळांनीं, हे शंकरा ! तुझी पूजा करून, ध्येयाचे ठायीं एकाग्र चित्त करून, डोंगराच्या गुहेंत शिलाशय्येवर बसून, स्वात्म्यांत तुष्ट, निष्काम वृत्तीनें, गुरुवचनरत असा मी, हे मदनारिपो ! तुझ्या इच्छेनें, माझ्यासारख्या हातापायाच्या (म्हणजे माझ्याइतपतच निकृष्ट स्थितींतल्या) माणसाच्या सेवेपासून झालेल्या दुःखांतून मी कधीं बरें मुक्त होईन ?

शिखरिणी

मही रम्या शय्या विपुलमुपधानं भुजलता
वितानं चाकाशं व्यजनमनुकूलोऽयमनिलः ॥
स्फुरद्दीपश्चन्द्रो विरतिवनितासङ्गमुदितः
सुखं शान्तः शेते मुनिरतनुभूतिर्नृप इव ॥ २० ॥

शार्दूलविक्रीडित

*शय्या रम्य मही; विशाल उपले बाहू उशी योजुन*
हें आकाशचि चांदवा, मृदु असा वायू बने विंझण ॥
चंद्राचा झळके दिवा; विरति या स्त्रीच्या सुखालिंगनीं
राजा वैभवयुक्त तो जणुं सुखें शांतींत झोपे मुनि ॥ २९ ॥

गद्यार्थ—भुई हीच सुंदर शय्या; मोठे बाहु हीच उशी; आकाश हाच चांदवा, झुळझुळ वारा हा पंखा, चंद्र हाच झगझगीत दिवा योजून वैराग्यवृत्तिरूपी स्त्रीच्या आलिंगनानें आनंदित झालेला असा हा मुनि एखाद्या वैभवशाली नृपाप्रमाणें शांत सुखानें झोपला आहे.

शार्दूलविक्रीडित

कौपीनं शतखण्डजर्जरतरं कन्था पुनस्तादृशी
नैश्चिन्त्यान्निरपेक्षभैक्ष्यमशनं निद्रा श्मशाने वने ॥
स्वातंत्र्येण निरङ्कुशं विहरणं स्वान्तं प्रशान्तं सदा
स्थैर्यं योगमहोत्सवेऽपि च यदि त्रैलोक्यराज्येन किम् ? २१

शार्दूलविक्रीडित

चिंध्या शंभर, जीर्ण वस्त्र ततुलें, कंथा तशी लेवुनी
भिक्षा—जी निरपेक्ष ये करिं सुखें, निद्रा स्मशानीं वनीं ॥
स्वच्छंदें फिरणें, प्रशांत मन ही, सुस्थैर्य योगोत्सवीं
हें ज्या लाभतसे, कशास मग त्या त्रैलोक्यराज्यें हवीं ? ॥ २१ ॥

गद्यार्थ—शंभर तुकड्यांचीं जीर्ण वस्त्र, तसलीच कफनी, निरपेक्ष विनायास मिळणारी भिक्षा हें अन्न; स्मशानांत रानांत झोंपणें, स्वच्छंदें वाटेल तेथें फिरणें, प्रशांत मन; योगसमाधि असो कीं महोत्सवाचा प्रसंग असो दोन्ही प्रसंगीं स्थिर वृत्ति.—इतकें सर्व असल्यावर, त्रिलोकाचें राज्य ही किस झाडची पत्ती ?

मन्दाक्रान्ता

गंगातीरे हिमगिरिशिलाबध्दपद्मासनस्य
ब्रह्मध्यानाभ्यसनविधिना योगनिद्रां गतस्य ॥
किं तैर्भाव्यं मम सुदिवसैर्येषु ते निर्विशङ्काः
कण्डूयन्ते जरठहरिणाः शृङ्गमङ्गे मदीये ॥ २२ ॥

सुमदारमाला

हिमाद्रींत गंगातटीं पृष्ठभागीं
शिलांच्याच, घालून पद्मासन ॥
मनीं ब्रह्म चिंतीत, अभ्यासयोगें
अहा! योगनिद्रेंत मी जाउन ॥
हरावी स्वकंडू न भीतां मृगांनीं
स्वशृंगें मदंगावरी घांसुन ॥
मला लागली ओढ कीं शीघ्र ऐसे
कधीं धन्य जातील माझे दिन? ॥ २२ ॥

गद्यार्थ—हिमालयात, गंगेच्या काठीं, शिलासनावर पद्मासन घालून ब्रह्मध्यान करण्याच्या सरावानें मला अशी गाढ योगनिद्रा लागावी कीं प्रौढ हरिणानीं, न भितां निःशंकपणे आपलीं शिंगें खुशाल माझ्या अंगावर घासून आपली कंड शमवावी. अहाहा! असे धन्य दिवस मला ( कधींकाळीं ) प्राप्त होतील का? ●●●

शार्दूलविक्रीडित

चाण्डाल किमयं द्विजातिरथवा शूद्रोऽथ किं तापसः
किं वा तत्त्वविवेकपेशलमतिर्योगीश्वरः कोऽपि वा ॥
इत्युत्पन्नविकल्पजल्पमुखरैः संभाष्यमाणा जनैः—
र्न क्रुद्धाः पथि नैव तुष्टमनसो यान्ति स्वयं योगिनः ॥२३॥

शार्दूलविक्रीडित

हा चाण्डालचि शूद्र कीं द्विज कुणी किंवा तपस्वी च हा?
किंवा तत्त्वविवेकपंडित असा योगीश कीं काय हा?
ऐसे तर्कवितर्क लोक वदतां उद्देशुनी त्यां पथीं
तेणें क्रुद्ध न वा न तुष्ट बनतां योगी पुढे चालती ॥२३॥

गद्यार्थ—"हा काय हल्क्या जातीचा, कीं ब्राह्मण, कीं, शूद्र किंवा बैरागी, कीं तत्त्वज्ञानात प्रवीण असा कोणी महायोगी असावा?" असे अनेक तर्कवितर्क याला उद्देशून, लोक रस्त्यात आपसात बोलतात, त्याबद्दल न रागावता, किंवा, आनंद न वाटता योगी आपले मुकाट मार्गानें जात असतात. ●●●

शिखरिणी

अतिक्रान्तः कालो ललितललनाभोगसुखदो
भ्रमन्तः श्रान्ताः स्म सुचिरमिह संसारसरणौ ॥
इदानीं स्वःसिन्धोस्तटभुवि समाक्रन्दनगिरः
सुतारैः फूत्कारैः शिव शिव शिवेति प्रतनुमः ॥ २४ ॥

शिखरिणी

स्त्रियांच्या भोगानें सुखकर, असा काल सुरला
भ्रमोनी संसारीं सुचिर, अमुचा देह थकला ॥
अतां गंगातीरीं; स्वर निज अती उंच धरुनी
असूं आक्रंदोनी 'शिव! शिव!' अशा आर्त वचनीं ॥२४॥

गद्यार्थ—सुंदर ललनाचा उपभोग घेत होतों तो काल निघून गेला; संसाराच्या मार्गावरून फार काळ भटकून भटकून जीव दमून गेला आहे. आता गंगाकिनारीं उच्चस्वरानें "शिव! शिव! शिव" असा आर्त आक्रोश करीत ( दिवस कंठीत ) आहों. ●●●

अनुष्टुभ्

सहवर्धितयोर्नास्ति सम्बन्धः प्राणकाययोः ।
पुत्रमित्रकलत्रेषु सम्बन्धित्वकथैव का? ॥ २५ ॥

आर्या

संबंध प्राण तनू यांत न, तीं सहचि वाढलीं असतां।
पत्नी सुत मित्रांच्या संबंधाची कशास हो वार्ता? ॥२५॥

गद्यार्थ—प्रत्यक्ष प्राण आणि देह हे इतके ( एकजीवपणें ) एकत्र वाढले असताना सुद्धा त्यांचा ( मृत्यूनंतर ) संबंध उरत नाहीं तर माणसाचे पुत्र, मित्र, पत्नी यांच्याशीं जे संबंध, त्याची गोष्टच कशाला? ( ते चिरकाल तर नव्हेच पण प्राण व देह, यांच्या संबंधाइतके म्हणजे माणसाच्या आयुष्याइतके तरी दीर्घकाळ कुठून टिकणार? ) ●●●

अनुष्टुभ्

विषस्य विषयाणां च दूरमत्यन्तमन्तरम् ॥
उपभुक्तं विषं हन्ति विषयाः स्मरणादपि ॥ २६ ॥

अनुष्टुभ्

आहे अंतर अत्यंत विषांत विषयांतही।
वधी विष जधीं भुक्त; विषय स्मृतमात्रही ॥२६॥

गद्यार्थ—विष आणि विषय ( अक्षरांत जें साम्य असलें तरी प्रत्यक्षांत ) यांत फार मोठें अंतर आहे. विष हें प्रत्यक्ष तें खालें तरच मारील पण विषय हे नुसतें त्यांचें चिन्तन केल्यानेंसुद्धां माणसाचा नाश करतात. ●●●

(हाच श्लोक प्र. ४९–६० क्रमांकांत रथोद्धतेंत भाषांतरला आहे.)

वसंततिलका

मुण्डं शिरो वदनमेतदनिष्टगन्धं
गात्रं मलेन मलिनं गतसर्वशोभम् ॥
भिक्षाटनेन भरणं च हतोदरस्य
कष्टं तथापि मनसो मदनेऽस्ति वाञ्छा ॥ २७ ॥

वसंततिलका

दुर्गंधयुक्त मुख, मस्तक मुंडिलेलें,
सर्वांग घाण नि विशोभित जाहलेलें ॥
हें दुष्ट पोट भरणें जळलें भिकेनें
कामार्थ ओढ तरि हाय! कशी मनानें ॥ २७ ॥

गद्यार्थ—डोक्यावर केस राहिला नाहीं; तोंडाला दुर्गंधि येत आहे, सर्वांग मलिन होऊन सर्व सौंदर्य नष्ट झालें आहे; पोटाची जळली खांच भरावयाची तीहि भिक्षान्नानें! तरी हायहाय! मनाला कामोपभोगांची ओढ कायमच आहे! ●●●

आर्या

यदि धनिनः सत्पुरुषाः यदि च सुरूपाणि परकलत्राणि
अनुपचितसुकृतसङ्ग्रह तव हृदय! किमाकुलीभावः? ॥२८॥

आर्या

असले सज्जन धनवान्,
असल्या सुंदर तशाच परनारी।
पुण्य न संचित करितां,
हृदया! आकुल कशास होसि तरी? ॥ २८ ॥

गद्यार्थ—सज्जन हे ( त्याच्या पूर्व पुण्याईनें ) श्रीमंत झाले, आणि परक्यांच्या स्त्रिया ( त्या पुरुषांच्या भाग्यानें ) सुदर असल्या तरी, हे माझ्या मना! तूं स्वतां जर पुण्याचा संचय केलेला नाहींस तर ( त्यांच्या मत्सरानें ) तूं का उगाच व्याकुळ होतेंस? ( संपत्ति व सौंदर्य पूर्वपुण्याशिवाय तुला कोठून मिळणार?) ●●●

# प्रकरण ३९ वें

## सुख दुःख

शिखरिणी

तृषा शुष्यत्यास्ये पिबति सलिलं स्वादु सुरभि
क्षुधार्तः सन् शालीन् कवलयति शाकादिवलितान् ।।
प्रदीप्ते कामाग्नौ सुदृढतरमाश्लिष्यति वधून्
*प्रतीकारं व्याधेः सुखमिति विपर्यस्यति जनः ।। १ ।।*

शिखरिणी

**सुगंधि स्वादू तो जल पिउनिया शोष हरतो**
**भुकेसाठीं अन्न प्रचुररस पोटांत भरतो ।।**
**जळे कामाग्नी तें हृदयिं तरुणी घट्ट धरितो**
**उपायां व्याधीच्या, चुकुनि जन यां सौख्य म्हणतो ।।१।।**

गद्यार्थ—तहानेनें तोंड सुकलें कीं गोड सुगंधी जल पिऊन, मनुष्य आपला शोष शमवितो. भुकेनें व्याकुळ झाला, कीं, नाना मधुररसाचीं खाद्यें खाऊन भुकेचें दुःख हरण करतो; कामाग्नि भडकला कीं तरुणीला गाढ आलिंगन देऊन तो शांत करतो! अशा तऱ्हेनें दुःख झालें, व्याधि झाल्या, तर त्या शमविण्याचे हे जे उपाय त्याला लोक चुकून सुख म्हणतात, (पण खरें पाहतां सुखाला स्वतंत्र अस्तित्व आहे. दुःखपरिहार हें नकारात्मक असल्यानें खरें सुख नव्हे!) ●●●

वंशस्थ

सुखं हि दुःखान्यनुभूय शोभते
घनान्धकारेष्विव दीपदर्शनम् ।।
सुखात्तु यो याति नरो दरिद्रतां
धृत शरीरेण मृतः स जीवति ।। २ ।।

उपजाति

**भोगून दुःखें, सुख शोभतें तसें**
**गाढान्धकारीं दिसणें दिवा जसें ।।**
**सुखांतुनी जाइ दरिद्रतेप्रत**
**जगे तरी हो नर तो खरा मृत ।।२।।**

गद्यार्थ—दाट अंधारांत, (पुष्कळवेळ चाचपडल्यानतर,) जसा दिवा दिसावा, तसे, आधीं दुःखें भोगल्यानतर जें सुख मिळतें त्यात विशेष शोभा आहे. पण, आधीं सुखं भोगून, नतर, ज्याला दारिद्य येतें तो मनुष्य जिवत असला तरी वास्तविक मृतच आहे! ●●●

उपजाति

सुभाषितहीन जनेन सार्धं संभाषणं सुप्रभुसेवनं च ।।
आलिङ्गनं तुङ्गपयोधराणां प्रत्यक्षसौख्यं त्रयमेव लोके ।।३।।

उपजाति

**सुभाषितज्ञासह बोलणें हें**
**भल्या धन्यातें नित सेवणें हें ।।**
**आलिंगिणें स्त्रीकुच पुष्ट उंच**
**प्रत्यक्षसौख्यें जगिं तीन हींच ।। ३ ।।**

गद्यार्थ—सुभाषिताच्या ज्ञात्या माणसाशीं संभाषणाची संधि लाभणें, भल्या अशा धन्याची सेवा करणें, मदमत्त तरुणींचें स्तनालिंगन लाभणें ही तीनच काय तीं प्रत्यक्ष सौख्यें या जगात आहेत! ●●●

अनुष्टुभ्

दिनमेकं शशी पूर्णः क्षीणस्तु बहुवासरान् ।।
सुखाद्दुःखं सुराणाप्यधिकं, का कथा नृणाम् ? ।।४।।

उपजाति

**पक्षामधें चंद्र दिनैक पूर्ण**
**चौदा परी वासर तोच क्षीण ।।**
**सुखाहुनी पुष्कळ दुःख हेंची**
**देवांसही; काय कथा नरांची ! ४**

गद्यार्थ—पंधरवड्यामध्ये केवळ एक दिवस चंद्र पूर्ण असतो,

वाकीचे चौदा दिवस क्षीणच असतो. देवानाहि सुखापेक्षां दुःखच अधिक असतें; तर माणसाची कथा काय ? ●●●

अनुष्टुभ्

लोभमूलानि पापानि व्याधयो रसमूलकाः ।
स्नेहमूलानि दुःखानि त्रयं त्यक्त्वा सुखी भवेत् ॥५॥

वसंततिलका

लोभामुळेंच जन पाप जगीं करीती
चाखून षड्‌रसचि रोग तनूस होती ॥
स्नेहामुळेंच मनिं दुःखहि जन्म घेई
सोडून तीनहि, सुखी नर नित्य होई ॥ ५ ॥

गद्यार्थ— लोभापायीं मनुष्य पाप करतो : विविध रसाच्या (अति) सेवनानेंच रोग उत्पन्न होतात; प्रेमापायीं, मैत्रीपायीं माणसाला दुःख करण्याची पाळी येते ! हीं तिन्ही सोडून देणारा सुखी होतो ! ●●●

अनुष्टुभ्

इच्छोदयो यथा दुःखमिच्छाशान्तिर्यथा सुखम् ।
तथा न नरके नापि ब्रह्मलोकेऽनुभूयते ॥ ६ ॥

अनुष्टुभ्

इच्छा होण्यांत जें दुःख। इच्छातृप्तींत जें सुख ।
नरकीं ब्रह्मलोकीं तें। तैसें कांहीं न लाभतें ॥ ६ ॥

गद्यार्थ— इच्छा, हाव मनात उत्पन्न होणे ( व ती अतृप्त राहणें ) यात जें दुःख आहे, तसें भयकर दुःख नरकातसुद्धा नाहीं. आणि इच्छा मनोरथ वगैरे तृप्त होण्यात जें सुख, आहे, तसें ब्रह्मलोकातहि नाहीं. ●●●

अनुष्टुभ्

सर्वं परवशं दुःखं सर्वमात्मवशं सुखम् ।
एतद्विद्यात्समासेन लक्षणं सुखदुःखयोः ॥ ७ ॥

अनुष्टुभ्

जें पराधीन तें दुःख। सर्व स्वाधीन तें सुख ।
थोडक्यांतचि हें जाण। दुःख वा सुख लक्षण ॥७॥

गद्यार्थ— जें परक्याच्या ( बाह्य वस्तूंच्या ) स्वाधीन तें सर्व दुःख ; जें जें स्वतःच्या अधीन तें तें सर्व सुख; हें थोडक्यांत दुःखाचें व सुखाचें स्वरूप जाणावें ! ●●●

अनुष्टुभ्

सुखमात्यन्तिकं यत्तद् बुद्धिग्राह्यमतीन्द्रियम् ॥ ८ ॥

अनुष्टुभ्

सर्वोच्च सुख हें बुद्धिग्राह्य, गम्य न इंद्रियां ॥८॥

गद्यार्थ— सर्वोच्च सुख हें बुद्धीलाच केवळ ग्रहण करतां येतें. तें इंद्रियांच्या ग्रहणशक्तीच्या पलीकडे असतें. ●●●

अनुष्टुभ्

सुखमेव हि दुःखान्तं कदाचिद्दुःखतः सुखम् ।
तस्मादेतद्द्वयं जह्याद्य इच्छेच्छाश्वतं सुखम् ॥ ९

अनुष्टुभ्

कधीं सुखहि दुःखान्त दुःखांतुनि निघे सुख।
सोडावीं हीं तयें दोन्ही इच्छी शाश्वत जो सुख ॥९॥

गद्यार्थ— कधीं सुख हेच दुःखाला कारणीभूत होतें कधीं दुःखांतून सुख निघतें. तेव्हा शाश्वत सुख इच्छिणाऱ्यानें हीं दोन्ही सोडून द्यावींत. ●●●

# प्रकरण ४० वें

## शील

अनुष्टुभ्

शीलेन हि त्रयो लोका शक्या जेतुं न संशय ।
न हि किञ्चिदसाध्यं वै लोके शीलवतां भवेत् ॥१॥

अनुष्टुभ्

निश्चयें, शक्य शीलानें जिंकणें लोक तीनही ।
शीलवंतास काहींही असाध्यच नसे मही ॥१॥

गद्यार्थ—यांत काहींच संशय नाहीं, कीं, शीलानें तिन्ही लोक जिंकणें शक्य आहे शीलवंताला या लोकीं असाध्य असें काहीं नाहीं ●●●

शिखरिणि

वरं तुङ्गाच्छृङ्गाद्गुरुशिखरिणः क्वापि पुलिने
पतित्वाऽयं कायः कठिनदृषदन्तर्विदलितः ।।
वरं न्यस्तो हस्तः फणिपतिमुखे तीव्रदशने
वरं वह्नौ पातस्तदपि न कृतः शीलविलयः ॥ २ ॥

शिखरिणी

वरें उत्तुंगा त्या गिरिवरुनि खालींहि पडणें
शिलांनीं ठेचोनी पुलिनिं तनु विच्छिन्न घडणें ॥
वरें नागाच्याही मुखिं कर धरोनीहि मरणें
वरें अग्नीमध्यें पतन—न च नि शील जगणें ॥ २ ॥

गद्यार्थ—( नदी किंवा समुद्राच्या तीरावरील ) उंच डोंगराच्या कड्यावरून खालीं पडून पुळणतील कठीण दगडांनीं देहाच्या चिंधड्या होणें हेंहि पत्करलें महासर्पाच्या, तीक्ष्ण दात असलेल्या, तोंडात हात धरून आमहत्याहि केली तरी, खुशाल अग्नीतसुद्धा उडी घ्यावी, परंतु शील सोडून जगात जगणें नको। ●●●

शार्दूलविक्रीडित

वह्निस्तस्य जलायते जलनिधिः कुल्यायते तत्क्षणा-
न्मेरुः स्वल्पशिलायते मृगपतिः सद्यः कुरङ्गायते ॥
व्यालो माल्यगुणायते विषरसः पीयूषवर्षायते
यस्याङ्गेऽखिललोकवल्लभतमं शीलं समुन्मीलति॥३॥

शार्दूलविक्रीडित

त्यातें अग्नि जलापरी, उदधिही छोट्या झऱ्याचे परी
मेरू अल्पशिलेपरी मृगपती होई कुरंगापरी ॥
होई सर्पहि पुष्पहार, विष हें पीयूषवृष्टीपरी
लोकांना अवघ्या अति प्रिय असें, जो शील अंगीं धरी॥३॥

गद्यार्थ—अखिल जगताला अत्यंत आवडणारें असे (एक) शील ज्याचे अंगीं असेल त्याला, ( सर्व आपदा यासुद्धा साह्य होतात. ) अग्नि हा जलाप्रमाण (शीतल) होतो, समुद्र हा लहानशा पाटाप्रमाणें ( सहजीं ओलांडण्याजोगा ) होतो, मेरुपर्वत लहानशा ग्गडासारखा ( सहज चढण्याजोगा ) होतो सिंह हा हरिणाप्रमाणें ( निरुपद्रव ) होतो सर्प हा पुष्पहाराप्रमाणें (सुखस्पर्श) होतो व विष हें अमृताच्या वृष्टीप्रमाणें सुखद होतें ! ●●●

शार्दूलविक्रीडित

ऐश्वर्यस्य विभूषणं सुजनता शौर्यस्य वाक्संयमो
ज्ञानस्योपशमः श्रुतस्य विनयो वित्तस्य पात्रे व्ययः ॥
अक्रोधस्तपसः क्षमा प्रभवितुर्धर्मस्य निर्व्याजता
सर्वेषामपि सर्वकारणमिदं शीलं परं भूषणम् ॥ ४ ॥

शार्दूलविक्रीडित

सौजन्यें खुलतें सुवैभव, गुणें वाक्संयमें शूरता
विद्या, ज्ञानहि, शांतिनें सुविनयें पात्रीं व्ययें संपदा॥
क्षान्तीनें प्रभुता, शमें तप, ऋजुत्वानें गुणें धर्महीं
सर्वां कारण आद्य, भूषण महा सच्छील हें या महीं ॥४॥

गद्यार्थ—वैभव हें सौजन्यानें शोभून दिसतें; शौर्य हें वाणीच्या संयमानें शोभतें; ज्ञान हें शांतीनें, विद्या ही विनयानें, धन हें सत्पात्रीं दान देण्यानें, तप हें न रागावण्यानें, प्रभुता ( सत्ता ) ही क्षमावृत्तीनें, धर्माचरण हें सरल वागण्यानें शोभतें पण या सर्वांचे आद्य कारण व महान् भूषण आहे शील !

●●●

उपजाति

वाचो हि सत्यं परमं विभूषणं मृगेक्षणायाः कृशता कटौ च ।
द्विजस्य विद्यैव पुनस्तथा क्षमा शीलं हि सर्वस्य जनस्य भूषणम् ॥ ५ ॥

उपजाति

वाणीस कीं सत्यचि थोर भूषण
कृशा कटी हें वनिताविभूषण ॥
विद्या क्षमा हें द्विजजातिभूषण
सच्छील हें सर्व जनास भूषण ॥ ५ ॥

गद्यार्थ—वाणीचें सर्वोच्च भूषण सत्य; कंबर बारीक असणें हें स्त्रीचें मोठें भूषण; ब्राह्मणाचें मोठें भूषण विद्या आणि त्याचबरोबर क्षमा; आणि सर्व मानवजातीचें ( सर्वांत मोठें ) भूषण शील !

●●●

अनुष्टुभ्

शीलं प्रधानं पुरुषे; तद्यस्येह प्रणश्यति ।
न तस्य जीवितेनार्थो न धनेन न बन्धुभिः ॥ ६ ॥

अनुष्टुभ्

शील मुख्य नरामध्यें; टाकी जो तेंच नाशुनी !
कांहीं अर्थ नसे त्याच्या धन-बांधव-जीवनीं ॥ ६ ॥

गद्यार्थ—माणसाला ( मनुष्यत्व देणाऱ्या गोष्टींमध्यें ) मुख्य शील हें असतें ; पण तेंच ज्याचें नष्ट झालेलें असेल त्याच्या संपत्ति असण्याला, मोठे नातेवाईक असण्याला, व जगण्याला सुद्धां कांहीं अर्थ उरत नाहीं.

●●●

---

# प्रकरण ४१ वें

## चित्र, विचित्र, शब्दवैचित्र्य, अर्थवैचित्र्य, समस्या, अपह्नुति, प्रहेलिका ( उखाणे ), कृष्ण-गोपी इत्यादि.

मराठींत आजकाल आलेल्या 'धक्का' गीताचे, हे श्लोक पूर्वज होत. कोटियुक्त शब्दांनीं, जगावेगळा चमत्कारिकपणा समर्पक करून दाखविणें, हें कौशल्य या श्लोकांत दिसतें. विशेषतः समस्येचे शब्द असे भयंकर दिसावे, की, त्याची पूर्ति अशक्यच वाटावी. पण युक्तीनें पहिल्या तीन ओळींतून, समस्येची चौथी ओळ सम्यक निघावी, हा शब्दांचा खेळ आहे. म्हणून या प्रकाराचें भाषांतर करणें फार मानगडीचें व कष्टसाध्य होतें. व केव्हां केव्हां मूळांतले शब्द कोटि, वगैरे तसेच घ्यावे लागतात, याला नाइलाज होतो ! संस्कृतांत यमक आवश्यक नाहीं. मराठींत ती एक अधिक अडचण !

अनुष्टुभ्

नपुंसकमिति ज्ञात्वा प्रियायै प्रेषितं मनः ।
तत्तु तत्रैव रमते हताः पाणिनिना वयम् ॥ १ ॥

आर्या

'मन' जाणून नपुंसक, दिधलें मी तें प्रियेस धाडोनी।
फसवी पाणिनि आम्हां ! हा ! हा ! गेलें तिथेंच तें रमुनी

गद्यार्थ—मन ( हा शब्द ) नपुंसक आहे असें पाणिनीचें व्याकरण सांगतें. या भरवशावर मी आपलें मन प्रियेकडे पाठविलें; पण तें ( जणु काय पुरुष होऊन ) तेथेंच रमलें ! पाणिनीनें आमचा घात केला !

●●●

उपजाति

काचं मणिं काञ्चनमेकसूत्रे बाले ! निबध्नासि किमत्र चित्रम् ? ॥
विचारवान् पाणिनिरेकसूत्रे श्वानं युवानं मघवानमाह ॥२॥

इन्द्रवज्रा

**काचा, मणी, कांचन एकसूत्रें**
**तूं गुंफिशी हें न विचित्र बाले ॥**
**तो सुशही पाणिनि एकसूत्रीं**
**श्वाना-युवाना मघव्यास घाली ॥२॥**

गद्यार्थ—( पाणिनीच्या व्याकरणात, त्यानें, श्वन् युवन् मघवन् हे तीन शद्ब, एकसारखे चाल्तात, म्हणून एकाच सूत्रात गोविले. अशा रीतीनं श्वा = कुत्रा, युवा = तरुण पुरुष, मघवा = इद्र असे तीन अगदी भिन्न मूल्याचे प्राणी एका सूत्रात, सब घोडे बारा टक्के या म्हणीप्रमाणें, एकत्र आल्यानें पाणिनि, एका निराळ्या अर्थानें तारतम्यरहित ठरतो ! ) ( जिला मूल्यामूल्यविवेक आलेला नाहीं अशा ) हे बाले ! काचा, रत्नें, सोन्याचे मणि हे तू एकाच सूत्रात ( सूत्र शद्बावर कोटि-अर्थ–दोरा व पाणिनिसूत्र. ) ओवलेस यात विचित्र काय आहे ! ( तू तर अशक्त आहेस ) पण मोठा विचारवत जो पाणिनि त्यानेंसुद्धा कुत्रा, तरुण व इद्र तिन्ही एका सूत्रात घातले ! ●●●

उपजाति

शुनेव यूना प्रसभं मघोना प्रधर्षिता गौतमधर्मपत्नी ।
विवेकवान् पाणिनिरेकसूत्रे श्वानं युवानं मघवानमाह ॥ ३ ॥

उपजाति

**श्वानापरी यौवनिं इंद्र दुष्ट**
**करी अहल्येस बळेंच भ्रष्ट ॥**
**तो पाणिनी वास्तव एक सूत्रीं**
**श्वाना-युवाना मघव्यास घाली ॥३॥**

गद्यार्थ—( वरील श्लोक २ मध्य, पाणिनीवर, जो अविवे काचा आळ आला, तो त्याचा भक्त, खोडून काढतो— ) कुत्र्याप्रमाणें तरुण इंद्रानें, बळानळानें (दुष्टनें) गौतम ऋषींची धर्मपत्नी (अहल्या,) हिला भ्रष्ट केलें. यावरून, नीट विचारानेंच त्या पाणिनीन श्वा युवा व मघवा, याना एका सूत्रात घातलें. ●●●

आर्या

अम्बुजमम्बुनि जातं, न हि दृष्टं जातमम्बुजादम्बु ।
अधुना तद्विपरीतं चरणसरोजाद्विनिर्गता गङ्गा ॥ ४ ॥

आर्या

**उगवे कमल जलीं, परि न दिसे कमलामधून जल येतें ।**
**गंगा विपरीत कशी प्रभुपदपद्मांतुनी पहा निघते ॥४॥**

गद्यार्थ—जलात कमल उगवतें, पण, कमलातून जलाचा उद्गम, कधीं पाहण्यात आल नाहीं ! पण, आता, हें कसे उलट घडलें पहा—( श्री विष्णूच्या ) पदकमलापासून, गगेसारखा ( प्रचड ) जलौघ, उगम पावला ! ! ●●●

अनुष्टुभ्

चिंता चितासमानाऽस्ति बिन्दुमात्रविशेषत ।
सजीवं दहते चिंता निर्जीवं दहते चिता ॥ ५ ॥

अनुष्टुभ्

**बिन्दु तो सोडतां चिंता चितेच्या सम तत्त्वता ॥**
**जित्याला जाळिते चिंता मेल्याला जाळिते चिता ॥५॥**

गद्यार्थ—एका अनुस्वाराचा फरक सोडला, तर, चिंता ही चितेसारखीच आहे ( नव्हे ! चिंता थोडी जास्त भयकरच ) कारण चिंता जिवत माणसाला जाळते ! तर चिता केवळ मेलेल्याला जाळते ! ●●●

आर्या

अल्पीयसैव पयसा यत्कुम्भ पूर्यते प्रसिद्ध तत् ।
ब्राह्मं तेज पश्यत कुम्भोद्भूत पपौ समुद्रमपि ॥६॥

आर्या

**जाणिति सर्वेहि जन कीं, कुम्भ भरे नित्य अल्पशाहि जळें**
**कुम्भातुनि जन्मे तें ब्राह्म तेज परि समुद्रही प्यालें ॥६॥**

गद्यार्थ—ही गोष्ट सर्वांना माहीतच आहे, कीं कुम्भ हा थोडक्याशाच पाण्यानें भरून जातो. परतु ( हा चमत्कार पहा कीं ) कुम्भातून जन्मलेल्या ब्राह्मतेजानें (कुम्भपुत्र अगस्ति या ब्राह्मणानें) समुद्रच पिऊन टाकिला ! ●●●

अनुष्टुभ्

सरसो विपरीतश्चेत्सरसत्वं न मुञ्चति ।
साक्षरा विपरीताश्चेद्राक्षसा एव केवलम् ॥७॥

वसततिलका

**झाला जरी 'सरस' हा विपरीत साचा**
**होतो तसा 'सरस' तो उरलो सदाचा ॥**
**त्या 'साक्षरा' स विपरीतपणा घडेल**
**तें 'राक्षसा' समचि केवळ तो ठरेल ॥ ७ ॥**

*गद्यार्थ*—( सरस म्हणजे रसपूर्ण हृदयाचा म्हणजे सद्भावयुक्त रसवेत्ता, आणि साक्षर म्हणजे पंडित म्हणजे रसहीन, कठोर, हृदयाचा. या दोघांतला फरक दाखविण्यासाठीं शब्दचमत्कृतियुक्त श्लोक. ) सरस हे जरी विपरीत झाले म्हणजे उलटले ( 'सरस' हीं अक्षरें उलटीं वाचलीं ) तरी ' सरस'च राहतात. ( रसज्ञ वाकड्यांत शिरला तरी सरस राहतो. ) या उलट ' साक्षरा'ला विपरीतपणा आला, ( साक्षरा हीं अक्षरें उलटीं वाचलीं, ) कीं, तो ' राक्षसा ' समान होतो ( रुक्ष नीरस पंडित उलटला, कीं, त्याची टीका राक्षसारखी क्रूर असते.) ●●●

उपजाति

सञ्चारिणी काञ्चनवल्लरीव विद्युल्लता वा पतिता नभस्तः।
घृतस्य धारा पतिता न जाने दिवं गता वाऽथ भुवं गता वा ८

इंद्रवज्रा

**ही धांवती वेलचि सोनियाची**
**कीं वीज खालीं पडली नभींची ? ॥**
**धारा घृताची पडुनी कळे न**
**पृथ्वींत कां स्वर्गि वसे दडून ? ॥ ८ ॥**

*गद्यार्थ*—( कृपणाच्या घरीं, किंवा, खानावळींत पानावर तूप वाढलें जातें त्याचें वर्णन. केशवसुताची ' खानावळींतील घृतधारा ' ही कविता या कवितेचें भाषांतरच आहे. ) ही काय सोन्याची धावत जाणारी वेली आहे ! की आकाशातून पडलेली वीज आहे ? ही तुपाची धार वरून पडली ती परत स्वर्गात गेली की भूगर्भात शिरली हें कांहीं कळत नाहीं. (एवढें मात्र खरें कीं, भातावर कांहीं ती पडली नाहीं !) ●●●

*शार्दूलविक्रीडित*

अत्तुं वाञ्छति वाहनं गणपतेराखुं क्षुधार्तः फणी
तं च क्रौञ्चपतेः शिखी; स गिरिजासिंहोऽपि नागाननम् ॥
गौरी जह्नुसुतामसूयति कलानाथं कपालानलो
निर्विण्णः स पपौ कुटुम्बकलहादीशोऽपि हालाहलम् ॥९॥

स्रग्धरा

**खाण्या पाहे भुकेला गणपतिवहना उंदराला फणीन्द्र**
**स्कंदाचा मोर सर्पा, परि गजवदना पार्वतीचा मृगेंद्र ॥**
**गौरी गंगेस, चंद्रा अनलहि चिरिंचा, मत्सरानें पहाती**
**प्याला हालाहलातें शिव गृहकलहें होत उद्विग्न चित्तीं ॥ ९ ॥**

*गद्यार्थ*—( घरोघर मातीच्या चुली. तुमच्या आमच्या संसारात गृहकलह आहेत, तसेच, महा देव महा ईश परम ईश्वर अशीं नावें असलेल्या शंकराच्या घरातसुद्धां आहेत. ) ( शंकराच्या गळ्यातला ) भुकेला सर्प, गणेशाचें वाहन जो उंदीर त्याला खाऊ पहातो; उलट त्या सर्पाला, कार्तिकस्वामीचा मोर खाऊ पाहतो; इकडे पार्वतीचा सिंह गजाननाला ( तो हत्ती म्हणून ) खाऊ इच्छितो; पार्वती गंगेचा मत्सर करते आणि कपाळावरचा अग्नि चंद्राचा मत्सर करतो—या सर्व गृहकलहानें उद्विग्न होऊन शंकरहि हालाहल प्याला ! ( मग साधारण माणसाची कथा काय ? ) ●●●

अनुष्टुभ्

चतुरङ्गबलो राजा जगतीं वशमानयेत् ।
अहं पञ्चाङ्गबलवानाकाशं वशमानये ॥ १० ॥

अनुष्टुभ्

**चतुरंगबळें राजा जग हें मात्र जिंकतो ।**
**पंचांगबलवान् मी हा सारें आकाश जिंकितों ॥१०॥**

*गद्यार्थ*— ( शाब्दिक कोटि करून ज्योतिषी बढाई मारतो. ) सैन्याचीं चार अंगें ( पायदळ, अश्वदल, गजदल नौदल इत्यादि दल किंवा ) बळ यांच्यामुळे, राजा, फार तर जग जिंकू शकेल. पण मी ( ज्योतिषी ) ' चतुरंगा'पेक्षा एक अधिक ' पंचांग ' असलेला ' त्या पंचांगाच्या बळावर [ त्यांत ग्रहगणित असतें म्हणून किंवा वाटेल तशा बनावट पत्रिका करण्याइतके सर्व ग्रह माझ्या स्वाधीन असल्यानें ] मी सर्व आकाश जिंकितों ! ●●●

अनुष्टुभ्

अहं च त्वं च राजेन्द्र लोकनाथावुभावपि ।
बहुव्रीहिरहं किन्तु षष्ठीतत्पुरुषो भवान् ॥११॥

अनुष्टुभ्

**लोकनाथचि हे राजा ! मी तूं आहोंत रे, तरी ।**
**मी बहुव्रीहि तूं मात्र षष्ठीतत्पुरुषापरी ॥ ११ ॥**

*गद्यार्थ*— ( एक याचक व्याकरणाचें ज्ञान दाखवून स्वतःची राजाशीं तुलना करतो ) हे राजा ! तू काय, मी काय, दोघेहि लोकनाथ आहों. फरक इतकाच, कीं, माझे वर्णन करताना लोकनाथ हा समास बहुव्रीहि ( लोक आहेत नाथ म्हणजे आश्रयदाते ज्याचे ) सोडवावयाचा व तुझे वर्णन करताना षष्ठीतत्पुरुष ( लोकांचा नाथ ) समजावयाचा ! ●●●

अनुष्टुभ्

राजन् दौवारिकादेव प्राप्तवानस्मि वारणम् ।
मदवारणमिच्छामि त्वत्तो ऽ हं जगतीपते ! ॥ १२ ॥

अनुष्टुभ्

रक्षकाकडुनी राजा ! मिळे मजसि वारण ! ।
मदवारण इच्छी मी पृथ्वीशा ! तुजपासुन ॥ १२ ॥

गद्यार्थ—( कोणा एका पुरस्कारेच्छु कवीला, राजाच्या द्वारपालाकडून, वारण म्हणजे मज्जाव, प्रतिबंध, प्राप्त झाल्यामुळे, त्यानें राजाकडे तक्रार केली, कीं, मला असा दारावर मज्जाव, प्रतिबंध, न व्हावा. ( मत्=माझा, अवारण=मज्जाव न होणें ) मदवारण मी मागतो. एकीकडे द्वारपालानें हटकल्याची तक्रार तर राजाला समजली पण दरबाराबरील कवीला तर आपला अपमान झाला हें समजू नये म्हणून वारण=साधा हत्ती, मदवारण म्हणजे मदोमत्त हत्ती, असे द्व्यर्थी शब्द घालून तो म्हणतो, हे राजा वारण=साधा हत्ती तर मला तुझ्या द्वारपालाकडूनच मिळाला आहे, आता तुझ्याकडून मदवारण ( मदोन्मत्त हत्ती ) मला हवा आहे. !

अनुष्टुभ्

एष वन्ध्यासुतो याति खपुष्पकृतशेखर ।
मृगतृष्णाम्भसि स्नात्वा शशशृङ्गधनुर्धर ॥१३॥

वसंततिलका

नाहोनिया मृगजळामधल्या जळात
हातीं विशाल शशशृंगधनुष्य घेत ॥
आकाशपुष्पमुकुटा धरनी शिरीं तो
वांझोटिचा डुलत हा बघ पुत्र जातो ॥१३॥

गद्यार्थ—( अथपासून इतिपर्यंत अशक्य गोष्टींची गुंफण ) मृगजळातल्या पाण्यात स्नान करून, सशाच्या शिंगाचें केलेले धनुष्य हातीं घेऊन, आकाशात फुललेल्या फुलाचा मुकुट डोक्यावर धारण करून हा पहा वांझोटीचा मुलगा चालला आहे. !

मन्दाक्रान्ता

मूकारब्ध कमपि बधिरा श्लोकमाकर्णयन्ति
यद्वाहस्त निलिखति कुणि श्रद्धया वीक्षतेऽन्ध ॥
अभ्यारोहत्यहह सहसा पङ्गुरप्यद्रिशृङ्ग
सान्द्रालस्या शिशुभरणतो मन्दमायाति वन्ध्या ॥ १४ ॥

मन्दाक्रान्ता

ऐके गाणें बधिर, निघते जे मुक्याच्या मुखानें
थोटा श्रद्धे लिहित, बघतो आंधळा कौतुकानें ॥
अद्रीच्याही शिखरिं चढतो, पंगु लीलेमधें ते
वांझोटी ही अलसगतिनें गर्भिणी मन्द जाते ॥१४॥

गद्यार्थ—( श्लोक १३ प्रमाणेंच सर्व अशक्याची मालिका ) मुक्यानें गायला सुरवात केलेला कसलासा श्लोक बहिरा ऐकत आहे ! थोटा श्रद्धापूर्वक तो लिहून घेत आहे, तें, आंधळा कौतुकाने पाहात आहे ! पांगळासुद्धा, लीलेनें डोंगराच्या शिखरावर चढून जात आहे. आणि वांझेला गर्भ राहिल्यामुळे, ती, अलस गमना, मंदपणें चालत आहे !

अनुष्टुभ्

प्रहारितोऽपि मार्जारस्तमाखु नैव मुञ्चति ।
तथैव बोधितो मूर्खस्तमाखु नैव मुञ्चति ॥ १५ ॥

अनुष्टुभ्

मार देऊनही बोका न आखु सोडितो जसा ।
बोध देऊनही मूर्ख तमाखु सोडिना तसा ॥१५॥

गद्यार्थ— ( तमाखु = तम आखु=त्या उंदराला, तमाखु = तंबाखू ) दोन तऱ्हेनें पदें पाडल्यानें चमत्कृति. ) मार देऊनहि बोका तमाखु सोडीत नाहीं. मूर्ख मनुष्य उपदेश करूनहि तमाखु सोडीत नाही !

भुजङ्गप्रयात

बिडौजा पुरा पृष्टवानब्जयोनिं "धरामण्डले सारभूतं किमस्ति"
चतुर्भिर्मुखैरुत्तरं तेन दत्तं "तमाखुस्तमाखुस्तमाखुस्तमाखुः"

भुजंगप्रयात

अनुष्टुभ्

स्वयं स्थाणुरपर्णा स्त्री विशाखस्तनय स्मृत ।
तथापि कुरुते छाया भवतापापहारिणीम् ॥ १७ ॥

अनुष्टुभ्

स्वयें स्थाणु, अपर्णा स्त्री, विशाख मुलगा जरी ।
शिव देई तरी छाया भवतापहि जी हरी ॥ १७ ॥

हेंच वसततिलकेंत—

स्थाणु स्वयें शिव नि ती गृहिणी अपर्णा
झाला विशाखचि असा जरी पुत्र त्यांना ॥
आश्चर्यकारक अशी परि देइ छाया
कीं जी समर्थ भवतापहि तिवाया ॥ १७ ॥

गद्यार्थ—( स्थाणु = शकराचें एक नाव, दुसरा अर्थ झाडाचा बुधा ( खांबासारखा, पानें शाखा नसलेला. ) अपर्णा = पार्वतीचें एक नाव, दुसरा अर्थ पर्णहीन, विशाख = कार्तिक स्वामी, दुसरा अर्थ फांद्या नसलेला. ) शकर स्वता बघावा तर स्थाणु ( नुसता झाडाचा बुधा ) बायको बघावी तर अपर्णा ( पानें नसलेली )मुलगा बघावा तर विशाख ( फांद्या नसलेला ) तरी हा स्थाणु, छाया मात्र, भवतापसुद्धां शात करील, अशी देतो. ( इतर, पुष्कळ फाद्या असलेले, व पानांनीं भरगच्च असे वृक्ष छाया देतात ती केवळ देहताप शात करू शकते. ) ●●●

अनुष्टुभ्

पिनाक फणि बालेन्दु भस्म-मन्दाकिनी-युता ।
तथापि भव ! ते मूर्तिरपवर्गप्रदायिनी ! ॥ १८ ॥

आर्या

पिनाक,फणि,बालशशी,भस्म नि मंदाकिनी 'प'वर्ग असे
शिव ! तव मूर्तीत असुनी देशी अपवर्ग हें घडे कैसें? १८

गद्यार्थ—हे शकरा ! तुझ्या मूर्तीत, पिनाक ( शिवधनुष्य किंवा त्रिशूल ) फणि ( सर्प ) बालेन्दु ( चद्रकोर ) भस्म आणि मंदाकिनी ( गगा ) या प्रमाणें सर्व प फ ब भ म हा 'प'वर्ग असून, तू भक्तांना मात्र अपवर्ग ( म्हणजे मोक्ष ) देतोस ( हा केवढा चमत्कारिक विरोधाभास ! ) ●●●

अनुष्टुभ्

स्वय पञ्चमुख पुत्रौ गजाननषडाननौ
दिगम्बर कथ जीवेदन्नपूर्णा न चेद्गृहे ? ॥ १९ ॥

आर्या

पंचमुखी असुनि स्वयें,पुत्र गजानन षडाननचि असती।
जगता कसा दिगंबर जर नसती त्यास अन्नपूर्णा ती?॥१९

गद्यार्थ— ( शकराच्या घरात खायला तोंडेंच फार ! ) स्वता शकराला तोंडें पाच ( परमेश्वर हा पचमुख ); मुलगे दोन, पैकीं एकाला हत्तीचें तोंड, दुसऱ्याला सहा तोंडें; ( घरात समृद्धि केवढी ! ) तर घरधनी दिगबर ! अशा स्थितींत घरात जर ( पार्वतीसारखी ) अन्नपूर्णा ( अन्न पुरें पाडणारी ) नसती तर शकर कसा जगला असता ! ●●●

उपजाति

स्थाणु स्वयं मूलविहीन एव पुत्रो विशाखो रमणी त्वपर्णा ॥
परोपनीतैः कुसुमैरजस्र फलत्यभीष्ट किमिद न चित्रम् ?॥२०॥

उपजाति

स्थाणु स्वयें त्यास न मूळ एक
पत्नी अपर्णा मुलगा विशाख ॥
फळे, परें दत्त फुलें, अजस्र
अभीष्ट दे हें न च कां विचित्र ? ॥ २० ॥

गद्यार्थ— शकर हा स्वत खांबासारखा झाडाचा बुधा मग त्याला मुळे कुठून असणार ? बायको अपर्णा ( पार्वती, पर्णहीन ) आणि मुलगा विशाख ( कार्तिकेय, फांद्या नसलेला ) तेव्हा असल्या झाडाला फुलें कुठली ! पण लोक त्याला फुलें वाहतात आणि त्यामुळे तो विपुल फलप्रद होतो व अभीष्ट देतो हा चमत्कार नव्हे का ? ●●●

शार्दूलविक्रीडित

' कीटोऽय भ्रमरी भवेदविरतध्यानात्तथा चेदह
राम स्या त्रिजटे ! तथा ह्यनुचित दाम्पत्यसौख्यच्युता ॥ "
" एव चेत्कृतकृत्यतैव भविता, रामस्तव ध्यानत
सीता, त्व च निहत्य राक्षसपतिं सीतान्तिके यास्यसि ! " २१

शार्दूलविक्रीडित

" भुंगारूप धरील कीट सततध्यानें, तरी जाहलें—
मीही राम, न योग्य, पतिसुख हें लोपेल त्याच्यामुळें " ॥
" तेंची युक्त ठरेल, राम तुझिया ध्यानेंच सीता घडे;
तूंही मारुनि रावणास समरीं, जाशील सीतेकडे ! ॥२१॥

गद्यार्थ—( अशोकवनात घडलेला सीता व त्रिजटी याचा संवाद. एखाद्या कीटकानें सतत भ्रमराचें ध्यान केलें तर त्यामुळें तो कीटकच भुंगा होऊन जातो. अशी कथा त्रिजटेनें सीतेला सांगितली तेव्हां सीता म्हणते —) "हे त्रिजटे ! हा कीटक, जसा, सततध्यानामुळें भ्रमरच होणार, तसा, सततध्यानामुळें मीहि जर राम झालें, तर, माझें दांपत्यसुख नष्ट होणार ! तेव्हां हा मोठा घोटाळा होणार !" त्यावर त्रिजटी म्हणते— "अग सीते ! तसें झालें तर फारच उत्तम. कारण त्यानें तू कृतकार्य होशील. तिकडे राम तुझ्या ध्यानानें सीता होईल; आणि तू राम झाल्यानें, रावणाचा वध करून, त्वरितच सीतेकडे जाशील !"

●●●

शार्दूलविक्रीडित

श्रीरामे मृगयां गतेऽपि धनुषा बाणे समारोपितेऽ– ।
प्याकर्णान्तगतेऽपि मुष्टिगलितेऽप्येणाङ्गलग्नेऽपि च ॥
न त्रस्तं, न पलायितं, न चकितं नोत्कम्पितं नोध्दतं ।
मृग्या मद्वशगं करोति दयितं कामोऽयमित्याशया ॥२२॥

शार्दूलविक्रीडित

**जातां राम शिकारिला, धनुवरी तो बाण जोडी जरी**
**आकर्णांतहि खेचुनी, शर सुटे, विंधी मृगा तो तरी ॥**
**न क्षोभें, न भयें पळे, न चकिता, नाहीं मृगी कांपली**
**कान्ता मद्वश देइ हा मदन ही आशा तिला वाटली २२**

गद्यार्थ—राम मृगयेला गेला असता (हरिणांचें एक जोडप याच्या टप्प्यात आलें. रामानें धनुष्यावर बाण चढविला, दोरी आकर्ण ओढली, बाण हातांतून सुटला व त्यानें त्या मृगाला विंधिलें तरी त्याची स्त्री मृगी, क्षोभानें वा भयानें पळत सुटली नाहीं, थरथर कांपत सुटली नाहीं किंवा ती चकितसुद्धा झाली नाहीं ! तिला वाटलें राम हा प्रत्यक्ष मदनच आहे. (व त्याच्या शरानें विद्ध झाल्यानें) माझा पति (माझ्यावर अधिकच अनुरक्त होऊन) मला पूर्ण वश होईल !!

●●●

अनुष्टुभ्

सच्छिद्रो मध्यकुटिलो कर्णः स्वर्णस्य भाजनम् ।
धिग्दैवं निर्मलं नेत्रं पात्रं कज्जलभस्मनः ॥ २३ ॥

वसंततिलका

**मध्यांत वक्र, वर छिद्रहि त्या असून**
**सोन्यास पात्र ठरतो जगिं तोच कान ॥**
**धिग्दैव ! निर्मल असूनहि अंतरानें**
**नेत्रास मात्र जन भाखिति काजळानें !॥ २३ ॥**

गद्यार्थ—ज्याला छिद्र आहे आणि ज्याच्या मध्यें वक्रता आहे असा कान हा सुवर्णालंकाराला पात्र समजला जातो ! आणि जो नेत्र आतून अगदीं निर्मल त्याला मात्र काजळ ! धिक्कार असो दैवाला ! (छिद्र, वक्र, निर्मल हे शब्द द्व्यर्थी.) ●●●

शार्दूलविक्रीडित

" गृह्णात्येष रिपोः शिरः प्रजविनं कर्षत्यसौ वाजिनं
धृत्वा चर्म धनुः प्रयाति पुरतः संग्रामभूमावपि ॥
द्यूतं चौर्यकृतं तथा च शपथं कुर्यान्न वामः करो ।"
" दानानुद्यमतां विलोक्य विधिना शौचाधिकारीकृतः" २४

शार्दूलविक्रीडित

**" शत्रूचें शिर हा धरी, उसळत्या अश्वा लगामीं धरी**
**जाई ढाल धनुष्य घेऊनि पुढें संग्रामभूमीवरी ॥**
**चौर्य द्यूत करी न; ना शपथ घे केव्हांहि डावा कर !"**
**"ना दे दान म्हणून त्यास विधि दे प्रातर्विधीचा वर" ॥ २४ ॥**

गद्यार्थ—( दंतकथा अशी कीं दोन कवींना, एकाला उजव्या हाताला व दुसऱ्याला डाव्या हाताला धरून, एक राजा, फिरायला निघाला; व, ज्याच्या हातीं जो हात आला, त्याची त्यानें स्तुति करून, कविता करण्यास, राजानें सांगितलें, तेव्हा हाताच्या कवीनें चौथी ओळ करून त्याला छेळविलें !— ) "हे राजा ! शत्रूचें शिर (तू छाटलेंस, कीं, तें) धरण्याचें कार्य हा डावा हात करतो ! उसळत्या घोड्याला लगामानें आवरून धरण्याचें काम डावा हातच करतो. ढाल धरण्याचा किंवा धनुष्य धरून रणांगणात पुढें जाण्याचा मान डाव्या हाताचा ! हा कधीं द्यूत खेळत नाहीं, चोरी करीत नाहीं किंवा ( पैजा मारीत नाहीं, शाप देत नाहीं, वचन देत नाहीं ) शपथ घेत नाहीं." यावर उजव्या हाताचा पुरस्कर्ता कवि म्हणतो—" पण हा डावा हात कधीं दान देत नाहीं हें पाहून ब्रह्मदेवानें त्याला प्रातर्विधीचा अधिकार दिला आहे !" ●●●

समस्यापूर्ति श्लोक २५ ते ३६

अनुष्टुभ्

निपायां दुर्मदो यस्य वार्णव्यं निभते सति ।
तेषां दैवाभिशप्तानां सलिलादग्निरुत्थितः ॥ २५ ॥

अनुष्टुभ्

विद्या असून गर्वी जे, चिक्कू, धनिक होउनी।
ते देवें शापिले; त्यांना निधे अग्नि जलांतुनी ॥ २५ ॥

गद्यार्थ—( पाण्यातून अग्नि निघे अशी चौथी ओळ समस्यापूर्तीसाठी दिली असावी. ) विद्या शिकूनहि जे उन्मत्त; व वैभव असून जे कद्रू त्यांना, तो देवाचा शापच होय. जलांतून-सुद्धां अग्नि निघावा, (असेच त्याचें जीवन होय,) असे म्हटलें पाहिजे ! समस्यापूर्तीसाठीं काहींनरा विलक्षण अशक्य प्राय घटना वाक्याची असते; त्याशिवाय पूर्ति करणाराची परीक्षा कशी व्हावी ?

●●●

अनुष्टुभ्

दामोदरकराघातविह्वलीकृतचेतसा।
दृष्टं चाणूरमल्लेन शतचन्द्रं नभस्तलम् ॥ २६ ॥

अनुष्टुभ्

चाणूर कृष्णहस्तांनीं मार खाई भयंकर।
त्या, दिसों लागले तेव्हा आकाशीं चंद्र शंभर ॥ २६ ॥

गद्यार्थ—( " आकाशात शंभर चंद्र " हे समस्येचें वाक्य ) कृष्ण आणि चाणूर याचें मल्लयुद्ध सुरूं असता, जेव्हा का, तो, कृष्णाच्या कराघाताचा प्रसाद चाखूं लागला, तेव्हा ( त्याच्या डोळ्यापुढे काजवे चमकल्यासारखें होऊन ) त्याला आकाशात (एकाचे) शंभर चंद्र दिसूं लागले !

●●●

अनुष्टुभ्

चलत्तरङ्गरङ्गाया गङ्गायाः प्रतिबिम्बितम्।
सचन्द्रं शोभतेऽत्यन्तं शतचन्द्रं नभस्तलम् ॥ २७ ॥

अनुष्टुभ्

गंगेच्या हलती लाटा, बिंबता चन्द्र त्यांवर।
बहु शोभति, तें वाटे आकाशीं चन्द्र शंभर ॥ २७ ॥

गद्यार्थ—( " आकाशात शंभर चंद्र " याच समस्येची दुसऱ्या कुणी केलेली पूर्ति. ) गंगेच्या हलत्या लाटावर जेव्हा चंद्र प्रतिबिंबित होतो, तेव्हा, अशी अत्यंत शोभा दिसते, कीं जणु आकाशात शंभर चंद्र असावेत !

●●●

अनुष्टुभ्

विधे ! पिधेहि शीतांशुं यावन्नायाति मे प्रियः।
आगते दयिते कुर्याः शतचन्द्रं नभस्तलम् ॥ २८ ॥

अनुष्टुभ्

देवा ! झांकुनि घे चंद्रा प्रिय येई न तोंवर
तो येतां ठेव आणून आकाशीं चंद्र शंभर ॥ २८ ॥

गद्यार्थ—( " आकाशात शंभर चंद्र " याच समस्येची तिसऱ्या कवीनें केलेली पूर्ति— ) कोणी विरहिणी म्हणते— " देवा ! माझा प्रियकर भेटायला येत नाहीं, तोंवर चंद्र झाकून ठेव. ( कारण विरहिणीला चंद्र अधिकच पीडा देतो. ) पण, तो आला, कीं, आकाशात शंभर चंद्र आणून ठेव " ( म्हणजे अधिकस्याधिकं फलम् ! मीलनसुख शतपट ! )

●●●

अनुष्टुभ्

घृतं न श्रूयते कर्णे दधि स्वप्ने न दृश्यते।
मुखे दुग्धस्य का वार्ता ? तक्रं शक्रस्य दुर्लभम् ॥ २९ ॥

अनुष्टुभ्

तूप ना ऐकिलें कानीं, दिसे स्वप्नींहि ना दहीं।
सोडा गोष्टहि दुग्धाची इंद्रा दुर्लभ ताकही ॥ २९ ॥

गद्यार्थ—( समस्येचें वाक्य-ताक इंद्राला दुर्लभ. ) कोणी अत्यंत दरिद्री म्हणतो—"तूप कानानीं ऐकलं नाहीं, दहीं स्वप्नात सुद्धा दिसत नाहीं, तोंडात दूध पडण्याची गोष्ट कशाला ? ताक इंद्राला सुद्धा दुर्मिळ (तर मला कुठून मिळणार ?)"

●●●

अनुष्टुभ्

भोजनान्तेऽपि किं पेयं ? जयन्तः कस्य वै सुतः ? ।
कथं विष्णुपदं प्रोक्तं ? तक्रं शक्रस्य दुर्लभम् ॥ ३० ॥

अनुष्टुभ्

जयन्त पुत्र कोणाला ? कसा वैकुंठ या मही ? ।
प्यानें जेवूनिही काय ? इंद्रा दुर्लभ ताकही ॥ ३० ॥

गद्यार्थ—( " ताक इंद्राला दुर्लभ " याच समस्येची दुसऱ्या कवीनें केलेली पूर्ति. पहिल्या तीन ओळींत तीन प्रश्न विचारले असून त्यांची तीन उत्तरें क्रमानें चौथ्या ओळींत दिलीं आहेत. मराठी भाषांतरात समस्याशब्दाचा क्रम बदलल्यानें प्रश्नाचाहि क्रम बदलला आहे. ) ( अर्थ मराठी क्रमानं )— जयन्त हा पुत्र कोणाला ( झाला ? ) वैकुंठप्राप्ति कशी आहे ? जेवणानंतर-हि काय प्यावें ? उत्तरें-क्रमानें-इंद्रा-( इंद्राला ) दुर्लभ, ताकहि.

●●●

उपजाति

अजन्ति पद्मानि कदा विकास? प्रिया, गते भर्तरि, किं करोति?
रात्रौ च नित्यं विरहाकुला का? सूर्योदये रोदिति चक्रवाकी ॥ ३१ ॥

भुजंगप्रयात

दुरी नाथ जातां, करी काय नारी?
वियोगें सदा व्याकुला कोण रात्रीं? ॥
वदा केधवां पद्म पावे विकास?
रडे चक्रवाकीच सूर्योदयास! ॥ ३१ ॥

*गद्यार्थ*—(*श्लोक २६ पासून येथपर्यंत व पुढें*, काहीं विचित्र, जगावेगळी घटना समस्येसाठीं घ्यावयाची प्रथा दर्शविते. *समस्यापूर्ति करणाऱ्या कवीनें, अशा खुबीनें* पहिल्या तीन ओळी रचावयाच्या, कीं, त्यामुळें चौथ्या ओळीचा योग्य उलगडा व्हावा. त्यासाठीं प्रश्न विचारावयाचे, व, त्याची उत्तरें हे *समस्याशब्द* असे दाखविणें, ही युक्ति, बऱ्याच कवींनीं अवलंबिलेली आहे. चक्रवाक जोडप्याचा रात्रीं वियोग होतो व सूर्योदयाला पुनर्मीलन होतें. पण मुद्दामच उलट्या अर्थाचें *वाक्य समस्येसाठीं दिलें आहे*) मराठी *भाषांतराच्या क्रमानें* पति दूर गेल्यावर स्त्री काय करते? रडे. रात्रीं नित्य वियोगानें व्याकुल होणारी कोण? चक्रवाकीच. पद्म केव्हा उमलतें? सूर्योदयास.

●●●

उपजाति

विलोक्य नारीमुखचन्द्रबिम्बं कण्ठे च मुक्तावलिहारताराः।
पुनर्निशाया भयभीतचित्ता सूर्योदये रोदिति चक्रवाकी ३२

उपजाति

पाहून नारीमुखरूप चद्रा!
कंठीं तिच्या मौक्तिकरूप तारा ॥
पुन्हां निशा ये जणुं या भयें कीं
रडेच सूर्योदयिं चक्रवाकी ॥ १३२ ॥

गद्यार्थ—स्त्रीमुखरूपी चद्र व त्या स्त्रीच्या गळ्यातल्या मुक्ताहारातले मोती हे तारे, पाहून, पुन्हां रात्र आली कीं काय! या भयानें सूर्योदय होऊन सुद्धां चक्रवाकी रडत आहे. ●●●

उपजाति

शिव प्रहर्षं समुदीक्षते किं?
प्रिया प्रियं किं कुरुते निशायाम्? ॥
मोक्षस्य दाता स्मरणेन को वा?
गौरीमुखं चुम्बति वासुदेवः ॥ ३३ ॥

उपजाति

शिव प्रहर्षें बघतो कुणाला?
दे मुक्ति कोण स्मरतां, नराला? ॥
रात्रीं प्रिया काय करीत राहे?
गौरीमुखाला हरि चुंबिताहे! ॥ ३३ ॥

गद्यार्थ—(प्रश्नोत्तरें)—शंकर कोणत्या वस्तूला मोठ्या हर्षानें पाहतो? गौरीमुखाला. *नामस्मरण केलें असता मनुष्याला* कोण मोक्ष देतो? हरि; रात्रीं प्रिया प्रियकराला काय करते? चुंविताहे! (विष्णु पार्वतीचें मुख चुंबितो!) ●●●

अनुष्टुभ्

कस्तूरी जायते कस्मात्को हन्ति करिणां कुलम्?।
किं कुर्यात्कातरो युद्धे मृगात्सिंहः पलायते ॥ ३४ ॥

(चाल फटक्याची)

कुणापासुनी मिळे कस्तुरी? कोण वधी गजसंघ वळें?
रणांत करितो काय भेदरट? मृगापासुनी सिंह पळे! ३४

*गद्यार्थ*—(*समस्येचें वाक्य हरिणापासून सिंह पळतो!*) प्रश्नोत्तरें-कस्तूरी कोणापासून निघते? मृगापासून. गजसंघाला *कोण मारतो? सिंह भित्रा युद्धांत काय करतो? पळतो!* ●●●

अनुष्टुभ्

असमाने समानत्वं भविता कलहो मम।
इति मत्वा ध्रुवं मानी मृगात्सिंहः पलायते! ॥ ३५ ॥

(चाल फटक्याची)

"असमानाशीं युद्ध घडे मम
हरिण काय मम तुल्य वळें?।"
अशा विचारें खराच मानी
मृगापासुनी सिंह पळे! ३५ ॥

गद्यार्थ—( तीच समस्या, सोडवणूक निराळी. ) हरिणाची आपली शुद्ध लावण्यात येत आहे, अशा समजुतीनें सिंह मनात म्हणतो—" हें युद्ध म्हणजे अपमानाचें युद्ध होणार ! हरिण काय माझ्याशी तुल्यबळ ? " असा विचार करून मानी सिंह हरिणापासून पळ काढतो. !

●●●

शिखरिणी

कदाचित्पाञ्चाली विपिनभुवि भीमेन बहुश
कृशाङ्गि श्रान्ताऽसि क्षणमिह निषीदेति गदिता ॥
शनै शीतच्छाय तटविटपिन प्राप्य मुदिता
पुर:पत्युः कामाच्छ्वशुरमियमालिङ्गति सती ॥ ३६ ॥

शार्दूलविक्रीडित

वायूचा सुत द्रौपदीस वदतो, जेव्हां थके ती वनीं—
" गे गेलीस दमून तू क्षण इथें विश्रांति घे बैसुनी ॥ "
मोदें शीतल सावली तरतळीं लाभोनिया ती तिथें
भर्त्यादेखत सासऱ्यासचि सती कामार्थ आलिंगिते !॥३६

गद्यार्थ—( विलक्षण समस्या—" ती सती कामार्थ आपल्या नवऱ्याचे देखत, आपल्या सासऱ्याला आलिंगन देते ! " )—वनवासात, चालता चालता, द्रौपदी थकलेली पाहून वायुपुत्र भीम, तिला वारवार म्हणतो, " हे कृशांगि ! दमलीस ! क्षणभर इथें बैस. " असें म्हटल्यावर मग ती द्रौपदी झाडाखाली थंड सावलीत बसून, मोठ्या हर्षानें नवऱ्याच्या देखत कामतृप्तीसाठीं सासऱ्याला आलिंगन देते ! ( भीम हा वायुपुत्र; काम, या ठिकाणीं थकवा घालविणें हा. त्यासाठीं ती वायूला ( सासऱ्याला ) आलिंगन देते—अगावर घेते असा अर्थ. )

●●●

अनुष्टुभ्

भक्ते द्वेषो जडे प्रीतिररुचिर्गुरु लङ्घनम् ।
मुखे कटुकता नित्य धनिना ज्वरिणामिव ॥ ३७ ॥

वसततिलका

भक्तांप्रती अरुचि, भक्ति जडें जडांत
मोठीच हौस गमते गुरुलंघनांत ॥
लोपे रसज्ञपण, नित्य मुखीं कटुत्व
रोग्यांत आणि धनिकांत असें समत्व ॥ ३७ ॥

गद्यार्थ—( भक्त = आपल्यावर भक्ति ठेवणारे; दुसरा अर्थ शिजविलेला भात, जड = मूर्ख, मदबुद्धि; दुसरा अर्थ जडान, अरुचि = अरसिकपणा; दुसरा अर्थ जिभेला चव नसणें. गुरुलंघन = वडिलांचा अपमान करणें, दुसरा अर्थ—दीर्घ उपवास, लंघन करणें, मुखे कटुकता = वाणी कटु वापरणें दुसरा अर्थ तोंड कडू होणें, ) श्रीमत आणि तापाचा रोगी दोघासहि भक्ताविषयीं द्वेष, जडाविषयीं प्रेम, अरुचि, गुरुलंघन करावेसें वाटणें, व मुखीं नेहमीं कटुकता, असल्यानें त्याच्यात इतकें साम्य दिसतें

●●●

अनुष्टुभ्

" भारत चेक्षुदण्ड च कलानाथ च वर्णय ! "
— कालिदासः कविर्ब्रूते " प्रतिपर्वरसावहम् " ॥ ३८ ॥

अनुष्टुभ्

" एक्या शब्देंच वर्णी तूं ऊस, चंद्र नि भारत ! "
कालिदास कवी बोले— " प्रतिपर्वरसप्रद " ॥ ३८ ॥

गद्यार्थ—" महाभारत, ऊस आणि चद्र या तिघांचेंही समर्प कपणें एकाच शब्दात वर्णन कर पाहू " असे ( बहुधा भोजानें ) सांगितल्यावर कालिदास कवि म्हणतो, " प्रतिपर्वरसप्रद " ! (—महाभारत ग्रथाच्या प्रत्येक पर्वात रस आहेच; उसात प्रत्येक पेऱ्यात रस आहे. चद्र प्रत्येक पर्वकाळीं कल्याणकारक आहे.)

●●●

आर्या

" चतुरः सखि मे भर्ता
स यल्लिखति तत्परो न वाचयति ॥ "
" तस्मादप्यधिको मे
स्वयमपि लिखित स्वय न वाचयति " ॥ ३९ ॥

आर्या

" चतुरचि सखि ! मम पति, तो
लिहितो तें कुणि दुजा न वाचुं शके ! "
" चतुर तयाहुनि मम गे,
स्वतां लिही तें स्वतां न वाचुं शके ! " ॥ ३९ ॥

गद्यार्थ—( लग्न झालेल्या दोन मैत्रिणी आपली अक्कल पाजळतात ! ) एक म्हणते " सखे ! अग माझे यजमान मोठे चतुर ! ते जें लिहितात तें दुसरें कोणीच वाचू शकत नाहीं.—" दुसऱ्या सखीला तिच्या वरचढ करावीशी वाटली. ती म्हणते " अग तुझ्याहून माझे यजमान अधिकच चतुर ! कारण ते लिहितात तें स्वतःच वाचू शकत नाहींत ! "

●●●

अनुष्टुभ्

उष्ट्राणां लग्नवेलायां गर्दभाः स्तुतिपाठकाः ।
परस्परं प्रशंसन्ति "अहो रूपं ! अहो ध्वनिः !" ॥४०॥

अनुष्टुभ्

उंटांच्या लग्नवेळेला गाती गाढव हे स्तुति ।
"काय रूप! ध्वनी कैसा!" एकमेकांस वानिती ॥४०॥

गद्यार्थ—उंटाच्या लग्नप्रसंग ! गाढव स्तुतिपाठक ! उंटाचें रूप पाहून गाढव म्हणतो " अहाहा ! काय तुझं रूप ! " तेव्हां परस्पर प्रशंसा पुरी करण्यासाठीं उंट म्हणतो " अहाहा ! काय गोड तुझा ध्वनि ! "

●●●

उपजाति

कश्चिद्बटुर्दर्भपवित्रपाणिर्वने सदा सिञ्चति बालचूतान् ॥
आम्राश्च सिक्ताः पितरश्च तृप्ता एका क्रिया द्व्यर्थकरी बभूव

उपजाति

वटू कुणी घेउन दर्भ हातीं
बालाम्र शिंपी खुजलें वनान्तीं ॥
शिंपून आंबे, पितरांस तृप्ति
एक क्रिया द्व्यर्थचि जाहली ती ॥ ४१ ॥

गद्यार्थ—कोणी एक बटु पितृतर्पण करावयाचें तें घरात न करता, रानात आम्र्याच्या रोपापाशीं करावयाचा. हातीं दर्भ घेऊन, हात पवित्र करून, तें पाणी शिंपल्यामुळें, एकीकडे आम्र्याचें शिंपणेंहि झालें, इकडे पितराचें तर्पणहि होऊन, एकच क्रिया दोन अर्थ साधणारी झाली.

इन्द्रवज्रा

इन्दीवराक्ष्याः स्फुटविद्रुमोष्ठ्या सङ्केतमुद्दिश्य वने चरन्त्याः ।
चौराः समस्ताभरणानि हृत्वा नासामणिं नापहरन्ति चित्रम्

शार्दूलविक्रीडित

डोळे नीलचि पद्म, विद्रुमपरी ते ओष्ठही लालसे
संकेतस्थळिं कामिनी कुणि अशी रानीं जधीं जातसे ॥
चोरांनीं लुटिले तिचे इतर जे सारे अलंकार ते
नेला स्पर्श न त्या नथेसचि परी; आश्चर्य हें वाटतें॥४२॥

गद्यार्थ—नीलकमलासारखे डोळे असलेली, उमललेल्या पोवळ्यासारखे लालचुटुक ओठ असलेली अशी कोणी अभिसारिका, एकटीच, रानातून संकेतस्थळीं जात असता, चोरांनीं तिच्या अंगावरचे इतर सर्व अलंकार हरण केले पण केवळ नाकातली नथ तेवढी लुटली नाहीं हें केवढें आश्चर्य ! ( कारण वरून नीलकमलाप्रमाणें नेत्रांचीं नील ( काळीं ) किरणें व खालून ओठाचीं लाल किरणें पडल्यानें नथेंतील मोतीं हे गुंजासारखे त्यांना वाटले ! ह्यासारखीच कल्पना प्रकरण २७ श्लोक ३२ यात आली आहे. )

●●●

वसंततिलका

आनन्दताण्डवपुरे द्रविडस्य गेहे
चित्रं वसिष्ठवनितासममाज्यपात्रम् ॥
विद्युल्लतेव परिनृत्यति तत्र दर्वी
धारा विलोकयति योगबलेन सिद्धः ! ॥ ४३ ॥

वसंततिलका

आनंदतांडवपुरीं द्रविडाघरीं तें
'मोठें' अरुंधतिपरी घृतपात्र होतें ॥
नाचे पळी जणुं विजेसम ती तयांत
धारा बघूं शकतसे कुणि योगसिद्ध ॥ ४३ ॥

गद्यार्थ—आनंदतांडव ( आनंदाची ल्यलूट असलेल्या ) नगरींत, एका द्राविड ब्राह्मणाच्या घरीं, महा विलक्षण असें वसिष्ठाच्या पत्नीच्या ( अरुंधतीच्या ताऱ्याच्या ) आकाराचें तुपाचें भांड ( अरुंधतीचा तारा अतिसूक्ष्म, उत्तम दृष्टि असेल त्यालाच दिसू शकणारा ) होतें ! त्याच्यात, ( अर्थातच त्याहून सूक्ष्म अशी ) पळी विजेसारखी ( चपलतेनें व खुडखुड फडकडाट करीत, ) नाचत होती, आणि ( ती मरून गृहिणीनें ) तुपाची धार ( अन्नावर ) घातली तर ती दिसू शकण्याची शक्ति योगसिद्ध पुरुषामच होती !

●●●

इंद्रवज्रा

स्वर्गापगायास्तरलैस्तरङ्गैः पौराङ्गनानां कुटिलैः कटाक्षैः ।
धर्मश्च कामश्च समेत्य तीरे ह्यन्योन्यमायोधनमारमेते ॥४४॥

शार्दूलविक्रीडित

गंगास्नान करावयास जमती तीरीं जधीं सुंदरी
तेव्हां धर्म नि काम तेथ लढती, वाटे असें अंतरीं ! ॥
गंगाशीततरंग सोज्ज्वल असें तें शस्त्र धर्माकरीं
स्त्रीचे वक्र कटाक्ष शस्त्र म्हणुनी तें कामही वापरी॥

गद्यार्थ—( गंगानदीवर स्नान करायला, जेव्हा, सुंदर स्त्रिया जमतात, तेव्हा, ) तेथें, तीरावर, धर्म आणि काम हे परस्पराशीं युद्ध खेळतात. गंगेचे शीतल तरल तरंग हें सोज्ज्वल शस्त्र धर्माच्या हातीं असतें ! आणि त्या नागर सुंदरींचे कुटिल कटाक्ष, हें मोहनास्त्र, कामाच्या हातीं असतें ! ●●●

शार्दूलविक्रीडित

साक्षीकृत्य महेश्वरं सगिरिजं स्वर्गापगायास्तटे
प्राणानां शरणं कलेवरधनं न्यासीकृतं सज्जनैः ॥
भूयो भूरितरैरुपायनिकरैः संप्रार्थ्यमाना तु या
दातुं नेच्छति सा नु किं मुनिवरैःकाशी सुधन्यायते? ॥४५॥

शार्दूलविक्रीडित

साक्षी ठेवुनि पार्वती शिव, तटीं गंगेचिया, सज्जन
प्राणाधार असें शरीरधन हें, येती जधीं ठेवुन ॥
मागोनी विनवून तें पुनरपी, देईच ना जी कधीं
ती काशी, न कळे सुधन्य म्हणती कां हे मुनी मंदधी॥

गद्यार्थ—( गंगाकाठीं देह ठेवून प्राण सोडणारांना पुन जन्म नाहीं, पुन्हा देह नाही, या काशीक्षेत्राच्या पुण्यदायित्वाची व्याजनिंदात्मक स्तुति ! ) शंकर पार्वतीला साक्ष ठेवून, गंगेच्या तटीं, प्राणाचें आधार असें स्वशरीरधन, विचारे सज्जन ठेव म्हणून ठेवून येतात. आणि मग नाना विनवण्या करून सुद्धा, जी काशी नगरी ती ठेव ज्याची त्याला परत देण्याची गोष्ट सुद्धा काढीत नाहीं, अशा ( ठेवबुडव्या ) काशीला, "धन्य धन्य" म्हणून मुनिवर का नावाजतात तें कळत नाहीं ! ●●●

मंदाक्रान्ता

एका भार्या प्रकृतिमुखरा चञ्चला च द्वितीया
पुत्रस्त्वेको भुवनविजयी मन्मथो दुर्निवारः ॥
शेषः शय्या शयनमुदधौ वाहनं पन्नगारिः
स्मारं स्मारं स्वगृहचरितं दारुभूतो मुरारिः ॥ ४६॥

आर्या

"जात्या एक बडबडी,
दुसरी चंचल, अशा मला पत्नी !
सुत अवखळ एकचि जो
बसला साऱ्या जगास जिंकोनी ॥
शय्या शेष, समुद्रीं
निजणें, वाहन भुजंगरिपु गरुड !"
विष्णु स्वगृहसुखा या
स्मरुनी स्मरुनीच होइ लांकूड ॥ ४६ ॥

गद्यार्थ—( जगन्नाथपुरीच्या देवळात विष्णूची मूर्ति लाकडाची आहे. ती लाकडी का या विषयीं विनोद. ) एक बायको जात्या बडबडी ! ( सरस्वती ); दुसरी चंचल ! ( लक्ष्मी ). एक मुलगा ( मदन ), पण तो मोठा अवखळ, बसला जग जिंकून ! ( असला उपद्व्यापी ! ) शय्या म्हणावी तों शेषनागाची ! शयन मंदिर म्हणे समुद्र ! वाहन भुजगरिपु गरुड ! असलें हें स्वतःचें गृहसौख्य (!) आठवून आठवून विष्णु लाकूड झाला ! ●●●

अनुष्टुभ

कमले कमला शेते हरः शेते हिमालये ।
क्षीराब्धौ च हरिः शेते मन्ये मत्कुणशङ्कया ! ॥ ४७ ॥

अनुष्टुभ्

कमलांत निजे लक्ष्मी हिमाद्रीवर शंकर ।
ढेकणांच्या भयें, वाटे, विष्णु क्षीरोदधीवर ॥ ४७ ॥

गद्यार्थ— लक्ष्मी कमलात निजते, शंकर हिमालयावर निजतो, विष्णु क्षीरसागरावर निजतो — या सर्वांचें कारण, मला वाटतें, ढेकणाची भीति ! ●●●

अनुष्टुभ्

इक्षुदण्डास्तिलाः शूद्राः कामिनी हेम मेदिनी ।
दधि चन्दनताम्बूले मर्दनं गुणवर्धनम् ॥ ४८ ॥

अनुष्टुभ्

ऊंस, तीळ, दहीं, शूद्र, माती सोनें नि कामिनी ।
विडा, चंदन— सर्वांचे वाढती गुण मर्दुनी ॥ ४८ ॥

गद्यार्थ— ऊस व तीळ खूप पिळल्यानें, दहीं खूप घुसळल्यानें, शूद्राला खूप धाकात ठेवल्यानें, कामिनी निर्दय रतिपीडेनें, सोनें खूप ठोकल्यानें, माती खूप तिंबल्यानें, चंदन खूप उगाळल्यानें, तांबूल खूप चर्वणानें आपापले गुण ( गोडी, तेल, कार्यकरत्व, सुखदायित्व, सु–वर्ण, त्वचीकपणा, नवनीत, सुगंध, रंग ) अधिकाधिक प्रकर्षानें दाखवितात ( गुण–संस्कृतच्या क्रमानें ) ●●●

अनुष्टुभ्

लेखनी पुस्तकं रामा परहस्ते गता गता ।
कदाचित्पुनरायाता भ्रष्टा भ्रष्टा च चुम्बिता ॥४९॥

वसंततिलका

**स्त्री, लेखनी समचि पुस्तक, ही त्रयीही**
**जातां दुज्याकरिं, मिळे न पुन्हां कधींही ॥**
**भाग्यें कधीं परत ती जर कां मिळेल**
**पाडून कुस्करुनि चुंबित ती असेल ॥ ४९ ॥**

गद्यार्थ—स्त्री, लेखणी आणि पुस्तक या तिन्ही वस्तु अशा आहेत, कीं, एकदा त्या परक्याच्या हातीं गल्या, की गेल्याच ! यदा कदाचित् त्या परत आल्याच तर भ्रष्टविलेल्या [पाडलेल्या] कुस्करलेल्या [ निष्काळजीपणें वापरलेल्या ] आणि चुंबित च असावयाच्या ! ●●●

अपह्नुतीचें एक उदाहरण—

शार्दूलविक्रीडित

" या पाणिग्रहलालिता, सुसरला, तन्वी, सुवंशोद्भवा
गौरी, स्पर्शसुखावहा गुणवती नित्य मनोहारिणी ॥
सा केनापि हृता; तया विरहितो गन्तु न शक्तोऽस्म्यह ! "
" रे भिक्षो ! तव कामिनी ? " " न हि न हि ! प्राणप्रिया यष्टिका ! " ॥ ५० ॥

शार्दूलविक्रीडित

**" जी हस्तें कुरवाळिली, सरल जी तन्वी सुवंशांतली**
**गोरी, अन् गुणवान् , मनोहर सुखस्पर्शा सदा लाभली**
**नेली ती कुणिशी ! तिच्याविण न मी जाऊं शकें सत्वर ! "**
**" कां भिक्षो ! तव कामिनी ? " " न च तसें; काठी मिया सुंदर ! " ॥ ५० ॥**

गद्यार्थ—( अपह्नुति म्हणजे लपवालपवी. या श्लोकात कुण्या वृद्ध भिक्षूला पूर्वाश्रमींच्या कामिनीची ओढ लागली व तिचा विरह कमा असह्य झाला आहे--याचें तो वर्णन करतो; पण तें अशा खुबीन कीं सर्व शब्द द्व्यर्थी वापरून तेंच वर्णन हातात धरायच्या काठीचें होऊ शकतें.) (अशाच तऱ्हेची लपवालपवी प्रकरण २९ मधील १३ वा श्लोक जो " समये पयोधराणां " यातहि आहे. ) काठी आणि कामिनी दोन्ही पाणिग्रहलालिता म्हणजे हाताने कुरवाळून लाडावलेल्या; काठी आकारानें सरळ, कामिनी स्वभावान सरळ, तन्वी म्हणजे सडपातळ; दोन्हीकडे; काठी सुवंशोद्भवा म्हणजे चागल्या बाबूची; कामिनी चागल्या कुळांतली; दोन्ही गोऱ्या, दोन्ही स्पर्शाला सुखकर; काठी गुणवती म्हणजे सरळ धागे असलेली (गांठाळ नसलेली.) कामिनी चांगल्या गुणाची; दोन्ही मनोहारिणी; भिक्षु म्हणतो "—अशी अशी ती माझी—कुणीतरी नेली ! तिच्याबाचून मी हालू फिरू शकत नाहीं. " शेजारचा विचारतो " काय भिक्षुबुवा ! बरेच रंगेल दिसता कीं ! काय कामिनीची आठवण आली वाटतें ? " भिक्षु म्हणतो " छे, छे, तसें नव्हे ! माझ्या प्राणप्रिय काठीविषयीं मी बोलतों आहे ! " ●●●

## प्रहेलिका. श्लोक ५१ ते ५५

मराठींत ज्याला आपण कोडी किंवा उखाणे म्हणतों तोच प्रकार संस्कृतमध्य प्रहेलिका या नावान ओळखला जातो. मराठी प्रमाणेंच काहींतरी विलक्षण, कधी द्व्यर्थी, शब्दानीं उखाणा घातला जातो. त्यामुळें जशी कोटि, श्लेष, त्याप्रमाणें प्रहेलिकांचेहि भाषांतर करणें कठीण. प्रयत्न केला आहे—

अनुष्टुम्

नरनारीसमुत्पन्ना सा स्त्री देहविवर्जिता ।
अमुखी कुरुते शब्दं जातमात्रा विनश्यति ॥५१॥

अनुष्टुभ्

**नरनारींतुनी जन्मे - त्या स्त्रीला देहही नसे ।**
**नाद काढी मुखावीण, जन्मतां नष्ट होतसे ' ॥५१॥**

गद्यार्थ—( उत्तर चुटकी ) आंगठा हा पुरुष व मध्यमा ही स्त्री या दोन बोटांपासून हिचा जन्म होतो. हिला देहच नसतो; हिला तोंड नसताना ही ध्वनि काढते आणि जन्मताच नष्ट होते ! ●●●

अनुष्टुभ्

एकचक्षुर्न काकोऽय बिलमिच्छन्न पन्नग. ।
क्षीयते वर्धते चैव न समुद्रो न चन्द्रमाः ॥५२॥

अनुष्टुभ्

**एकाक्ष, परि ना काक, इच्छी बिळ, न सर्प तो ।**
**वाढे झडे तरीही न चंद्र वा न समुद्र तो ॥५२॥**

गद्यार्थ—एकच डोळा असून कावळा नव्हे; बिळात राहे पण सर्प नव्हे; कमी होणें व वाढणें चालू असूनहि समुद्र नव्हे किंवा चंद्र नव्हे ! ( उत्तर -- शाईची दौत ) ●●●

अनुष्टुभ्

**कृष्णवक्त्री न मार्जारी द्विजिह्वा न च सर्पिणी ।**
**पञ्चभर्त्री न पाञ्चाली यो जानाति स पण्डितः ॥५३॥**

वसंततिलका

काळें हिचें मुख असे परि मांजरी न
नागीण ही न; जिभल्या जरि हीस दोन ॥
ही द्रौपदी न, नवरे जरि पांच हीतें
होईल पंडितचि उत्तर येइ ज्यातें ॥ ५३ ॥

गद्यार्थ—काळं तोंड आहे पण मांजरी नाही; दोन जिभा आहेत पण नागीण नाहीं, पांच नवरे आहेत पण द्रौपदी नाहीं.. याचें उत्तर देईल तो पंडित. (उत्तर लेखणी) ●●●

उपजाति

वृक्षाग्रवासी न च पक्षिराजस्त्रिनेत्रधारी न च शङ्करोऽयम् ।
त्वग्वस्त्रधारी न च सिद्धयोगी जलं च बिभ्रन्न घटो न मेघः ॥

उपजाति

वृक्षाग्रिं राहे तरि पक्षि हा न
न धूर्जटी, या जरि नेत्र तीन ॥
योगी न हा, वल्कल पांघरून
पोटांत पाणी, घट, मेघ, वा न ॥५४॥

गद्यार्थ—झाडाच्या शेंड्यावर राहतो पण पक्षी नाहीं, तीन डोळे आहेत पण शंकर नाही; वल्कलें नेसतो पण योगी नाहीं, पोटात पाणी पण घट नाहीं किंवा मेघ नाहीं ! (उत्तर–अशोल्या नारळ) ●●●

शार्दूलविक्रीडित

सर्वस्वापहरो न तस्करगणो, रक्षो न रक्ताशन
सर्पो नैव बिलेशयोऽखिलनिशाचारी न भूतोऽपि च ॥
अन्तर्धानपटुर्न सिद्धपुरुषो नाप्याशुगो मारुत-
स्तीक्ष्णास्यो न तु सायकस्तमिह ये जानन्ति ते पण्डिताः ॥

शार्दूलविक्रीडित

सर्वस्वापहरी, न चोर, पिउनी घे रक्त, ना राक्षस
नोहे सर्प, बिलस्थ, भूत न, जरी हा संचरे रात्रिस ॥
अंतर्धानपटू, न सिद्ध परि हा, ना वेगवान् मारुत
आहे तीक्ष्णमुखी, न बाण, उमजे जो यास तो पंडित५५

गद्यार्थ—सर्वस्वापहरी याचे दोन अर्थ; चोराकडे–सर्वस्वाचें अपहरण करणारा; ढेंकणाकडे –सर्व स्वाप म्हणजे झोंप हरण करणारा. हा सर्वस्वापहर आहे तरी चोर नव्हे. रक्त पितो पण राक्षस नव्हे, बिळात राहतो पण सर्प नव्हे; रात्रीं संचार करतो पण भूत नव्हे; अंतर्धान पावण्यात (दिसेनासा होण्यात) पटाईत पण योगी नव्हे, वेगानें धावतो पण वारा नव्हे; तीक्ष्ण तोंडाचा पण बाण नव्हे, अशा याला जो ओळखील तो पंडित.
(उत्तर– ढेंकूण; वर आलेंच आहे,) ●●●

## कृष्ण–गोपी. श्लोक ५६ ते ६२

या विभागातील पहिले दोन श्लोक थोडे शृंगारिक असले तरी पुढील चार श्लोकात अर्थचमत्कृति असल्यानें या प्रकरणात घातले आहेत.

मन्दाक्रान्ता

*नोष्णश्वासं वलयसि न वा गण्डयोः पाण्डिमानं*
*दृष्टे वस्तुन्यपि च भजसि प्रत्यभिज्ञामभिज्ञा ॥*
*कौलं धर्मं वहसि बहलं तद् ध्रुवं नन्दसूनो—*
*र्वंशीनादस्तव न सरले श्रोत्रदेशं प्रविष्टः ॥५६॥*

शार्दूलविक्रीडित

उष्णश्वास तुझा न येइ, न दिसे पंडुत्व गालांवरी
वस्तू जी बघतेस, ओळखिसि ती तू नीट सुज्ञेपरी ॥
अद्यापी कुलधर्म पाळिसि, तयें ही निश्चिती कीं, कधीं
कृष्णाचा मृदु वेणुनाद तुझिया गेला न कर्णामधीं ॥५६॥

गद्यार्थ— हे गोपी, तुझा श्वास उष्ण येत नाहीं, गालावर पडुता आलेली दिसत नाहीं, कोणतीहि वस्तु पाहिलीस, कीं, ती तू शहाण्यासारखी ओळखू शकतेस, कुलधर्म अजून नीट पाळीत आहेस, या सर्व लक्षणावरून हे मोळे ! निश्चितपणें असे म्हणतां येतें, कीं, अजून नंदकुमार कृष्णाचा मुरलीनाद, तुझ्या कानीं, पडलेलाच नसावा ! (तो पडता तर तुझी स्थिति घरच्याहून विपरीत पुढील श्लोकातल्यासारखी व्हायलाच हवी होती !) ●●●

पृथ्वी

मुहुः स्खलति नीविका पुलकिना च गण्डस्थली
दृशोरपि कृशोदरि स्फुरति रीतिरन्यादृशी ॥
वचोऽपि तव गद्गदं स्फुरदमन्दचन्द्रानने !
मुरारिमुरलीरवः कथय किं समाकर्णितः ! ॥ ५७॥

शार्दूलविक्रीडित

**होई नीवि तुझी ढिली कितिकदां, रोमांच गंडस्थळीं**
**नेत्रांची तव, हे कृशोदरि ! दिसे मातें तऱ्हा आगळी ॥**
**वाणीही तव पूर्णचन्द्रवदने ! झाली किती गद्गद**
**कानीं मोहनवेणुनाद तुझिया आला खरा कां वद ?॥**

गद्यार्थ—( श्लोक ५६ मध्यें कृष्णाचा वेणुनाद ऐकण्या-पूर्वीची गोपीची अवस्था वर्णिली. या श्लोकात वेणुनाद ऐकतांच ती कशी पालटते ते पहा--) हे कृशोदरि, हे पूर्णचन्द्रवदने गोपी ! तुझ्या वस्त्राच्या निऱ्या वारवार ढिल्या पडत आहेत; गालांवर रोमांच उभे राहिले आहेत; तुझ्या नेत्राची रीत काहीं निराळीच दिसूं लागली आहे --( सर्व ध्यान त्या वेणुनादाकडे एकत्रित झाल्यानें दृष्टि शून्य होऊन, पाहिलेलें न पाहिल्यासारखे होत आहे. ) तुझी वाणीहि किती गद्गद झाली आहे, तेव्हां सांग पाहू, कृष्णाचा मुरलीनाद तुझ्या कानीं पडला, ( व त्यामुळें तूं अशी बावरी झालीस ) हें खरें ना ? ●●●

आर्या

" किं द्रुतपदं प्रयासि प्रतीच्छ मुग्धे च्युतं ह्यलङ्कारम् । "
" मृगयाम्यच्युतमेव भ्रष्टैरेतैर्न मे हानिः ॥ ५८ ॥ "

आर्या

**" कां त्वरित जासि मुग्धे ?**
**च्युत भूषण तवचि घेइ उचलोनी । "**
**" अच्युतची शोधी मी !**
**गळलीं हीं तर मुळीं न मम हानि " ॥ ५८ ॥**

गद्यार्थ—( घाईघाईत कृष्णाकडे जाताना गोपीचा अलकार गळून पडला – तो उचल म्हणून सागितलें तरी ती तो न उचलता, तशीच घाईत पुढे जाण्याचें कारण सागते. ) " हे मुग्धे गोपी ! इतक्या त्वरेनें कुठे चाललीस ? तुझा अलकार च्युत झाला ( जमीनीवर गळला ) तो उचल ! " ती म्हणते, " मी आता प्रत्यक्ष अच्युतच शोधीत आहें तेव्हा अलकार च्युत झाल्यानें माझी काय हानि ? " ●●●

आर्या

तप्तं कैः कैर्न तपः फलितं तद्गोपबालिकानां तु ।
लोचनयुगले यासामञ्जनमासीन्निरञ्जनं ब्रह्म ॥ ५९ ॥

आर्या

**तप कुणिकुणी न केलें ? गोपींचें मात्र तें फळा आलें ।**
**ब्रह्म निरंजन, अंजन ज्यांच्या नयनीं सदैव तें झालें ॥**

गद्यार्थ—आजवर तप कुणी कुणी केलें नाहीं ? पण गोपींचें मात्र तप फळाला आलें. त्यांच्या डोळ्यात प्रत्यक्ष निरंजन ब्रह्म (श्रीकृष्ण) हेंच अंजन झालें ! ( गोपीच्या डोळ्यांना कृष्णा-वाचून दुसरें काहीं दिसेना. कृष्ण हाहि काळा ! तो काजळ ( अंजना ) इतका डोळ्याशीं एकजीव झाला. पण कृष्ण हा ब्रह्मच ! आणि ते तर पूर्ण शुद्ध ( निरजन. ) तेव्हां निरंजन ( दुसरा अर्थ काजळ विरहित. ) हेंच अंजन ( काजळ ) होणें याला म्हणतात खरी तपश्चर्या ! ती केवळ गोपींची ! ) ●●●

आर्या

लोभाद्वराटिकानां विक्रेतुं तक्रमक्रममटन्त्या ।
लब्धो गोपकिशोर्या मध्येरथ्यं महेन्द्रनीलमणिः ॥ ६० ॥

आर्या

**कवड्यांच्या लोभानें ताक विकाया यथेष्ट भटकोनी ।**
**गवसे गोप मुलीला भरमार्गातचि महेन्द्रनील मणि ! ॥ ६०**

गद्यार्थ—ताक विकून कुठे थोड्याशा कवड्या मिळविण्या-साठीं गावभर वणवण भटकत असलेल्या गोपमुलीला, ( काय चमत्कार ! ) भर रस्त्यातच ( विश्व मोलाचा ) इंद्रनीलमणि ( कृष्ण ) सापडला ! ●●●

आर्या

रूपारुचिं निरसितु रसयन्त्या हरिमुखस्य लावण्यम् ।
शिव ! शिव ! सुदृशः सकले जाता सकलेवरे जगत्यरुचिः ! ॥ ६१ ॥

आर्या

**रूपारुचि घालविण्या हरिमुखलावण्य चाखितां चित्तीं–**
**शिव ! शिव ! गोपिस झाली निजतनुसह सकल जगतिं अप्रीति ॥ ६१ ॥**

गद्यार्थ—( रूपारुचि = सौंदर्याविषयीं अरुचि; लावण्याचे अर्थ दोन; एक लवणयुक्त खारा पदार्थ. ( तोंडाची अरुचि घालविण्यासाठीं चरचरीत खारट पदार्थ आपण चाखतों; ) लावण्याचा दुसरा अर्थ सौंदर्य. ) जगांत अनेक तऱ्हेतऱ्हेचीं सौंदर्ये पाहून एका गोपीला रूपाविषयीं अरुचि उत्पन्न झाली; ती घालविण्यासाठीं ( खारट पदार्थ म्हणून ) ती कृष्णमुखरूपी लावण्य चाखून पाहूं लागली; तों ( मिटानें चव येण्याऐवजीं चवच गेली असा चमत्कार होऊन ) तिला शिव ! शिव ! स्वतःच्या देहासह सर्व जगाविषयींच अरुचि उत्पन्न झाली. ( कृष्णमय होऊन तिला वैराग्य प्राप्त झाले ! ) ●●●

आर्या

कस्मै किं कथनीयं ? कस्य मनःप्रत्ययः कथं भवति ? ।
रमयति गोपवधूटी कुञ्जकुटीरे परं ब्रह्म ! ॥ ६२ ॥

आर्या

काय कुणा सांगावें ? कुणास खात्री पटेल वदतां तें ?
कुंजीं पूर्णब्रह्मा क्षुद्र अशी गोपिकाहि रजवितें ! ॥ ६२ ॥

गद्यार्थ—कुणाला काय सांगावें ? आणि सांगितलें तर कोणाची कशी खात्री पटणार ? (पण सांगितल्याविना राह-वतच नाहीं, कारण चमत्कारच तो तसा आहे कीं–) एक क्षुद्र गोपी कुंजामध्यें शुध्द ब्रह्माला (कृष्णाला) खेळवीत, रमवीत आहे !

●●●

---

# प्रकरण ४२ वें

---

## बाल्य, किशोरावस्था, तारुण्य, वार्धक्य–

वसन्ततिलका

आलक्ष्यदन्तमुकुलाननिमित्तहासै–
रव्यक्तवर्णरमणीयवचःप्रवृत्तीन् ॥
अङ्काश्रयप्रणयिनस्तनयान्वहन्तो
धन्यास्तदङ्गरजसा मलिनीभवन्ति ॥ १ ॥

वसंततिलका

हासे उगाच दिसतात हळूच दात
अस्पष्ट, अर्थ न, असे मधु बोल येत ॥
इच्छी निजांक, असला शिशु खेळवीत
त्याच्या मळें मलिन, ते जगिं धन्य होत ॥ १ ॥

गद्यार्थ—ज्या बालकाच्या अकारण हास्यानें, दातांच्या कळ्या हळूच दिसून पडत आहेत, अस्पष्ट, बोबडे अर्थहीन असे अत्यंत कर्णमधुर कांहीं बोल तोंडांतून येत आहेत, मांडीवर बसण्यासाठीं जो आसुसला आहे, अशा बालकाला अंगावर खेळवीत, जे त्याच्या अंगाच्या मलानें मलीन होतात ते धन्य ! (शाकुंतलांतील या कालिदासीय प्रसिद्ध श्लोकाच्या वाचनानें त्यांतील सुंदर स्वभावोक्तीची प्रतीति येऊन, एक जर्मन महा पंडित, गटे, हर्षभरानें नाचूं लागला, असें सांगतात !)

●●●

अनुष्टुभ्

दिग्वाससं गतव्रीडं जटिलं धूलिधूसरम् ।
पुण्याधिका हि पश्यन्ति गङ्गाधरमिवात्मजम् ॥ २ ॥

वसंततिलका

स्वच्छंद वर्तन, सदा तनु वस्त्रहीन
झाला जटाळ, नि धुळींत भुरा मळून ॥
ऐसें शिवासमचि दर्शन बालकाचें
भाग्यीं वसे, करिति पुण्य अशा नराचे ॥ २ ॥

गद्यार्थ— अंगावर वस्त्र नाहीं, लाजेची जाणीवच नाहीं, असें स्वच्छंद वर्तन, केस जटाळलेले आहेत– धुळीनें अंग भुरकटलेलें आहे असें शंकरासारखें 'ध्यान' आपल्या मुलाचें ज्यांना पाहण्यास मिळतें ते महापुण्यवान् !

●●●

पृथ्वी

क्षणं सरलवीक्षणं क्षणमपाङ्गसवीक्षणं
क्षणं रजसि खेलनं क्षणमतीव भूपादरं ॥
क्षणं द्रुततरा गतिः क्षणमतीव मन्दा गतिः
क्षणक्षण-विलक्षणं जयति चेष्टितं शुभ्रुवः ॥ ३ ॥

पृथ्वी

**क्षणीं सरल पाहणें– क्षणि कटाक्षही टाकणें**
**क्षणीं धुळिंत खेळणें– क्षणि तनूस शृंगारणें ॥**
**क्षणीं त्वरित धांवणें, क्षणि सुमंदही चालणें**
**क्षण क्षण किशोरिचें किति विचित्र हें वागणें ॥ ३ ॥**

गद्यार्थ— क्षणांत सरळ पाहील तर दुसऱ्याच क्षणीं कटाक्ष सोडील; क्षणांत धुळींत खेळेल तर क्षणांत नट्टापट्टा करण्यांत गर्क होईल. क्षणांत धांवत सुटेल तर क्षणांत गजगति धारण करील. अशा रीतीनें, क्षणाक्षणाला विलक्षण वाटणारें किशोरीचें वागणें मोठें मधुर असतें !

अनुष्टुभ्

सुनिर्मलाऽपि विस्तीर्णा पावन्यपि हि यौवने ।
मतिः कलुषतामेति प्रावृषीव तरङ्गिणी ॥ ४ ॥

अनुष्टुभ्

**पवित्र, स्वच्छ, विस्तीर्ण, असुनी मानवी मति ।**
**गढूळ होइ तारुण्यीं—पावसाळी जशी नदी ॥४॥**

गद्यार्थ—मानवाची बुद्धि, ( मूलतः नदीसारखी ) पवित्र स्वच्छ, व, विस्तीर्ण असते, तरी, ( तारुण्य हा जीवनाचा जणूं पावसाळाच असल्यानें— ) पावसाळ्यांत जशी नदी, तशीच, तारुण्यांत बुद्धि, गढूळ होते.

आर्या

गरिमाणमर्पयित्वा लघिमानं कुचतटात्कुरङ्गदृशाम् ।
स्वीकुर्वते नमस्ते यूनां धैर्याय निर्विवेकाय ॥ ५ ॥

आर्या

**स्त्रीकुच बघुनिच अर्पिति महिमा, लघुतेस घेति लाचार**
**त्या तरणांच्या धैर्या अविवेकाही असो नमस्कार ॥ ५ ॥**

गद्यार्थ—हरिणाक्षीचे कुच पाहूनच, जे तरुण, स्वतःचा 'मोठेपणा' त्यांना अर्पण करून, 'लघुपणा' स्वीकारतात ( लाचार होतात ) त्यांच्या धैर्याला आणि अविवेकाला नमस्कार असो !

उपजाति

अर्थो नराणां पतिरङ्गनानां स्वधर्मचारी नृपतिः प्रजानाम् ।
वर्षा नदीनामृतुराट् तरूणां गतं गतं यौवनमानयन्ति ॥६॥

उपजाति

**नरांस संपत्ति पति स्त्रियांनां**
**राजा स्वधर्मी रत तो प्रजांना ॥**
**वर्षा नद्यांना, तरूंना वसंत**
**गेलें पुन्हां यौवन आणितात ॥ ६ ॥**

गद्यार्थ—संपत्तिलाभ हा पुरुषाला, पतिलाभ हा स्त्रीला, स्वधर्मानें चालणारा राजा हा प्रजेला, पावसाळा हा नद्यांना, वसंतऋतु वृक्षांना, एकदा निघून गेलेलें तारुण्यसुद्धां, पुन्हां आणून देतात.

वंशस्थ

किमित्यपास्याभरणानि यौवने
धृतं त्वया वार्धकशोभि वल्कलम् ? ॥
वद प्रदोषे स्फुटचन्द्रतारका
विभावरी यद्यरुणाय कल्पते ? ॥ ७ ॥

इंद्रवज्रा

**कां यौवनीं टाकुनि भूषणांस**
**वृद्धेपरी नेससि वल्कलास ? ॥**
**तारे शशी स्पष्ट अशा प्रदोषीं**
**होई कधीं सांग पहाट खाशी ? ॥ ७ ॥**

गद्यार्थ—( भर तारुण्यांत पार्वती तपस्विनी झाली तिला पृच्छा. ) भर तारुण्यांत अलंकार घालावयाचे ते सोडून, तूं म्हातारपणाला शोभणारें वल्कल कां धारण केलें आहेस ! तारे चंद्र स्पष्ट दिसताहेत अशा भर रात्रींच कधीं पहाटेचा अरुणोदय होतो कां सांग. ( अलंकार हे चंद्र तारकांप्रमाणें. प्रदोष हें भर तारुण्य; वल्कल अरुण रंगाचें. अशी सुंदर पूर्णोपमा. )

शिखरिणी

गतं तत्तारुण्यं तरुणिहृदयानन्दजनकं
विशीर्णा दन्तालिर्निजगतिरहो यष्टिशरणा ॥
जडीभूता दृष्टिः श्रवणरहितं कर्णयुगलं
मनो मे निर्लज्जं तदपि विषयेभ्यः स्पृहयति ॥ ८ ॥

शिखरिणी

**युवावस्था गेली युवतिहृदया मोदकरिणी**
**गळाली दन्ताली, अवश फिरणें यष्टि धरुनी ॥**
**दिसेना डोळ्यांनीं, उभय बनले कान बहिरे**
**तरीं निर्लज्जा या मनिं विषयतृष्णा मम उरे ! ॥८॥**

गद्यार्थ—तरुणींना आनंद देईल असें माझें तें तारुण्य निघून गेलें; दंतपंक्ति गळून गेली. असहायपणें काठी धरून चालणें कपाळीं आलें! दृष्टि जड झाली. दोन्ही कानांना ऐकूं येत नाहीं! तरी निर्लज्ज माझ्या मनाचा, विषयांची हांव आहे ती आहे!

●●●

अनुष्टुभ्

वलिभिर्मुखमाक्रान्तं पलितैरङ्कितं शिर:।
गात्राणि शिथिलायन्ते तृष्णैका तरुणायते ॥९॥

अनुष्टुभ्

मुखीं सुरकुत्या भारी। केंसही पिकले शिरीं।
अंगेंहि थकलीं; तृष्णा। एकली घेइ यौवना ॥ ९ ॥

गद्यार्थ—तोंड संपूर्ण सुरकुत्यांनीं व्यापलें आहे. डोक्यावरचे केंस पिकले आहेत. सारे अवयव निःशक्त झाले आहेत—(सारें वृद्ध होत आहे) पण तृष्णा एकटी पुनः तरुण होत आहे!

●●●

अनुष्टुभ्

मलिनैरलकैरेतैः शुक्लत्वं प्रकटीकृतम्।
तद्रोषादिव निर्याता वदनाद्रदनावलिः ॥ १० ॥

अनुष्टुभ्

मलीन मम केंसांनीं शुभ्रता दाविली जधीं।
त्या रोषेंच मुखांतून गेली दंतावली तधीं ॥ १० ॥

गद्यार्थ—(केंसांचा मूळ स्वभाव काळे असण्याचा, दातांचा स्वभाव शुभ्र असण्याचा!) माझ्या या मलीन (दुष्ट; काळ्या) केसांनीं जेव्हां शुभ्रता प्रकट केली तेव्हां (आपल्या विशेषाधिकारावर त्यांनीं आक्रमण केलें म्हणून) रागावून जणूं काय तोंडांतून दातांनीं बहिर्गमन केलें!

●●●

शार्दूलविक्रीडित

गात्रं संकुचितं गतिर्विगलिता भ्रष्टा च दन्तावलि—
र्दृष्टिर्नश्यति वर्धते बधिरता वक्त्रं च लालायते ॥
वाक्यं नाद्रियते च बान्धवजनैर्भार्या न शुश्रूषते
हा! कष्टं पुरुषस्य जीर्णवयसः पुत्रोऽप्यमित्रायते ॥११॥

शार्दूलविक्रीडित

गात्रें आक्रसलीं, गतीहि थकली, दंतावलीही गळे
गेली दृष्टि नि वाढली बधिरता, हें तोंड लाळाळलें ॥
शब्दा आदरिती न बांधव कुणी, भार्या न सेवा करी
हा! हा! वृद्धपणीं स्वपुत्रहि नरा होई अमित्रापरी ॥

गद्यार्थ—अवयव आखडले, गति मंदावली, दांत गळाले, दृष्टि गेली, बहिरेपण वाढलें, तोंडातून लाळ गळूं लागली, नातेवाईक म्हातार्‍याच्या शब्दाचा आदर करीत नाहींत, बायको सेवा करीत नाहीं. हाय! हाय! वृद्धपणीं स्वतांचा पुत्रसुद्धां अमित्रासारखा वागूं लागतो!

●●●

शार्दूलविक्रीडित

अर्थाः पादरजःसमा गिरिनदीवेगोपमं यौवन—
मायुष्यं जलबिन्दुलोलचपलं फेनोपमा मेदिनी ॥
धर्मं यो न करोति निश्चलमतिः स्वर्गार्गलोद्घाटनं
पश्चात्तापयुतो जरापरिगतः शोकाग्निना दह्यते ॥ १२ ॥

शार्दूलविक्रीडित

धूळीच्या सम वित्त; यौवन गिरिस्रोतापरी शीघ्रग
पाण्याचे सम आयु चंचल, असे, फेंसापरि हें जग ॥
स्वर्गोद्घाटक धर्म निश्चलमनें ज्यानें न केला असे
पश्चात्ताप घडून वृद्धपणिं त्या शोकाग्नि जाळीतसे ॥

गद्यार्थ—संपत्ति पायापाशल्या धुळीइतक्या मोलाची, होय; डोंगरावरून खालीं वाहत येणार्‍या नदीच्या वेगानें, यौवन संपत असतें; आयुष्य, जलबिंदुइतकें चंचल; व जग हें निव्वळ फेंसाचा बुडबुडा; (असें नीट उमजून) जो मनुष्य (तारुण्यांतच) निश्चयी मनानें, स्वर्गाचें दार उघडून देणार्‍या धर्माचें, आचरण करीत नाहीं, त्याला, म्हातारपणीं पश्चात्ताप होऊन शोकाग्नि जाळीत असतो.

●●●

अनुष्टुभ्

अलङ्करोति हि जरा राजामात्यभिषग्यतीन्।
विडम्बयति पण्यस्त्रीमल्लगायकसेवकान् ॥१३॥

वसंततिलका

राजा, अमात्य, यति आणिक वैद्य यांस
वार्धक्य जें ठरत भूषणभूत खास ॥
तें होइ कारण सदैव विडंबनेस
वेश्या नि गायक नि मल्ल नि नोकरांस ॥१३॥

गद्यार्थ—राजे, अमात्य, वैद्य व यति यांना, जें वार्धक्य, अलंकारासारखें शोभून दिसतें, तेंच, वेश्या, गायक, मल्ल व नोकर यांच्या विटंबनेला कारणीभूत होतें.

●●●

वसंततिलका

आपाण्डुराः शिरसिजास्त्रिवली कपोले
दन्तावली विगलिता न च मे विषादः ॥
एणीदृशो युवतयः पथि मां विलोक्य
तातेति भाषणपराः खलु वज्रपातः ॥ १४ ॥

वसंततिलका

गालीं वळ्या पडुन, केंस भुरे बनून
जाऊन दांत न च मी बनलों विषण्ण ॥
मार्गी मृगाक्षि जधिं ती मजला बघून
'बाबा' म्हणे तधिंच वज्र पडे वरून ॥ १४ ॥

गद्यार्थ— ('पिकल्या पाना'त सुद्धा केव्हा केव्हा हिरवट 'रस' शिल्लक असतो!) माझे केंस भुरकट झाले, गालावर सुरकुत्या पडल्या, दात पडले या गोष्टीमुळे मी कधीं विषण्ण झालों नाहीं ! पण, जेव्हा का एखादी मृगनयना तरुणी, मार्गी, मला "बाबा!" म्हणून संबोधून बोलू लागते, तेव्हां मात्र, वज्र पडल्यासारखें मला वाटतें ! (मग तिने काय तुला 'सजणा' म्हणावें !)

●●●

भुजंगप्रयात

कृतान्तस्य दूती जरा कर्णमूले
समागत्य वक्तीति लोकाः शृणुध्वम् ॥
परस्त्रीपरद्रव्यवाञ्छा त्यजध्वं
भजध्वं रमानाथपादारविन्दम् ॥ १५ ॥

भुजंगप्रयात

यमाची जरादूतिका कानिं लागे
तुम्ही ऐकणें, ती जगा काय सांगे ॥
"परस्त्री परद्रव्य लोभा त्यजावें
सदा विष्णुपादारविंदा भजावें !" ॥ १५ ॥

गद्यार्थ— यमाची दूतिका वृद्धावस्था ही कानाच्या मूळाशीं येऊन (केंस पांढरे होण्यास आरंभ कानाच्या जवळून होतो.) जगाला काय सांगते, तें, हे मानवानों ! तुम्ही ध्यान देऊन ऐका ! ती म्हणते "परस्त्री व परद्रव्य यांची इच्छा सोडून आतां श्रीविष्णुपदकमलाची सेवा करा !"

●●●

शिखरिणी

निवृत्ता भोगेच्छा बहुपुरुषमानो विगलितः
समानाः स्वर्याताः सपदि सुहृदो जीवितसमाः ॥
शनैर्यष्ट्युत्थानं घनतिमिररुद्धे च नयने
अहो दुष्टः कायस्तदपि मरणापायचकितः ॥ १६ ॥

शिखरिणी

पळाली भोगेच्छा; 'पुरुष' असला गर्वहि नुरे !
जगीं या जीवाचे समगुण कुणी मित्र नुरले ॥
उठावें काठीनें हळुंच; अति अंधार नयनीं !
तरी दुष्टा देहा मरणभय हें काय म्हणुनी ? ॥ १६ ॥

गद्यार्थ— भोगाची इच्छा नष्ट झाली ! मोठा 'पुरुष' म्हणून गर्व होता तोहि गळून गेला ! जीवश्च कण्ठश्च समगुण मित्र मरामर स्वर्गाला गेले ! काठीच्या आधारानें हळूच उठायची पाळी आली ! डोळे दाट अंधारानें भरले ! तरी या चांडाळ शरीराला मरणाचें भय वाटावयाचें तें वाटतच आहे.

●●●

वैतालीय

दलिता गलिता रदावली चमरीवद्धवलीभवन्ति केशाः ।
न तथाऽपि कथा रथाङ्गपाणेः श्रवणप्रीतिकरीति मन्दरीतिः १७

वैतालीय छंद

हलली गळलीच दंतपंक्ति
चवरीच्या परि केंस शुभ्र होती ॥
न तरी श्रवणां कथा हरीची
रुचणें, ही अतिमूर्खताच साची ॥ १७ ॥

गद्यार्थ— दात हलू लागले, गळूं लागले; केंस चवरीसारखे पांढरे होऊं लागले ! तरी सुद्धा, कानांना, हरिकथाश्रवण आवडू नये, ही केवढी मूर्खपणाची गोष्ट आहे !

●●●

पृथ्वी

श्रुतिः शिथिलतां गता स्मृतिरपि प्रनष्टाऽधुना
गतिर्विपथमागता विगलिता द्विजानां ततिः ॥
गवामपि च संहतिः समुचितक्रियातश्च्युता
कृता नु जरयाऽनया कलियुगस्य साधर्म्यता ॥ १८ ॥

पृथ्वी

**श्रुती शिथिल जाहली, स्मृतिहि आजला नष्ट ती**
**गतीहि चुकली स्वपंथ, गळली द्विजांची तति ॥**
**क्रिया उचित लुप्त होउनि मलूल गोसंहति**
**जरा करुनि दाविते कलियुगासि साम्यें किती ! ॥१८॥**

गद्यार्थ— ( वार्धक्य आणि कलियुग यांचें साधर्म्य दाखविलें आहे. चार शब्द व्यर्थी; श्रुति = वार्धक्याकडे श्रवणेंद्रिय, कलियुगाकडे ऋग्वेदादि. स्मृति = वार्धक्याकडे स्मरणशक्ति; कलियुगाकडे मनुस्मृति आदि. द्विज = वार्धक्याकडे दात ( ते दोनदा जन्मतात. ) कलियुगाकडे ब्राह्मण ( हेहि जन्मानें व मुंजीनें असे दोनदा जन्मतात ) गो = वार्धक्याकडे ज्ञानेंद्रिय; ( कलियुगाकडे गाय; ) श्रुति शिथिल झाली, स्मृति नष्ट झाली, गति अडखळून-पद्ध लागली—कलियुगात माणसाची गति कुपथ धरू लागली. वार्धक्यात दात गळले. कलियुगात ब्राह्मणाचें महत्त्व गेलें. वार्धक्यात ज्ञानेंद्रियाच्या उचित क्रिया लुप्त झाल्या. कलियुगात गोपालन, गोवर्धन या बाबतींतल्या उचित क्रिया कुणी करीत नाहीं. अशा तऱ्हेनें वार्धक्य हें कलियुगाचीं कितीतरी साम्यें दाखवितें ! ●●●

आर्या

वदनं दशनविहीनं, वाचो न परिस्फुटा, गता शक्तिः ।
अव्यक्तेन्द्रियशक्तिः पुनरपि बाल्यं कृतं जरया ॥ १९ ॥

आर्या

**मुख दंतहीन, वाणी अस्फुट, बलही गळोनिया गेलें ।**
**इंद्रियशक्ति न दिसती बाल्यचि दुसरें जरेंतुनी आलें ॥१९**

गद्यार्थ— ( वरच्या श्लोकात वार्धक्याचें कलियुगाशीं साम्य दाखविलें; आता त्याचें बाल्याशीं साम्य Old age is second Childhood या म्हणीप्रमाणें. ) तोंडात दात नसणें, बोलणें अस्पष्ट असणें, दुर्बल असणें, इंद्रियांच्या शक्ति दिसून न पडणें इतक्या गोष्टींमुळें, वार्धक्य हें, जणु पुनः बाल्य आल्यासारखेंच वाटतें. ●●●

आर्या

दन्ता विश्लथदन्ता केशाः काशप्रसूनसकाशाः ।
नयनं तमसामयनं तथापि चित्तं धनाङ्गनायत्तम् ॥२०॥

आर्या

**हलती दांत मुळांतुनि, काशफुलासमचि केश शुभ्र जरी**
**नेत्रहि अंध जहाले, चित्त जडे धन नि कामिनींत तरी २०**

गद्यार्थ—दात मूळापासून ढिले झाले आहेत, केश काशपुष्पाप्रमाणें शुभ्र झाले आहेत; डोळ्यात अंधार भरला आहे तरी चित्त, धन व कामिनींतच गुंतून पडलेलें आहे. ●●●

अनुष्टुभ्

जरा मार्जारिका भुङ्क्ते यौवनाखुं तथोद्धता ।
परमुल्लासमायाति शरीरामिषवर्धिनी ॥ २१ ॥

इन्द्रवज्रा

**ही मांजरी वार्द्धक धीट खास**
**भक्षोनिया यौवन उंदरास ॥**
**खाऊन वाढे तनु आमिषास**
**आनंद मोठा तिचिया जिवास ॥ २१ ॥**

गद्यार्थ— वार्द्धक्यरूपी मांजरी यौवनरूपी उंदराच ( पहिल्या घडाक्याच ) गट्ट करून मग सर्व देहाचेंच मांस ( सावकाशीनें ) खात खात चरत बाढते आणि यानें तिच्या जिवाला परमानंद होत असतो । ●●●

उपजाति

भोगा न भुक्ता वयमेव भुक्तास्तपो न तप्तं वयमेव तप्ताः ।
कालो न यातो वयमेव यातास्तृष्णा न जीर्णा वयमेव जीर्णाः ॥ २२ ॥

शार्दूलविक्रीडित

**आम्ही भोग न भोगतांच बनलों भोक्तव्य त्यांचे स्वयें**
**केलें ना तप; ताप मात्र अमुच्या आतां कपाळास ये ॥**
**गेला काल न; मात्र पूर्ण झिजुनी आम्हीच गेलों सदा**
**झाली जीर्ण तृषा न, जीर्ण परि हो आम्हीच हे सर्वदा ॥ २२**

गद्यार्थ—आम्ही भोग भोगले नाहींत, तर आम्हीच भोगांकडून भोगले गेलों, त्याचें भक्ष्य झालों, हेंच म्हणणें जास्त युक्त होय ! आम्ही तप केलें नाहीं, पण आम्हीच तापविले मात्र गेलों. काळ गेला नाहीं, ( आम्ही दिवस घालविले नाहींत ) तर, आम्हीच ( कालमुखीं ) गेलों; तृष्णा जीर्ण ( कमी ) झाली नाहीं, तर, आम्हीच जीर्ण ( म्हातारे ) झालों. ! ●●●

शार्दूलविक्रीडित

सा बाला, वयमप्रगल्भमनसः सा स्त्री, वयं कातराः
सा पीनोन्नतिमत्पयोधरयुगं धत्ते, सखेदा वयम् ॥
साऽऽक्रान्ता जघनस्थलेन गुरुणा, गन्तुं न शक्ता वयं
दोषैरन्यजनाश्रयैरपटवो जाता स्म इत्यद्भुतम् ॥ २३ ॥

शार्दूलविक्रीडित

ती बाला! परि मीच पोरकट हा! ती स्त्री, नि मी भेकड!
पीनोत्तुंग तिला कुचद्वय! परी माझ्या उरीं जोखड! ॥
तीतें पुष्ट नितंबभार! फिरण्या मातेंच शक्ती नसे!
दोषांचे दुसऱ्यांचिया फळ मला! आश्चर्य हें
कां नसे? ॥ २३ ॥

गद्यार्थ—(वृद्धाचें मदमत्त तरुणीशीं लग्न झाल्यावरच्या त्याच्या दशेचें, किंवा व्यंग्यार्थानें एखाद्या तरुणाची त्याच्या प्रियेच्या अप्राप्तीनें झालेल्या अवस्थेचें हें वर्णन असू शकेल, थोड्या फरकानें दोन्हींकडे लावून बघावें.) बाला ती आहे (तेव्हा वास्तविक पोरकट ती असावी, पण, प्रत्यक्षात) आम्ही पोरकटासारखे वागत आहों! ती स्त्री आहे (म्हणून ती भित्री असावी, पण प्रत्यक्षात) आम्ही गलितधैर्य झालों आहों! तिला पुष्ट उच्च स्तन आहेत, (तेव्हा तिला जड वाटावें, पण प्रत्यक्षात) उरावर ओझें असल्यासारखें आम्हालाच वाटत आहे! तिला पुष्ट नितंबभार (त्यामुळें तिला चालणें कठीण व्हावें, पण प्रत्यक्षात) आम्हीच चालू किंवा जाऊं शकत नाहीं! तेव्हा दुसऱ्याच्या दोषाचें फळ आम्हाला भोगावें लागावें हें केवढें अद्भुत!

●●●

शार्दूलविक्रीडित

नाभ्यस्ता भुवि वादिवृन्ददमनी विद्या विनीतोचिता
खड्गाग्रैः करिकुम्भपीठदलनैर्नीतं न नाकं यशः ॥
कान्ताकोमलपल्लवाधररसः पीतो न चन्द्रोदये
तारुण्यं गतमेव निष्फलमहो शून्यालये दीपवत् ॥२४॥

शार्दूलविक्रीडित

जिंकी वादरतांस, भूषण अशी विद्या न अभ्यासिली
खड्गें मारुनि हस्ति, कीर्ति मम ती स्वर्गी न या धाडली
कान्तेच्या अधरांतली मधु सुधा ज्योत्स्नेंत न प्राशिली
गेलें यौवन हें उजाड घरिंच्या दुव्यर्थ दीपापरी २४

गद्यार्थ— (वृद्धाचा पश्चात्ताप. Old age is a regret!) वादपटु लोकांना जिंकून घेईल अशी, सुजास भूषणभूत अशी विद्या मी (विद्यार्थी दशेंत) अभ्यासली नाहीं! (भर तारुण्यात) खड्गानें मत्तहत्ती मारून, स्वताच्या शौर्याची कीर्ति, स्वर्गांत पोंचविली नाहीं! कान्तेच्या पल्लवकोमल अधरातलें अमृत चादण्यात बसून प्राशिलें नाहीं! उजाड घरात दिवा व्यर्थ (जळून) जावा तसें माझें तारुण्य निघून गेलें!

●●●

उपजाति

पाणौ गृहीताऽपि पुरस्कृताऽपि स्नेहेन नित्यं परिपालिताऽपि
परोपकाराय भवेदवश्यं वृद्धस्य भार्या करदीपिकेव ॥२५॥

उपजाति

घेऊन हातीं-पुढतीं धरून! स्नेहें तयां संतत वाढवून ॥
परोपकारार्थ सदैव दोन्ही। हातांतला दीप नि
वृद्धपत्नी ॥ २५ ॥

गद्यार्थ— (सर्व वर्णन दोन्हींकडे लागू होतें.) (स्नेह = तेल किंवा प्रेम.) हातात घेऊन, पुढे धरलेला व तेलानें सतत ज्याचें पोषण केलें, असा दिवा स्वताला, प्रकाश देऊन उपयोगी पडत नाहीं— दुसऱ्याला उपयोगी पडतो (पूर्वी, पणतीसारखे दिवे, हातात घेऊन पुढें धरले, तरी त्याची छाया खालीं पुढें पाऊल टाकण्याच्या जागीं पडून, आपलें पाऊल अधारात पडत असे लोकाना मात्र रस्ता दिसे.) त्याप्रमाणें अगदीं तळहातावरच्या फोडाप्रमाणें वागवली, सतत पुढ धरली (तिला महत्त्व देत गेलें) प्रेमानें सतत वाढविली तरी वृद्धाची (तरुण) पत्नी ही त्याच्या 'कामा'ची नव्हे. ती परोपकारच करणार (म्हणजे इतरांच्याच कामना अवश्य पूर्ण करणार!)

●●●

अनुष्टुभ्

नोपभोक्तुं न च त्यक्तुं शक्नोति विषयान् जरी
अस्थि निर्दशनः श्वेव जिह्वया लेढि केवलम् ॥ २६ ॥

अनुष्टुभ्

भोगूं टाकूं शकेना जो वृद्ध त्या विषयां जरी।
अदंत श्वा जसा हाडे जिभेनें चाटतो परी ॥ २६ ॥

गद्यार्थ— जरी (जराग्रस्त = वृद्ध) हा, विषयांना भोगूहि शकत नाहीं किंवा टाकूहि शकत नाहीं, तरी, दात पडलेला कुत्रा ज्याप्रमाणें जिभेनें हाडें चाटीत बसतो, तसा, (सुखत्या कल्पनेनें विषयांचा मिटक्या मारीत उपभोग घेतो.)

●●●

# प्रकरण ४३ वें

## स्वभाव.

अनुष्टुभ्

यो हि यस्य स्वभावोऽस्ति स नित्यं दुरतिक्रमः ।
श्वा यदि क्रियते राजा स किं नाश्नात्युपानहम् ? ॥ १ ॥

अनुष्टुभ्

ज्याचा स्वभाव जो, त्यातें टाकणें नित्य दुष्कर ।
राजा केलें जरी श्वाना तें कां खाई न खेटर ? ॥ १ ॥

गद्यार्थ— ज्याचा जो स्वभावच असतो, तो सोडणें, त्याला कधीं जमणार नाहीं. कुत्र्याला राजपदावर बसविलें तरी तें काय खेटरें चावून खाण्याचें सोडणार आहे ?

शार्दूलविक्रीडित

काकः पद्मवने रतिं न कुरुते हंसो न कूपोदके
मूर्खः पण्डितसङ्गमे न रमते दासो न सिंहासने ॥
कुस्त्री सज्जनसङ्गमे न रमते नीचं जनं सेवते
या यस्य प्रकृतिः स्वभावजनिता केनापि न त्यज्यते ॥ २ ॥

शार्दूलविक्रीडित

काका पद्मवनीं रुची न; रमतो या हंस कूपांत न
मूर्खा पंडितसंगतींहि न रुचे, दासा न सिंहासन ॥
नीच स्त्री सुजनांमधें न रमतां नीचा जना सेविते
जन्मापासुन जो स्वभावच, न त्या, कोणी कधीं
सोडितें ॥ २ ॥

गद्यार्थ— कमलवनांत राहणें कावळ्याला आवडत नाहीं, हंसाला विहिरीच्या पाण्यांत करमत नाहीं; मूर्खाला पंडितमैत्री रुचत नाहीं. दासाला सिंहासनावर बरें वाटत नाहीं. हलकट स्वैरिणी सुजनांत न रमतां नीच जनांशींच संग करते; ज्याचा जो जन्मजात स्वभावच, तो कोणीहि सोडीत नाहीं.

आर्या

रक्तत्वं कमलानां सत्पुरुषाणां परोपकारित्वम् ।
असतां च निर्दयत्वं स्वभावसिद्धं त्रिषु त्रितयम् ॥ ३ ॥

आर्या

कमलांत ताम्रपण तें सुजनीं तैसा परोपकारगुण ।
दुष्टांतहि निर्दयपण स्वभावसिद्धचि तिघांत हे तीन ॥ ३ ॥

गद्यार्थ— कमलांतली लाली, सज्जनातला परोपकारगुण; दुर्जनांतलें दुष्टपण ... हे तीन या तिघात स्वभावसिद्धच असतात.

शार्दूलविक्रीडित

व्याघ्रः सेवति काननं सुगहनं, सिंहो गुहां सेवते
हंसः सेवति पद्मिनीं विकसितां गृध्रः श्मशानस्थलीम् ॥
साधुः सेवति साधुमेव सततं नीचोऽपि नीचं जनं
या यस्य प्रकृतिः स्वभावजनिता केनापि न त्यज्यते ॥ ४ ॥

शार्दूलविक्रीडित

राहे दाट वनांत वाघ, नि गुहेमध्येंच राहे हरि
पद्मीं हंस वसे प्रफुल्ल; वसतो गृध्र श्मशानान्तरीं ॥
साधूसंगति साधु नित्य वसतो नीचासवें नीच तो
जी ज्याची प्रकृति स्वभावगुणशी, कोणी न तीं
टाकितो ॥ ४ ॥

गद्यार्थ — वाघ घनदाट अरण्यांतच राहावयाचा; सिंह गुहें-तच वसावयाचा; फुललेल्या कमलांतच हंसाची वसति; गिधाड श्मशानांतच असावयाचें; साधू हे साधूचीच संगत नेहमीं धर-तात; नीच नीचासंगतींच मैत्री करावयाचे; स्वभावानेंच ज्याची जशी प्रकृति बनलेली असते ती तो कधींच सोडूं शकत नाहीं. (सेव् धातु परस्मैपदी कसा ?)

अनुष्टुभ्

नमस्कारप्रियः सूर्यो जलधाराप्रियः शिवः ।
अलङ्कारप्रियो विष्णुर्ब्राह्मणो भोजनप्रियः ॥ ५ ॥

वसंततिलका

होई सदैव नमन प्रिय भास्कराला
धाराभिषेक असतो प्रिय शंकराला ॥
वस्त्रें विभूषण असे प्रिय त्या हरीला
मिष्टान्नभोजन असे प्रिय ब्राह्मणाला ॥ ५ ॥

गद्यार्थ—सूर्याला नमस्कार प्रिय असतात, पाण्याचा अभिषेक शंकराला प्रिय असतो; विष्णूला अलंकार प्रिय असतात; ब्राह्मणाला भोजन प्रिय असतें. ●●●

अनुष्टुभ्

जले तैलं, खले गुह्यं पात्रे दानं मनागपि ।
प्राज्ञे शास्त्रं स्वयं याति विस्तारं वस्तुशक्तितः ॥ ६ ॥

शार्दूलविक्रीडित

पाण्याचे वर तैलबिंदु; कथिलें वा गुप्त दुष्टाप्रति
सत्पात्राप्रति दान, शास्त्र शिकवूं जें सुज्ञ शिष्याप्रति ॥
हीं सारीं अति अल्प अल्प असुनी विस्तार कीं पावती
वृद्धीची जणुं अंगभूतचि तयां नैसर्गिकी शक्ति ती॥ ६॥

गद्यार्थ—पाण्याचे पृष्ठभागावर सोडलेलें तेल, दुष्टाला सांगितलेलें गुपित, सत्पात्रीं केलेलें दान, सुज्ञ शिष्याला शिकविलेलें शास्त्र; हीं मूळ कितीहि अल्प असलीं तरी त्यांच्या अंगभूत स्वभावधर्माला अनुसरून विस्तार पावतात. ●●●

शिखरिणी

भवत्या हि व्रात्याधमपतितपाखण्डपरिषत्
परित्राणस्नेहः श्लथयितुमशक्यः खलु यथा ॥
ममाप्येवं प्रेमा दुरितनिवहेष्वम्ब जगति
स्वभावोऽयं सर्वैरपि खलु यतो दुष्परिहरः ॥ ७ ॥

शिखरिणी

असंस्कारी-पापी-अधम-खल-उद्धारकरणीं
जसा तूतेंही ना प्रणय सुटणें शक्य जननी ॥
तसा पापांचाही प्रणय मज सोडीच कधि ना !
स्वभावा सोडावें अति कठिण हें सर्वहि जनां ॥ ७ ॥

गद्यार्थ –( जगन्नाथ, गंगेस उद्देशून— ) हे गंगामाते ! असंस्कारी अधम, पापी, पाखंडी अशा सर्वांच्या उद्धाराच्या कामीं, तुला जें प्रेम आहे, तें शिथिल करणें, जसें तुला शक्य नाहीं, तद्वत, पापें करण्याविषयींचें माझे प्रेमसुद्धां सुटणें शक्य नाहीं. ( तुझा तो स्वभाव; माझा हा स्वभाव. ) कारण ज्याचा जो स्वभाव, तो सोडणें सर्वच माणसाना मोठें कठिण वाटें. ●●●

शार्दूलविक्रीडित

मुक्तं मौक्तिकदाम हेमवलयश्रेणी समुत्सारिता
वासो नीलपटीकृतं , नियमितो मञ्जीरकोलाहलः ॥
गच्छन्त्यास्तव साहसं न सहते तन्वङ्गि संगोपनं
धम्मिलच्युतमल्लिकापरिमलप्रौढो निशीथानिलः॥४॥

शार्दूलविक्रीडित

मुक्ताहार तशीं सुवर्णवलयें काढून तूं टाकिलीं
केले नूपुर मूक आणि वसनें तूं नेसलीं हीं निळीं ॥
जाण्याच्या तव साहसासह तुझें यत्नें असें गोपन
वेणीपुष्पसुगंधचोर गमतें नैशानिला सह्य न ॥४॥

गद्यार्थ—हे अभिसारिके ! कुणाला सुगावा लागू नये, म्हणून, तू आपला मोत्याचा हार, व सुवर्ण वलयें, कंकणें, वगैरे काढून ठेवलींस; पायातल्या नूपुराना (वरून वस्त्राचे पट्टे बाधून ) तू गप्प केलेंस आणि ( दिसू नये म्हणून अंधाराच्या समान ) निळ्या रंगाचीं वस्त्रें तू नेसलीस. ( हें सर्व खरें ) परंतु तुझ्या वेणींतून गळलेल्या मल्लिकापुष्पामुळें सुगंधित झालेल्या या रात्रीच्या वायूला, तुझें हें साहस व यत्नानीं तू चालविलेले हें गोपन सहन होत नाहीं. ( तो चहाडी करून, जगाला तुझें अस्तित्व सांगत आहे. ) ●●●

शार्दूलविक्रीडित

कृत्वा नूपुरमूकता चरणयोः संयम्य नीवीमणी—
नुद्दामध्वनिपण्डितान्परिजने किञ्चिच्च निद्रायति ॥
कस्मात्कुप्यसि ! यावदस्मि चलिता तावद्विधिप्रेरितः
काश्मीरीकुचकुम्भविभ्रमधरः शीतांशुरभ्युद्गतः ॥५॥

शार्दूलविक्रीडित

केले नूपुर गप्प मी स्वचरणीं, अन् मेखला बांधिली
होती गर्जत फार जी, नि डुकली भृत्यां जधीं लागली ॥
कां रे कोपसि ? जो न मी निघतसें, दैवें जणूं प्रेरितां
काश्मीरीकुचगौर चंद्र उदया चांडाळ आला तदा ! ५

गद्यार्थ—( संकेतस्थळीं आपली वाट पाहणाऱ्या वल्लभाला अभिसारिका, येण्यास उशीर होण्याचें कारण सांगते —) मी पायातले पैंजण गप्प केले, मेखलेचे मणि फार वाजत होते त्याना नीट बांधले, नोकराना किंचित झोंप लागण्याची वाट पहावी लागली. इतके उरकून मी जों निघतें न निघतें तों काश्मीरी स्त्रीच्या स्तनाइतका गोरा तो (चांडाल) चंद्र, दुर्दैवानें सांगितल्या-सारखा, उदयास आला. ( त्यामुळें लपतछपत यायला फार वेळ लागला !) मग माझ्यावर का बरें रागावतोस ? ●●●

वैतालीय

रजनीतिमिरावगुण्ठिते पुरमार्गे घनशब्दविक्लवाः ।
वसतिं प्रिय ! कामिनां प्रियास्त्वदृते प्रापयितुं क ईश्वरः ? ६

साकी

अंधारानें गुरफटलेल्या रात्रीं पुरमार्गांत
आकाशींच्या मेघगर्जना ऐकुनि ज्या भयभीत ॥
कामिनींस त्या, निजप्रियांच्या दूरस्थहि वसतीस
तुजविण मदना ! अन्य कोण रे समर्थ पोंचविण्यास ? ६

गद्यार्थ—( कुमारसंभवातील, मदनदहनानंतर रतिविलाप ) रात्रीं अंधारानें गुरफटलेल्या नगरमार्गांतून, मेघगर्जनांमुळें भयभीत झालेल्या अभिसारिकाना त्यांच्या त्यांच्या वल्लभाच्या वसतीपर्यंत सुखरूप पोंचविण्यास ( व तितकें धाडस त्याना देण्यास ) हे प्रिय मदना ! तुझ्यावाचून दुसरें कोण समर्थ आहे ? ( श्लोक १ पहा. ) ●●●

---

# प्रकरण ४५ वें

## वाराङ्गना

अनुष्टुभ्

*आदौ वेश्या पुनर्दासी पश्चाद्भवति कुट्टिनी ।*
*सर्वोपायपरिक्षीणा वृद्धा नारी पतिव्रता ॥ १ ॥*

अनुष्टुभ्

**आधीं वेश्या पुढें दासी, होतसे मग कुंटिणी ।**
***पतिव्रता बने वृद्धा सर्वोपायचि खुंटुनी ॥ १ ॥***

गद्यार्थ—प्रथम वेश्या, मग दासी, मग कुटीण; आणि यापैकीं कांहीं करता येण्याचे उपाय संपण्याइतकी, वेश्या म्हातारी झाली, कीं, मग स्वताला पतिव्रता म्हणवते ! •••

अनुष्टुभ्

वेश्याऽसौ मदनज्वाला रूपेन्धनसमेधिता ।
कामिभिर्यत्र हूयन्ते यौवनानि धनानि च ॥ २ ॥

अनुष्टुभ्

***वेश्या ही मदनज्वाला, भडके रूप सर्पणें ।***
***कामी त्यांत बळी देती आरोग्य-धन-यौवनें ॥ २॥***

गद्यार्थ—सौंदर्यरूपी सर्पण घालून पेटविलेली, मदनज्वाला म्हणजे वेश्या ! कामी हे या ज्वाळेंत आपलें तारुण्य आणि धन होमीत असतात. •••

अनुष्टुभ्

*सद्भावो नास्ति वेश्याना स्थिरता नास्ति सम्पदाम् ।*
*विवेको नास्ति मूर्खाणां विनाशो नास्ति कर्मणाम् ॥३॥*

अनुष्टुभ्

**नसे सद्भाव वेश्यांत वैभवा स्थिरता नसे ।**
**नसे विवेक मूर्खांना कर्मांना नाशही नसे ॥ ३ ॥**

गद्यार्थ—वेश्यांत कधीं सद्भावना असत नाहीं; वैभवात कधीं स्थिरता दिसत नाहीं; मूर्खांत कधीं विवेक आढळत नाहीं; कर्मांचा कधीं नाश होत नाहीं. •••

उपजाति

*समुद्रवीचीव चलस्वभावाः सन्ध्याभ्रलेखेव मुहूर्तरागाः ।*
*वेश्या कृतार्था. पुरुषं निरर्थं निष्पीडितालक्तकवत्त्यजन्ति॥४॥*

वसंततिलका

**ज्यांचे स्वभाव चल अब्धिपरी तरंगी**
***संध्याभ्रासम मनें क्षणमात्र रंगी ॥***
**वेश्या धना मिळवुनी, पुरुषा निरर्थ**
**घेतां पिळून अळित्यापरि फेकतात ॥ ४ ॥**

गद्यार्थ—समुद्राच्या लाटाइतके चचल ज्याचे स्वभाव; सध्याकाळाच्या मेघावरील रगाइतकें ज्याचें प्रेम क्षणजीवी (नुसतें दाखविण्यापुरतेंच.) अशा वेश्या या कृतार्थ झाल्या म्हणजे पैसे मिळविण्याचें कार्य साधलें, कीं, (त्याच्यापायीं सपत्ति गमावून) कफल्लक झालेल्या पुरुषास, अर्के, रग, पिळून घेतलेल्या अळित्याप्रमाणें फेकून देतात. •••

वसंततिलका

एता हसन्ति च रुदन्ति च कार्यहेतो—
र्विश्वासयन्ति च परं न च विश्वसन्ति ॥
तस्मान्नरेण कुलशीलवता सदैव
वेश्या श्मशानघटिका इव वर्जनीयाः ॥ ५ ॥

वसंततिलका

**कार्यार्थ ज्या हंसुनि दाविति या रडून**
**विश्वास घेति तुमचा, परि ठेविती न ॥**
**वेश्यांस यास्तव नरें कुलशीलवान**
**घ्यावें स्मशानघटिकेपरि हो त्यजून ॥ ५ ॥**

गद्यार्थ—ज्या वेश्या स्वार्थ साधण्यासाठीं हंसण्याचें सोंग करतील; रडून दाखवितील; स्वत.वर विश्वास ठेवायला लावतील; पण स्वतः कोणावरच विश्वास ठेवणार नाहींत; त्या वेश्या, कुलशीलवान माणसानें, स्मशानांतल्या मडक्याप्रमाणें, (पाय सुद्धा लागू न देतां टाळतों तसा) टाळाव्या. •••

इन्द्रवज्रा

कुर्वन्ति तावत्प्रथमं प्रियाणि यावन्न जानन्ति नरं प्रसक्तम्।
ज्ञात्वा च तं मन्मथपाशबद्धं ग्रस्तामिषं मीनमिवोध्दरन्ति ॥६॥

वसंततिलका

थार्थी सदैव गणिका प्रिय वागतात
जों जणिती न, नर, कीं, पुरता प्रसक्त ॥
खात्री पटून नर मन्मथपाशबद्ध
मासा गळीं अडकल्यापरि ओढितात ॥ ६ ॥

*गद्यार्थ*— जोंवर, पुरुष, आपल्यावर पुरता मोहित झाल्याची खात्री, त्यांना वाटत नाहीं, तोंवर, प्रथम, वेश्या अतिशय गोड प्रिय वाटेल, अशा वागतात. पण, हें साबज मदनाच्या जाळ्यात पुरतें अडकल्याविषयीं निश्चिती झाली, कीं, गळाला लागलेल्या माशाप्रमाणें, त्याला ( निर्दयपणें ) ओढतात. ●●●

अनुष्टुभ्

दूरस्थाः पर्वता रम्या वेश्या च मुखमण्डने।
युद्धस्य वार्ता रम्या च त्रीणि रम्याणि दूरतः ॥७॥

वसंततिलका

होती दुरून गिरि दुर्गम साजिरे ते
वेश्या मुखास सजवूनचि रम्य होते ॥
युद्धांतली भयद रम्य असे कथा ती
या तीन वस्तु दुरनीच सुरम्य होती ॥ ७ ॥

*गद्यार्थ*— या तीन वस्तु दुरूनच रम्य — ( खाचखळगे दुर्गम ) पर्वत, ( मुळात कुरूप असूनहि ) तोंड रंगविलेली वेश्या, आणि ( भयकर असतहि ) युध्दाच्या वार्ता. ●●●

शार्दूलविक्रीडित

जात्यन्धाय च दुर्मुखाय च जराजीर्णाखिलाङ्गाय च
ग्रामीणाय च दुष्कुलाय च गलत्कुष्ठाभिभूताय च ॥
यच्छन्तीषु मनोहरं निजवपुर्लक्ष्मीलवश्रध्दया
पण्यस्त्रीषु विवेककल्पलतिकाशस्त्रीषु रज्येत कः ? ॥ ८ ॥

शार्दूलविक्रीडित

जन्मान्धास, रड्यास, खेडवळाशा, अत्यंत जीर्णासही
जन्मानें हलक्यास, रक्तपिति ज्या देहास येश्यासही ॥
वित्तात्पास्तव देह सुंदर विकी, त्या नीच वेश्येप्रति—
छाटी जी सुविवेककल्पलतिका — ठेवी कुणी कां
रति ? ॥ ८ ॥

*गद्यार्थ*—(येणारें गिऱ्हाइक,) जन्मानें आंधळा असो, रड्या असो जर्जर जख्ख येरडा असो, गावढळ असो, हलक्या कुळांतला असो, घाणेरडे रोग, रक्तपिती वगैरे झालेला असो,—(त्यात कसलेंहि वर्ज्यावर्ज्य न मानता ) त्याला आपला सुंदर देह, अल्पशा पैशाच्या लालचीनें देणाऱ्या, सुविवेकाच्या कल्पलतेला छाटून टाकणाऱ्या, वेश्येवर कोण प्रेम करू शकेल ? ●●●

आर्या

उपभुक्तखदिरवीटीजनिताधररक्तरङ्गभङ्गभयात् ।
पितरि मृतेऽपि हि वेश्या रोदिति "हा तात तातेति" ॥९॥

आर्या

आला कातविड्यानें तो न झडो रंग ओठिंचा म्हणुनी
मृतहि पित्यास्तव रडते वेश्या " हे तात ! तात रे "
म्हणुनी ॥ ९ ॥

*गद्यार्थ*— खाल्लेल्या कात व विड्यानें ओठाला आलेला रंग कमी न व्हावा, म्हणून, वेश्या, बाप मेला, तरी त्याचा शोक करताना, " तात ! तात ! " म्हणून रडते ! ( तात यात सर्व उच्चार दंतव्य म्हणजे केवळ जीभ दाताला लावून होतो. पण त्या ऐवजीं, " बाबा बाबा " हे शब्द उच्चारल्यास, ते ओष्ठ्य, म्हणजे, ओठाला ओठ लागूनच उच्चारणें शक्य; व, त्यामुळें ओठाचा रंग थोडातरी कमी होणारच ! ओठाचा रंग म्हणजे वेश्येचें जीवन ! तेव्हां बाप मेला तरी बेहेत्तर, पण ओठाचा रंग जाऊन चालणार नाहीं ! त्यासाठीं प्रेमाचा " बाबा बाबा " शब्द न काढतां, मुद्दाम दूरचा " तात तात " शब्द उच्चारते, इवढी वेश्या निर्घृण, हें सागण्याचा हेतु ! ) ●●●

आर्या

वर्णनदयितः कश्चिद्धनदयितो दानकर्मदयितोऽन्यः।
रक्षादयितश्चान्यो वेश्यानां नर्मदयितोऽन्यः ॥ १० ॥

उपजाति

वर्णावया एक, धनार्थ अन्य
वेश्यांस, दानें करण्यास अन्य ॥
असे पती अन्यचि रक्षणाला
थट्टा करायास कुणी निराळा ! ॥ १० ॥

गद्यार्थ—(वेश्याना किती नवरे असतात याची गणना कोण करणार ? पण त्यातील ठळक ठळक असे —) कागदोपत्री स्वतःचें वर्णन करण्यासाठीं, एक नवरा ! पैसे उकळण्यासाठीं, दुसराच नवरा ! दान देण्यासाठीं, म्हणजे, दान देण्यास ज्याच्याकडून पैसे काढावयाचे, असें म्हणा; किंवा, ज्याच्या नांवानें, दान ती करते तो म्हणा, — आणखी कोणीतरी एक नवरा ! रक्षण करणारा म्हणून (कोणीतरी आडदांड) एक नवरा ! 'नवरा नवरा' म्हणून, थट्टा विनोद करावयाला, म्हणून, निराळाच एक नवरा ! ●●●

वसंततिलका

लज्जावशावनतमन्थरदृष्टिपातं
यैश्चुम्बितं कुलवधूवदनारविन्दम् ॥
तेषामनेकपुरुषप्रणिताधरेषु
सक्तिः कथं भवति वेशवधूमुखेषु ॥ ११ ॥

आर्या

लाजेनें नमुनि हळूं, नेई जी नम्र दृष्टि, पायाशीं ।
ऐश्या कुलस्त्रियेच्या जे नर चुंबिति मुखारविंदासी ॥
त्यांना वेशवधूच्या, चुंबुचुंबुनी अनेक पुरुषांनीं
डसलेल्या अधरांप्रति गोडी वाटेल अल्पही कुठुनी ? ११

गद्यार्थ— लाजेनें, हळूच, नम्रपणें वांकून, पायाकडे दृष्टि नेणाऱ्या, कुलकन्येचें मुखकमल, ज्यानीं चुंबिलें, त्यांना, ज्याना अनेक पुरुषांनीं चुंबून चुंबून ओठावर व्रण केलेले आहेत, अशा, वारांगनेच्या मुखाची, गोडी कशी वाटेल ! ●●●

स्वागता

नाम्बुजैर्न कुमुदैरुपमेयं स्वैरिणीनयनपङ्कजयुग्मम् ॥
नोदये दिनकरस्य न वेन्दो केवलं तमसि यस्य विकासः १२

स्वागता

पद्म वा कुमुद हें उपमान
स्वैरिणीनयनयोग्य असे न ॥
सूर्यचंद्र उदयीं न तयांस
येइ केवळ तमांत विकास ॥ १२ ॥

गद्यार्थ—स्वैरिणी स्त्रीच्या डोळ्यांना पद्म किंवा कुमुद यापैकीं एकाचीच उपमा देणें योग्य ठरत नाहीं. (कारण पद्म सूर्योदयविकासी, कुमुद चन्द्रोदयविकासी.) पण स्वैरिणीची कृष्णकृत्यें केवळ अंधारांतच व्हावयाचीं व त्यांना सूर्यप्रकाश काय चंद्रप्रकाश काय दोन्हींचें वावडेंच. त्यामुळें स्वैरिणीनेत्राचा विकास, केवळ अंधारांतच होतो; हें कमलांत व त्यात अंतर आहे. (मात्र मूळ संस्कृत कवीनें हें सांगत असतानाच स्वैरिणीनयनांना पंकज म्हटलें आहे हा केवढा वदतोव्याघात !) ●●●

शार्दूलविक्रीडित

वाप्यां स्नाति विचक्षणो द्विजवरो, मूर्खोऽपि वर्णाधमः
फुल्लां नाम्यति वायसोऽपि हि लतां या नामिता बर्हिणा ! ॥
ब्रह्मक्षत्रविशस्तरन्ति च यया नावा तयैवेतरे
त्वं वापीव, लतेव, नौरिव ! जनं वेश्याऽसि सर्वं भज ॥१३॥

सुमंदारमाला

विहीरींत ज्या सुज्ञ तो विप्र न्हाहे
तिथें हीनवर्णी असा मूर्खही ॥
मयूरें प्रफुल्ला लता वांकवीली
चढोनी तिला वांकवी काकही ॥
तरे ब्रह्मवैश्यासवें क्षत्र नौकें-
तुनी त्याच नौकेंत चाण्डाळही ॥
लता, नाव, वापी, तिन्ही तूंच वेश्ये !
कुणालाहि सोडू नको तूं महीं ॥ १३ ॥

गद्यार्थ— ज्या विहिरींत, सुज्ञ ब्राह्मण स्नान करतो, त्याच विहिरींत हलक्या वर्णाचा मूर्खहि बुड्या मारतो ! ज्या प्रफुल्ल वेलीवर बसून, मोर तिला वाकवितो, त्याच वेलीवर कावळाहि चढतो व तिला वाकवितो ! ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य ज्या नौकेंत चढून नदी वगैरे ओलांडतात, तिच्यांतच चढून, इतर (चांडाल वगैरेहि) जातात. वेश्ये ! तू विहीर, लता, नौका सर्व एकत्रित आहेस ! जगात कुणालाहि तू वगळू नको ! ●●●

वंशस्थ

न पर्वताग्रे नलिनी प्ररोहति न गर्दभा वाजिधुरं वहन्ति च ॥
यवाः प्रकीर्णा न भवन्ति शालयो न वेशजाताः
शुचयस्तथाङ्गनाः ॥ १४ ॥

उपजाति

शिरीं गिरींच्या कमलें न वाढतीं
न गाढवे अश्वधुरेस वाहतीं ॥
येती न साळी जवधान्य पेरुन
होतात वेश्याहि कधीं पवित्र न ॥ १५ ॥

गद्यार्थ—डोंगराच्या शिखरांवर कमलें कधीं वाढत नाहींत गाढवें कधीं घोड्याचें जू मानेवर घेत नाहींत जव पेरून कधीं तांदूळ उगवत नाहीं तसेच ( काहींहि उपाय केल्यानें ) वेश्या पवित्र होत नाहींत ●●●

---

# प्रकरण ४६ वें

कुटुंबीय मंडळी—आदर्श नातीं; अपत्य—पुत्र—कन्या—कन्यापितृत्व-जामात- मातृभक्त पुत्र—आदर्श दीर-पितृभक्त पुत्र-आदर्श पत्नी—पतिव्रता सावित्री, सीता,—कुलस्त्री—तिच्या वर्तनमर्यादा—आदर्श बंधु भरत व लक्ष्मण—माता—दोन बायकाचा दादला-स्त्री-पुरुष वैशिष्ट्यें—पतिपत्नी—आदर्श बंधु भरत व लक्ष्मण—माता—पंचकन्या

अनुष्टुभ्

अन्त करणवस्त्रस्य दम्पत्यो स्नेहसश्रयात् ।
आनन्दग्रन्थिरेकोऽयमपत्यमिति कथ्यते ॥ १ ॥

साकी

हृदयरूप वस्त्रास, दपतीस्नेहचि जी बांधितसे ।
आनदाची गाठ, तियेला अपत्य हृ नाम असे ॥१॥

गद्यार्थ— दपतीच्या प्रेमामुळ, हृदयरूपी वस्त्राची आनद स्वरूप जी गाठ बाधली जाते, तिला अपत्य हें नाव आहे ●●●

शार्दूलविक्रीडित

आनन्दस्रुतिरामनो नयनयोरन्त सुधाभ्यञ्जन
प्रस्तार प्रणयस्य मन्मथतरो पुष्प प्रसादो रते ॥
आलान हृदयद्विपस्य विषयारण्येषु सञ्चारिणो
दम्पत्योरिह लभ्यते सुकृतत ससारसार सुत ॥२॥

शार्दूलविक्रीडित

आनदाश्रुच मूर्त! अतरिं सुधा कीं प्रीतिरत्नापरी
जाणों मन्मथवृक्षपुष्प रतिच्या वाटे प्रसादापरी ॥
खुटी, चित्तगज प्रमत्त, विषयारण्यीं भ्रमे, त्याप्रत
पुण्ये सस्रुतिसार लाभत असे युग्मास लोकीं सुत ॥२॥

गद्यार्थ— ( विवाहित युगलाना झालेला ) पुत्र, म्हणजे, मूर्तिमत आनदाश्रु! हृदयाला आतून लावलेला अमृताचा लेप प्रीतीच रत्न मदनतरूला आलेल पुष्प! रतिदेवतेचा प्रसाद! विषयरूपी अरण्यामध्ये ( धुदींत ) भ्रमणाऱ्या, हृदयरूपी हत्तीला, (बाधून, नियत्रणात ठेवण्यासाठीं ) खुटीच! संसाराचें सार! असा पुत्र मोठ्या पुण्ययोगानें दपतीस मिळत असतो! ●●●

अनुष्टुभ्

इद तत्स्नेहसर्वस्व सममाढ्यदरिद्रयो ।
अचन्दनमनौशीरं हृदयस्यानुलेपनम् ॥ ३ ॥

अनुष्टुभ्

सम श्रीश दरिद्र्यांना प्रेमसर्वस्व हो सुत।
वाळ्या नि चंदनावीण लेप तो हृदयांप्रत ॥ ३ ॥

गद्यार्थ— श्रीमंत असोत, दरिद्री असोत, दोघानाहि समान असे, प्रेमसर्वस्व, म्हणजे पुत्र. वाळा किंवा चंदन याविरहित, असा हा हृदयाला शीतलत्व देणारा लेप होय!

●●●

अनुष्टुभ्

स्वगर्भशुक्तिनिर्भिन्नं सुवृत्तसुतमौक्तिकम्।
वंशश्रीतिलकीभूतं मन्दभाग्यस्य दुर्लभम् ॥ ४ ॥

वंशस्थ

स्वगर्भशुक्तीमधुनीच जन्मलें
सुपुत्र हें मौक्तिक नेटकें भलें ॥
कुळास जें भूषणभूत हें असें
न मंदभाग्याप्रति लब्ध होतसे ॥ ४ ॥

गद्यार्थ— स्वस्त्रीगर्भरूपी शिंपल्यात जन्मलेलें पुत्ररूपी गोळीवद मोती, कुळवैभवाच्या कपाळीं तिलकासारखें शोभणारें –मंदभाग्यास दुर्लभ!

●●●

अनुष्टुभ्

पुन्नाम्नो नरकाद्यस्मात् पितरं त्रायते सुत ।
तस्मात्पुत्र इति प्रोक्तः पितॄन्यः पाति सर्वतः ॥५॥

अनुष्टुभ्

पुन्नाम नरकांतून पित्याला सुत रक्षितो।
म्हणुनी पुत्र त्या नांव; पितृरक्षक नित्य तो ॥५॥

गद्यार्थ— पुत् नावाच्या नरकापासून, सुत हा पित्याचें रक्षण करतो, म्हणून पुत्–त्र = पुत्र असें नाव मुलाला लावतात; सर्व बाजूंनींच तो पित्याचा रक्षक असतो.

●●●

आर्या

किं मधुरं सुतवचनं मधुरतरं किं तदेव सुतवचनम्।
मधुरान्मधुरतमं किं श्रुतिपरिपक्वं तदेव सुतवचनम् ॥ ६ ॥

आर्या

"वद मधुर काय"? "सुतवच!"
"मधुरतरहि काय?" "तेंच सुतवचन!"
"वद काय मधुरतम तें?"
"ज्ञानें परिपक्व तेंच सुतवचन" ॥ ६ ॥

गद्यार्थ— (कोणालाहि विचारून पहा कीं) "कानाला गोड काय लागतें?" (तर उत्तर येईल) "पुत्राच्या तोंडचे शब्द." "त्याहून मधुर काय?" "तेंच! पुत्राचें बोलणें" (विचारा कीं) "सर्वांत मधुर काय तें सांगा पाहू?" (तर उत्तर येईल) "पुन्हा तेंच. पुत्राचें भाषण; पण ज्ञानानें परिपक्व झालेलें." (इतका सर्वांना पुत्र प्रिय असतो.)

●●●

आर्या

कुम्भः परिमितमम्भः पिबत्यसौ कुम्भसम्भवोऽम्भोधिम्।
अतिरिच्यते सुजन्मा कश्चिज्जनकं निजेन चरितेन ॥ ७ ॥

आर्या

प्राशी घट परिमित जल
कुम्भोद्भव अब्धिही वसे पिउनी।
मार्गे सारी स्वपित्या
एखादा सुत कधीं स्वचरितांनीं ॥ ७ ॥

गद्यार्थ— कुंभ हा मोजकेंच पाणी आपल्या पोटात घेऊ शकतो! पण कुम्भापासून जन्मलेल्या (अगस्ति) मुनीनें समुद्रचा समुद्र प्राशन केला! चांगल्या कुळात जन्मलेला, असाच एखादा पुत्र, स्वतःच्या कृत्यांनीं, आपल्या जनकाला मार्गे टाकतो.

●●●

अनुष्टुभ्

एकेनापि सुवृक्षेण पुष्पितेन सुगन्धिना।
वासितं तद्वनं सर्वं सुपुत्रेण कुलं यथा ॥ ८ ॥

अनुष्टुभ्

सुगंधी एकही वृक्ष करी फुलुनि गंधित। —
साऱ्या राना, कुला जैसा शोभवी चांगला सुत ॥ ८ ॥

गद्यार्थ— एखादा चांगला सुगंधी वृक्ष, जर फुलून आला, तर, तो सारें रान सुगंधित करून टाकतो. तद्वतच, एक चांगला मुलगा, सर्व कुलाला, सत्कीर्तिसुगंध देतो.

●●●

वरमेको गुणी पुत्रो, न च मूर्खशतान्यपि।
एकश्चन्द्रस्तमो हन्ति न हि तारागणोऽपि च ॥ ९ ॥

अनुष्टुभ्

बरा एक गुणी पुत्र, न मूर्खांचें लटांबर।
एक चंद्र तमा नाशी न तारागण सुंदर ॥ ९ ॥

गद्यार्थ—मूर्ख पुत्रांचें ल्टांबरचें ल्टांबर असण्यापेक्षां, एकच कां होईना, पण गुणी पुत्र असलेला, अधिक चांगला. एकटा चद्र अंधार नष्ट करतो. अनत तान्यांनाहि तें कार्य करतां येत नाहीं. ●●●

अनुष्टुभ्

कोऽर्थः पुत्रेण जातेन यो न विद्वान् न भक्तिमान् ? ।
काणेन चक्षुपा किं वा ! चक्षु.पीडैव केवलम् ॥ १० ॥

उपजाति

विद्वान् न, वा भक्तहि जो न झाला
जन्मास तो पुत्र कशास आला ? ॥
डोळा असावा, चकणा परी, तो
डोळ्यासची केवळ दुःख देतो ॥ १० ॥

गद्यार्थ— जो मुलगा विद्वान् किंवा जो भक्तिमान् झाला नाहीं तो जन्मल्याचा उपयोग काय ? डोळा असावा पण तो चकणा ! म्हणजे मग डोळ्यानाच दुःख; यापेक्षा अन्य काय निष्पन्न होणार ? ●●●

अनुष्टुभ्

किं तया क्रियते धेन्वा या न दोग्ध्री न गर्भिणी ।
कोऽर्थो जातेन पुत्रेण यो न विद्वान्न धार्मिकः ॥११॥

अनुष्टुभ्

कशाला गाय ती? जी ना दूध देई, न गर्भिणी
धर्मी विद्वान् न जो पुत्र, लाभ तो काय जन्मुनी? ॥११॥

गद्यार्थ— जी दूधहि देत नाहीं, किंवा गर्भिणीहि होत नाहीं, त्या गाईचा उपयोग काय? जो विद्वत्ता मिळवीत नाहीं, किंवा, धर्माचरणहि करीत नाहीं, तो पुत्र जन्मून उपयोग काय? ●●●

इंद्रवज्रा

जातेति कन्या महती हि चिन्ता
कस्मै प्रदेयेति महान्वितर्कः ।
दत्ता सुखं यास्यति वा न वेति
कन्यापितृत्वं खलु नाम कष्टम् ॥ १२ ॥

उपजाति

जन्मे सुता हीच महान चिंता
" द्यावी कुणा ? " घोर विचार चित्ता ॥
देता, " असे दुःखित कां सुखांत ? "
वधूपिता या नित काळजींत ॥ १२ ॥

गद्यार्थ— जन्मली ती मुलगी (मुलगा नाहीं) हीच गोष्ट प्रथम बापाला मोठी चिंता उत्पन्न करते! " कोणाला द्यावयाची ?" हा दुसरा घोर जिवाला लागतो. लग्न करून दिल्यावरहि " ती सुखी होत आहे कीं, दुःखी ? " ही काळजी ( जन्मभरच ! ) ( एकूण काय ) मुलीचा बाप होणें महादुःखाला कारण होय ! ●●●

अनुष्टुभ्

कन्या वरयते रूपं माता वित्तं पिता श्रुतम् ।
बान्धवाः कुलमिच्छन्ति मिष्टान्नमितरे जनाः ॥१३॥

अनुष्टुभ्

कन्या रूप बघे, आई संपत्ती, बाप शिक्षण ।
इच्छिती कुल, नात्याचे; पकान्न इतरे जन ॥ १३ ॥

गद्यार्थ— पतीची निवड करतांना, मुलगी, बहुधा, मुख्यत्वें, तो सुंदर आहे कीं नाहीं हें पाहते; जोवर श्रीमंत आहे कीं नाहीं, हें आईचें पाहणें असतें. बापाची दृष्टि, तो शिकला आहे किती, याकडे असते. नातेवाईकांची इच्छा असते, कीं, तो चांगल्या कुळांतला असावा. व इतरांची इतकीच इच्छा असते, कीं यथेच्छ पक्वान्नें झोडायला मिळावींत. ●●●

इंद्रवज्रा

अर्थो हि कन्या परकीय एव तामद्य संप्रेष्य परिग्रहीतुः ॥
जातो ममायं विशदः प्रकामं प्रत्यर्पितन्यास इवान्तरात्मा १४

इंद्रवज्रा

कन्या दुजाची जणुं ठेव, तीतें
मी धाडितां आज तिच्या पतीतें ॥
माझें जहालें मन सुप्रसन्न
ज्याची तया ठेवचि पाठवून ॥ १४ ॥

— गद्यार्थ (शाकुंतल चौथा अंक. कण्वानें शकुंतलेला दुष्यन्ताकडे धाडल्यानंतर काढलेले उद्गार. चार उत्कृष्ट श्लोकापैकीं एक ) कन्या ही, मोठी झाले तरी, कन्यापित्याकडे दुसऱ्यानें ठेवलेली ठेवच होय ती आज मी तिच्या पतीकडे पाठविल्या-मुळे, दुसऱ्याची ठेव परत केल्यावर, जसें, हृदयावरील भार हलका होऊन, अंतरात्मा प्रसन्न होतो, तसें मला वाटत आहे. ●●●

शार्दूलविक्रीडित

स्वाधीना दयिता सुतावधि सुतो ऽ सौ षोडषाब्दावधि
कन्या स्यात्करपीडनावधि सुतस्त्री तद्दशात्वावधि ॥
जामाता बहुलार्पितावधि सखा साधुप्रलापावधि
शिष्यो गुह्यनिरूपणावधि परे चैते धनित्वावधि ॥ १५॥

आर्या

पुत्र न झाले तोंवर पत्नी स्वाधीन राहते अपुली।
पुत्र हि आज्ञा पाळिति, सोळा वर्षे वया न जों झालीं ॥
लग्न न झालें तोंवर सत्ता कन्येवरी असे अपुली ।
सूनहि आज्ञांकित तों, जोंवर यौवनदशा न तिज आली
देऊं पुष्कळ आपण, तोंवर वागेल जांवई नीट।
जों गोडगोड बोलूं तोंवर मैत्री दिसेल मित्रांत ॥
जोंवर गूढ न शिकवूं तोंवर शिष्यहि असेल आज्ञेत।
इतरे जन गोडचि तों, जोंवर आपण असूंच धनवंत १५

गद्यार्थ—मुलगा झाला नाहीं तोंवरच पत्नी नवऱ्याच्या स्वाधीन असते- ( मग ती द्विधा होऊन बहुतांशीं मुलावाळाचीच होते.) वयाला सोळा वर्षे झालीं नाहींत, तोंवरच, मुलगा स्वाधीन म्हणजे आज्ञाधारक असतो (पुढें त्याला मित्र व मतें फुटून तो स्वतन्त्रपणें वागू लागतो.) मुलगी आपल्या स्वाधीन असते, ती, लग्न करून देईपर्यन्त, (मग ती सासरची !) आपली सून, आपल्या स्वाधीन असते, ती, तिला यौवनदशा येईपर्यंतच! ( मग आपला मुलगा तिच्या मुठींत जाऊन त्याचे द्वारा ती आपली सत्ता चालवूं लागते ) आपण, प्रसंगाप्रसंगानीं, जावयाच्या पदरात भरपूर सुवर्ण टाकीत असू तोंवरच तो आपल्या स्वाधीन, (तें आटलें, कीं, तो ताठलाच!) गोड व प्रिय बोलत राहू, तोंवर मित्राशीं मैत्री टिकलेली दिसते. (जरा अप्रिय, स्पष्ट बोलून पहा, कीं, मित्र अमित्र झालाच.) जी विद्या आपण शिष्याला शिकवीत असू त्यातलें गुह्य, गुपित, मर्म, त्याला जोंवर आपण सांगत नाहीं, तोंवरच शिष्य गुरूच्या स्वाधीन असतो (एकदा तें गुह्य शिष्याला हस्तगत झालें, कीं, संजीवनीच्या प्राप्तीनतर ज्सा कच, तसा तो गुरूला सोडून स्वतन्त्र होणारच!) इतर लोकहि आपल्या स्वाधीन असल्यासारखे वागतात, ते, आपण श्रीमन्त आहों तोंपर्यंतच (आपण दरिद्री झालों, कीं, जग आपल्यावर उलटलेंच!) ●●●

अनुष्टुभ्

ज्येष्ठो भ्राता, पिता वाऽपि यश्च विद्यां प्रयच्छति ।
त्रयस्ते पितरो ज्ञेया धर्म्ये च पथि वर्तिन ॥ १६॥

अनुष्टुभ्

मोठा भाऊ, पिता किंवा ज्यानें विद्या दिली तुला।
पिता तिघांस मानावें; धर्माचा मार्ग हा भला ॥ १६॥

गद्यार्थ— धर्म मार्गानें चालत जाणें असल्यास, तू आपला मोठा भाऊ, पिता, व विद्यादाता गुरु या तिघानाहि पितृतुल्यच मानीत जा. ●●●

अनुष्टुभ्

उपाध्यायान्दशाचार्य आचार्याणा शतं पिता।
सहस्रं तु पितृन्माता गौरवेणातिरिच्यते ॥ १७ ॥

अनुष्टुभ्

दशोपाध्यायासि गुरु पिता गुरुशताहुनी ।
सहस्रहि पित्यांहून माता श्रेष्ठचि मन्मनीं ॥१७॥

गद्यार्थ— (धर्मकार्य करणाऱ्या) दहा कुलोपाध्यायाहून, विद्यादाता गुरु श्रेष्ठ, शंभर गुरूहून पिता श्रेष्ठ, आणि सहस्र पित्याहून माता श्रेष्ठ होय! ●●●

अनुष्टुभ्

तद् ब्रूहि वचनं देवि राज्ञो यदभिकाङ्क्षितम् ।
करिष्ये प्रतिजाने च रामो द्विर्नाभिभाषते ॥ १८ ॥

अनुष्टुभ्

राजेच्छा काय कैकेयी! सांग तें मज एकदां।
पाळीन ती प्रतिज्ञा मी, राम बोले न दोनदां ॥ १८॥

गद्यार्थ— (रामायण. दशरथानें कैकेयीस दिलेला वर पितृभक्तीनें श्रीराम पाळून करतात हा पितृभक्तीचा महान आदर्श) तर हे कैकेयी, दशरथराजाची काय इच्छा आहे तें मला सांग. मी ती पूर्ण करीन, ही तुजपाशीं मी प्रतिज्ञा करतों. राम कधीं दोनदां बोलत नसतो. (दिलेला शब्द नेहमीं खराच करतो, फिरवीत नाहीं ) ●●●

अनुष्टुभ्

नाहं जानामि केयूरे नाहं जानामि कुण्डले ॥
नूपुरे त्वेव जानामि नित्यं पादाभिवन्दनात् ॥ १९॥

अनुष्टुभ्

जाणतों मी न केयूरां, जाणतों मी न कुण्डलें ॥
मात्र नूपुर जाणें मी नित्य पादनतीमुळें ॥ १९

गद्यार्थ— ( रामायण. सीतेला रावणानें नेली, तेव्हा, तिनें आपल्या अंगावरचे अलंकार वाटेंत ठिकठिकाणीं टाकून, रामाला रावण गेल्याचा मार्ग सापडावा अशी व्यवस्था केली. राम लक्ष्मणाना, सीतेच्या शोधात, ते सापडले, तेव्हा " हे दागिने तू ओळखतोस काय ?" असें लक्ष्मणाला विचारण्यात आलें असता, त्यानें दिलेलें उत्तर, या श्लोकात आहे— ) मी केयूर ( बाहूवर घालण्याचा अलंकार ) ओळखीत नाहीं, ( कानातलीं ) कुंडलें सुद्धा ओळखीत नाहीं. पण नेहमीं सीतामाईच्या पाया पडण्याच्या माझ्या सवयीमुळे पायातलीं पैंजणें तेवढींच ओळखू शकतों. ( दिरानें आपल्या भावजईशीं वागण्याचा महान् आदर्श यात दर्शविला आहे, कीं, दिरानें इतके नम्र, सभ्य, सच्छीलपणें वागावें, कीं, त्याची दृष्टि भावजईच्या पायाहून वर कधींच जाऊ नये.

●●●

शार्दूलविक्रीडित

तिष्ठन् भाति पितुः पुरो भुवि यथा सिंहासने किं तथा ?
यत्संवाह्यत सुखं हि चरणौ तातस्य, किं राज्यतः ?॥
किं भुक्ते भुवनत्रये धृतिरसौ भुक्तोज्झिते या गुरो—
रायासः खलु राज्यमुज्झितगुरोस्तत्रास्ति कश्चिद्गुणः ? ॥ २०

सुमंदारमाला

पित्याच्या पुढें भूवरी जो उभा, तो
तसा शोभतो काय सिंहासनीं ?
पित्याच्या चुरोनी पदां सौख्य जैसें,
तसें का मिळे राज्यही सेवुनी ? ॥
पित्यामागुनी जेवतां शांति ये जी,
तशी काय त्रैलोक्यही भोगुन ?
त्यजोनी पित्या, राज्य हें कष्टदायी !
कुणा त्यात काहीं दिसे का गुण ? ॥ २० ॥

गद्यार्थ— (नागानंद नाटकातील पित्याच्या सेवेपुढें राज्य व सिंहासन तुच्छ मानणारा पितृभक्त पुत्र म्हणतो— ) पित्याच्या पुढ, (नम्रतेनें,) भूमीवर, (त्याच्या आज्ञापालनासाठीं) उभा राहणारा पितृभक्त मुलगा, जितका शोभतो, तितका, तोच, सिंहासनीं बसूनहि शोभतो काय ? पित्याच्या सेवेमध्यें, त्याचे पाय चुरण्यानें, जें सुख पितृभक्ताला लाभतें, तें, प्रत्यक्ष राज्य सेवून तरी मिळतें काय ? पित्यानें भोजन करून उरलेलें अन्न, भक्षण करणाऱ्या, पितृभक्ताला जी शांति प्राप्त होते, ती त्रैलोक्य भोगून तरी मिळते काय ? तेव्हां मला तर असेंच वाटतें कीं पितृसेवा सोडून राज्यप्राप्ति होणें हें कष्टप्रदच असतें. त्यात काय अर्थ आहे ?

●●●

अनुष्टुभ्

सदा वक्रः सदा क्रूरः सदा पूजामपेक्षते ।
कन्याराशिस्थितो नित्यं जामाता दशमो ग्रहः ॥ २१ ॥

अनुष्टुभ्

सदा वक्र सदा क्रूर म्हणे 'द्या मान' सर्वदा ! ॥
दहावा ग्रह जामात कन्या राशीस जो सदा ॥ २१ ॥

गद्यार्थ— ( कन्या = मुलगी व दुसरा अर्थ सूर्य ज्या राशींतून फिरतो त्यापैकीं एक राशीस = मराठींत तो तिच्या राशीस लागला म्हणजे छळू लागला, दुसरा अर्थ-राशिचक्रापैकीं राशीस. वक्र = वाकड्यात शिरणारा, पचागात वक्री ग्रह म्हणतात, तो दुसरा अर्थ ) नेहमींच वक्र ( वक्री ), नेहमींच क्रूर; नेहमींच मान इच्छिणारा, जावई हा कन्याराशीला नेहमींच लागलेला (नवग्रहापलीकडचा,) दहावा ग्रहच जणू ! ( सूर्यसुद्धा एकाच राशीला सतत नसतो ! )

●●●

अनुष्टुभ्

यस्य भार्या शुचिर्दक्षा भर्तारमनुगामिनी ।
नित्यं मधुरवक्त्री च सा रमा, न रमा रमा ॥ २२ ॥

अनुष्टुभ्

ज्याची पत्नी दक्ष शुद्ध, पती मागुतिं जातसे ।
मधुभाषी-तीच लक्ष्मी ! लक्ष्मी लक्ष्मी खरी नसे ॥ २२ ॥

गद्यार्थ—ज्याची पत्नी, (अंतर्बाह्य) पवित्र, स्वकर्तव्यात दक्ष, आणि पतीचें अनुसरण करणारी, आणि सदा मधुरभाषिणी, ती खरी लक्ष्मीच ! लक्ष्मी ( संपत्ति ) ही लक्ष्मी नव्हे.

●●●

अनुष्टुभ्

शीलभारवती कान्ता पुष्पभारवती लता ।
अर्थभारवती वाणी भजते कामपि श्रियम् ॥ २३ ॥

अनुष्टुभ्

शीलभारें नता कांता । पुष्पभारें नता लता ।
अर्थभारें नता वाणी । दिसती फार शोभुनी ॥ २३ ॥

गद्यार्थ— (मूळ संस्कृत श्लोकांतले शब्द मराठींत सहज समजण्याजोगे असल्यानें तसेच ठेवले आहेत.) सच्छीलाच्या भारानें (नम्रवर्तनी) कांता; पुष्पभारानें (लवलेली) लता; (मोठा) अर्थ भरल्यानें (उन्नत अशी) वाणी, या तीन वस्तूंना कांहीं अवर्ण्य सौंदर्य असतें!

●●●

उपजाति

कार्येषु मन्त्री करणेषु दासी भोज्येषु माता शयनेषु रम्भा।
धर्मानुकूला क्षमया धरित्री भार्या च षाड्गुण्यवतीह दुर्लभा

शार्दूलविक्रीडित

सल्लागार, कसेंहि कार्य पडतां, दासीच कर्मांमधें
माता भोजन घालितां, नि शयनीं रंभेपरी सौख्य दे॥
धर्माला अनुकूल वृत्ति, पृथिवीपेशी क्षमा जी धरी
हे साही गुण जींत, दुर्लभ अशी पत्नी त्रिलोकान्तरीं २४

गद्यार्थ— (कसलेंहि कार्य करण्यापूर्वीच्या योजनावस्थेंत) जी पतीची सल्लागार असते, (प्रत्यक्ष) कार्य करतांना जी दासी सारखी (अंग मोडून परिश्रम करते,) पतीला भोजन घालताना आई (इतक्या वात्सल्यानें त्याच्या पोषणास जपते;) शयनीं रंभेप्रमाणें (रतिसुख देऊन तृप्त करते,) धर्माचरणाच्या बाबतींत पतीची पूर्ण सहकार्य करणारी; (सर्वसहा) पृथ्वीइतकी क्षमाशील (वृत्ति असलेली) असे सहाचे सहा गुण एकवटलेली, अशी पत्नी, या जगीं दुर्लभ आहे.

●●●

आर्या

तल्पे प्रभुरिव गुरुरिव मनसिजशास्त्रे श्रमे भुजिष्येव।
गेहे श्रीरिव गुरुजनपुरतो मूर्तेव सा व्रीडा॥ २५॥

आर्या

शयनीं प्रभुपरि, गुरुपरि रतिशास्त्रीं, भृत्य इतर कष्टांत।
घरांत लक्ष्मीपरि, गुरुपुढतीं लज्जाच ती असे मूर्त २५

गद्यार्थ— आदर्श स्त्री, ही शयनीं, आपल्या प्रेमानें पतीला आपला आज्ञाधारक सेवक बनविते, रतिशास्त्रामध्ये पतीची गुरु असते, पण कष्ट करण्यांत जी स्वतःच पतीची नोकर होते; घरास लक्ष्मीप्रमाणें (समृद्धिवैभव यांचें सौंदर्य देते,) व वडील माणसांच्या पुढें मूर्तिमंत लज्जाच असते!

●●●

अनुष्टुभ्

न गृहं गृहमित्याहुर्गृहिणी गृहमुच्यते।
गृहं तु गृहिणीहीनं कान्तारादतिरिच्यते॥ २६॥

अनुष्टुभ्

न घरा, घर हें नांव; गृहिणीच खरें घर।
घर जें गृहिणीवीण रानाहूनि भयंकर॥ २६॥

गद्यार्थ— घर हें नांव (नुसत्या रिकाम्या) घराला देत नाहींत. त्यांतली गृहिणी हें खरें घर, गृहिणीविना घर हें रानाहून भयंकर!

●●●

अनुष्टुभ्

वृक्षमूलेऽपि दयिता यत्र तिष्ठति तद् गृहम्॥
प्रासादोऽपि तया हीनो ह्यरण्यसदृशः स्मृतः॥२७॥

अनुष्टुभ्

झाडाखालींहि राहील स्त्री जिथें गृह तें खरें!
स्त्रीविना राजवाडाही अरण्याच्यासमान रे॥ २७॥

गद्यार्थ— पत्नी जिथें राहील, मग तें स्थळ झाडाखाली कां असेना, तेंच खरें घर; पत्नीविरहित राजवाडासुद्धां अरण्या-सारखाच समजावा.

●●●

आर्या

जीवति जीवति नाथे, मृते मृता, या मुदा युता मुदिते।
सहजस्नेहरसाला कुलवनिता केन तुल्या स्यात्?॥२८॥

आर्या

नाथ जगे तों जगते, मरतां मरते, सुखें सुखाचे ती।
सहज-प्रेम-मधुर जी तुल्य कशाशीं अशी
कुलस्त्री ती?॥२८॥

गद्यार्थ— पति जिवत असे तोंवरच, जी (खऱ्या अर्थानें) जगते; तो मेला कीं, जी मरते; त्याला आनंद झाला कीं, जिला आनंद होतो; सहज म्हणजे अकृत्रिम प्रेमरसानें जी मधुर, अशी कुलस्त्री कशाशीं तुल्य असेल?

●●●

अनुष्टुभ्

दामोदरस्य मुरली कथं न भवति प्रिया?।
विप्रयोगे गतप्राणा, सप्राणाऽधरयोगतः॥२९॥

अनुष्टुभ्

**प्रिय कां न गमे कृष्णा मुरली एकजीविनी ?।**
**वियोगीं जी गतप्राणा सप्राणा मात्र चुंबनीं ॥२९॥**

गद्यार्थ—(मुरलीचें रूपक पुढ करून आदर्श पत्नीचें वर्णन.) प्राण शब्दावर कोटि; मुरलीकडे घ्यावयाचा अर्थ गतप्राण म्हणजे आत वायु नसलेली, म्हणून नाद न काढणारी, स्त्रीकडे-मृत, मृतप्राय. सप्राणा--मुरलीकडे आत वायु असलेली, म्हणजे नाद करणारी, बोलकी. स्त्रीकडे—जीवत–पुनर्जीवन लाभलेली. जी मुरली (आदर्श, एकजीव झालेल्या पत्नीप्रमाणें,) पतिवियोगानें गतप्राण व अधरीं घेतली असता सप्राण होते, ती (अद्वैतभाव पावलेली) मुरली कृष्णाला प्रिय का वाटू नये ? ●●●

वैतालीय

शशिना सह याति कौमुदी सह मेघेन तडित्प्रलीयते।
प्रमदाः पतिवर्त्मगा इति प्रतिपन्न हि विचेतनैरपि ॥३०॥

वैतालीय छंद

**शशिच्या सह जाइ कौमुदी**
**जलदाच्या सह वीज लुप्त ती ॥**
**पतिमागुति जाति अगना**
**असतें ज्ञानचि हें अचेतनां ॥ ३० ॥**

गद्यार्थ --(कुमारसंभवातील मदनदहनानंतर रतीनें केलेला विलाप) चंद्राच्या सह चंद्रिका निघून जाते; मेघाबरोबरच वीज लोप पावते; (हीं दोन्हीं उदाहरणें स्पष्टपणें हेंच दर्शवितात, कीं,) पत्नीनें पतीचाच मार्ग अनुसरावयाचा असतो—या गोष्टीची जाणीव अचेतन सृष्टीला सुद्धा आहे (तेव्हा मीच कशी रे तुझ्या मागें राहिलें ! आणि मदना ! तू तरी मला एकटीला सोडून कसा गेलास ! अचेतनाइतकेंसुद्धा ज्ञान आप त्याला नसावें !)
●●●

अनुष्टुभ्

पतिर्नाथः पति प्राणा पतिस्ते पालको न किम् ।
पतिस्तेऽधिपतिर्मुख्यो योगक्षेमकर पतिः ॥
त्वदर्थे सहते क्लेशास्तत्र तत्र दिवा निशि ।
त्वं तावद्वर्तसे गेहे निर्भया स्वस्थमानसा ॥ ३१ ॥
एतेषामुपकाराणां कृतेऽसौ करतस्तव ।
क वाञ्छति कर भद्रे राजा सन्ननधारय ॥
" शुद्धा प्रीति, स्मित चारु, सात्त्विकी वशवर्तिता "
इत्येतत्त्रयमाकाङ्क्षन् न महोदार एष किम् ? ॥ ३१ ॥

अनुष्टुभ्

**पति नाथ पति प्राण, न कां त्वत्पति पालक ?।**
**मुख्याधिपति तूतें तो योगक्षेमास दायक ॥**
**साहे क्लेश तुझ्यासाठीं जेथें तेथें अहर्निश।**
**तेणें तूं राहसी गेहीं निर्भय स्वस्थमानस ॥**

**इच्छी या उपकारांचेस्तव तो तुजपासुनी —।**
**कर काय, जरी राजा, तें सखे घेइ जाणुनी ॥**
**" शुद्ध प्रेम, हंसूं गोड; प्रेमें आज्ञेंत वर्तन। "**
**हीं तीन मात्र इच्छी तो अत्युदारत्व काय न ? ॥ ३१ ॥**

गद्यार्थ-- (शेक्स्पियरच्या उताऱ्याचें कै. गु. म. पा. ओककृत संस्कृत भाषांतर.) हे स्त्रीजाति ! पति हा तुझा नाथ, तुझें जीवन, तुझा पालकच नव्हे का ? तुझ्या हृदयराज्याचा तो राजा तुझा योगक्षेम चालविणारा; तो रात्रंदिवस तुझ्यासाठीं ठायीं ठायीं कष्ट सोशीत असतो आणि त्यामुळें तू गृहामध्यें निर्भय स्वस्थचित्त राहू शकतेस !
●●●

इतक्या या सर्व उपकारांचा मोबदला म्हणून, तुझ्या, हृदयराज्याचा राजा असून, तुझा पति, तुजकडून काय करभार वसूल करू इच्छितो तें नीट जाणून घे. "विशुद्धप्रेम, मधुर हास्य, आणि सात्त्विक प्रेमळ अशी आज्ञाधारकता !" (आता तूच विचार कर कीं–) एकट्या तीनच गोष्टींची तुजकडून अपेक्षा करणारा, तुझा तो पतिराजा किती उदार हृदयाचा असेल बरें ?
●●●

आर्या

वयसि नवे स्वामिन्यः सहचर्य. सन्ति मध्यमे वयसि।
वार्द्धक्ये तु नराणां धात्रीकर्माणि कुर्वते दयिता ॥ ३२ ॥

आर्या

**स्त्री मध्यमीं सहचरी, तारुण्यीं स्वामिनीच पुरुषाची।**
**येतां वार्धक्य तया होई परिचारिकाच ती त्याची ॥ ३२ ॥**

गद्यार्थ—तारुण्यामध्यें पत्नी ही पतीची स्वामिनी; मध्यमवयांत सहचरी (मित्रच); व वार्धक्यामध्यें ती त्याची शुश्रूषक परिचारिका होते.
●●●

उपजाति

सखीं सुशीलां कुशलां सुरूपां यः सानुरागां भुवि विन्दतेऽत्र।
किं तस्य रत्नैरुत रम्यहर्म्यैः क' शेवधिर्वास्ति ततो गरीयान्? ॥३३॥

उपजाति

सच्छील कौशल्य-सुरूप-युक्ता
जगीं मिळे प्रेमळ ज्यास कांता॥
रत्नें तया हर्म्यहि काय होय?
तिच्याहुनी सन्निधि थोर काय?॥ ३३ ॥

*गद्यार्थ*—(*मूळ संस्कृत श्लोक कै. गु. म. पा. ओककृत.*) *ज्या (धन्य) पुरुषाला, या जगात, सुशील, कुशल, सुंदर व* प्रेमळ अशी पत्नी मिळते, त्याला रत्नांची किंवा प्रासादाची पर्वा काय? अशा पत्नीपेक्षा मोठा धनकोश तो कोणता?

अनुष्टुभ्

लक्ष्मीवता कुदाराणामलक्ष्मीः सहचारिणी।
निर्लक्ष्मीकाः सुदारास्तु लक्ष्मीप्रणयभाजनम् ॥३४॥

अनुष्टुभ्

कुपत्नीक धनेशांच्या आकाबाई फिरे घरीं।
सुपत्नीक दरिद्र्यांना प्रेमें लक्ष्मी स्वयें वरी ॥३४॥

गद्यार्थ— (कै. गु. म. पा. ओक.) वाईट बायको असलेल्या लक्ष्मीवंताच्या घरीं, (आकाबाई,) अवदसा, ही सहचरी असते. पण चांगली बायको असलेल्या दरिद्री पुरुषांवर, लक्ष्मी स्वतः प्रेम करते!

आर्या

आपदि मित्रपरीक्षा शूरपरीक्षा रणाङ्गणे भवति।
विनये वंशपरीक्षा, स्त्रियः परीक्षा तु निर्धने पुंसि ॥३५॥

आर्या

संकटिं मित्र, रणांगणिं सारे शूरहि परीक्षिले जाती।
संस्कृति वंशाची अन् गरिबी स्त्रीची करी परीक्षा ती॥३५॥

गद्यार्थ— संकटें आलीं असता, (ते कसे वागतात यावरून) मित्राची परीक्षा होत असते; रणांगणांत (ते कसे लढतात यावरून) शूराची परीक्षा होत असते. (मुलांना) शिक्षण (संस्कार) कसले दिले जातात यावरून वंशाची परीक्षा होत असते. आणि पतीला दारिद्र्य आलें असतां (ती कसा संसार करते यावरून) स्त्रीची परीक्षा होते.

शार्दूलविक्रीडित

सूनुः सच्चरितः सती प्रियतमा, स्वामी प्रसादोन्मुखः
स्निग्धं मित्रमवञ्चकः परिजनो निःक्लेशलेशं मनः॥
आकारो रुचिरः स्थिरश्च विभवो, विद्यावदातं मुखं
तुष्टे विष्टपहारिणीष्टदहरौ सम्प्राप्यते देहिना ॥३६॥

शार्दूलविक्रीडित

सच्छीला गृहिणी, सुवृत्त मुलगा, सुप्रीत ऐसा धनी
प्रेमी मित्र, मन व्यथेविण, रमे जो भृत्य ना वंचनीं॥
बांधा गोंडस, वैभव स्थिर,मुखीं विद्येमुळें तेज तें
तोषे इष्टद तो भवान्तक हरी, तेव्हांच हें लाभतें ॥३६॥

*गद्यार्थ*— *सद्वर्तनी पुत्र, सच्छील पत्नी, आपल्यावर संतुष्ट* असा स्वामी, प्रेमळ मित्र, न फसविणारा नोकर, यत्किंचितहि क्लेश नसलेलें मन, सुंदर बांधा, स्थिर वैभव, विद्येनें शोभणारें मुख, हें सर्व, भवसागरातून मुक्त करणारा व इष्ट देणारा, श्रीहरि, ज्यावर प्रसन्न होतो, त्याच धन्य पुरुषास प्राप्त होत असतें.

अनुष्टुभ्

यत्र मे नीयते भर्ता स्वयं वा यत्र गच्छति।
मया च तत्र गन्तव्यमेष धर्मः सनातनः ॥ ३७ ॥

अनुष्टुभ्

नेशी मत्पति तू जेथें, जाई वा तो स्वयें जिथें।
हा सनातन रे धर्म, कीं, मी जावें तिथें तिथें ॥ ३७ ॥

गद्यार्थ— (केवळ प्रेमासाठीं, जाणूनबुजून, अल्पायुषी सत्यवानास सावित्रीनें वरिलें. त्याला जेव्हा यम नेऊं लागला, तेव्हा सावित्री त्याचे मागून चालली. ती चालून दमली, म्हणून, यमानें तिला परत जाण्यास सांगितलें, तेव्हा ती म्हणते—) जेथें माझा भर्ता नेला जात आहे किंवा जेथें तो आपणहून जाईल, तेथें तेथें, त्याची सहचरी, मी, जावें हाच सनातन धर्म आहे.

वंशस्थ

न कामये भर्तृविनाकृता सुखं
न कामये भर्तृविनाकृता दिवम् ॥
न कामये भर्तृविनाकृता श्रियं
न भर्तृहीना व्यवसामि जीवितुम् ॥ ३८ ॥

उपजाति

पतीविना मी सुख इच्छितेंच ना
न इच्छितें स्वर्गहि मी पतीविना ॥
संपत्ति ना इच्छितसे पतीविण
इच्छी न त्यावीण जगूंहि जीवन ॥ ३८ ॥

गद्यार्थ— ( सावित्रीनें परत जावें म्हणून यमानें तिला नाना आमिषें दाखविलीं– सुख, संपत्ति, स्वर्ग देऊं केला; तेव्हा, ती बाणेदारपणें म्हणते– ) पतीपासून विधुर होऊन मी सुख इच्छीत नाहीं. पतिविरहित मी स्वर्ग इच्छीत नाहीं. पतीची प्राप्ति होणार नसेल तर मी संपत्तीहि इच्छीत नाहीं पतीवाचून मी जगूंच इच्छीत नाहीं.

●●●

अनुष्टुभ्

यदि त्वं प्रस्थितो दुर्गं वनमद्यैव राघव ।
अग्रतस्ते गमिष्यामि मृद्‌नन्ती कुशकण्टकान् ॥३९॥

अनुष्टुभ्

रामा ! घोर वनीं जाण्या आजची निघसी जर ।
तुडवीत तुझ्या आधीं काटे, मी निघतें तर ॥ ३९ ॥

गद्यार्थ— ( ऐन राज्याभिषेकाचे वेळींच श्रीरामचंद्राच्या कपाळीं वनवासास जाणें आलें. सीतेला बरोबर नेण्याची इच्छा नव्हती पण सीता ऐकेना, ती त्याच्या पुढें त्याच्या मार्गावरील कांटेकुटे आपल्या कोमल पदकमलांनीं तुडवीत, त्याचा मार्ग निष्कण्टक करण्याचा स्वतः निश्चय केल्याचें सांगते. )

हे राघवा ! तू घोर अरण्यात जाण्यास आजच निघणार असशील तर, हीं, मी, तुझ्या आधीं, तुझ्या मार्गांतले कांटे तुडवीत ( तुझा मार्ग निष्कंटक करण्यासाठीं ) तुझ्यापुढें निघालें !

●●●

अनुष्टुभ्

यस्त्वया सह स स्वर्गो निरयो यस्त्वया विना ।
इति जानन् परां प्रीतिं गच्छ राम मया सह ॥ ४० ॥

अनुष्टुभ्

जो तुझ्यासह तो स्वर्ग, नर्क तो, जो तुझ्याविण ।
जाणुनी थोर ही प्रीति, जा रामा ! मज घेउन ॥४०॥

गद्यार्थ— सीता म्हणते, रामा, तुझ्या संगतींत जें काय मोक्ष्य प्राप्त होईल, त्यालाच, मी स्वर्ग म्हणतें, तुझ्या विरहित, जें काय असेल, ( मग तें विश्वांतले सर्व सुख का होईना ) त्यालाच मी नरक मानतें; तेव्हा माझ्या प्रेमाची ही उत्कटता जाणून, रामा, मला बरोबर घेऊन तूं वनात चल.

●●●

अनुष्टुभ्

न पिता नात्मजो वात्मा न माता न सखीजनः ।
इह प्रेत्य च नारीणां पतिरेको सदा गतिः ॥ ४१ ॥

अनुष्टुभ्

ना सखीजन ना माता ना पिता सुत, ना स्वतां ।
येथें, मृत्यूपुढें स्त्रीला पति हा गति एकटा ॥ ४१ ॥

गद्यार्थ— ( सीतेचे उद्गार ) बाप नाहीं, मुलगा नाहीं, स्वतः ( ची पुण्याई ) नाहीं, आई नाहीं, मैत्रिणी नाहीं—या जगात काय किंवा परलोकात गेल्यावर काय, स्त्रीला पति हाच एक गति होय. ( एकच प्याल्यातली सिंधु हेच शब्द बोलते. )

●●●

अनुष्टुभ्

कृतकृत्या हि वैदेही छायेवानुगता पतिम् ।
न जहाति रता धर्मे मेरुमर्कप्रभा यथा ॥ ४२ ॥

अनुष्टुभ्

गेली छायेपरी सीता कृतार्थो पतिमागुनी ।
मेरूस ज्यापरी सूर्य सोडीना धर्मपालनीं॥ ४२॥

गद्यार्थ—( पतीबरोबर वनात जाऊन अद्वैतभावानें त्याच्या सर्व सुखदुःखात सहभागी होण्यास मिळाल्यानें ) कृतार्थ होऊन सीता छायेसारखी पतीमागुती गेली धर्मरत असलेली स्त्री, सूर्य जसा मेरूभोंवतालची प्रदक्षिणा कधीं सोडीत नाहीं, तशी पतीला कधींच सोडीत नाहीं.

●●●

उपजाति

जीवेति वज्रधरस्य पश्चाच्छचीं प्रभृत्याप्रतिरूपरूपाम् ।
न मादृशी राक्षस धर्षयित्वा पीतामृतस्यापि तवास्ति मोक्षः ॥ ४३ ॥

वसंततिलका

अत्यंत सुंदर शचीस बलात्करोनी
इंद्रापुढेंहि कधिं दीर्घ जगेल कोणी ॥
तूं राक्षसा धरिशि मत्सम जो स्त्रियेस
प्राशी सुधा तरिहि निश्चित मृत्यु त्यास ॥ ४३ ॥

गद्यार्थ— ( स्वतःच्या शीलाच्या स्थैर्याविषयीं, आणि रामाच्या सामर्थ्याविषयीं महान् विश्वासामुळें, सीता, रावणाला ठणकावून म्हणते— ) एक वेळ अप्रतिम रूपवती अशा इंद्राणीवर बलात्कार करूनहि, एखादा दुष्ट, इंद्राच्या पश्चात् चिरकाल जगू शकेल. परंतु हे रावणा! ( जिचा त्राता राम आहे अशा ) मजसारख्या सतीला, धरून, मग तू जरी अमृत प्यालास तरी, त्या तुला (मृत्यूच येणार;) मोक्षप्राप्ति शक्य नाहीं हें ध्यानीं ठेव!

●●●

रथोद्धता

आ-विवाहसमयाद् गृहे वने शैशवे तदनु यौवने पुनः ।
स्वापहेतुरनुपाश्रितोऽन्यया रामबाहुरुपधानमस्तु ते ॥ ४४ ॥

साकी

लग्नापासुनि, सखे, आजवर, गृहांत अथवा रानीं ।
लहान होतों तदा, नि झालों जेव्हां तरुण नि तरुणी ॥
कुण्या दुजीनें अस्पृष्ट, नि तुज शिर टेकुनि निजण्याची
रामबाहु ही उशीच सीते! लाभो तुजसि सदाची ॥४४॥

गद्यार्थ— ( आदर्श गृहस्थाश्रमी गृहिणीच्या, परमोच्च सुखाचें, उत्तररामचरितांतील, हें वर्णन आहे. लंकाविजयानंतर, राज्याभिषेकानंतर, सीता व राम, लक्ष्मणाचा चित्रपट पहात होते. सीता गरोदर असल्यानें दमून तिला क्षणभर डोकें टेकून झोंप घ्यावेंसें वाटू लागलें, व इकडेतिकडे कोठ उशी दिसते काय, तें ती पाहू लागली असता, राम तिला म्हणतो— ) आपला विवाह झाल्यादिवसापासून, घरात असू, किंवा वनात असू, अगदीं ल्हान होतों तेव्हा, तसेच तारुण्यात आलों तेव्हाहि, हे सीते! दुसऱ्या कोणत्याहि स्त्रीनें ज्यावर कधीं डोकें टेकलें नाहीं असा हा रामबाहु, जसा आजपर्यंत तुझी उशी होत आला, तसाच आताहि होवो — ( अन्य कशली उशी कशाला शोधतेस ? )

●●●

अनुष्टुभ्

प्रवादः सत्यमेवायं त्वां प्रति प्रायशो नृप ।
पतिव्रताना नाकस्मात्पतन्त्यश्रूणि भूतले ॥ ४५ ॥

अनुष्टुभ्

सीतात्याग तुला रामा! कलंकचि खरोखर ।
पतिव्रतांचे ना व्यर्थ सांडती अश्रु भूवर ॥ ४५ ॥

गद्यार्थ— रामा! ( निरपराध पवित्रता अशा सीतेचा तू त्याग केलास ) हें तुला कलंकरूपच आहे. पतिव्रतांचे अश्रु व्यर्थ भूमीवर सांडत नसतात!

●●●

अनुष्टुभ्

सविशेषतया स्त्रीणां ह्रीमत्त्वमुपकारकम् ।
विवर्धयति सौंदर्यमलावण्यं च गुह्यति ॥ ४६ ॥

अनुष्टुभ्

उपकारक लज्जा ही स्त्रीजातीस विशेषतां ।
करी वर्धित सौंदर्य आणि झांकी कुरूपता ॥ ४६ ॥

गद्यार्थ— लज्जा ही, विशेषेंकरून स्त्रीजातीला, अत्यंत उपयुक्त असते. (असलेलें) सौंदर्य ती अधिक खुलवून दाखविते, व कुरूपता (असेल तर ती तिला) झाकून टाकते.

●●●

अनुष्टुभ्

काम रूपवती रत्नं निधिः शीलवती पुनः ।
पुंसो बलं स्त्रियो रूपं व्यसृजद् भगवान् विधिः ॥ ४७ ॥

अनुष्टुभ्

सुंदर स्त्री जरी रत्न; सच्छील स्त्री परी निधि!
रूप स्त्रीस, नरा शक्ति विभागें निर्मितो विधि ॥ ४७ ॥

गद्यार्थ— सुंदर रूप असलेली स्त्री, ही जरी अमोल रत्नासारखी असली तरी सच्छील स्त्री, ही एखाद्या धनकोशासारखी असते. पुरुषाला शक्ति व स्त्रीला रूप अशी विभागणीच ब्रह्मदेवानें केली आहे.

●●●

अनुष्टुभ्

तावत्कुलस्त्रीमर्यादा यावल्लज्जाऽवगुण्ठनम् ।
हृते तस्मिन् कुलस्त्रीभ्यो वरं वेश्याङ्गनाजनः ॥ ४८ ॥

आर्या

लज्जावगुंठित असे तोंवर मर्यादशील कुलयुवति ।
जातां अवगुंठन तें, तीहुनि वरवी म काय वेश्या ती ? ॥ ४८ ॥

गद्यार्थ— लज्जेचा बुरखा घेऊनच, बोलणें, चालणें, वागणें, ही कुलस्त्रीची मर्यादा असते. लज्जेचें अवगुंठन टाकून देऊन जर ती वागूं लागली, तर असल्या कुलस्त्रीपेक्षां सरळ वेश्याच बरी नव्हे काय ? ●●●

शिखरिणी

पदन्यासो गेहाद् बहिरहिफणारोपणसमो
निजावासादन्यद् भवनमपरद्वीपतुलितम् ॥
वचो लोकालभ्यं कृपणधनतुल्यं मृगदृशः
पुमानन्यः कान्ताद्विधुरिव चतुर्थीसमुदितः ॥ ४९ ॥

शिखरिणी

**घराच्या बाहेरी, पद अहिशिरीं ती समजते**
**निवासा लोकांच्या स्वमनिं परका देश गणिते ॥**
**तिची वाणी लोकां कृपणधनवत् दुर्लभ अति**
**चतुर्थीचंद्राच्यासम पतिविना अन्य जगतीं ॥ ४९ ॥**

गद्यार्थ— ( पूर्वकालीन कुलस्त्रीच्या वर्तनमर्यादांचें वर्णन. ) स्वतःच्या घराबाहेर पाऊल टाकणें, हें, सर्पाच्या फणावर पाऊल टाकण्यासारखें, ती मानते; स्वतःच्या घराहून अन्य कोणाचेंहि घर, हें, ती जणूं काय , परका देश, असें समजते. कृपणाचें धन, जसें, कोणालाहि अलभ्य, तद्वतच तिचें बोलणें भाषण हें परक्यांच्या कानाना दुर्लभ; आणि (गणेश) चतुर्थीला चंद्राचें दर्शन जसें अशुभ समजतात तसें च तितकें अशुभ, पतीवाचून दुसऱ्या कोणाचेंहि दर्शन ती समजते. ●●●

शार्दूलविक्रीडित

सञ्चारो रतिमन्दिरावधि, सखीकर्णावधि व्याहृतं,
चेतः कान्तसमीहितावधि, महामानोऽपि मौनावधि ॥
हास्यं चाधरपल्लवावधि, पदन्यासावधि प्रेक्षितं,
सर्वं सावधि; नावधिः कुलभुवां प्रेम्णः परं केवलम् ॥ ५० ॥

चाल फटक्याची

**कुलस्त्रियेच्या कृतिमर्यादा किती मधुर या गमतात—।**
**फिरणें होई तिचें फारतर शयनमंदिरापर्यंत ॥**
**तिचे पोंचती शब्द फारतर सखिजनकर्णोपर्यंत ।**
**धांव मनाची तिच्या, पतीचें ईप्सित करण्यापर्यंत ॥**
**मानाचीही मजल, अबोला पतिशीं धरण्यापर्यंत ।**
**हास्याची उकळीहि फारतर अधरपल्लवापर्यंत ॥**
**विनत दृष्टि पोंचते फारतर दुज्या पाउलापर्यंत ।**
**मर्यादा सर्वांत ठेवते—पतिवरच्या न प्रेमांत ॥ ५० ॥**

गद्यार्थ— ( कुलस्त्रीच्या कृतिमर्यादांचें अधिक विस्तारानें वर्णन. ) तिचें फिरणें, फार फार तर, शयनमंदिरापर्यंत होत असतें; तिच्या मुखांतील शब्द फार तर, सखींच्या कानापर्यंत ऐकूं जावयाचे; तिच्या मनाची धांव, फार तर, पतीचें ईप्सित करण्यापर्यंत; तिनें राग, कोप, मान, धरला, तर, त्याचें पर्यवसान, फारतर, पतीशीं अबोला धरण्यातच व्हावयाचें; अगदीं हास्याची उकळी फुटली, तरी, जरा अधरपल्लव उमलण्यापुरतीच तिची मजल जावयाची; तिची दृष्टि, फारतर पुढच्या पावलापर्यंत पोंचेल, इतकी विनत असावयाची; अशा रीतीनें कुलस्त्री, सर्व वर्तणुकींत, मर्यादा मानते; पण, पतीवर करावयाच्या प्रेमांत मात्र, ती, कसलीच मर्यादा न मानता तें निःसीम करते ! ●●●

शार्दूलविक्रीडित

अभ्युत्थानमुपागते गृहपतौ तद्भाषणे नम्रता
तत्पादार्पणदृष्टिरासनविधिस्तस्योपचर्या स्वयम् ॥
सुप्ते तत्र शयीत तत्प्रथमतो जह्याच शय्यामिति
प्राच्यैः पुत्रि निवेदितः कुलवधूसिद्धान्तधर्मागमः ॥ ५१ ॥

शार्दूलविक्रीडित

**येतां स्वागतणें पतीस, वचनीं त्या, नम्रता ठेवणें**
**देणें आसन, दृष्टि लावुनि पदीं, त्यातें स्वयें सेवणें ॥**
**त्याच्या मागुनि झोंपणें—नि उठणें त्याच्याहि आधीं परी**
**प्राच्यांनीं कथिला मुली ! वघ कुलस्त्रीधर्म गे**
**यापरी ॥ ५१ ॥**

गद्यार्थ— घरीं आलेल्या पतीचें उठून, उभें राहून, स्वागत करणें; त्याच्याशीं बोलण्यात नम्रता ठेवणें; दृष्टि त्याच्या पायावर ठेवून, त्याला बसण्यास आसन देणें; स्वतः त्याची सेवा करणें; तो झोंपल्यानतर झोपणें; पण तो उठण्यापूर्वी आपण शय्या सोडून उठणें; असा, मुली, प्राचीन थोर लोकांनीं, कुलस्त्रीनें कसें वागावें, याचा आदर्श सांगून ठेवला आहे. ●●●

वसंततिलका

विश्रम्भरस्तु सुधिया गलितेऽपि भेदे
भावेन भक्तिसहितेन समर्चनीयः ॥
प्राणेश्वरश्चतुरया मिलितेऽपि चित्ते
चेलाञ्चलव्यवहितं हि निरीक्षणीयः ॥ ५२ ॥

शिखरिणी

पदे अद्वैताची महति तरिही भक्ति करुनी
परेशा पूजानें सुचतुर नरें भाव धरुनी ॥
तसें सुज्ञ स्त्रीनें, जरिहि हृदयैकत्व पटलें
पहावें नाथातें-तनु विभव झांकून पटलें ॥ ५२ ॥

गद्यार्थ— जसे एखाद्या सुज्ञ भक्तानें विश्वेश्वराशीं अद्वैत प्रतीत झाल्यानंतरसुद्धा, भक्तिभाव धरूनच त्याचें पूजन करणें हें योग्य, तद्वतच, चतुर कुलस्त्रीनें, आपल्या प्राणेश्वराशीं हृदयाचें एकत्व साधल्यानंतर सुद्धा, (अगदीं निर्लज्ज व निर्वस्त्र न होता) स्वतनुविभव वस्त्रानीं आवृत करूनच पतीचें दर्शन घ्यावें. (स्वयंवर नाटकांतील रुक्मिणी म्हणते त्याप्रमाणें "एकांतींहि सोडी ना विनया!") •••

अनुष्टुभ्

बिलाद्बहिर्बिलस्थान्तःस्थितमार्जारसर्पयोः।
मध्ये चाखुरिवाभाति पत्नीद्वययुतो नरः ॥ ५३ ॥

वसंततिलका

बिळाच्या आंत बाहेर सर्प आणिक मांजर।
मध्यें मूषक तो तैसा द्विभार्यापति हो नर ॥ ५३ ॥

गद्यार्थ— बिळाच्या आंत सर्प असावा, आणि, बाहेर बोका असावा, व, दोघांच्या मध्यें उंदीर सापडावा; तशी स्थिति "दोन बायकांच्या दादल्याची" असते •••

अनुष्टुभ्

द्वे भार्ये एकसंस्थे यः पुरुषः कुरुते कुधीः।
एकस्मिन् पञ्जरे व्याघ्रीद्वयं स्थापयते हि सः ॥ ५४ ॥

अनुष्टुभ्

जो मूर्ख दोन भार्यांना वसे एकत्र घेउनी।
एकाच पिंजऱ्यामध्यें तो ठेवी दोन वाघिणी ॥ ५४ ॥

गद्यार्थ— जो मूर्ख नवरा, दोन बायकांना, एकत्र घेऊन राहतो, तो, जणू काय, दोन वाघिणींना एकाच पिंजऱ्यांत कोंडून ठेवतो. •••

अनुष्टुभ्

न नवे यौवने कार्या त्वरा दारपरिग्रहे।
वार्द्धके न तु सा चिन्ता पुंसा श्रेयोऽभिकाङ्क्षिणा ॥ ५५ ॥

अनुष्टुभ्

इच्छी स्वश्रेय जो त्यानें लग्नाची करणें मनीं—।
वार्द्धकीं न कधीं चिंता, उतावीळ न यौवनीं ॥ ५५ ॥

गद्यार्थ— आपलें कल्याण व्हावें अशी इच्छा असेल, त्यानें, तारुण्यांत लग्नाची कधीं घाई करू नये, व म्हातारपणीं लग्नाची कधीं चिंता करू नये. •••

अनुष्टुभ्

पुरुषाभ्यधिका प्रीतिः स्त्रीणामिति न निश्चितम्।
वरीयसी भवत्येषा निर्विवादमिदं पुनः ॥ ५६ ॥

उपजाति

नराधिका प्रीति जगीं स्त्रियांची
याची जरी निश्चिति नैव साची ॥
स्त्रीप्रीति त्याहून वरिष्ठ होई
याच्यामधें वाद कुठेंच नाहीं ॥ ५६ ॥

गद्यार्थ— पुरुष प्रेम करतो व स्त्री प्रेम करते, तेव्हां त्यांच्या प्रेमाची तुलना करून पाहिल्यास, स्त्रीचें प्रेम पुरुषापेक्षा (आकारानें) अधिक भरेल हें कांहीं निश्चितपणें सांगता येत नाहीं, परंतु स्त्रीचें प्रेम (प्रकारानें मात्र) पुरुषापेक्षा वरिष्ठ असतें (त्याची उत्कटा, तीव्रता अधिक असते) यांत मात्र कुठेंच मतभेद नाहीं. "प्रेम हें स्त्रीचें जीवनसर्वस्व असतें—पण पुरुषाच्या जीवनाचा तें एक केवळ भाग असतें," असे इंग्रजींत एक वाक्य आहे.) •••

अनुष्टुभ्

आपतन्ती विपत्पुंसा धीबलेन निवार्यते।
इयं प्राप्ता स्त्रिया धैर्यात्सुसह्यत्वं तु नीयते ॥ ५७ ॥

अनुष्टुभ्

करी पुरुष, बुद्धीनें आपत्तींचें निवारण।
येतां त्या, स्त्रीच धैर्यानें नीट नेई निभाउन ॥ ५७ ॥

गद्यार्थ— (कुटुंबावर) आपत्ति येत असतां, पुरुष हा आपल्या बुद्धीनें त्याचें निवारण करतो; परंतु त्या प्रत्यक्ष येऊनच पडल्या, म्हणजे, स्त्री, ही धैर्यानें, त्यांतून नीट (संसाराचा गाडा) निभावून नेते—त्यांचीं दुःखें सुसह्य करते. •••

अनुष्टुभ्

स्त्रियो हि नाम खल्वेता निसर्गादेव पण्डिताः ।
पुरुषाणां तु पाण्डित्यं शास्त्रेणैवोपदिश्यते ॥५८॥

अनुष्टुभ्

स्त्रिया खरोखरी सान्या निसर्गानेंच पंडित ।
पुरुषांतील पांडित्य शास्त्रानीं त्यांस शिक्षित ॥५८॥

गद्यार्थ— पांडित्याचा विचार केला असता, असे दिसून येतें, कीं, पांडित्य ( सुज्ञता ) स्त्रीला खरोखर निसर्गदत्तच आहे. पण पुरुषाचें पांडित्य, हें केवळ, त्यांना शास्त्रानीं पढविलेलें आहे.

●●●

वसततिलका

स्त्रीणामशिक्षितपटुत्वममानुषीणा
संदृश्यते किमुत या प्रतिबोधवत्यः ॥
प्रागन्तरिक्षगमनात्स्वमपत्यजात—
मन्यैर्द्विजैः परभृताः खलु पोषयन्ति ॥ ५९ ॥

वसततिलका

स्त्री ही अमानुष, शिके न, तरी शहाणी
होईल मानुष किती मग ती शिकोनी ॥
घे कोकिला निज पिला वध पोषवोनी
अन्यां द्विजांकडुनि, जाइ नभीं उडोनी ॥ ५९ ॥

गद्यार्थ— ( शाकुंतलाच्या पाचव्या अंकांतला प्रसंग आहे. दुष्यंत हा शकुंतलेवर प्रेम केल्याचें, व गांधर्व विधीनें तिच्याशीं लग्न केल्याचें, सर्व, ऋषिशापानें विसरून जातो. अशा स्थितींत शकुंतला सगर्भा त्याचे दरबारीं येते व पूर्वीच्या प्रणयाच्या आठवणी सांगून स्वत.चा स्वीकार करण्यास विनविते. अर्थात् विस्मृतीनें ग्रासलेल्या दुष्यन्ताला हें सर्व कुभांड वाटतें, व दुसऱ्या कुणाच तरी 'लफडें' आपल्याला चिकटविलें जात आहे, असे वाटून, तो तें सर्व नाकारतो व कोकिळेचें उदाहरण देऊन शकुन्तलेला हिणवितो ! कोकिळा आपलीं अंडीं कावळ्याच्या घरट्यात टाकते व त्याच्याकडून आपल्या पिलाचें पोषण करून घेते, व म्हणून कोकिळ हा परभृत् म्हणतात. )

स्त्री ही शिक्षण न घेतांच मोठी शहाणी असते, ही गोष्ट, अमानुष स्त्रियात सुद्धा जर दिसून पडते, तर, मनुष्य योनींतली स्त्री, ही शिक्षण घेऊ शकत असल्यानें, तिची तर गोष्टच बोलायलाच नको; ( ती अमानुष स्त्रीहून अनेक पटीनें शहाणी असणार, यात काय संशय ! ) आकाशात उडून जाण्यापूर्वी ( नव्या स्वैरपणाला मोकळीक व्हावी म्हणून जणू काय ) कोकिळा या आपलीं पिलें दुसऱ्या पक्ष्याकडून पोषवून घेतात ( हें प्रसिद्धच आहे. )

●●●

अनुष्टुभ्

श्रिया गेहे मयाऽरण्ये रामस्त्यक्तस्त्वया पथि ।
बत मुद्रे ! पुरन्ध्रीणां प्रत्ययं कः करिष्यति ? ॥६०॥

अनुष्टुभ्

श्रीनें गृहींच, मार्गी तूं, मीं रामा त्यजिलें वनीं !
मुद्रे ! विश्वास हा ! स्त्रीचा धरील कधिं कां कुणी ? ६०

गद्यार्थ— ( अशोकवनात रामाची मुद्रा ( अंगठी ) दाखवून मारुतीनें सीतेची गांठ घेतली तेव्हां स्त्रीजातीच्या, ओळीनं तीन व्यक्ति, रामाला सोडून गेल्या, हा चमत्कारिक विचार मनात येऊन, एक प्रकारच्या विनोद बुद्धीनें, त्या मुद्रिकेला उद्देशून, सीता म्हणते— ) श्रीनं ( लक्ष्मीनें, राज्यवैभवानें ) रामाला अगदीं त्याच्या घरींच सोडलें. ( राज्याभिषेक होऊ शकला नाही म्हणून. ) मी त्याची धर्मपत्नी, पण मींहि त्याला अरण्यात सोडिलें. ( हरण झाल्यामुळें. ) आता हे मुद्रिके ! ( तू एकटीच त्याचेजवळ होतीस, पण मला खूण पटविण्यासाठीं ) मार्गात त्याला तूहि सोडून आलीस ! मग सारं बरें ( असे एकामागून एक, इजा बिजा तिजा, असे, स्त्रीकृत पुरुष-त्यागाचे अनुभव लक्ष्यात घेऊन ) स्त्रीचा कोणी विश्वास धरील का ?

●●●

अनुष्टुभ्

पतिर्हि देवता नार्याः पतिर्बन्धुः पतिर्गुरुः ।
प्राणैरपि प्रियं तस्माद् भर्तुः कार्यं विशेषतः ॥ ६१ ॥

अनुष्टुभ्

बंधु असून् गुरु, पत्नीला, पतीच, तिज देवता ।
प्रिय, प्राणाहुनी त्याचें करो पत्नी विशेषता ॥ ६१ ॥

गद्यार्थ— पत्नीला, पति हाच, सर्व नात्याच्या मायाममतानें, पति हाच गुरु, पति हाच देव, तिनें आपल्या प्राणांहूनहि, विशेषें त्याचेंच प्रिय करावें.

●●●

अनुष्टुभ्

अर्धं भार्या मनुष्यस्य भार्या श्रेष्ठतमः सखा ।
भार्या मूलं त्रिवर्गस्य भार्या मूलं तरिष्यतः ॥६२॥

अनुष्टुभ्

**अर्धांग स्त्री मनुष्याची सर्वश्रेष्ठहि मित्र ती।**
**धर्मार्थकाममूल स्त्री, मोक्षाची मूल तीच ती ॥६२॥**

गद्यार्थ— पुरुषाचें, स्त्री ही जणू अर्धे अगच, तीच त्याची सर्वश्रेष्ठ मित्र, धर्म, अर्थ, काम या तिन्ही पुरुषार्थांचें मूळ, स्त्रीच होय. व, (अखेर चौथा पुरुषार्थ जो मोक्ष, त्याप्रत,) पुरुषाला या भवसागरातून तारून नेण्यास, मूळ कारणहि, स्त्रीच ! ●●●

शालिनी

प्रेयो मित्रं बन्धुता वा समग्रा
सर्वे कामाः शेवधिर्जीवितं च ।
स्त्रीणां भर्ता धर्मदाराश्च पुंसा-
मित्यन्योन्यं वत्सयोर्ज्ञातमस्तु ॥ ६३ ॥

वसंततिलका

**नातीं समग्र उभयां, प्रिय, मित्र होत**
**अद्वैतजीवन, निधी, अखिलेप्सितार्थ ॥**
**पत्नी पतीस, पति तीसहि या जगात**
**वत्सास यां उभय, हेंच असो प्रतीत ॥ ६३ ॥**

गद्यार्थ— (मालती, माधव, या बालवयाच्या वधूवरास दिलेला आशीर्वाद—) एकमेकांना (सर्वात) प्रिय व्यक्ति, मित्र, (आई, बाप, बहीण, भाऊ, इ.) सर्व नातीं (ज्यात एकवटलीं आहेत असें माणूस,) (मनाच्या) सर्व आशा आकांक्षांचें केंद्र स्थान, जणू सर्व धनकोश, आणि, (अद्वैत पावलेलें) जीवनच असें; पत्नीला पति व पतीला पत्नी एकमेकास (वाटलीं पाहिजेत,) हें, या (बालवयीन) वधूवरास प्रतीत होवो ! ●●●

अनुष्टुभ्

नातन्त्री विद्यते वीणा, नाचक्रो विद्यते रथः ।
नापतिः सुखमेधेत या स्यादपि शतात्मजा ॥ ६४ ॥

वसंततिलका

**तारांविना जगतिं संभवते न वीणा**
**चक्रांविना कधि कुठें रथही असेना ॥**
**राहे सुखी पतिविना न कधीं कलत्र**
**होती स्वतांस जरि शंभरही सुपुत्र ॥ ६४ ॥**

गद्यार्थ— तारांवाचून वीणा असूच शकत नाहीं. चाकांवाचून रथहि असणें शक्य नाहीं. तद्वत्च, पतीवाचून स्त्री, सुखी होऊच शकत नाहीं;— मग तिला स्वत:चे शंभर का मुलगे असेनात. ●●●

वैतालीय

धनधान्यसमृद्धिशाल्यपि शिशुहीनं न गृहं विराजते ॥
शिशुरत्नमरीचिभासिते न पुनर्मूर्च्छति दैन्यजं तमः ॥६५॥

वैतालीय छंद

**बहु धान्य असून वा धन**
**न विराजे गृह तें शिशूविण ॥**
**शिशुरत्न जिथें प्रकाशतें**
**शिरतें ना तम दैन्य हें तिथें ॥ ६५ ॥**

गद्यार्थ— धन धान्य आदि सर्व समृद्धि असलेलें घर, जर शिशुहीन असेल तर त्याला कसलीच शोभा दिसत नाहीं. या उलट, बालकरूपी रत्नाच्या प्रकाशानें उजळलेल्या घरात, दैन्यरूपी अंधाराचें, पाऊल पडत नाहीं. ●●●

इंद्रवज्रा

पादोपभुक्ते तव पादुके मे एते प्रयच्छ प्रणताय मूर्ध्ना ॥
यावद्भवानेष्यति कार्यसिद्धिं तावद्भविष्याम्यनयोर्विधेयः ६६

इंद्रवज्रा

**पायातल्या या तव पादुका दे**
**शीर्षें तुला या प्रणतास मातें ॥**
**हें कार्य झालें तव सिद्ध जों न**
**तों मी तदाज्ञाच शिरीं धरीन ॥ ६६ ॥**

गद्यार्थ— (भरत रामास रानात भेटून म्हणतो— ) तू पायात घालून वापरलेल्या, या तुझ्या खडावा पायीं डोकें ठेवलेल्या मला दे. जोंवर तुझें हें (वनवासाची प्रतिज्ञा) कार्य संपलें नाहीं, तोंवर, मी, या पादुकांचा आज्ञाधारक होऊन राहीन. ●●●

अनुष्टुभ्

इह स्थास्यामि देहेन तत्र स्थास्यामि कर्मणा ।
नाम्नैव भवतो राज्यं कृतरक्षं भविष्यति ॥ ६७ ॥

अनुष्टुभ्

**येथें राहीन देहानें—कर्मानें तेथ राहिन ।**
**त्वन्नाममात्रें राज्याचें रामा ! होईल रक्षण ॥६७॥**

गद्यार्थ— ( भरत रामास म्हणतो–) मी येथेंच रानात तुझ्या जवळ राहीन, व कर्मानें अयोध्येंत राहीन; तुझ्या केवळ नावा नेंच तुझ्या राज्याचें रक्षण होईल. ( मी तें करण्याची आवश्यकता नाहीं. ) ●●●

अनुष्टुभ्

न हि तद् भविता राष्ट्रं यत्र रामो न भूपतिः ।
तद्वन भविता राष्ट्र यत्र रामो निवस्यति ॥ ६८ ॥

अनुष्टुभ्

होणें न तें कधीं राष्ट्र जेथें राम न भूपति ।
तें रान राष्ट्र होईल–जेथें श्रीराम राहती ॥ ६८ ॥

गद्यार्थ— ( भरताचें रामावर, प्रेम जितकें अपार, तितकाच विश्वास सुद्धा अपार होता. तो म्हणतो–) जेथें राज्यकर्ता श्रीराम नाहीं, तें राष्ट्रच होणार नाहीं. उलट, ज्या रानात श्रीराम राहात असेल तें रानसुद्धां राष्ट्रपदवीस पात्र ठरेल. ●●●

अनुष्टुभ्

सुचिरेणापि कालेन यशः किञ्चिन्मयार्जितम् ।
अचिरेणैव कालेन भरतेनाथ सञ्चितम् ॥६९॥

अनुष्टुभ्

अर्जिलें यश मी किंचित् दीर्घ कालचि कष्टुनी ।
अल्पकाळांत तें आज घसे भरत अर्जुनी ॥ ६९ ॥

गद्यार्थ— ( भरताचें त्यागपूर्ण बंधुप्रेम पाहून संतुष्ट झालेले श्रीराम म्हणतात–) एवढेंसें कुठें यश मी मिळविलें, पण तें दीर्घकाल कष्ट केल्याचें फळ आहे; पण भरतानें मात्र आज अगदीं थोड्या वेळांत (एका सपाट्यात) तें मिळविलें. ( धन्य त्याची. ) (पादुका मागितल्याचा प्रसंग.) ●●●

अनुष्टुभ्

दृष्टपूर्वं न ते रूपं पादौ दृष्टौ तवानघे ।
कथमन्वेषयामि त्वां रामेण रहितां वने? ॥ ७० ॥

वसंततिलका

पूर्वी स्वरूप न तुझें कधि पाहिलं तें
मीं पाहिले अनघ केवळ पाय सीते ॥
शोधावयास मग आज कसा शकेन
रानावनांत तुजला स्वपतीविहीन ? ॥ ७० ॥

गद्यार्थ— ( सीताहरणानंतर रामलक्ष्मणानीं सीतेचा शोध सुरू केला. " मी इकडे शोधतों, तू तिकडे शोध " असे रामानें म्हटल्यावर, एकट्या लक्ष्मणानें शोध कसा करावा ? कारण त्यानें सीतेच्या पायापलीकडे तिचें रूप कधींच पाहिलें नव्हतें तेव्हा ही अडचण लक्ष्मण सांगतो. ) हे निष्पाप सीते ! मी तुझे रूप यापूर्वी कधींच पाहिलेलें नाहीं, केवळ तुझ्या पायाचें मात्र, मला दर्शन घडलें आहे. तेव्हा आता या रानावनात रामाविरहित, अशा तुला, मी कसा शोधू ? ( बरोबर राम असता, तर तुला ओळखू शकला असता, पण, मी एकटा तें कसें करू ? ) ●●●

अनुष्टुभ्

दीप्तमग्निमरण्यं वा यदि रामः प्रवेक्ष्यति ।
प्रविष्टं तत्र मां देवि ! त्वं पूर्वमवधारय ॥ ७१ ॥

अनुष्टुभ्

दीप्त अग्नींत वा रानीं रामचंद्र शिरे जर ।
त्याआधीं जाण मी सीते ! शिरलोंच तिथें तर ॥७१॥

गद्यार्थ— (राम वनवासाला निघाला तेव्हां लक्ष्मणानेंहि त्याचेबरोबरच जाण्याचें ठरविलें. त्याप्रसंगीं तो सीतेस म्हणतो–) राम हा वनातच काय, पण, जळत्या आगींत जरी शिरणार असेल, तरी, हे सीते, मी हा लक्ष्मण, त्याचे आधींच त्यात शिरेन हें लक्षात ठेव ! ●●●

अनुष्टुभ्

न सर्वे भ्रातरस्तात भवन्ति भरतोपमाः ।
मद्विधा वा पितु पुत्राः सुहृदो वा भवद्विधाः ॥ ७२ ॥

अनुष्टुभ्

मारुते ! बंधु सारेही न होतीं भरतोपम ।
न वा मित्र तुझ्यापेसे–न वा पुत्रहि मत्सम ॥ ७२ ॥

गद्यार्थ— ( वाल्मीकिरामायणात आदर्श व्यक्तींची नुसती गर्दी उसळलेली आहे. आदर्श पत्नी, आदर्श पुत्र; आदर्श बंधु, आदर्श वीर, आदर्श मित्र— इत्यादि. राम मारुतीस म्हणतो– ) मारुते ! बाबारे सारे भाऊ कांहीं भरतासारखे नसतात, माझ्यासारखे पितृभक्त पुत्रहि सर्वच नसतात— तुझ्यासारखे मित्रहि सारे नसतात ! ●●●

अनुष्टुभ्

माता यस्य गृहे नास्ति भार्या च प्रियवादिनी।
अरण्यं तेन गन्तव्य यथारण्यं तथा गृहम् ॥ ७३ ॥

अनुष्टुभ्

आई ज्याच्या घरीं नाहीं– न पत्नी प्रियभाषिणी।
अरण्यासम तें गेह– जावें त्यानें त्वरें वनीं ॥ ७३ ॥

गद्यार्थ— ज्याच्या घरात आई नाहीं — किंवा प्रियवादिनी पत्नीहि नाहीं, त्यानें खुशाल अरण्यात जावें, कारण, त्याचें तें घर कसलें ? अरण्यच तें !

●●●

उपजाति

स्तनन्धयस्याङ्गमलङ्करोति नेत्रोत्सवायात्मन एव माता ॥
अज्ञ कथ न्वेष हि भूषणाना सन्धारणान्निर्वृतिमश्नुवीत ? ७४

इंद्रवज्रा

शृंगारिते दूधपित्या शिशूस
माता स्वनेत्रा सुखवावयास ॥
त्या अज्ञ बाळास सुभूषणानीं
आनंद होईल वदा कुठोनी ? ॥ ७४ ॥

गद्यार्थ— अगदीं अंगावर पिण्याइतक्या, ल्हान बालकास माता, जी अलंकारानीं सजविते, ती, केवळ स्वतःच्या डोळ्यानीं, तो सोहळा पाहून आनंद पावावें, एवढ्यासाठींच अन्यथा, इतक्या ल्हान त्या बालकास, अलंकार घातल्याचें सुख कसलें वाटणार ?

●●●

अनुष्टुभ्

अपत्यदर्शनस्यार्थे प्राणानपि च या त्यजेत्।
त्यजन्ति तामपि क्रूरा मातर दारहेतवे ॥ ७५ ॥

अनुष्टुभ्

पाहण्या पुत्र, जी माता निजप्राणहि अर्पिते !
सोडिती हाय ! तीतेंहि स्त्रीपायीं क्रूर पुत्र ते ॥७५॥

गद्यार्थ— जो पुन (जन्मलेला) पाहण्यासाठीं, आई आपला जीवसुद्धा धोक्यात घालते— त्या आईलासुद्धां, क्रूर मुलगे, आपल्या बायकोप्रीत्यर्थ टाकून देतात ! (जगांत कृतघ्नपणाला सीमाच नाहीं !)

●●●

शिखरिणी

पृथिव्या पुत्रास्ते जननि ! बहव सन्ति सरला
अह तेषा मध्ये विरलतरलोऽय तव सुत ॥
त्वयाऽय त्यागो मे तव समुचितो नास्ति सुभगे !
कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति ॥ ७६ ॥

शिखरिणी

जगीं तूतें माते ! सुत कितितरी होति सरल
परी त्यामध्यें मी अवखळचि हा एक विरळ ॥
मला तू सोडावें, तुजसि मुळीं शोभे नच परी
कुमाता ना कोठें—कुसुत परि लोकीं कितितरी ॥७६॥

गद्यार्थ— (आद्य नव्हे पुढच्या कोणातरी शंकराचार्यांनीं देवी जगदंबेस उद्देशून म्हटलेला श्लोक, जन्मदात्या आईला का लागू होऊ नये ?) हे जननि ! या जगीं सरळपणें वागणारे असे कितीतरी पुत्र तुला आहेत, पण त्यांत क्वचित् एखादा अवखळ निघतो, तो हा मी आहें पण, म्हणून, आई ! तू माझा त्याग करावास, हें काहीं (तुझ्या वात्सल्याला व अपार दयाक्षमाशीलत्वाला) केव्हाहि शोभणारें नाहीं, कारण वाईट मुलगा केव्हातरी जन्मतो पण, वाईट आई कधींच जन्माला येत नसते

●●●

अनुष्टुभ्

अहल्या द्रौपदी सीता तारा मन्दोदरी तथा।
पञ्च कन्या स्मरेन्नित्य महापातकनाशिनी ॥ ७७ ॥

अनुष्टुभ्

अहल्या द्रौपदी सीता तारा मंदोदरी सती।
नित्य स्मरा पाच कन्या—ज्या महापाप
नाशिती ॥ ७७ ॥

गद्यार्थ—अहल्या, द्रौपदी, सीता, तारामती मंदोदरी या पांच महान् सती स्त्रियांचें नित्य स्मरण करावें–त्यामुळें मोठें पापहि नाश पावतें.

●●●

# प्रकरण ४७ वें

## अन्योक्ति

संस्कृत काव्यावें एक अनन्यसाधारण वैशिष्ट्य व भूषण, म्हणजे अन्योक्तिप्रकरण हें होय. "लेकी बोले, सुने लागे" या मराठी म्हणींत, अन्योक्तीचें यथार्थ वर्णन व उद्दिष्टदर्शन होतें. विनोबा भावे यानीं कोठेंसे लिहिलें आहे कीं– (प्रस्तुत लेखकानें तें कवितेंत बसविलें आहे—"अन्योक्ति एकास वदे वरोनी। उद्दिष्ट राहे परि अन्य कोणी॥ अत्युच्च अन्योक्ति वसे जगात। वरोनि सृष्टी; परि ईश आत॥") एकाला उद्देशून बोलावयाचें. परतु, लक्ष्यवेध दुसऱ्याच कोणाचा असावयाचा. यात व्याजोक्ति वक्रोक्ति, टोमणा इत्यादि जसे आहेत, तसेंच सरळ व निव्वळ स्तुति, किंवा निंदा मुद्दां. काहीं काहीं तर; म्हणायच्या अन्योक्ति पण अन्याला उक्ति नसून, निव्वळ वर्णन; फार तर स्वभावोक्तीच्या स्वरूपाचें असतें. अशाचा समावेश, खरें म्हणजे, अन्योक्तींत करण्यात येऊ नये. परतु 'सुभाषितरत्नभांडागार' सारख्या ग्रथानीं पायंडा पाडला तो येथेहि अशात चालू ठेवला आहे. या-प्रकरणातली १३० व १३५ ही शाकुन्तलात आलेली अन्योक्ति ही खरी खुरी आदर्श म्हटली पाहिजे. संस्कृतमध्ये सहस्रां अन्योक्ति आहेत, पैकीं या प्रकरणात सुमारें तीनशें व इतर प्रकरणातून त्या त्या विषयात शोभणाऱ्या सुमारें १००-१५० मिळून ४००–४५० अन्योक्ति या ग्रथात आहेत. या प्रकरणात त्या त्या अन्योक्तींतल्या गूढार्थानें चालू काळातील अनेक घटनाचें किती यथार्थ वर्णन होऊ शकतें हें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यातला बोचकपणा मूळ कवीचा आहे—मी केवळ चालू घटनाशीं साम्य दर्शविण्याचेंच काम केलें आहे. शेंकडों वर्षांपूर्वी रचण्यात आलेल्या या श्लोकातलो अर्थ शेंकडों वर्षांनतरच्या घटनानाहि ततोतत लागू पडल्याचा भास व्हावा, यावरून, मूळ कवीची त्रिकालदर्शी शक्ति प्रतीत होतें या दृष्टीनें श्लोक क्रमाक ३, ६, ८, ११, १६, २२, २३, २४, २५, ३५, ३६, ३७, ४३, ४४, ४७, ५०, ५६, ८४, ८५, ९१, ९७, ९८, १००, ११४, ११६, १२३, १२८, १३०, १४५, १४७, १५१, १६१, १७२, १८०, १८१, १८३, १८८, १९९ २२५, २३१, २३४, २४८, २५१, २५३, २६६, २६८, २७०, २७४, २८१, २८५, २९३, ३०१, ३०२, इत्यादि मुद्दाम वाचावे त्यातल्या काहींमधून उदा. १८३, १८८, २२५ एकेक कथानक, नाटक कसे उभें राहू शकतें याचें किंचित् दर्शन घडविलं आहे. — वाचकानीं आपापली कल्पनाशक्ति चालवून उपयोग केल्यास, आणखी कितीतरी कथा यातून निघू शकतील. "अमरुककवे श्लोकोऽप्येकः प्रबन्ध-शतायते" ही उक्ति अन्योक्तींना विशेष लागू पडते.

●●●

### अगस्ति (कुम्भोद्भव) अन्योक्ति

शार्दूलविक्रीडित

कम्पन्ते गिरय' पुरन्दरभिया मैनाकमुख्याः पुनः
क्रन्दत्यम्बुधरः स्फुरन्ति वडवावक्त्रोद्गता वह्नयः॥
भो कुम्भोद्भव! मुच्यतां जलनिधि स्वस्त्यस्तु ते साम्प्रत
निद्रालु क्षयबाहुवल्लिकमलाश्लेषो हरिः सीदति ॥ १ ॥

शार्दूलविक्रीडित

मैनाकादि सुरेंद्रभीत गिरि हे आतां पुन्हां कांपती
आक्रोशे नभिं मेघ. अग्नि वडवा ओकें मुखानें अति॥
हे कुम्भोद्भव! सोड सागर अतां, कल्याण लाभो तुला
लक्ष्म्याश्लेष घडून सैल, भय ये श्रीपाळु या विष्णुला १

गद्यार्थ— अगस्ति मुनीनें समुद्र प्राशन केला, व, त्यानेंच तो पुन्हा उत्पन्न केला, या दोन घटनाच्या मधल्या काळाविषयीं तरी हा श्लोक असावा; किंवा, वरील दोन्ही घटना पूर्ण होऊन गेल्यानतर, पुढें केव्हा तरी, समुद्रप्राशन करण्याचा धाक अगस्ति मुनीनें पुन्हा घातला असेल तेव्हांचा तरी हा श्लोक असला पाहिजे) हे कुम्भोद्भव मुने! सागर सोडून दे (याचा अर्थ तू प्राशन केलास तो पुन्हां परत सोड; किंवा आतां पुन्हां पिण्याचा धाक न घालता त्याचा पिच्छा सोड. असे दोन्ही अर्थ सभवतात.) तुझें कल्याण असो. (तू पुन्हां सागर अजून उत्पन्न केला नाहींस, त्यामुळें; किंवा, आतां तू तो पुन्हां पिऊन टाकशील त्यामुळें) इद्राच्या भीतीनें मैनाकादि गिरि (जे पख तुटण्याच्या भीतीनें समुद्रांत दडून बसले ते) पुन्हा थरथर कापू लागले आहेत. ("माझें जन्मस्थानच नष्ट झालें किंवा होणार"

या भयानें ) दग आक्रोश करीत आहे. (समुद्रांत राहण्यामुळें शांत असलेला) वाडवाग्नि पुन्हां आग ओकूं लागला आहे. आणि ( ज्याच्यावर तरंगणाऱ्या शेषरूपी शय्येवर झोंप घ्यायची तो सागरच नष्ट झाला किंवा होणार यानें व्यग्र होत्साता ) झोंपाळु विष्णु, लक्ष्मीच्या भोंवताल्या त्याचा बाहुपाश ढिला पडून आता म्लान झाला आहे. ●●●

## अगुरु अन्योक्ति

आर्या

अगुरुरिति वदतु लोको गौरवमत्रैव पुनरहं मन्ये ।
दर्शितगुणैव वृत्तिर्यस्य जने जनितदाहेऽपि ॥ २ ॥

आर्या

'अ–गुरु' म्हणो जन त्यातें; गौरव त्याचा मला गमे यांत-।
कीं तो दावी निजगुण–जाळी त्याच्याच शिरूनि
नाकांत ॥ २ ॥

गद्यार्थ— अगुरु हें एक सुगंधि द्रव्य असून, जाळल्यानेंच त्याचा सुगंध खुलतो. गुरु, गौरव शब्दावर कोटि) अगुरु ला लोक 'अ–गुरु' (गुरु म्हणजे थोर नसलेला) खुशाल म्हणोत. परंतु त्याचा गौरव, (मोठेपणा) यांतच दिसून पडतो कीं, जो त्याला जाळतो (त्याच्याच नाकात घुसून) त्याला तो आपल्या अपूर्व सुगंधाचा गुण दाखवितो ! (प्रेम किंवा कौतुक करणाराला आपले गुण सर्वच दाखवितात. पण अपकारकर्त्यांला सुद्धा स्वगुणांनीं तुष्ट करणाऱ्या खऱ्या थोराचें हें अन्योक्तीनें वर्णन आहे.) ●●●

## अशोक अन्योक्ति

वसंततिलका

गर्वायसे विकचकोरकमञ्जुगुञ्ज—
दुद्वृत्तषट्पदघटाविभवेन किं नु ! ॥
वामभ्रुवां चरणताडनदोहदानि
किं नाम न स्मरसि तावदशोक ! तानि ! ॥ ३ ॥

वसंततिलका

पुष्पें फुलून अलि मंजुल गुंजतात
याचाच कां धरिसि गर्व तुझ्या मनांत ॥
लत्ताप्रहार तरुणी करिती अशोका
ते डोहळे सकवि विस्मरलास तूं कां ? ॥ ३ ॥

गद्यार्थ— ( तरुण स्त्रीनें डाव्या पायानें लाथ मारली म्हणजे अशोकाचे डोहळे पुरविले जाऊन त्याला फुलें येतात असा संस्कृत वाङ्मयांत संकेत आहे. ) हे अशोका ! आज तुझीं फुलें फुललीं आहेत, व, त्यांचेभोंवतीं भुंग्यांच्या झुंडीच्या झुंडी मंजुल गुंजारव करीत आहेत, या वैभवामुळें एवढा गर्व तुला कां बरें झाला आहे ? ( नुकतेंच, हीं फुलें फुलण्यापूर्वी,) तरुण स्त्रियांचे लत्ता-प्रहार खाण्याचे डोहळे तुला लागले होते, ते (प्रहार खाऊनच तुला हें वैभव प्राप्त झालें आहे ही गोष्ट) तुला आठवतच नाहीं कीं काय ? ( इतरत्र ऐटींत मिरविणाऱ्या पण अन्यत्र वरिष्ठांच्या लाथा खाणाऱ्या बढाईखोरांना, किंवा ज्यांच्या सहाय्यानें प्रस्तुत वैभव प्राप्त झालें त्यांना विसरून केवळ आजचें वैभव मिरविणाऱ्या कृतघ्नांना ही जोडगोळी आहे.) ●●●

## अशोक अन्योक्ति

शार्दूलविक्रीडित

किं ते नम्रतया किमुन्नततया किं वा घनच्छायया ?
किं वा पल्लवलीलया किमनया चाऽशोक ! पुष्पश्रिया ? ॥
यत्त्वन्मूलनिषण्णखिन्नपथिकः स्तोमं स्तुवन्नन्वयं
न स्वादूनि मृदूनि खादति फलान्याकण्ठमुत्कण्ठितः ॥ ४ ॥

शार्दूलविक्रीडित

सारी व्यर्थ असे अशोक ! तव ती उंची तथा नम्रता
छाया ती घनदाट, पल्लव तरी पुष्पांतली चारुता ॥
पांथ श्रांत तुझ्या तळीं स्तवितसे सोत्कंठ तूतें जरी
देशी ना मृदु गोड सुंदर फळें आतृप्ति तूं त्या परी ॥ ४॥

गद्यार्थ—हे अशोका ! काय उपयोग आहे तुझ्या त्या नम्रतेचा ! काय उपयोग तुझ्या उचीचा ! काय उपयोग तुझ्या घनच्छायेचा किंवा पालवीच्या लीलेचा किंवा पुष्पांच्या वैभवाचा ? कारण, पांथ तुझ्या तळीं दमून भागून बसतो, व, उत्कठेनें तुझीं स्तुतिस्तोत्रें गातो, त्याला काहीं तू, मृदु मधुर फळें पोटभर खाऊ घालीत नाहींस. ( देखाव्याला अघळपघळ पण वस्तुतः 'निष्फळ' स्वागत करणारावर हा प्रहार होय. ) ●●●

## आम्र ( रसालफल ) अन्योक्ति

वसंततिलका

दिङ्मण्डलं परिमलैः सुरभीकरोषि
सौन्दर्यमावहसि लोचनलोभनीयम् ॥
हंहो रसालफलवर्य ! तथाऽपि दूये
यद् ग्रन्थिलं च कठिनं हृदयं बिभर्षि ॥ ६ ॥

वसततिऊका

गधें सुगंधित जरी करिशी दिशांस,
आम्रा ! स्वरूप तव मोहक लोचनांस ॥
तूतें असे हृदय घट्ट जटाळ ऐसें,
हें मन्मनीं फलवरा ! परि शल्य भासे ॥ ५ ॥

गद्यार्थ— हे फलश्रेष्ठ आम्रा ! तू आपल्या सुगधानें सर्व दिग्मडलाला सुगधित करतोस, आणि तुझे सौंदर्यहि मोठें नयनाभिराम असतें ; परतु तुला हृदय मात्र कठीण, व जटाळ असावें, या गोष्टीचे मला अतिशय दु ख वाटतें. ( दुरून ऐकावी तों मोठी कीर्ति, प्रत्यक्ष पाहावें तरी मोहक मूर्ति, पण अनुभवावें तों पापाणहृदयी; अशा मनुष्याला हा फटकारा आहे. ) ●●●

## आम्रवृक्ष ( माकन्द ) अन्योक्ति

आर्या

पृष्टाः खलु परपुष्टाः परितो दृष्टाश्च विटपिनः सर्वे ।
माकन्द ! न प्रपेदे मधुपेन तवोपमा जगति ॥ ६ ॥

आर्या

सारे वृक्ष बघितले, भवतीं, सार्‍याहि कोकिलां पुशिलें ।
आम्रा ! तव तोलाचें भ्रमराला जगीं कुणी न सांपडलें

गद्यार्थ— सार्‍या कोकिळाना विचारून पाहिलें, भोंवतालीं सर्व वृक्ष धुडाळून पाहिले, पण हे आम्रतरो ! भ्रमराला काहीं तुझ्या तोलाचें दुसरें कोणी सापडलें नाहीं. ( सहज कुणी तरी कुणावर तरी दुरळतो, व त्याला फार चागले म्हणतो. पण सर्‍या थोर माणसाची महती अशी कीं, ज्याचें प्रेम फक्काभरापेक्षा अधिकवेळ एका ठायीं टिकत नाहीं अशा अभिनवमधुलोलुप भ्रमरानें ( चावट चिकित्सकानें सुद्धा ) सुद्धा खूप शोधाअतींहि त्या महतीपुढें शरणागति स्वीकारावी. ) ●●●

## आम्रफल अन्योक्ति

शार्दूलविक्रीडित

आकर्ण्याम्रफलस्तुतिं जलमभून्नारिकेलान्तर
प्राय कण्टकितं तथैव पनसं जात द्विधोर्वारुकम् ॥
आस्तेऽधोमुखमेव कादलमगाद् द्राक्षाफलं क्षुद्रता
श्यामत्व यत जाम्बव गतमहो मात्सर्यदोषादिह ॥७॥

शार्दूलविक्रीडित

आंब्याची स्तुति ऐकुनी जल बने त्या नारळाचें मन
कांटा ये फणसा, दुभंग बसलें वाळूक तें होउन ॥
वाके खालतिं केळ, आणि बनलीं बारीक द्राक्षें किती
काळीं ठिक्कर जाभळेंहि पडलीं मात्सर्य वाटून तीं ॥७॥

गद्यार्थ—आम्रफलाची स्तुति ऐकून नारळाच्या हृदयाचें पाणी पाणी झालें, फणसाच्या सर्वांगावर काटा आला, वाळूक ( टरबूज ) दुभगलें. केळीचें झाड खालीं पाहू लागलें, द्राक्षें सकोचून अगदीं लहान झालीं, आणि मात्सर्यानें जाभळे काळीं पडलीं. ( यात अन्योक्तीच वैशिष्ट्य नाहीं. केवळ कविकल्पनाकृत वर्णन आहे. ) ( सज्जनाच्या महतीपुढें निंदकाची कशी दाणादाण उडते तें वर्णन. ) ●●●

## आम्रफलान्योक्ति

शार्दूलविक्रीडित

मा गर्वं कुरु शर्करे ! तव गुणाञ्जानन्ति राज्ञां गृहे
ये दीना धनवर्जिताश्च कृपणा स्वप्नेऽपि पश्यन्ति नो ॥
आम्रोऽहं मधुकूपकैर्मम फलैस्तृप्ता हि सर्वे जना
हे दग्धे ! तव किं गुणैर्मम फलैस्तुल्य न किञ्चित्फलम् ॥८॥

शार्दूलविक्रीडित

वाटो गर्व न शर्करे ! गुण तुझे, राजे जरी जाणिती
तूतें निर्धन, दीन अन् कृपण हे स्वप्नींहि ना पाहती ॥
मी आंबा ! रसपूर्ण या मम फलें संतृप्त सारे जन !
जळ्ळे त्वद्गुण फोल ते ! फल कुणी मत्तुल्य कोठेंच न

गद्यार्थ— ( प्राचीनकाळीं, साखर दुर्मिळ व महाग असल्यानें, मूठभर श्रीमंत व राजे लोकानाच ती लभ्य असे. आवे मात्र सुकाळाचे, अगदी गरीबाला सुद्धा लभ्य होते. आज बहुधा साखर व उत्तम आवे एका भावान विकले जातात, ही गोष्ट निराळी ) आंबा म्हणतो हे शर्करे ! तुझे गुण राजे लोकच जाणतात यामुळें तुला गर्व होऊ देऊ नकोस. कारण समाजातील, दीन, निर्धन, कृपण, अशा निरनिराळ्या थरातल्या लोकाना तू स्वप्नातसुद्धा दिसत नाहीस, आणि, माझीं रसपूर्ण फलें खाऊन मात्र सारे लोक तृप्त होत आहेत. जाळ ते तुझे गुण ! माझ्यासारखें फळच कुठे नाहीं. ( मार्क्सवादाचे वारे वाहू लागल्यापासून, केवळ बहुजनसमाजासाठीं जें जें काय असेल तें चागलें. व मूठभर श्रीमत, भाडवलदारा, बुर्झ्वासाठीं जें जें काय

असेल तें सरसकट व्हाईट, असें म्हणण्याची जी फॅशन पडली आहे अगदी तिला तंतोतंत धरून आंबा साखरेला हिणवीत आहे!)

●●●

## आम्रवृक्षान्योक्ति

आर्या

गाता कोकिल एव ज्ञाता च रसाल एव नियतमिदम्।
यःपञ्चममुद्गायति तस्यांगेष्वपि पुलकमुकुलानि ॥ ९ ॥

आर्या

कोकिल एकच गायक रसवेत्ता त्यास एक आंबाच।
गातां हा पचम, त्या तरुवर मोहोर येइ रोमांच ॥ ९ ॥

गद्यार्थ— कोकिळ हा एकमेव गायक-आणि त्याचें रसग्रहण करणारा खरोखर आम्रवृक्ष हा एकच! कोकिळ पचम स्वरात गाऊ लागतो—आणि आम्रवृक्षाच्या जणू हाडातून, आम्याच्या मोहोराच्या रूपानें, अंगावर, रोमांच उभे राहतात. ●●●

## (ऊस) इक्षुदण्डान्योक्ति

वसंततिलका

कान्तोऽसि नित्यमधुरोऽसि रसाकुलोऽसि
किं चासि पञ्चशरकार्मुकमद्वितीयम् ॥
इक्षो! तवास्ति सकलं परमेकमूनं
यत्सेवितो भजसि नीरसतां क्रमेण ॥ १० ॥

वसंततिलका

तूं गोड, सुंदर ऊसा! रसपूर्ण सर्व
आहेस रे स्मरधनुष्यचि तूं अपूर्व ॥
हें सर्व गोड; परि एकच दोष माने
कीं सेवितां रुचि तुझी सरते क्रमानें ॥ १० ॥

गद्यार्थ— हे ऊसा! तू सुदर आहेस, गोड आहेस, रसपूर्ण आहेस जणूं अपूर्व असे मदनधनुष्यच आहेस. हें सर्व ठीकच आहे पण तुझ्यात मला एकच उणेपणा दिसतो, तो हाच, कीं, तुझें सेवन करता करतां हळू हळू (मुळाकडून घाड्याकडे) तूं नीरस होत जातोस. (सत्काव्याप्रमाणें क्षणे क्षणे नवतामुपैति—क्षणाक्षणाला नव नव रसाची प्रतीति व्हावी तसें मात्र तुझ्यांत होत नाहीं.) (प्रतिभा आटत चाललेल्या कवीस) ●●●

## कञ्चुकान्योक्ति (चोळी)

स्वागता

श्रीमता कथय कञ्चुक! पूर्वे
कानि कानि सुकृतानि कृतानि ॥
जन्म यापयसि येन समस्तं
हारहृद्यहृदये हरिणाक्ष्याः ॥ ११ ॥

स्वागता

कंचुका! गतभवीं तव हस्तें
सांग काय घडलीं सुकृतें, तें ॥
जन्म घालविसि सर्वचि तुच्च्या
हारशोभित हृदीं रमणीच्या! ॥ ११ ॥

गद्यार्थ— हे वैभवशाली कंचुका! गेल्या जन्मांत काय काय पुण्यकृत्यें केलीस तें तरी सांग, कीं ज्याच्या बळावर, हारानें मंडित अशा हरिणाक्षीच्या हृदयावर सारा जन्म तू घालवितोस! (विशेषशी कर्तबगारी (निदान या जन्मात तरी,) ज्याची दिसून पडत नाहीं तरी जो जगाला हेवा वाटावा अशा 'उच्च' पदीं आरूढ झालेला दिसतो अशाला उद्देशून.) ●●●

## (कपि) मार्कटान्योक्ति

उपजाति

युक्तं सभायां खलु मर्कटानां शाखास्तरूणां मृदुलासनानि।
सुभाषितं चीत्कृतिरातिथेयी दन्तैर्नखाग्रैश्च विपाटितानि १२

उपजाति

सभा कपींची! तिथ योग्य होतीं
फांद्या तरूंच्या मृदु आसनें तीं ॥
अन् ओरखाडे नख दंत यांचे
आतिथ्य तें! स्वागत चीत्कृतीचें ॥ १२ ॥

गद्यार्थ— माकडाची सभा भरली! तिथें झाडाच्या फांद्या याच मऊ बैठकी, चीत्कार हेंच स्वागताचें मधुर भाषण आणि नखानीं दातानीं ओरखाडणें हेंच आतिथ्य! अशा स्थळीं व प्रसंगीं हें सर्व योग्यच म्हटलें पाहिजे. (असंस्कारी जनसमूहात सुसंस्कृतानें याहून वगळी अपेक्षा ठेवूं नये. गाढवाचा गोंधळ व लाथाचा सुकाळ!) ●●●

अनुष्टुभ्

हारं वक्षसि केनापि दत्तमज्ञेन मर्कटः।
लेढि जिघ्रति संक्षिप्य करोत्युन्नतमासनम् ॥ १३ ॥

अनुष्टुभ्

**अर्थे वक्षिं दिल्या हारा वघे मर्कट चाटुन ।**
**हुंगुनी देइ फेकून—करितो वर आसन ॥ १३ ॥**

*गद्यार्थ—* कुणा अज्ञ माणसानें माकडाच्या गळ्यात हार घातला ! साहजिकच माकडानें तो चाटून पाहिला, हुंगून पाहिला, आणि फेकून दिला, आणि आपले (लाल) कुल्ले वर केले ! (' अरसिकेषु कवित्वनिवेदनम् ' असें म्हणण्यानें, एकाद्या अरसिकाची संभावना, जेव्हां, फार सौम्य वाटेल, तेव्हा या श्लोकाचा उपयोग प्रभावी ठरेल. ) ( वरील दोन्ही श्लोकांत अन्योक्तीबरोबरच उत्कृष्ट स्वभावोक्ति आहे. ! ) ●●●

<u>कमलान्योक्ति</u> यातच कमलपत्र-कमलिनी याविषयीं अन्योक्ति श्लोक १४ ते २० पर्यंत.

मालिनी

अयि दलदरविन्द ! स्यन्दमान मरन्द
तव किमपि लिहन्तो मञ्ज गुञ्जन्तु भृङ्गा ॥
दिशि दिशि निरपेक्षस्तावकीन विवृण्व—
न्परिमलमयमन्यो बान्धवो गन्धवाहः ॥ १४ ॥

मालिनी

**विकसत <u>कमला</u> ! तू गाळिशी त्या मधूतें**
**पिउनि अलि करू दे मंजु गुंजारवातें ॥**
**दश दिशिं तव गंधा स्वार्थ सोडून, नेतो**
**अलगचि तव बंधू गंधवाही सदा तो ॥ १४ ॥**

*गद्यार्थ—* हे उमलत्या कमला ! तुझा गळणारा मध चाटीत भुंगे तुझ्या भोंवतीं मंजु गुंजारव करीत खुशाल रुंजी घालोत ! परंतु तुझ्यापासून कशाचीहि अपेक्षा न करता, तुझी सुगंध ( कीर्ति ) दशदिशांत पसरविणारा हा गंधवाह म्हणजे वारा तुझा आगळाच ( खराखुरा ) बंधु ( मित्र ) आहे हें नीट ध्यानात घे ! ( स्वार्थासाठीं चाटुगिरी करणाऱ्यानाच आपले मित्र समजणाऱ्या भोळ्या श्रीमंताना, त्याचे खरे मित्र कोण हें सांगण्यासाठीं ही अन्योक्ति आहे ) ●●●

उपजाति

**रे पद्मिनीपत्र ! भवच्चरित्रं चित्रं प्रतीमो वयमत्र किंचित्**
**त्वं पङ्कजन्मापि यदृच्छयाऽऽप्यादपि स्पृशस्यम्बु न पङ्कसङ्गि १५**

इन्द्रवज्रा

**हे <u>पद्मपत्रा</u> ! तव हें चरित्र**
**वाटे मला अल्प तरी विचित्र ! ॥**
**पंकात देवें जरि जन्म तूतें**
**न स्पर्शिसी पंकिल तू जलातें ॥ १५ ॥**

*गद्यार्थ—* हे कमलपत्रा ! तुझी वागणूक, मला तरी थोडी जगावेगळीच वाटते. दैवयोगानें, तुझा जन्म जरी चिखलात झालेला असला, तरी, तू चिखलमिश्रित पाण्याला स्पर्शसुद्धा करीत नाहींस. ( हलक्या कुळात जन्मलेल्या व वाईट संगतींत वाढलेल्या पण आपलें चरित्र विशुद्ध ठेवणाऱ्या सज्जनाला धन्यवाद ! ) ●●●

पुष्पिताग्रा

**रुचिरतिरुचिरा शुचित्वमुच्चै शिरसि धृत स्वयमेव शङ्करेण**
**कमलिनि ! मलिनीकरोषि कस्मान्मुखमिदमिन्दुमुदीक्ष्य**
**लोककान्तम् ? ॥ १६ ॥**

पुष्पिताग्रा

**अति मधुर छटा शुचित्व उच्च**
**शिरिं धरिल स्वयमेव शंकरेंच ॥**
**कमलिनि ! मलिनत्व का मुखास ?**
**जनसुखकारक पाहुनी विधूस ? ॥ १६ ॥**

*गद्यार्थ—* ज्याला वर्ण अति सुंदर, पावित्र्य अतिशय थोर, ज्याला स्वयं शंकरानें आपल्या शिरावर धारण केलें आहे अशा, सर्व जगाला सुखदायक चंद्रालाहि पाहून, हे कमलिनि ! तुझ्या मुखाला अशी मलिनता कां बरें ? ( कमलें चंद्रोदयारा मिटतात. ) ( काहीं नतद्रष्ट, दुराराध्य टीकाकार, कीं, ज्याना कितीहि सौंदर्य दिसलं, गुणाचे डोंगर दिसले तरी ते नाक मुरडायाचेच, अशाना उद्देशून ही अन्योक्ति आहे ! ) ●●●

वसन्ततिलका

लक्ष्मीः स्वयं निवसति त्वयि लोकधात्री
मित्रेण चापि विदितोऽसि दृढानुराग ॥
बन्दीव गायति गुणास्तव चञ्चरीकः
कः पुण्डरीक ! तव साम्यमुरीकरोति ? ॥ १७ ॥

वसंततिलका

लक्ष्मी स्वयें निवसते जिथ लोकधात्री
मित्रासिही तव दिसे परिपूर्ण मैत्री ॥
भाटापरी तव गुणस्तुति भृंग गाई
हे पुंडरीक ! तव साम्य कुठें कुणाही ? ॥ १७ ॥

*गद्यार्थ*— जगताचें धारण करणारी लक्ष्मी स्वय तुझ्यात वसति करते; मित्राशीं (सूर्याशीं) मित्राप्रमाणें ही तुझी दृढ प्रीति दिसून येत आहे. भाटाप्रमाणें भुंगे तुझें गुणगान करीत आहेत. हे कमला ! तुझें साम्य दुसऱ्या कोणात दिसणार आहे ? (कमलेंच न्यून नसलेल्या सर्वतोपरी भाग्यशाली माणसाला उद्देशून– बहुधा कोणा राजाला उद्देशून कोण्या कवीनें श्लोक रचिला असावा.) ●●●

शार्दूलविक्रीडित

एकस्मिन्ननिरावयो समजनि स्वच्छे सरोवारिणि
भ्रात. सद्गुसुखेन कानिचिदहान्यत्र व्यतीतानि नौ ॥
लब्धं तामरस ! त्वया मृगदृशा लीलानतसास्पद
शैवाल विलुठामि पामरवधूपादाहते पायसि ॥ १८ ॥

शार्दूलविक्रीडित

एका स्वच्छ सरोवरांत अपुला झाला असे जन्म रे
गेले गोड इथें कितीक दिन रे मैत्रीमयें आपुले ॥
नारीजात सदा प्रसाधनपदीं पद्मा ! तुला ठेविते
मी शेवाळ इथें जळांत डुलतें क्षुद्र स्त्रियांच्या पदें १८

*गद्यार्थ*— (शेवाळ कमलास म्हणतें— ) एकाच स्वच्छ सरोवरात तुझा आणि माझा जन्म झाला. भाऊ ! याच ठिकाणीं तुझे व माझे किती तरी दिवस, मधुर मैत्रीसुखात गेले. पण हे कमला ! तुला मात्र हरिणाक्षींच्या सौंदर्यवर्धक साधनात स्थान प्राप्त झालें आहे आणि मी शेवाळ मात्र, क्षुद्र स्त्रियांच्या पायानीं ढवळलेल्या पाण्यांत, इकडून तिकडे ढकलले जात आहे ! (दोन सख्ख्या भावापैकीं एक, भाग्यशाली, मोठ्या पदाला चढतो; व दुसरा समाजात लाथाडला जातो; दोन सख्ख्या बहिणींपैकीं एक राजाची राणी होते, व दुसरी निचारी दारिद्र्याचे कष्ट उपसीत असते. ' दो फूल साथ फूले, किस्मत् जुदा जुदा है ' । या वैषम्याला उद्देशून.) ●●●

आर्या

मधुप इव मारुतेऽस्मिन्मा सौरभलोभमम्बुजिनि ! मंस्थाः ।
लोकानामेव मुदे महताऽप्यात्मास्मुनार्थिता नीतः ॥ १९ ॥

आर्या

मधुपापरि या मरुता सुगंधलोभी असें न गण नलिनी !
जगदानन्दास्तवची याचक हा होइ थोरही असुनी १९

*गद्यार्थ*— हे कमलवेली ! भ्रमर जसा (मधाचा) लोभी, तसाच वारा हा सुगधाचा लोभी; अशी समजूत तू करून घेऊ नकोस. वास्तविक, हा अतिशय थोर असून यानें केवळ जगदानंदकारक कार्य करण्यासाठींच, ही याचकवृत्ति स्वीकारलेली आहे. (पोटाची खळगी भरण्यासाठीं याचक येतात, व घरचे सुखी असून, केवळ सत्कार्यासाठीं याचना करणारे येतात त्या दोघानाहि एकाच मापाने मोजणाऱ्या भीमताना उद्देशून.) ●●●

शार्दूलविक्रीडित

नीरान्निर्मलतो जनिर्मधुरता रामामुखस्पर्धिनी
वास किं च हरेः करे परिमलो गीर्वाणचेतोहरः ॥
सर्वस्व तदहो महाकविगिरा कामस्य चाम्भोरुह !
त्व चेत्प्रीतिमुरीकरोषि मधुपे तत्त्वा किमाचक्ष्महे ? २०

शार्दूलविक्रीडित

जन्म स्वच्छ जळीं ; तुझी मधुरता स्त्रीच्या मुखाचे परी
विष्णूच्या करिं वास, गंधहि असा कीं देवचित्ता हरी ॥
पद्मा तूं मदनास सत्कविसही सर्वस्व होसी, परी—
बोलूं काय ? तुला जर प्रणय रे या क्षुद्र भुंग्यावरी २०

*गद्यार्थ*— हे पद्मा ! स्वच्छ जळात तुला जन्म लाभला, सुंदरीच्या मुखासारखी मधुरता लाभली, श्रीविष्णूच्या हातांत वसतिस्थान मिळालें, देवाचें चित्त हरण करणारा सुगंध लाभला, आणि तू महाकवींच्या वाणीचें व मदनाचें सर्वस्व होऊन असलेंस तरी क्षुद्र भृंगावरच जर तुझें प्रेम जडलें तर आम्ही म्हणावें तरी काय ? (सर्वगुणसंपन्न राजकन्येचें हलकट माणसावर प्रेम जडावें किंवा सर्वगुणसंपन्न सज्जनानें एखाद्या क्षुद्राशीं मैत्री करावी व ती सोडता येऊ नये अशा प्रसंगाला उद्देशून.) ●●●

## करीरान्योक्ति

**अनुष्टुभ्**

किं पुष्प किं फल चास्य करीरस्य महात्मन ।
येन वृद्धिं समासाद्य न कृत पत्रसग्रह ॥ २१ ॥

**आर्या**

**थोर करीर महात्मा पुष्प कुठें यास वा कुठें फलही ?॥
इतुकी उन्नति पावुनि केला यानें न पत्रसंग्रहही ।२१॥**

गद्यार्थ— ( करीर नावाचें एक मोठें वाढणारें काटेरी झाड, याला पानें फुलें फळें कांहींच लागत नाहींत. ) ह्या महात्म्या करीराला कुठली फुलें आणि कुठलीं फळें ! एवढा मोठा होऊन यानें नुसता पत्रसंग्रह सुद्धा केला नाहीं ! ( चांगल्या व वाईट दोन्ही अर्थांनीं ही अन्योक्ति घेता येईल. एखाद्या निर्लोभ मनुष्यानें—धन संपत्ति तर साचविली नाहींच पण मोठ्या पदाला चढून साधी उपजीविका सुद्धा मिळविली नाहीं, इतकी अपरिग्रह वृत्ति ! असे गुणगान हें होईल, किंवा कुत्सितार्थानें हा एवढा रोणगा वाढला, तरी, इतर ऐश्वर्य राहो, पण, चार पोथ्याची पानें (पत्रसंग्रह) सुद्धा, विद्यार्जनासाठीं यानें जमविलीं नाहींत असेंहि म्हणता येईल. )

●●●

## कलशान्योक्ति

**शार्दूलविक्रीडित**

भ्रात काञ्चनलेपगोपितबहिस्ताम्राकृति सर्वतो
मा भैषी कलश ! स्थिरो भव चिर देवालयस्योपरि ॥
ताम्रत्व गतमेव काञ्चनमयी कीर्ति स्थिरा तेऽधुना
नान्तस्तत्त्वविचारणप्रणयिनो लोका बहिर्बुद्धय ॥ २२॥

**शार्दूलविक्रीडित**

**आच्छादी तव ताम्रदेह कलशा ! सोनें चहूंबाजुनीं
राहा तू स्थिर मंदिरावर अता, भीती नसो त्वन्मनीं ॥
'सोन्याचा' तव कीर्ति ही स्थिर असे, तार्वे वसे लोपुनी
पाहीना कुणि आतलें, जन भुले बाहेरचें पाहुनी ॥२२॥**

गद्यार्थ— हे कलशा ! ( देवळावरच्या कळसा ! ) तुझा मूळचा ताम्यानें घडविलेला देह सोन्यानें चोहींकडून आच्छादून टाकलेला आहे. ( सोन्याचा तुझ्यावर मुलामा केलेला आहे. ) त्यामुळें तुला आता मिण्याचें मुळींच कारण नाहीं तू खुशाल देवमंदिराच्या शिखरावर चिरकाल राहा. तुझें ताम्रत्व गेलेलें आहे. 'तू सोन्याचा आहेस' ही तुझी कीर्ति आता बद्धमूल होऊन बसली आहे. सर्वसाधारण माणसाना आतल्या तत्त्वाचा विचार करण्याची मुळींच आवड नसते—ते स्वभावत च बहिर्बुद्धय म्हणजे बाहेरच्या देखाव्यावर हुरळणारे असतात ! ( मूळात स्वत ची पात्रता नसता वशिल्यानें उच्च पदीं चढणा ऱ्याना उद्देशून. एखाद्या लोकप्रिय पक्षानें उभे केलेले नालायक उमेदवार, शेंदूर लावलेले दगड, निवडून येतात, एवढेंच नव्हे तर मनीसुद्धा होतात. हाहि ताम्यावरील सोन्याच्या मुलाम्यानें, कलशाचा 'कळस' झाल्याचा प्रकार ! )

●●●

**आर्या**

दृढतरगलननिबन्ध कूपनिपातोऽपि कलश ! ते धन्य ।
यज्जीवनदानैस्त्व तर्षामर्षं नृणा हरसि ॥ २३ ॥

**आर्या**

**घेउनि फास गळ्याला, धन्य तुझें कूपपतनही कलशा !
कीं तू जीवनदानें तृष्णार्तांची निवारितोस तृषा ॥ २३ ॥**

गद्यार्थ— हे कलशा ! स्वताच्या गळ्याला घट्ट फास लावून घेऊन, स्वत विहिरींत खोल जाण्याचें अध पतनहि पत्करतोस, तें पतनसुद्धा केवढें धन्य म्हटलें पाहिजे. कारण तू जीवन दानान ( पाणी देण्यान ) तृष्णाव्याकुल अशा जनाचें दुःखहरण करतोस ! ( सत्कार्यास्तव कष्ट काढणारे, देशस्वातंत्र्यासाठीं फाशीं जाणारे देशभक्त असेच इतराना जीवन देतात व स्वत च्या गळ्याला लागणाऱ्या फासाला धन्य करतात. )

●●●

## कल्पवृक्षान्योक्ति

**शार्दूलविक्रीडित**

औदार्यं भुवनत्रयेऽपि विदित सभूतिरम्भोनिधे—
र्वासो नन्दनकानने परिमलो गीर्वाणचेतोहर ॥
एव दातृगुणोत्कर सुरतरो सर्वोऽपि लोकोत्तर
स्यादर्थिप्रवरार्थितार्पणविधावेको विवेको यदि ॥ २४ ॥

**शार्दूलविक्रीडित**

**ज्याची ख्यात उदारता त्रिभुवनीं—जन्मे समुद्रामधें
राहे इन्द्रवनात—मोहित करी देवांस सौरभ्य तें ॥
सारे कल्पतरूंत दातृगुण हे उत्कृष्ट होते, जर—
पात्रापात्र विवेक एकचि कधीं दावू शके तो तर ! ॥२४**

गद्यार्थ— ज्याची उदारता साऱ्या त्रिभुवनाला माहीत आहे; ज्याला समुद्रमथनाचे प्रसंगीं क्षीरोदधींत जन्म लाभला; ज्याचे बसतिस्थान नन्दनवन; ज्याचा सुगंध देवांचें सुद्धा चित्त हरील असा; अशा रीतीनें दातृगुणप्रधान गुणसमुच्चय या कल्पतरूचा मोठा अपूर्वच ठरलाअसता–जर याचकांना दान देण्यात यानें केवळ एक पात्रापात्रविवेक दाखविला असता तर ! (आल्या गेल्याला, "भाई भाई" म्हणून मिठ्या मारणारे, पात्रापात्रविवेकशून्य आजहि आहेतच. प्रत्येक भक्ताला, तो मागेल तें देत राहून, सर्व सृष्टीवर उठल्यासुठल्या आपत्ति आणणारे भोळे शंकर, पूर्वीहि होतेच, त्यांना उद्देशून.) ●●●

शार्दूलविक्रीडित

स्वर्लोकस्य शिखामणिः सुरतरुग्रामस्य धामाद्भुत
पौलोमीपुरुहूतयो परिणति. पुण्यावलीनामसि।।
सत्य नन्दन ! किं त्विद सहृदयैर्नित्य विधिः प्रार्थ्यते
"त्वत्त खाण्डवरङ्गताण्डवनटो दूरेऽस्तु वैश्वानरः" ।। २५ ।।

शार्दूलविक्रीडित

**स्वर्गी भूषण, धाम अद्भुत सदा तू देववृक्षाप्रति**
**पुण्यांचें फल तूं असें तुज शची अन् इंद्र हे मानिती ॥**
**बाळा ! सर्व खरें, परी सहृदय हे ब्रह्मास हें प्रार्थिती—**
**कीं, "वैश्वानर दग्धखाण्डव असा स्पर्शो न तूतें कधीं" ॥ २५ ॥**

गद्यार्थ— बाळा कल्पतरो ! तू स्वर्गाला मस्तकावरील रत्नाप्रमाणें भूषणभूत आहेस, सर्व देववृक्षामध्यें श्रेष्ठ आहेस; प्रत्यक्ष इंद्र व इंद्राणी तुला, स्वतःच्या पुण्यराशीचें फल मानतात, हें सारें खरें ! परंतु सहृदय, सज्जन ब्रह्मदेवाची अशी प्रार्थना करीत असतात, कीं, खांडववन जाळणारा तो वैश्वानर वणवा, तुझ्यापासून दूर असो !

(इतरांना, जें मागावें तें देणारा कल्पतरु, पण स्वसंरक्षणाची, कांहीं, त्याने व्यवस्था केलेली दिसत नाहीं. अन्यथा, इतरांचें ईप्सित देणाराला, स्वसंरक्षणाचीहि —अग्नीनें सुद्धा स्वतःला जाळू नये–अशी व्यवस्था करून घेता आली असती. पण मग आत्यंतिक औदार्याला बट्टा लागला असता ना ! आत्यंतिक अहिंसेच्या आग्रहापायीं, गांधींनीं, शेवटच्या दिवसांत, हिंदुस्थानची सारी राजसत्ता हातीं असतांनाहि स्वसंरक्षणासाठीं आरक्षकव्यवस्था नाकारली, व, पाकिस्तानला कोट्यवधि रुपयांची औदार्याची खैरात चालू ठेवली; त्यावेळीं त्यांच्या अनुयायांना जी भीति पोटात वाटत होती, तिचें हुबेहुब चित्र या अन्योक्तींत नाहीं का !) ●●●

अनुष्टुभ्

कल्पवृक्षोऽपि कालेन भवेद्यदि फलप्रदः ।
को विशेषस्तदा तस्य वन्यैरन्यमहीरुहैः ॥ २६ ॥

अनुष्टुभ्

**कल्पद्रुहि उशीरानें फलदायी ठरे जर ।**
**त्याच्यात अन्यवृक्षांत काय अंतर हो तर ? ॥ २६॥**

गद्यार्थ— (जें मागावें तें तात्काळ देणारा हेंच तर कल्पद्रुमाचें वैशिष्ट्य.) कल्पद्रुमसुद्धां जर सावकाश कालान्तरानें फलदायक होणार असेल, तर मग, रानातल्या इतर झाडांत व त्याच्यात अंतर तरी काय ? (याचकाला, याचनेचें दुःख फारसें भोगावयास न लावता, तात्काळ दान देणारा, अशी ज्याची कीर्ति. अशा कोण्या दात्यानें त्या कीर्तीस न साजेसें, वर्तन केल्यास, त्याला उद्दे न ) ●●●

वैतालीय

न मया रचित तवालवाल
पयसा वा विहितस्तवाभिषेकः ।
अयि कल्पतरो ! परोपकारे
भवतो विश्वविलक्षण प्रकार ॥ २७ ॥

वैतालीय छंद

**तुज मी रचिलें कधीं न आळें**
**कधिंही वा न जलाभिषेक केले ॥**
**परि कल्पतरो ! परोपकार**
**करिशी हाच विलक्षण प्रकार ॥ २७ ॥**

गद्यार्थ— हे कल्पतरो ! मी तुझ्या मुळाशीं कधीं आळें केलें नाहीं; किंवा, कधीं साक्षेपानें, तुझ्यावर पाणी शिंपडलें नाहीं. (इतका मी तुझ्याशीं तुटकपणें अनास्थेनें वागलों;) तरी परोपकार करण्याचे बाबतींत (दुसरा आपल्याशीं कसा वागला हें लक्ष्यात न घेतां, समवृत्तीनें तू वागतोस,) हा प्रकार मात्र फार लोकविलक्षण म्हटला पाहिजे. (आपण कसेंहि परक्येपणान वागलों तरी मित्र, बंधु भगिनी, माता, पिता, इत्यादि, आपल्यावरील प्रेमांत अंतर पडूं देत नाहींत, असा अनुभव येतो, तेव्हांचे पश्चात्तप्त हृदयाचे हे उद्गार आहेत.) ●●●

## कस्तूरिकान्योक्ति

मालिनी

अयि बत गुरुगर्वं मास्म कस्तूरि ! यासी—
रखिलपरिमलानां मौलिना सौरभेण ॥
गिरिगहनगुहायां लीनमत्यन्तदीनं
स्वजनकममुनैव प्राणहीनं करोषि ॥ २८ ॥

मालिनी

तुज नच बहु होवो गर्व कस्तूरि ! साचा,
अखिलपरिमलांच्या श्रेष्ठ त्वत्सौरभाचा ॥
गहन गिरिगुहान्तीं जो लपे आश्रयासी,
गरिब तव पित्याचा प्राण त्यानेंच घेसी ॥ २८ ॥

गद्यार्थ—हे कस्तूरी ! जगातल्या सर्व सुगंधांत, तू श्रेष्ठ आहेस, या गोष्टीचा, तू फार गर्व धरू नकोस.—कारण, पर्वताच्या खोल खोल गुहांत, आश्रयार्थ लपून बसणाऱ्या, अतिशय दीन अशा तुझ्या जनकाच्या प्राणहानीला, हा तुझा सुगंधच कारणीभूत ठरतो ( हें लक्ष्यांत ठेव ! ) ( आपल्या मुलाला सद्विद्यासंपन्न, सद्‌गुणसंपन्न करण्यासाठीं मातापित्यांनीं आपल्या सर्वस्वाचा होम करून, सर्वतोपरी 'जिवत मरण' पत्करिलें, याची जाणीव न ठेवता, स्वतःच्या गुणसंपन्नतेचा गर्व वाहणाऱ्या कृतघ्न मुलास उद्देशून. ) ●●●

मन्दाक्रान्ता

जन्मस्थानं न खलु विमलं वर्णनीयो न वर्णो
दूरे पुंसां वपुषि रचना पङ्कशङ्कां करोति ॥
यद्यप्येवं सकलसुरभिद्रव्यगर्वापहारी
को जानीते परिमलगुणः कोऽपि कस्तूरिकायाः २९

शार्दूलविक्रीडित

जन्मस्थान न शुद्ध ; रंगहि कधीं वर्णू नये जो कुणी
घाटे ही दुरुनी जणूं चिखलशी देहावरी लावुनी ॥
हें सारें, परि गर्व ही हरितसे साऱ्या सुगंधांतला
कस्तूरींत कळे न गंधगुण हा आला कसा कोठला ! २९

गद्यार्थ— कस्तूरीचें जन्मस्थान ( हरिणाची नाभि ) बघावें तर तें शुद्ध नव्हे, रंग बघावा तर तो कुणी वर्णू नये असा. कुणी जर अंगावर लावली, तर दुरून चिखल फासल्यासारखें वाटावें, हें सर्व असलें तरी तिला सुगंध मात्र अखिल जगातल्या साऱ्या सुगंधी द्रव्याचा गर्व हरण करील असा ! हा अपूर्व सुगंधगुण तिला कसा कोठून प्राप्त झाला तें कोण सांगू शकेल? ( हलक्या कुळांत जन्मलेल्या, वर्णानें, रूपानें, सुंदर तर नव्हेच, पण, कुरूपच असलेल्या, पण, सद्‌गुणानीं सर्वश्रेष्ठ ठरणाऱ्या कोण्या अलौकिक व्यक्तीस उद्देशून. ) ●●●

## काकान्योक्ति

वसंततिलका

कृष्णं वपुर्वहतु चुम्बतु सत्फलानि
रम्येषु संवसतु चूतवनान्तरेषु ॥
पुंस्कोकिलस्य चरितानि करोतु कामं
काकः कलध्वनिविधौ स तु काक एव ॥ ३० ॥

वसंततिलका

काळा असो; मधुर खात असो फळें तीं
आम्रांत रम्य वसतीहि करो वनान्तीं ॥
हें कोकिळासम करी जरि काक सर्व
काढी ध्वनीच परि केवळ " काव ! काव ! " ॥३०॥

गद्यार्थ— कावळ्याचा रंग काळा असो; तो मधुर फळें खात असो; रम्य आम्रवनांत वसतीहि करो; हें सर्व कितीहि जरी कावळ्याचें, कोकिळा सारखें दिसत असलें, तरी, तोंडातून ध्वनि काढील तो मात्र 'काव ! काव !' ( थोर माणसाचें, इतर कितीहि प्रकारांनीं, हीन माणसानें, सोंग आणलें, तरी, प्रसंग पडल्या वेळीं थोर तो थोर, हीन तो हीन हें उघडकीस आल्यावांचून राहात नाहीं ! ) ●●●

वैतालीय

विधिरेव विशेषगर्हणीयः
करट ! त्वं रट कस्तवापराधः ? ॥
सहकारतरौ चकार योऽसौ
सहवासं सरलेन कोकिलेन ॥ ३० अ ॥

वैतालीय

तुज कोकिलसंगती जयानें
दिधली आम्रतरूवरीच तेणें ॥
विधि निंद्यचि तो ठरे विशेष
रट काका ! तव यांत काय दोष ? ॥ ३० अ ॥

गद्यार्थ— आंब्याच्या झाडावर ज्या ब्रह्मदेवानें तुझी कोकिळाशीं संगत घडविली ( आणि तूंहि कोकिळासारखेंच मधुर कूजन करशील अशा खोट्याच अपेक्षा जनमानसांत उत्पन्न केल्या व साहजिकच त्या फसल्या याबद्दल ) तो ब्रह्म-

देवच विशेष दोषी ठरतो! हे कावळ्या! तू आपला कावकाव कर. तुझा यांत काय दोष? (नीट लायकी न पाहता अगदींच निकृष्ट गुणाच्या माणसाला मोठ्या पदावर बसविलें, व, त्याच्याकडून अपेक्षाभंग झाला, तर, दोष कोणाचा?) ●●●

शार्दूलविक्रीडित

काक! त्वं फलनम्रमाम्रविपिनं दैवात्समासादयन्
किं कर्णौ बधिरीकरोषि परुषकैंकारकोलाहलैः?॥
मौनं चेदवलम्बसे रतभरप्रक्रान्तपुंस्कोकिल–
भ्रान्त्याऽपि त्वयि संचरन्ति न कथं मुग्धाः कटाक्ष–
च्छटाः?॥ ३१॥

शार्दूलविक्रीडित

लाभोनी फलनम्र आम्रवन हें काका! सुदैवें असे
कां कानां किटवून टाकिसि फुका काकारवें कर्कशें
घेसी मौन तरी रतातं जणुं तूं कोकीळसा भासुनी
मुग्धांचे तिरपे कटाक्ष न च कां घेशील आकर्षुनी ३१

गद्यार्थ— हे काका! फलभरानें वाकलेल्या आंब्याच्या झाडाची, राईची राई, सुदैवानें तुला लाभली असता, येथें बसून तू आपल्या कर्कश काकारवानीं. कां उगाच, कान किटवून टाकीत आहेस? तू जर गप्प बसलास, तर, रतातं कोकिळ वाटून मुग्ध कोकिळांचे प्रेमळ कटाक्ष, तू आपल्याकडे आकर्षून घेऊं शकणार नाहींस का? (पण मूर्खाला, आपलें तोंड, नको तेथें, व, नको त्यावेळीं उघडून, आपला मूर्खपणा जगजाहीर करण्याची जन्मजात खोड असते ती जाणार कशी? मौन धारण केलें, तर, कित्येक अज्ञ सुद्धा, सुज्ञांत खपून जातात, हें आपण पाहात नाहीं का?) ●●●

उपजाति

काकस्य गात्रं यदि काञ्चनस्य
माणिक्यरत्नं यदि चञ्चुदेशे॥
एकैकपक्षे ग्रथनं मणीनां
तथाऽपि काको न तु राजहंसः॥ ३२॥

उपजाति

सर्वांग झालें जरि सोनियाचें
चोचींत गुंफूं जरि रत्न साचें॥
पंखांत रत्नें जडलीं तयास
तरीहि तो काक न राजहंस॥ ३२॥

गद्यार्थ— कावळ्याचें शरीर जरी सोन्याचें केलें, चोंच रत्नाची केली, दोन्ही पंख रत्नांनीं गुंफिले तरी कावळा कांहीं राजहंस होत नाहीं. (तेथें पाहिजे जातीचें. सौंदर्य आणता येईल पण गुण कोठून आणणार? सोन्यारत्नांनीं मढविला, तरी, कावळा, दूध, पाणी, निराळें करूं शकेल काय?) ●●●

अनुष्टुभ्

"वयं काका वयं काका" इति जल्पन्ति वायसाः।
तिमिरारेस्तमोहन्तुः शङ्कातङ्कितमानसाः॥ ३३॥

अनुष्टुभ्

"काक आम्ही! काक आम्ही! न हो अंधार" हें असें
ज्योत्स्नेंत बोलती काक तमोघ्नशशिभीतसे॥ ३३॥

गद्यार्थ— (चांदण्यात कावळे कावकाव का करतात यावर उत्प्रेक्षा.) चंद्र हा अंधाराचा नाश करणारा; कावळ्यांचा व अंधाराचा रंग एक. तेव्हा चंद्र उगवला, कीं, रंगसादृश्यानें, अंधाराबरोबर आपलाहि नाश व्हावयाचा, या भीतीनेंच जणु काय चांदण्यात ("आम्ही अंधार नाहीं.) आम्ही कावळे, आम्ही कावळे!" असें तमोनाशी चंद्राला नीट बजावण्यासाठीं, 'काव काव' असा ध्वनि, कावळे करीत असतात.) ●●●

अनुष्टुभ्

तुल्यवर्णच्छदैः कृष्णः सङ्गतः किल कोकिलैः।
केन विज्ञायते काकः स्वयं यदि न भाषते?॥ ३४॥

अनुष्टुभ्

काळा त्यांसम वर्णानें मिसळे कोकिळांमधें।
ओळखी कोण काकाला जर तो न स्वयें वदे?॥ ३४॥

गद्यार्थ— सारख्याच रंगाचें आवरण असलेल्या कोकिळामध्यें, काळा कावळा मिसळला असतां, तो स्वतः तोंडावून, कावकाव ध्वनि जर न काढील, तर त्याला कोण ओळखून काढू शकेल? (पण गप्प बसेल तर तो कावळा कसला?) ●●●

शार्दूलविक्रीडित

किं केकीव शिखण्डमण्डिततनुः? किं कीरवत्पाठकः?
किं वा हंस इवाङ्गनागतिगुरुः? शारीव किं सुस्वनः?॥
किं वा हन्त! शकुन्तराजपिकवत् कर्णामृतं सिञ्चते?
काकः केन गुणेन काञ्चनमये व्यापारितः पञ्जरे?॥ ३५॥

सुमंदारमाला

मयूरापरी काय यातें पिसारा ?
वदे काय हा पोपटाचे परी ?
स्त्रियां चाल दावी असा हंस कां हा ?
कुठें तुल्य साळुंकिशीं सुस्वरीं ? ॥
करी, पक्षिराजा अशा कोकिळाच्या
परी काय कर्णीं सुधासिंचन ?
सुवर्णाचिया पंजरीं ठेविला काक
हा कोणत्या तद्गुणा पाहुन ? ॥ ३५ ॥

गद्यार्थ— ( कुण्या मूर्खानें सोन्याच्या पिंजऱ्यात कावळा ठेवलेला पाहून कवि विचारतो— ) याला काय मोरासारखा सुंदर पिसारा आहे ? हा काय पोपटासारखा बोलू शकतो ? स्त्रीजातीला सुंदर ललित गति गुरूसारखा दाखविणारा हा काय हंस आहे ? हा काय साळुंकीसारखा सुस्वर गाऊ शकतो ? किंवा पक्षिराज कोकिळाप्रमाणें हा काय कानामध्यें अमृतसिंचन करू शकतो ? यापैकीं, एकहि, हा जर करू शकत नाहीं, तर मग या कावळयाचा कोणता गुण पाहून, याला, मोठ्या दिमाखानें, सोन्याच्या पिंजऱ्यात ठेवण्यात आलें आहे ? ( अर्थार्थी अर्थाअर्थी संबंध नसणाराला अर्थमंत्री, कादंबरीलेखकाला शेत कीमंत्री नेमले जाण्याचे प्रकार पाहिले म्हणजे या अन्योक्तीची आठवण होणारच. )

●●●

## ( काजवा ) खद्योतान्योक्ति

शिखरिणी

जगच्चक्षुस्तेजोनिधिरखिलमाकाशमभितो
मयूखैराक्रामन्नपि मनसि मानं न वहते ॥
कियान् खद्योत ! त्वं ? नियति नियती ते गतिरहो ?
कियत्तेज पुच्छे ? तदपि बत गर्वेण वलसे ! ॥ ३६ ॥

शिखरिणी

जगच्चक्षू तेजोनिधि, सकल आकाश फिरुनी
स्वतेजानें व्यापी, तरि मुळि न त्या गर्वहि मनीं ॥
कितीसा तू ? व्योमीं गतिहि तव खद्योत ! कितिशी ?
किती दीप्ती पुच्छीं ? तरिहि किति गर्वे मिरविशी ! ॥ ३६ ॥

गद्यार्थ— सर्व जगाचा नेत्र, व तेजाचा निधि, असा तो महान् सूर्य, सर्व आकाश उलघून, आपल्या किरणानीं त्याला व्यापून टाकतो,— परंतु त्याच्या मनाला गर्वाचा स्पर्श सुद्धां नाहीं ! आणि, हे काजव्या ! अरे तुझा जीव तो केवढासा ! आणि आकाशात तुझी भरारी तरी कितीशी ! तुझ्या शेपटींत तेज तरी केवढेंसें ! आणि तरीहि मोठ्या ऐटींत मिरवतो आहेस ! ( गुरु अत्यंत विद्वान् पण प्रसिद्धिविन्मुख असावा पण अर्ध्या हळकुडानें पिवळ्या ज्ञानलवदुर्विदग्ध झालेल्या शिष्यानें आपली निमकी जगभर वाजवावी या व अशा स्वरूपाच्या अनेक घटनांना उद्देशून )

●●●

## कुटजान्योक्ति

आर्या

समुपागतवति दैवादवहेलां कुटज ! मधुकरे मा गाः ।
मकरन्दतुन्दिलानामरविन्दानामयं महामान्यः ॥ ३७ ॥

आर्या

दैवें अलि ये जवळीं, त्याचा कुटजा ! करी न अपमान ।
मधुनें तुडुंब येशीं कमलेंही यास देति बहुमान ॥ ३७ ॥

गद्यार्थ— ( कुटज हें एक झाड आहे. त्याच्या फुलांत सुगंध किंवा मध नसल्यानें नाइलाज झाल्याशिवाय भुंगे त्याकडे फिरकत नाहींत. ) हे कुटजा ! तुझ्या दैवानें भ्रमर आज तुजकडे आला आहे, तर त्याला तू य कश्चित् समजून त्याची अवहेलना करू नकोस. (तुझ्यापाशीं मध नाहींच. परंतु) मधानें तुडुंब भरलेल्या अशा कमलांना सुद्धां, बहुमान देण्याच्या पात्रतेचा, हा, वाटतो. ( आपल्याकडे आलेल्या साध्यासुध्या अतिथीची, खरी महती, आपणास माहीत नसल्यानें, किंवा मूळचा थोर माणूस, सत्कार्यार्थ सहाय्ययाचना, करण्यास आला असता, त्याची थोरवी आपणास अज्ञात असल्यानें, आपण त्याचा अवमान करण्याचा संभव असतो, त्यास उद्देशून. श्रावण मासात परमेश्वर याचक होऊन येत असतो, तेव्हां कोणालाच विन्मुख पाठवू नये, अशी बायकांतून समजूत आहे, तसेच हें. )

●●●

## ( कुत्रा ) कुक्कुरान्योक्ति

इंद्रवज्रा

नैर्घृण्यमस्थैर्यमथाशुचित्वं रथ्याचरत्वं परकुत्सितत्वम् ॥
अभ्यो गृहीतं निशु नाम मूर्खैर्मूर्खेभ्य एताय शुना न जाने ॥ ३८ ॥

इंद्रवज्रा

अस्वच्छता मौर्य नि चंचलत्व, मार्गी भ्रमंती पर-
कुत्सितत्व ॥
हीं, मूर्खे घेती कुत्र्याकडुन किंवा घडे त्याउलटें, कळेन

गद्यार्थ— मूर्खपणा, नाचरेपणा, घाणेरडेपणा, मार्गांतून फिरणें, दुसऱ्याचें उष्टें खादीत बसणें—हीं सर्व कुत्र्याकडून मूर्खांनीं उचलिलीं, किंवा, मूर्खांकडून कुत्र्यानीं उचललीं, हें काहीं समजत नाहीं. (त्याच्यात तरतम ठरविणें कठीण !)

●●●

आर्या

शोकं मा कुरु कुक्कुर ! सत्त्वेष्वहमधम इति मुधा साधो ।
कष्टादपि कष्टतरं दृष्ट्वा श्वानं कृतघ्ननामानम् ॥ ३९ ॥

आर्या

कुत्रा 'कृतघ्न' नामक नीचचि नीचांत जो, तया बघुनी
शोक न कर हे श्वाना ! 'पशूंत मी अधम' या
विचारांनीं ॥ ३९ ॥

गद्यार्थ— हे श्वाना ! 'सर्व प्राण्यात मीच अधम' असे वाटून, तू आपल्या मनात उगाच शोक करू नकोस. नीचातली नीच 'कृतघ्न' नामक कुत्र्याची एक जात आहे, (ती तू अजून पाहिली नाहींस, असे दिसतें.) ती एकदा दृष्टीस पडली कीं, तुझें तुलाच वाटू लागेल, कीं, आपण किती तरी बरे ! उगाचच स्वत:ला वाईट समजत होतों.

●●●

(या शिवाय पहिल्या खंडातील प्रकरण १४ श्लोक ७ लांगूलचालनमधः हा श्लोक पाहावा.)

## कुण्डलान्योक्ति

शार्दूलविक्रीडित

यत्पूर्वं ह्यनिलाग्निशस्त्रसलिलैश्चीर्णं तपो दुष्करं
तस्यैतत्फलमीदृशं परिणतं यज्जातरूपं वपुः ॥
मुग्धापाण्डुकपोलचुम्बनसुखं सङ्गश्च रत्नोत्तमैः
प्राप्तं कुण्डल ! वाञ्छसे किमपरं यन्मूढ दोलायसे ? ॥ ४० ॥

शार्दूलविक्रीडित

वायू–अग्नि–जलात, शस्त्रहत, तू केलेंस जें दुष्कर–
मोठ्या त्याच तपें, सुवर्णवपु हें लाभे तुला सुंदर ॥
गालीं चुंबन लाभलें तरुणिच्या, रत्नांसवें मित्रता,
इच्छा काय उरे म्हणून डुलसी हे कुंडला ! तू आतां ? ४०

गद्यार्थ— हे कुंडला ! वायु, अग्नि, जल (वायूनें फुंकला जाऊन अग्नींत तापविला जाऊन, पाण्यात गार केला जाऊन) यात, तसेंच शस्त्रहत (हातोड्याचे ठोके खाऊन) होऊन तू जें मोठें दुर्घट तप केलेंस, त्याचें परिपक्व फल म्हणून तुला सोन्याचा देह लाभला, तरुणीच्या गालाचें चुंबनसुख लाभलें, उत्कृष्ट रत्नाची संगत लाभली. (देहाचें सार्थक व्हावें असा मोलाचें हें सर्व तुला मिळालें असूनहि) आता आणखी काय हवें आहे, म्हणून, हे मूर्खा, असा डुलत आहेस (वळवळ करीत आहेस !) (अत्यंत लोभी माणसे,—कीं, ज्याना कितीहि धन, ऐश्वर्य, सुख, मिळालें, तरी समाधान म्हणून नाहीं—आणखी काहींतरी मिळविण्यासाठीं त्याची वळवळ चालूच असते, अशाना उद्देशून.)

●●●

शिखरिणी

अलङ्कर्तुं कर्णौ भृशमनुभवन्त्या नवरुजं
ससीत्कारं तिर्यग्वलितवदनाया मृगदृशः ॥
कराब्जव्यापारानतिसुकृतिसारान् रसयतो
जनुः सर्वं श्लाघ्यं जयति ललितोत्तंस भवतः ॥४१॥

शार्दूलविक्रीडित

कर्णा शोभविण्यास विंधनविधी होऊन जी पीडित
सीत्कारासह जी मृगाक्षि अपुल्या मानेस वेळावत ।
पुण्याचें जणुं सारशा निजकरें गोंजारुनी घे तुला
वाटे जन्म सुधन्य सर्व तुजला हे कुंडला ! लाभला४१

गद्यार्थ— कानाना भूषविण्यासाठीं नुकतेच कान टोंचून घेतल्यानें अजून ते बरेच दुखत असल्यानें, कानात (कुंडलाची तार ओवताना, माना वेळावत, ही हरिणाक्षी सीत्कार काढीत, ज्याचा स्पर्श महापुण्यानेंच लाभावयाचा, अशा आपल्या करकमलानीं तुला चाचपून गोंजारते—तेव्हा हे कुंडला ! तुझा सारा जन्म धन्य झाला असेच म्हटलें पाहिजे ! (भाग्यशाली पुरुषाला उद्देशून)

●●●

## कुम्भान्योक्ति

शार्दूलविक्रीडित

श्लाघ्यं नीरसकाष्ठताडनशतं श्लाघ्यः प्रचण्डातपः
क्लेशः श्लाघ्यतरः सुपङ्कनिचयैः श्लाघ्योऽतिदाहानलः ॥
यत्कान्ताकुचपार्श्वबाहुलतिकाहिंदोललीलासुखं
लब्धं कुम्भवर त्वया ! न हि सुखं दुःखैर्विना
लभ्यते ॥ ४२ ॥

शार्दूलविक्रीडित

**काठीनें थडवी, उन्हांत सुकवी, कुंभार, कुंभा ! जरी**
**पंकातें तुडवून भाजित असे अग्नींत तूतें जरी ॥**
**स्त्रीवक्षाजवळीं कुशीत शिरुनी तू डोलसी जें तिथें**
**ते धन्यत्व तयें मिळे ! न सुख रे दु:खाविना लाभतें ॥ ४२ ॥**

गद्यार्थ— हे कुंभा ! (मातीचा घडा, मातींतून घटरूप होईपयतच्या प्रक्रियेमध्यें कुमारानें) तुला वाळलेल्या लांकडानें खूप बडविलें तें बरेंच झालें चिखल करून तुडविलें तेंहि बरें झालें, प्रखर उन्हात सुकविलें तेंहि छान झालें व अग्नींत भाजलें तेंहि उत्तम झालें, कारण (या सर्वांचें फळ म्हणून) तरुणींच्या वक्षोजांजवळ त्यांच्या बाहुलतिकेच्या मिठींत हिंदकळण्याचें सौख्य तुला लाभलें हें केवढें धन्यत्व बाबारे ! दु:ख, कष्ट भोगल्यांशिवाय सुख मिळत नसतें (खूप कष्ट केल्यानंतर श्रमसाफल्य लाभलेल्या माणसास उद्देशून)

## केतकी अन्योक्ति

वसततिलका

पत्राणि कण्टकशतैः परिवेष्टितानि
वार्ताऽपि नास्ति मधुनो रजसाऽन्धकारः ॥
आमोदमात्ररसिकेन मधुव्रतेन
नालोकितानि तव केतकि ! दूषणानि ॥४३॥

वसततिलका

**पानास कंटक बहु, मध अल्पही न**
**अधार आत पसरे रजहीं भरून ॥**
**गंधास केवळ तुझ्या भुलुनीच खास**
**पाहे न भृंग तव केतकि ! दूषणास ॥ ४३ ॥**

गद्यार्थ— तुझ्या पानांच्या सभोंवार शेंकडों काटे मधाचें तर नावहि नाहीं (आंतमधोंन) रज भरून अंधार झालेला ! परंतु हे केतकी ! केवळ सुगंधाला भाळलेला भुंगा, तुझे हे दोष पाहात नाहीं (कोणात काहीं, कोणात कांहीं, एखाद तरी गुण असतोच त्याच्या अनेक दोषांकडे डोळेझांक करून एखाद्या रसिकानें त्याच्या त्या एका गुणाचें कौतुक केल्यामुळें, त्याला वाटूं लागतें, कीं, आपण सर्वगुणसंपन्न व निर्दोषच आहों ! अंधांच्या डोळ्यांत अंजन घालण्यासाठीं !)

वसततिलका

हे हेमकेतकि ! कथं बहु गर्वितासि
ससेव्यसे मधुकरैरखिलैरतीव ॥
नैषा रसातिशयता ! नलिनीवियोगा-
त्तैर्दीयते विकटकण्टकशूलझम्पः ॥ ४४ ॥

वसततिलका

**भृंगे तुला सकल सेविति हे म्हणून**
**कां केतकी ! वससि गर्वभरें फुगून ? ॥**
**ही ना तुझी सरसता ! नलिनीवियोगें**
**घेतात हे झडप कंटकशूलि वेगें ॥ ४४ ॥**

गद्यार्थ— हे सोनकेतकी ! (संध्याकाळ झाल्याबरोबर) सारे भृंग तुलाच सेवीत आहेत, यामुळें, तू गर्वानें फुगून बसलीस कीं काय ? तू अत्यंत रसपूर्ण म्हणून हे तुजकडे येत आहेत, असा गैरसमज करून घेऊं नकोस त्याची प्रिया, जी कमल वेली (तिचीं कमलें सूर्यास्ताबरोबर मिटल्यानें) तिचा त्यांना वियोग घडल्यानें, (जिवावर उदार होण्याइतक्या दु:खानें) तुझ्या तीक्ष्ण कंटकरूपी सुळावर, (भोसकून घेऊन आत्महत्या करण्यासाठीं) हे झडप घालीत आहेत (शुद्ध मद्यार्क मिळत नाहीं म्हणून दारुडे, धोका पत्करून विषारी मेथिलेटेड् स्पिरिट् सुद्धा पितात ! म्हणून काय स्पिरिटनें स्वत:ला शर्यतीनें समजावें काय ?)

## कोकिलान्योक्ति

वसततिलका

अस्या सखे बधिरलोकनिवासभूमौ
किं कूजितेन किल कोकिल कोमलेन ? ॥
एते हि दैवहतकास्तदभिन्नवर्णं
त्वां काकमेव कलयन्ति कलानभिज्ञाः ॥ ४५ ॥

वसततिलका

**हे कोकिला ! बधिर राहति लोक येथें**
**लाभेल काय फल त्वन्मृदुकूजनातें ॥**
**पाहून दैवहत हे तुज काकवर्णें !**
**तूतेंच काक म्हणतील खुळे अजाण ॥ ४५ ॥**

गद्यार्थ— हे कोकिळा ! या ठिकाणीं सर्व बहिरे लोक राहात आहेत तेव्हां, तुझ्या मंजुळ कूजनाचा उपयोग काय ? हे दैवहत लोक, तुझा व कावळ्याचा रंग अभिन्न आहे, हें पाहून

हे खुळे तुलाच कावळा समजतील. ( गाढवापुढें वाचली गीता. कालचा गोंधळ बरा होता. अरसिकेषु कवित्वनिवेदनम् ) ●●●

शार्दूलविक्रीडित

गीतं कोकिल ! ते मुदा रसविदः शृण्वन्ति कर्णामृतं
नो किञ्चिद्वितरन्ति ते तरुदलैरेव स्वयं जीवसि ॥
कर्णायुर्हरमुद्गिरन्ति विरुतं काकास्तु तेभ्यो बलिं
प्राज्ञा एव दिशन्ति ! हन्त ! धिगिदं वक्रं विधेः क्रीडितम् ४६

शार्दूलविक्रीडित

त्वद्गीता श्रवणामृता रसिक ते ऐकोनिया, कोकिला !
कांहींही तुज देति ना; जगसि तूं खातां तरूंच्या दला ॥
आक्रोशे कटु कर्णकर्कश तया काकास द्यावा बलि—
ऐसें सांगति सुज्ञ ! हाय विधिची वक्रा गती जाहली ! ॥ ४६ ॥

गद्यार्थ—हे कोकिला ! (जगांतले सारे) रसज्ञ, तुझें, कानाला अमृतासारखें लागणारें गीत, आनंदानें ऐकतात; पण तुला देतात काय ? तर कांहीं नाहीं ! तुला आपली उपजीविका झाडांची पानें खाऊनच करावी लागते ! या उलट, कानांचें आयुष्य कमी होईल, असें, कर्कश ओरडणाऱ्या, कावळ्याला मात्र, बलि द्यावा, असें, सुज्ञ सांगतात ! ब्रह्मदेवाची क्रीडाच वक्रगति दुसरें काय ? ( सती शील घरांत लावायला बत्ती सुद्धां नसावी व असतीच्या दाराशीं हत्ती झुलत असावे हा जगाचा न्यायच आहे. ) ●●●

सवाई

रे रे कोकिल ! मा भज मौनं किञ्चिदुदञ्चय पञ्चमरागम् ॥
नो चेत्त्वामिह को जानीते काककदम्बकपिहिते चूते ! ४७

सवाई

रे रे कोकिल ! धर नच मौन
स्वर पंचम लव दे चढवून ॥
कोण जाणतो तुज इथ, ना तर,
काकांनीं भरल्या आंब्यावर ॥ ४७ ॥

गद्यार्थ—हे कोकिळा ! तूं मौन धरूं नकोस; थोडेंसें का होईना, पण पंचमसुरांतलें कूजन एकवार दे चढवून ! नाहींतर कावळ्यांनीं पूर्ण गजबजलेल्या, या आम्रवृक्षावर, तुला कोण ओळखूं शकेल ? ( गुणशाली पण प्रसिद्धिविन्मुख माणसाचा आजच्या या जाहिरातबाजीच्या युगांत निभाव लागणार नाहीं ! बोलेल त्याची माती विकली जाते — अबोलाचे मोतीं-सुद्धां विकले जात नाहींत. ) ●●●

आर्या

तावत्कोकिल विरसान् यापय दिवसान् वनान्तरे निवसन् ।
यावन्मिलदलिमालः कोऽपि रसालः समुल्लसति ॥४८॥

आर्या

तोंवर कोकिल ! घालव दिन नीरस हे वनान्तरीं वसुनी
जोंवर अलिमालाकुल आम्रवृक्ष ये कुठेंतरी फुलुनी॥४८॥

गद्यार्थ—हे कोकिला ! कुठें तरी एखादा तरी आम्रवृक्ष फुलून मोहोराला येईल व त्याच्या भोंवतीं भुंग्यांच्या झुंडी गर्दी करूं लागतील, तोंवर, नीरस असे तुझे दिवस, कसे तरी दुसऱ्या एखाद्या रानांत तुला काढले पाहिजेत. ( वाईट दिवस सर्वांनाच, केव्हां तरी, येतात. धीर सोडतां कामा नये. ) ●●●

आर्या

एकस्त्वं गहनेऽस्मिन् कोकिल ! न कलं कदाचिदपि कुर्याः
स्वाजात्यशङ्कया त्वां नूनं निघ्नन्ति निर्दयाः काकाः ॥४९॥

आर्या

हे कोकिल ! कूजन तूं करूं नको एकटा कधीं रानीं।
वधितील कावळे हे निर्दय, तुज कावळाच समजोनी

गद्यार्थ— हे कोकिला ! तूं रानांत कधीं एकटा कूजन करूं नकोस. हे निर्दय कावळे, तुला स्वतःच्याच जातीचा (कावळा) समजून, ( तूं त्याच्यापेक्षां निराळ्या सुरांत बोलतोस, एवढ्याच अपराधाबद्दल ) तुला ठार मारतील. ( अरसिकांच्या समूहांत कवि, दुष्टांच्या समूहात सुजन, मूर्खसमूहांत विद्वान् या सर्वांच्याच जिवाला धोका असतो. त्यांनीं अरक्षित राहूं नये. ) ●●●

अनुष्टुभ्

तावन्मौनेन नीयन्ते कोकिलैरपि वासराः ।
यावत्सर्वजनानन्ददायिनी वाक् प्रवर्तते ॥ ५० ॥

अनुष्टुभ्

दिन, कोकिल हा कंठी तोंवरी मौन सेवुन ।
आनंदकर सर्वांना जों फुटे कंठ त्यास न ॥ ५० ॥

गद्यार्थ— जोंवर सर्व जगाला आनंद देणारें कंठमाधुर्य, त्याला आलेलें नसतें, तोंवर, कोकिल हा सुद्धां आपले दिवस मौन सेवून घालवितो. (या मौनाचा फार मोठा अर्थ आहे. कोणतीहि कला कलावंतानें प्रथम आपल्याशींच गुप्तपणें पुष्ट करावी, व जगाला ती आनंद देईल्च असा आत्मविश्वास आल्यावरच, प्रकट करावी. अन्यथा कै. गडकऱ्यांनीं म्हटल्याप्रमाणें, कला, ही अज्ञान आणि धाडस यांनीं युक्त, अशी, जगापुढें आली म्हणजे सगळा आनंदच ! ) ●●●

अनुष्टुभ्

भद्रं कृतं कृतं मौनं कोकिलैर्जलदागमे ।
दर्दुरा यत्र वक्तारस्तत्र मौनं हि शोभनम् ॥ ५१ ॥

अनुष्टुभ्

मेघ येतां कोकिलांनीं बरवें मौनसेवन ॥
वक्ते बेडूकची, तेथें, दिसे मौनचि शोभुन ॥ ५१ ॥

गद्यार्थ— आकाशांत मेघ येण्याच्या वेळीं कोकिलांनीं मौन धारण केलें तेंच बरें केलें ; कारण बेडकासारखे ओरडणारे जेथें असणार तेथें मौन धरण्यांतच शोभा आहे. ( अरसिका-मध्यें कवि, गोंधळ्यांत गानपंडित यांनीं असाच सुविचार केला पाहिजे. ) ●●●

अनुष्टुभ्

काकः कृष्णः पिकः कृष्णस्त्वभेदः पिककाकयोः ।
वसन्ते समुपायाते काकः काकः पिकः पिकः ॥ ५२ ॥

आर्या

काक नि कोकिळ— दोघे दिसती रंगामधें जरी एक ।
येतां वसंत, कोकिळ तो कोकिळ आणि काक तो काक ॥

गद्यार्थ— कावळा काळा, कोकिळहि काळा, असें त्या दोघांत अभिन्नत्व आहे. परंतु एकदा का वसंत आला, कीं, कावळा तो कावळा, कोकिळ तो कोकिळ. ( तोतये जगभर मधून मधून उपटतातच. पण हें सोंग फार काळ टिकत नसतें. ) ●●●

अनुष्टुभ्

काकैः सह विरुद्धस्य कोकिलस्य कलागिरः ।
खलसङ्गेऽपि नैष्ठुर्यं कल्याणप्रकृतेः कुतः ? ॥ ५३ ॥

आर्या

काकविरुद्धचि कोकिल, तत्संगांतहि धरी कलावाणी
खलसङ्गांतहि सज्जन कर्कशपण आणणार तो कुठुनी ५३

गद्यार्थ— कावळयांच्या सहवासांतसुद्धां, तद्विरुद्धप्रकृति कोकिळाची वाणी, कलापूर्ण मधुरच राहते ! दुष्टांच्या संगतींत-सुद्धां मूळ, कल्याणकर मृदुप्रकृति असे सज्जन, कठोरपणा आणणार कुठून ? ●●●

आर्या

हे कोकिल कुरु मौनं जलधरसमये हि पङ्किला भूमिः ।
विकसति कुटजकदम्बे वक्तरि भेके क तेऽवसरः ? ॥ ५४ ॥

वसंततिलका

हे कोकिला अजुनि मौन धरी मुखानें
भूमीवरी चिखल हा बघ पावसानें ॥
आलीं कदंबकुटजांस फुलें फुलून
बेडूक ओरडति–वाव तुला कुठून ? ॥ ५४ ॥

गद्यार्थ— हे कोकिला ! तूं सध्यां मौन धारण कर ! पावसाळा असल्यानें सर्वत्र चिखल झालेला आहे. कदंब कुटजांसारख्या ( निर्गंध ) वृक्षांना फुलें आलीं आहेत व बेडूक ओरडत आहेत. येथें तुझ्या पंचमरागाला कोठून वाव मिळणार ? ( दुर्जनांचें जिथें प्राबल्य–तेथें सज्जनांनीं मौन पाळणेंच इष्ट ! त्यांचें कौतुक होण्याची शक्यताच तेथें नसते. ) ●●●

## क्षीरसमुद्रान्योक्ति

शार्दूलविक्रीडित

साकं ग्रावगणैर्लुठन्ति मणयस्तीरेऽर्कबिम्बोपमा
नीरे नीरचरैः समं च भगवान्निद्राति नारायणः ॥
एवं वीक्ष्य तवाविवेकमपि च प्रौढिं परामुन्नतेः
किं निन्दाम्यथवा स्तवानि कथय क्षीरार्णव त्वामहम् ॥५५॥

तीराला दगडांत लोळति मणी–ज्यां तेज सूर्योपरी
नक्रांच्या सहची जळांत भगवान् तो झोंप घेई हरि ॥
पाहोनी अविवेक हा तव, तशी मोठी तुझी उन्नति
हे क्षीरार्णव ! सांग, मी हि करणें निंदा तुझी का
स्तुति ? ॥ ५५ ॥

गद्यार्थ— हे क्षीरसागरा ! तुझ्या तीरावर बघावें, तर दगडांच्या राशींतच, सूर्यासमान तेजस्वी अशीं रत्नेंहि लोळत पडलेलीं आहेत. पाण्यांत, सर्व जलचरांच्या समवेतच भगवान्

विष्णु झोंप घेत आहे! एकीकडे, तुझा हा अविचारीपणा (दगडाला कुठें स्थान द्यावें, रत्नाला कुठें ठेवावें इत्यादि तारतम्य नसणें हा) पाहिला व दुसरीकडे (चौदा रत्नांना व प्रत्यक्ष अमृताला सुद्धा जन्म देण्याइतका) तुझा मोठेपणा मनात आला, म्हणजे, तुझी निंदा करावी, कीं, स्तुति करावी, हें कळेनासे होतें (अत्यंत थोर माणससुद्धा 'वसुधैव कुटुंबकम्' इत्यादि महान् तत्वांच्या जयघोषात, तारतम्य सोडून वसतात, अशीं उदाहरणें जगभर आहेतच!) ●●●

## गर्दभान्योक्ति

शार्दूलविक्रीडित

रे रे रासभ! वस्त्रभारवहनात्कुग्रासमश्नासि किं?
राजाश्वावसथं प्रयाहि चणकाभ्यूषान्सुखं भक्षय ॥
सर्वान्पुच्छवतो हया इति वदन्त्यत्राधिकारे स्थिता
राजा तैरुपदिष्टमेव मनुते सत्यं, तटस्था परे ॥५६॥

शार्दूलविक्रीडित

का रे गर्दभ! भार वाहुनि तुला कुग्रासची खावया?
ये खाण्यास चणे सुखात वसुनी राजाश्वशाळेंत या!
"ज्या ज्या पुच्छ तयास अश्व म्हणि" असें मंत्री इथें मानिती
राजा वदुत्त हेंच सत्य गणितो, मौना दुजे सेविती ॥५६॥

गद्यार्थ— हे गर्दभा! वस्त्राचे एवढाले भारे वाहूनसुद्धा तुला खायला कुग्रासच का बरें मिळावा? त्यापेक्षा तू असें कर. ही येथें राजाची अश्वशाळा आहे, तींत ये, आणि सुखानें चणे वगैरे पौष्टिक अन्न खात बैस (तू म्हणशील, "मला तेथें प्रवेश मिळणार कसा?" तर हें लक्ष्यात ठेव कीं, बाबा, ही अधेरनगरी आहे) येथले अधिकारी इतके बुद्धिमान् आहेत कीं (घोडा गाढव हा भेद यांना कळत नाहीं, तर) ज्याला ज्याला शेपूट तो तो घोडाच असें हे मानतात व येथला राजा, त्यांचें बोलणें हें सत्यच असें मानतो व दुसरे (सुज्ञ विचारे) तटस्थपणें गप्प बसतात! (आजच्या बुद्धियुगात सुद्धा असली अधेरनगरी अनेक ठिकाणीं दिसते! आणि 'तज्ज्ञ तज्ज्ञ' म्हणविणारे, अज्ञपणात अगदीं अज्ञजनांना सुद्धां सारखें मान घालवयाला लावतात, अशीं उदाहरणेंहि आहेतच!)

## गोदावरी अन्योक्ति

अनुष्टुभ्

न केनापि श्रुतं दृष्टं वारिणा वारि शुष्यते।
अहो गोदावरीनीरं भवसिंधुर्विशुष्यते ॥५७॥

अनुष्टुभ्

वाळे जळ, जळें, हें ना पाहिलें ऐकिलें कुणी।
गोदावरीजळें जाई भवसागर वाळुनी ॥५७॥

गद्यार्थ— (शब्दचमत्कृतीनें गोदावरी नदीच्या पावित्र्याचें वर्णन) पाण्यानें पाणी वाळणें, हा प्रकार, कोणी कधीं ऐकला नाहीं, कीं, पाहिलाहि नाहीं पण (नसेल पाहिला तो प्रकार पहा, कीं) गोदावरीच्या पाण्यानें भवसागर वाळून जातो! ●●●

## गंगा अन्योक्ति

आर्या

किं निःशङ्कं शेषे शेषे वयसि त्वमागतो मृत्युः?॥
अथवा सुखं शयीथा निकटे जागर्ति जाह्नवी जननी ॥५८॥

आर्या

सरत्या वयांत केसा निर्भय निजशी? समीप ये मरण
अथवा नीज सुखानें! जागृत गंगा वहात जवळून ५८

गद्यार्थ—(गंगा नदीच्या किनाऱ्यावर निजलेल्या म्हाताऱ्या माणसास उद्देशून प्रश्न विचारून त्याचे उत्तरीं गंगानदीची मृत्युनाशक शक्ति वर्णिली आहे—) हे वृद्धा! तुझें आयुष्य तर सरत आलें, तेव्हा उरलेल्या आयुष्यात (जीवाचें सार्थक करण्यात प्रत्येक क्षण वेंचण्याचें सोडून) असा निःशंकपणें कसा निजला आहेस? मृत्यु जवळ आला आहे! पण (माझाच प्रश्न चुकला) तू सुखानें नीज कारण जागृत गंगामाता जवळच जागत बसली आहे (ती तुला अमरत्व देणार तेव्हा तुला मृत्यूची भीति वाटण्याचें कारण नाहीं) ●●●

आर्या

स्वर्धुनि! तव महिमानं वक्तुमनीशः स्वयं फणीशोऽपि ॥
वितरसि यत्पदमच्युतमच्युतपदाद्विच्युताऽपि त्वम् ॥५९॥

आर्या

गंगे! तव महिमा गे! वर्णाया शेषही समर्थ नसे।
अच्युतपदविच्युत तू अच्युतपद या जनास देसि कसें? ॥५९॥

गद्यार्थ— (शब्दचमत्कृतीनें गंगामहिमावर्णन) हे स्वर्गंगे तू स्वतः अच्युत (च्युत न होणारें किंवा विष्णु) पदापासून (स्थळापासून किंवा पायापासून) विच्युत (भ्रष्ट झालेली, पडलेली, किंवा उगम पावलेली) असून जनाला मात्र अच्युत पद (अढळ पद, विष्णुपद) देतेस हा जो भक्तन्यणमान्य

चमत्कार, त्याची महती वर्णन करण्याला, प्रत्यक्ष, ( सहस्र मुखें असलेला ) शेष सुद्धां समर्थ होणार नाहीं. ●●●

( धान्य दळण्याचें जातें )
किंवा
घरट्ट ( विहिरीवरील रहाट ) अन्योक्ति
अनुष्टुभ्

रे रे घरट्ट ! मा रोदी. । क कं न भ्रामयन्त्यमू: ! ।
कटाक्षक्षेपमात्रेण, कराकृष्टस्य का कथा ? ॥ ६० ॥

अनुष्टुभ्

जात्या ! रडूं नको रे ! स्त्री फिरवी न कुणा कुणा ?
कटाक्षेंहि, करें ओढी त्याची वार्ता पुसोंच ना ॥ ६० ॥
रहाटाकडे—

रडू नको रहाटा ! स्त्री . ( पुढें सर्व वरीलप्रमाणें )

गद्यार्थ— ( दळतांना जातें घोगरा आवाज करतें किंवा पाणी काढतांना रहाट करकर वाजतो त्याचें समाधान करण्याचे मिषानें, कवि, स्त्रीजातीच्या ' आकर्षणाचा ' प्रभाव सांगत आहे— ) हे जात्या ( किंवा रहाटा ! ) रडू नको ! अरे स्त्री ही कोणाकोणाला गरगर फिरवीत नाहीं ? कित्येकांना तर नुसत्या कटाक्षाच्या फेकीनें ( नाचविते व आपल्या भोंवतीं फिरायला लावते, ) मग प्रत्यक्ष हातानीं धरून ज्यांना ती ओढते त्यांची कथा काय सांगावी ? ●●●

चक्रवाक अन्योक्ति
शार्दूलविक्रीडित

मित्रे क्वापि गते, सरोरुहवने बद्धानने ताम्यति
क्रन्दत्सु भ्रमरेषु वीक्ष्य दयिताश्लिष्टं पुरः सारसम् ॥
चक्राह्वेण वियोगिना बिसलता नास्वादिता नोज्झिता
कण्ठे केवलमर्गलेव निहिता जीवस्य निर्गच्छतः ॥ ६१ ॥

शार्दूलविक्रीडित

जातां सूर्य दुरी, मिटून कमलें होतां अतिम्लान तीं
भुंगे ओरडता, बघून रमल्या त्या सारसांची मिठी ॥
खाईना त्यजिना बिसें हि विरही चक्राह्व कंठीं धरी—
जातां प्राण, गळ्यांत त्या अडविण्या, तीं अर्गलाचे परी

गद्यार्थ— ( अन्योक्तीपेक्षां ही उत्कृष्ट स्वभावोक्ति आहे. ) सूर्य कुठें तरी गेला ( मावळला; ) सारीं कमलें ( तोंड माघून ) मिटून म्लान झालीं, भुंगे ओरडू लागले; व समोरच एका सारसानें आपल्या प्रियेला मिठी मारली, हें सर्व दृश्य पाहून, विरही चक्रवाक पक्षी, तोंडात घेतलेले कमलतंतू धड खाईना, व टाकूनहि देईना, पण ( जणू काय त्या विरहदुःखानें ) स्वतःच्या निघून जाऊं पाहणाऱ्या प्राणांना, गळ्यातल्या गळ्यातच, अडवून धरून, ( बाहेर पडूं न देण्याच्या उद्देशानें, त्यानें ) ते बिसतंतु, गळ्यात अर्गलासारखे, (बूच, अडसर; मारल्यासारखे ) ठेवून दिले ! ●●●

चातकान्योक्ति
शार्दूलविक्रीडित

रे रे चातक ! सावधानमनसा मित्र क्षणं श्रूयता—
मम्भोदा बहवोऽपि सन्ति गगने, सर्वेऽपि नैतादृशाः ॥
केचिद्वृष्टिभिरार्द्रयन्ति धरणीं, गर्जन्ति केचिद् वृथा ।
यं यं पश्यसि तस्य तस्य पुरतो मा ब्रूहि दीनं वचः ॥६२॥

शार्दूलविक्रीडित

बा रे चातक ! लक्ष्य देउनि सख्या, हें ऐक एक क्षण
आकाशीं असती किती घन जरी, ते सारखे सर्व न ॥
वृष्टीनीं कुणि या जगा भिजविती, कोणी वृथा गर्जती
ज्या ज्या पाहसि त्यापुढें न वदणें प्राणी तुझी दीन ती ६२

गद्यार्थ— हे चातका ! मित्रा, मी तुला सांगतों, तें, क्षणभर नीट लक्ष्य देऊन ऐक. आकाशांत, मेघ तर पुष्कळच असतात, पण ते सारे कांहीं एकसारखे नाहींत, कांहीं, जलवर्षाव करून पृथ्वीला भिजवून टाकतात—तर कांहीं उगाचच गर्जना करतात. म्हणून, जो जो मेघ दिसेल, त्या त्या प्रत्येकापुढे, तू दीनवाणेपणें उगाच याचना करू नको. ( दान करणारांना जसा पात्रापात्रविवेक सांगतात, तसेंच याचकानींहि कोणापाशीं याचना करावयाची व कोणापाशीं नाहीं यात तारतम्य ठेवणें अवश्य असतें;—कारण, मोठे बडलेवाले दिसले, म्हणजे सगळे कांहीं दानशूर नसतात, मेघाप्रमाणेंच त्यांच्यातहि, अयाचित वृष्टींनीं तृप्त करणारे व पोकळ आश्वासनें देणारे असे भेद आहेतच ) ●●●

सवाई

गर्जसि मेघ ! न यच्छसि तोयं
चातकपक्षी व्याकुलितोऽहम् ॥
दैवादिह यदि दक्षिणवात
क त्वं काहं क च जलपात ? ॥ ६३ ॥

सवाई

घन ! गर्जसि परि जल नच देशी
व्याकुल हा मी चातकपक्षी ॥
दैवें जर ये दक्षिणवारा
कुठ तूं, कुठ मी, कुठ जलधारा ? ॥ ६३ ॥

गद्यार्थ—(चातक मेघास म्हणतो)—हे मेघा! नुसत्या गर्जना करतोहेस, पण जलवृष्टि करीत नाहींस. मी चातकपक्षी अगदीं व्याकुळ झालों आहें. (आता, अधिक वाट पाहायला लावून, माझा अंत पाहू नको. वृष्टि करायचीच, तर, लौकर कर. नाहींतर, लौकरच जर का) दक्षिणेचा वारा सुरू झाला तर कुठें तू, कुठें मी आणि कुठें वृष्टि! (अशी दाणादाण उडून जाईल.) (सत्कार्य करायचे, नुसते संकल्प करीत बसू नये! त्यासाठीं मुहूर्तहि पाहत बसू नये. सत्कार्य करण्याची संधि वारंवार येत नसते. जीविताचा भरवसा काय? क्षणात मृत्यूचा झपाटा येऊन सारे संकल्प वाऱ्यावर उडवून लावील.) (याच अर्थाचा 'वितर वारिद' हा श्लोक मेघान्योक्तींत पहा..) ●●●

वसंततिलका

के वा न सन्ति भुवि वारिरुहावतंसा
हंसावलीवलयिनो जलसंनिवेशाः ? ॥
किं चातकः फलमपेक्ष्य च वज्रपातां
पौरन्दरीं कलयते नववारिधाराम् ? ॥ ६४ ॥

वसंततिलका

नाहींत कां जगिं तळीं—कमलें जयांत-
आलीं फुलोनि भवतीं कलहंस जेथ ? ॥
इच्छा मनीं धरुनि चातक तो कशाची,
वज्रामुळें भयदही नववृष्टि याची ? ॥ ६४ ॥

गद्यार्थ— ज्याच्यात अलंकाराप्रमाणें, सुंदर कमलें फुलून आलेलीं आहेत, व, ज्याच्या भोंवतीं हंसाच्या झुंडी विहार करीत आहेत, असे जलाशय, जगांत थोडे का आहेत? परंतु असें असून सुद्धा, मनांत कशाची अपेक्षा धरून, न कळे, चातक हा वीज पडण्याच्या संभवामुळें भयदायक अशा मेघाच्या नववृष्टीचीच याचना करतो! (तें क्षुद्रांना कधीं कळावयाचें नाहीं. उच्च ध्येयावर दृष्टि खिळलेल्या महात्म्याचें वर्तन साधारणांना असेंच विक्षिप्त वाटतें. गडकऱ्यांच्या 'प्रेम आणि मरण' या कवितेंतील झाडाला विजेचें वेड का लागलें, हें, असेंच सामान्य जनाना आकलन होणारें नव्हे!) पुढें श्लोक ६७ पहा. ●●●

आर्या

चातक! धूमसमूहं दृष्ट्वा मा धाव वारिधरबुद्धया ॥
इह हि भविष्यति भवतो नयनयुगादेव वारिणा पूरः ॥६५

आर्या

धूमास मेघ समजुनि धावुं नको चातका, तयामागें।
नेत्रांतूनचि तुझिया पाणी हा वाहवील रे वेगें ॥ ६५ ॥

गद्यार्थ— हे चातका! हा धुराचा लोट पाहून, त्यालाच मेघ समजून, तू त्याच्यामागें उगाच धावू नको. (हा तुला जलवृष्टि तर देणार नाहींच,) पण तुझ्या डोळ्यांतून मात्र हा पाण्याचा पूर वाहवील. (याचक या नात्यानें भलत्याच्या पुढें हात पसरला, तर, केव्हां केव्हां "भीक नको! कुत्रा आवर!" असें म्हणण्याची पाळी येते, त्यास उद्देशून.) ●●●

मंदाक्रांता

सन्त्येवास्मिञ्जगति बहवः पक्षिणो रम्यरूपा—
स्तेषा मध्ये मम तु महती वासना चातकेषु ॥
यैरध्यक्षैरथ निजसखं नीरदं स्मारयद्भि—
श्चित्तारूढं भवति किमपि ब्रह्म कृष्णाभिधानम् ॥ ६६

मन्दाक्रान्ता

सौंदर्यानें जगतिं असतां श्रेष्ठ कित्येक पक्षी
प्रेमा त्याच्याहुनि परि मला खास या चातकाशीं ॥
जेव्हां नेत्रा वर करुनि ते कृष्णमेघा पहाती (किंवा वहाती,)
तेव्हां होई स्थिर, न कळतां कृष्ण हें ब्रह्म चित्तीं ६६

गद्यार्थ— या जगांत रूपानें सुंदर पक्षी पुष्कळच आहेत; परंतु त्या सर्वांमध्यें चातक या पक्ष्याविषयीं मला विशेष प्रेम वाटतें. त्याचें कारण, असें कीं,— चातक हे जेव्हां वर डोळे करून निजमित्र जो (कृष्ण) मेघ त्याकडे पाहतात, तेव्हां माझ्या चित्तामध्यें न कळत (का कोण जाणे) कृष्ण नांवाचें ब्रह्म आरूढ होतें. ●●●

शार्दूलविक्रीडित

कूपे पानमधोमुखं भवति मे; नद्यो वराक्यः स्त्रियः।
सारङ्गैर्बकटिट्टिभैः सह सरस्येवं समालोकयन्॥
नादत्ते तृषितोऽपि हीनसलिलं क्रूरैर्वृतं जन्तुभि—
र्मानादुन्नतकन्धरः सुरपतिं तच्चातको याचते॥ ६७॥

शार्दूलविक्रीडित

वांके मान कुव्यामधें जळ पितां, स्त्री ती विचारी नदी
सारंगादि तळ्यांत घाण करिती पक्षी, बघे हें जधीं।
जन्तु क्रूर जिथें-गढूळ जळ तें, तृष्णार्तही ना पिलो
मानी चातक, मान उंच धरुनी इन्द्रासचि प्रार्थितो ६७

गद्यार्थ— ( श्लोक ६४ मध्यें जो प्रश्न कवीनें अनुत्तरित सोडला, त्याचें अंशतः उत्तर, या श्लोकांत कवीनें तर्किलें आहे ) विहिरींत पाणी प्यायचें, तर, मान खालीं वांकवावी लागते; नदी बिचारी स्त्रीजाति! ( मानी पुरुषानें काय स्त्रीपाशीं याचना करावयाची? ) तळ्यांत पाणी पिण्यास जावें तों सारंग, बगळे, टिटव्या यांनीं त्यांत घाण केलेली; ज्यांत क्रूर जंतु वळवळताहेत असें गढूळ पाणी, यासाठीं, तृष्णार्त असूनहि चातक पीत नाहीं; तर मानानें, खांदे उभवून केवळ इंद्राची ( मेघदेवतेची ) प्रार्थना करतो. ●●●

## चन्दनान्योक्ति

शार्दूलविक्रीडित

भ्रातश्चन्दन! किं ब्रवीमि विटप! स्फूर्जत्फणाभीषणा
गन्धस्यापि महाविषाः फणभृतो गुप्त्यै पदे ते कृताः॥
दैवात्पुष्पफलान्वितो यदि भवानत्राभविष्यत्तदा
नो जाने किमकल्पयिष्यदधिकं रक्षार्थमस्यात्मनः?॥६८॥

शार्दूलविक्रीडित

तूतें एक सुगंध थोर असतां त्याच्याहि संरक्षणा
हे मोठे विषपूर्ण नाग जवळीं तूं ठेविशी चंदना!
दैवानें तुज लाभलीं जर कधीं पुष्पें फळें सुंदर
तूं याहून उपाय काय करिशी, तें कोण जाणे नर ६८

गद्यार्थ—हे चंदनवृक्षा! अरे तुला कुठें एक सुगंध हा गुण लाभला, तर, त्याच्या रक्षणार्थ पाहरेकरी म्हणून महाविषारी भयंकर फणा उभारणारे, असे नाग, तूं आपल्या संग्रहीं ठेवलेले आहेस. मग, दैवयोगानें, जर कधीं तुला फुलें फळें लाभलीं असतीं, तर कोण जाणे, तूं त्यांच्या संरक्षणार्थ याहून आणखी काय भयंकर उपाय केले असतेस? ( कुठें चुकून एखादा गुण लाभला, तर कृपणासारखा तो स्वतःजवळच जपून ठेवणाऱ्या व परार्थ त्याचा यत्किंचितहि उपयोग होऊं न देणाऱ्याला उद्देशून. ) ●●●

इन्द्रवज्रा

मूलं भुजङ्गैः शिखरं प्लवङ्गैः शाखा विहङ्गैः कुसुमानि भृङ्गैः
नास्त्येव तच्चन्दनपादपस्य यन्नाश्रितं सत्त्वभरैः समन्तात् ६९

उपजाति

भुजंग मूळीं, शिखरीं प्लवंग
शाखांत पक्षी; कुसुमांत भृंग॥
कांहीं न ऐसें मुळिं चंदनातें
येती न कोणी जिथ आश्रयातें॥ ६९॥

गद्यार्थ— चंदनाच्या झाडाच्या मुळाशीं सर्पांनीं आश्रय घेतला आहे. शेंड्यावर माकडांनीं, फांद्यांवर पक्ष्यांना व फुलात भुंग्यांनी आश्रय घेतलेला आहे:— चंदनाच्या झाडाचा असा कोणताच विभाग नाहीं, कीं, ज्यांत, कोणाना कोणा तरी प्राण्यानें आश्रय घेतला नाहीं. ( सर्वतोपरी, सर्वांगपरोपकारी, महात्म्याचें हें वर्णन आहे. ) ●●●

शार्दूलविक्रीडित

सौरभ्यं भुवनत्रयेऽपि विदितं शैत्यं तु लोकोत्तरं
कीर्तिः किं च दिगङ्गनाङ्गणगताः किन्त्वेतदेकं शृणु॥
सर्वानेव गुणानियं निगिरति श्रीखण्ड ते सुन्दरान्
उज्झन्ती खलु कोटरेषु गरलज्वालां द्विजिह्वावली॥ ७०॥

शार्दूलविक्रीडित

त्रैलोक्यासहि गंध ठाउक, तुझी अत्यंत ती शीतता;
गेली कीर्ति दिगन्तरांत; परि तूं हें एक ऐकें अतां;॥
टाकी सद्गुण सर्व सुंदर तुझे हे चंदना! खाउनी
(जाळुनी)
ही सर्पावलि कोटरांत गरलज्वाला इथें ओकुनी॥७०॥

गद्यार्थ— हे चंदनतरो! तुझा सुगंध उभ्या त्रैलोक्याला माहीत आहे. तुझी शीतलता लोकोत्तर आहे तुझी कीर्ति दिशा-सुंदरींच्या अंगणांत पोंचली आहे......हें सर्व खरें पण...

एवढें हें एक ऐकून घे: तुझ्या दोलींत हे जे सर्प आहेत त्यांनीं ओकलेल्या विषरूपी ज्वाला, तुझे हे सारे सुंदर सद्गुण खाऊन (जाळून) टाकीत आहेत. (अनेक सद्गुण अगीं असून, एक तुसडेपणा, एक माणूसघाणेपणा, माणसाला जवळ येऊं न देण्याचा एक दुर्गुण, ज्या माणसाच्या अगीं असतो, व त्या एकाँ दुर्गुणानें ज्यानें आपल्या साऱ्या सद्गुणाची माती करून टाकली आहे, अशाला उद्देशून (एको हि दोषो गुणसन्निपाते या कालिदासोक्तीस विरोधी उक्ति) ●●●

आर्या

जनक स्थाणुविशेषो जाति काष्ठं भुजङ्गमै सङ्ग: ।
स्वगुणैरेव पटीरज यातोऽसि तथाऽपि महिमानम् ॥ ७१ ॥

आर्या

बाप कुणीसा तरु तव, जातीनें काष्ठ, सग भुजगाशीं ।
स्वगुणानींच तरीही हे चदन, ! तूं महत्पदा जासी ७१

गद्यार्थ— हे चदना, कुणीसा वृक्ष हा तुझा पिता, जातीनें तू काष्ठ, तुला सगति लाभली ती सर्पाची, असें असताहि केवळ तूं स्वतःच्या अगच्या गुणानीं एवढ्या महत्पदाला चढला आहेस!

(जन्मानें हीन, योनीन हल्का, सगत दुष्ट, अशा परिस्थितींत आहि एखादा माणूस स्वगुणानीं मोठा होतो त्यास उद्देशून) ●●●

आर्या

अयि मलयज ! महिमाऽयं कस्य गिरामस्तु नाम विषयस्ते ।
उद्गिरतो यद्गरलं फणिन पुष्णासि परिमलोद्गारै ॥ ७२ ॥

आर्या

हे चदन ! तव महिमा वर्णूं शकणार कोण वाणीनें ? ।
ओकी गरल अशाही सर्पा तू पोषिसी सुगंधानें ॥७२॥

गद्यार्थ— हे चदना ! तुझी थोरवी कोण आपल्या वाणीनें वर्णन करू शकेल ? गरल ओकणाऱ्या सर्पासहि तूं आपल्या सुगंधानें पुष्ट करतोस ●●●

आर्या

पाटीर ! तव पटीयान् क परिपाटीमिमामुरीकर्तुम् ? ।
यत्पिषतामपि नृणा पिष्टोऽपि तनोषि परिमलै पुष्टिम् ७३

आर्या

हे चंदन ! शक्य कुणा होई धरणें तुझ्या सुवृत्तीस ? ।
तुज कुटिती जन त्यांसहि पुष्टि तुष्टि परमलेंच देतोस

गद्यार्थ— हे चंदना ! तुझी हीं अलौकिक भली वृत्ति धरण्यास कोण समर्थ आहे ? जे तुला कुटतात त्यांना तू स्वता चूर्ण होऊन सुद्धा स्वताच्या सुगधानें पुष्टितुष्टि देतोस. (निरनिराळे दृष्टात देऊन वरील दोनहि श्लोकात अपकारकर्त्यावरहि उपकार करण्याची महात्म्याची वृत्ति वर्णिली आहे) ●●●

अनुष्टुभ्

सुभगा सुलभारोहा फलपल्लवशालिन ।
जायन्ते तरवो देशे न तु चन्दनपादपा ॥ ७४ ॥

अनुष्टुभ्

सोपे चढावया, वृक्ष फलपल्लवशोभन ।
होती कितीक या लोकीं विरळा परि चदन ॥ ७४ ॥

गद्यार्थ— सुदर, चढायला सोपे, फलपाल्लवीयुक्त असें वृक्ष जगभर वाटेल तेवढे वाढतात—पण चन्दन मात्र अगदीं क्वचित् ●●●

अनुष्टुभ्

सन्त्येव लिखिताकाशा महीयन्ति महीरुहा ।
तथापि जनताचित्तानन्दनश्चन्दनद्रुम ॥ ७५ ॥

अनुष्टुभ्

होतीं उंच तरू कीं जे नभीं करिती लेखन ।
तथापि जनताचित्ता देई आनंद चन्दन ॥ ७५ ॥

गद्यार्थ—आकाशात लेखन करू शकतील इतके उच वृक्षहि जगात आहेतच. परतु जनताचित्ताला आनद देणारा एक चदनच (वरील दोन्ही श्लोकात जगात सर्वसाधारणांचें संख्या बाहुल्य व दुसऱ्या बाजूस महात्म्यानें अल्पसंख्याकत्व वर्णिलें आहे.) ●●●

आर्या

यद्यपि चन्दनविटपी विधिना फलकुसुमवर्जितो विहित ।
निजवपुषैव परेषां तथाऽपि सन्तापमपनयति ॥ ७५-अ ॥

आर्या

केलें चंदनवृक्षा विधिनें फलपुष्प याविनाच जरी ।
निजतनुनेंच परी तो अन्यतनूतील सर्व दाह हरी
॥ ७५ अ ॥

गद्यार्थ—चन्दनवृक्षाला, ब्रह्मदेवान, फळें किंवा फुलें, काहींच दिली नाहींत, तरी, तो आपल्या देहाचें दान करून, ( उगाळून घेऊन ) दुसऱ्याच्या देहातील ताप नाहींसा करितो. ( साध नावाचून परोपकाराचें अडत नाही. ) ●●●

## चन्द्रान्योक्ति

मन्दाक्रान्ता

पादन्यास क्षितधरगुरोर्मूर्ध्नि कृत्वा सुमेरो
क्रान्त येन क्षपिततमसा मध्यम धाम विष्णो ॥
सोऽय चन्द्र पतति गगनादल्पशेषे मयूखे
दूरारोहो भवति महतामप्यपभ्रशहेतु ॥ ७६ ॥

मन्दाक्रान्ता

मेरूच्याही-गिरिगुरु अशा-मस्तकीं पाद ठेवी,
अधारातें हरुनि विधु जो व्यापितो सर्व पृथ्वी ॥
तो हा तेज क्षयचि घडुनी ये नभातून खालीं !
थोरानाही अतिच चढणें हो अध पातकारी ॥ ७६ ॥

गद्यार्थ—सर्व गिरींचा प्रमुख अशा मेरूच्या शिरावर सुद्धां जो आपले पाद ( किरणें ) ठेवितो, जो अधाराचा नाश करून ( विष्णूनें वामनावतारात दुसऱ्या पावलनें जी व्यापली ती ) पृथ्वी जो आक्रात करतो, तो हा चद्र आता तेज क्षय लागून ( पहाटेस ) आकाशातून खालीं पडत आहे. मोठे लोक झाले म्हणून काय झाल ? त्याना सुद्धा अति उच चढणें—हें पतनालाच कारणीभूत होतें ●●●

वसततिलका

तारापते ! कुमुदिनीमनुकूलकान्ता
पादेन पीडयसि, कम्पयसि द्विजातीन् ॥
निद्वेषमाचरसि किं च वियोगिलोके
नक्तचरस्य भवतः करुणा कुत स्यात् ? ॥ ७७

वसततिलका

आशाकिता कुमुदिनी तुडवून पादें
चद्रा ! कसा सतत कापविशी द्विजातें ॥
कां द्वेष रे धरिसि तू विरहीजनास ?
दुष्टा ! दया तुज कुठून निशाचरास ? ॥ ७७ ॥

गद्यार्थ— तुझ्या आशेंत वागणाऱ्या कुमुदिनीरूपी पत्नीस का बरें पादानीं ( किरणानीं ) तुडवितोस आणि द्विजाना ( ब्राह्मणाना, दुसरा अर्थ पक्ष्याना ) ( थडीनें कुडकुडवून ) ( ब्राह्मणाकडे भयानें ) का नरें थरथर कापवितोस, आणि त्या बिचाऱ्या विरहीजनाचा द्वेष कां करतोस ? ( चक्रवाकाना विरह घडवितोस, सूर्य विकासी कमल मिटल्यानें त्यात भुगा अडकून भ्रमरीपासून तो वियुक्त होतो—आणि इतर सर्वच रीतीनें चद्र हा सर्व विरही जनाच्या विरहानलज्वाला भडकविणाराच ठरतो. ) ( पण हें सर्व बोलणेंच व्यर्थ आहे ) तू पडलास निशाचर ! ( राक्षस भूत इत्यादि ) तेव्हा तुझ्या हृदयात दया असेल अशी अपेक्षा कशी करावी ? ●●●

मालिनी

अभिलषसि यदीन्दो ! वक्त्रलक्ष्मीं मृगाक्ष्या
पुनरपि सकृदब्धौ मज्ज, सक्षालयाङ्कम् ॥
सुविमलमथ बिम्ब पारिजातस्य गन्धै
सुरभय, वद नो चेत्त्व क्व तस्या मुख क्व ? ॥ ७८

मालिनी

शशि ! तुज जर व्हावी स्त्रीमुखाची सुकाति
फिरुनि बुडुनि धु तो डाग तू सागरातीं ॥
विमल मुख करी तें पारिजातें सुवासी
न तर कुठुन होसी तुल्य तू स्त्रीमुखासी ?

किंवा

न तर मुख कुठें तें, तूहि कोठें तुलेसी ? ॥ ७८ ॥

गद्यार्थ— हे चद्रा ? तुला जर, हरिणाक्षीच्या मुखाचें सौंदर्य प्राप्त करून घेण्याची अभिलाषा असेल, तर, पुन्हा एकवार, समुद्रात बुडी मार, व आपल्या तोंडावरचा तो डाग धुऊन ये, आणि, अशा तऱ्हेन कल्मषरहित झालेलें तुझें मुख, पारिजाताच्या वासानें सुगधित कर असें जर तू न केलेंस, तर तूच सांग ( तुलना करताना ) सुदर स्त्रीचें मुख कुठे आणि तू कुठे ! ( असच कोणीहि म्हणणार नाहीं काय ! ) ●●●

वसंततिलका

मारस्य मित्रमसि किं च सुधामयूख !
शम्भावपि प्रणयिता प्रकटीकरोषि ! ॥
विश्वासपात्रमसि यद् द्विषतोस्तयोर—
प्येतच्च प्रकृतिशुद्धतनोश्चरित्रम् ॥ ७९ ॥

वसंततिलका

वा रे सुधांशु ! असुनी स्मरमित्र खास
तूं दाविशी प्रणय रे तरिही शिवास ॥
विश्वासपात्र रिपुशा उभयास एक
हें श्रेय शुद्ध तुझिया चरितास देख ॥ ७९ ॥

गद्यार्थ—हे सुधाकर चंद्रा ! एकीकडे बघावें, तों, तू मदनाचा, मित्र, आणि, दुसरीकडे पहावें तो शंकरावर प्रेम व्यक्त करतोस ! एकमेकांचें शत्रु असलेल्या, त्या दोघानाहि, तू विश्वासपात्र वाटावास, हें श्रेय, तू जात्यात अत्यंत विशुद्ध आहेस, याच गोष्टीला आहे. ( दोन्ही शत्रूंचा विश्वासपात्र फक्त शुद्धचरित्रच होऊं शकतो. ) •••

शार्दूलविक्रीडित

नक्षत्राणि बहूनि सन्ति परितः पूर्णोदयान्यम्बरे
तैः किं शान्तिमुपैति दीर्घतिमिरं, किं वार्धिरुज्जृम्भते ? ॥
किं स्यादार्तचकोरपारणविधिर्भ्रांत सुधादीधिते !
तन्नून भुवनैकतापशमनः श्लाघ्यस्तवैवोदय ॥ ८० ॥

शार्दूलविक्रीडित

नक्षत्रें जरि भोंवतीं उगवलीं संपूर्ण या अंबरीं
तेणें कां तम नष्ट होइ ? अथवा अब्धीहि येई वरी ? ॥
होती आर्तचकोर तृप्त ? जगिंच्या तापास जो नाशन—
चंद्रा ! एक तुझा नभीं उदय तो सुश्लाघ्य सर्वांहुन ॥८०॥

गद्यार्थ— संपूर्ण नक्षत्रें जरी, आकाशात समोंवार सर्वत्र उगवलीं, तरी, त्यांच्या तेजानें काय गाढ अंधाराचा नाश होणार आहे ! किंवा समुद्र उचंबळून वर येणार आहे ? किंवा आर्त चकोराची काय तृप्ति होणार आहे ? म्हणून हे चंद्रा ! जगाच्या सर्व तापास, एकटाच शमन करणारा जो तू, त्या तुझा, एकट्याचाच उदय प्रशंसनीय होय ! •••

## चन्द्रकान्तान्योक्ति

अनुष्टुभ्

सुधाकरकरस्पर्शाद् बहिर्द्रवसि सर्वत ।
चन्द्रकान्तमणे ! तेन मृदुत्वं लोकविश्रुतम् ॥ ८१ ॥

आर्या

द्रवसी बाहेरहि तूं सुधाकरकरें चहूंकडून मणे !
हे चन्द्रकान्त ! मृदुता जगप्रसिद्धचि तुझी असे तेणें ॥८१॥

गद्यार्थ— हे चंद्रकान्त मणे ! अमृतवर्षी अशा चंद्राच्याहि शीतल किरणानीं सब बाजूनीं बाहेरून सुद्धा तू द्रवतोस यामुळें तुझं मृदुत्व जगप्रसिद्ध ( व लोकविलक्षण ) ठरलें आहे. ( द्रवण्याची, विरघळण्याची, पाझरण्याची, क्रिया ही केवळ तापानें ( दु खानें ) उष्णतेनें व्हावयाची, असं आपण जगात पाहतों, पण, चंद्रकान्त हा, अत्यंत शीतल व अमृतासारख्या शामक किरणानीं द्रवतो द्रवण्याची क्रिया साधारणत अंत करणाची, असें आपण समजतों, पण चंद्रकांत सर्वबाजूनीं बाहेरूनसुद्धा द्रवतो हें मोठं वैशिष्ट्य. कै गडकरी म्हणतात तसें— " जें आनंदेंही रडतें, दु खात कसें तें होई ? " ) •••

## चम्पकान्योक्ति

आर्या

साधारणतरुबुद्ध्या न मया रचितस्तवालवालोऽपि ।
लज्जयसि मामिदानीं चम्पक भुवनाधिवासितै कुसुमै ॥८२॥

आर्या

क्षुद्र तरू समजुनि मी केलें आळेंहि चंपक ! न तुजसी !
जगभर सुरभि भरोनी आता कुसुमें मलाचि लाजविसी ॥ ८२ ॥

गद्यार्थ— हे चंपका ! कसलेंतरी साधें क्षुद्र झाड समजून मी, तुला आळेंसुद्धा केलें नाहीं पण आता तू, जगभर सुगंध भरणाऱ्या आपल्या फुलानीं मलाच अगदीं लाजवून टाकलें आहेस. ( एखाद्या थोर माणसाची थोरवी आपल्याला अज्ञात असावी व त्यामुळें आपण त्याला कुणीतरी अल्लत्यागल्लत्या समजून त्याची उपेक्षा करावी, पण पुढें त्याची खरी महती कळल्यावर आपण शरमून जावें, या घटनेस उद्देशून ) •••

वसततिलका

अन्तःप्रतप्तमरुसैकतदह्यमान—
मूलस्य चम्पकतरो : क्व विकासचिन्ता ? ॥
प्रायो भवत्यनुचितस्थितिदेशभाजा
श्रेयः स्वजीवपरिपालनमात्रमेव ॥ ८३ ॥

वसंततिलका

मूळांत आग जळत्या मरुचंपकाली
आशा कुठून कुसुमें फुलतील पेशी ? ॥
देश, स्थितीहि बहुधा प्रतिकूल ज्यातें
कर्तव्य जीवपरिपालन हेंच होतें ॥ ८३ ॥

गद्यार्थ—मारवाड देशाच्या वाळवटात लावलेल्या, आतून तापलेल्या वाळूनें ज्याची मुळं जळली जात आहेत, अशा चंपकाला, वाढून फुलें लागतील, ही आशा तरी कुठून असणार ? प्रतिकूल स्थल, व परिस्थिति ज्याला लाभली, अशाना, केवळ जीव जगविण्याची धडपड करणे हच कर्तव्य श्रेयस्कर. ( सद्गुणी माणसाला त्याचे गुण दाखविण्यास, सर्व परिस्थिति जर भयकर प्रतिकूल करून ठेवण्यात आली, तर त्यानें विचाऱ्यानें केवळ जीव जगविण्यापलीकडे काही गुणप्रभाव न दाखवावा यात त्याला काय दोष ! ) ०००

## जलान्योक्ति

शार्दूलविक्रीडित

शैत्य नाम गुणस्तवैव तदनु स्वाभाविकी स्वच्छता
किं ब्रूमः शुचिता भवन्ति यदशुचयः स्पर्शेन यस्यापरे ॥
किं वाऽतः परमुच्यते स्तुतिपद यज्जीवन देहिना
त्व चेन्नीचपथेन गच्छसि पयः कस्त्वा निरोद्धु क्षम ? ८४

शार्दूलविक्रीडित

शैत्याचा गुण एकत्या तुज; तशी
ती स्वच्छता मूळची !
वर्णूं काय पवित्रता ? अशुचिहि
स्पर्शेच होई शुचि ॥
"प्राण्यां जीवनरूप तूंच !" कुठली
मोठी स्तुती याहुनी ?
पाण्या ! तूं जर नीच मार्ग धरिसी,
रोधूं शके का कुणी ? ॥ ८४ ॥

गद्यार्थ—शीतलता हा गुण तुझ्या एकट्याचा आहे; तुला निसर्गानेंच जन्मसिद्ध स्वच्छता दिलेली आहे. तुझे पावित्र्य काय वर्णावें ? तुझ्या नुसत्या स्पर्शानें अशुद्ध वस्तु शुद्ध होतात; "तू प्राणिमात्राला जीवनरूप आहेस" याहून आणखी मोठी स्तुति ती काय असावयाची ? असे सारें असून हे पाण्या ! जर तूच ( सखल प्रदेशाकडे जाणारा ) नीच मार्ग धरिलास तर तुला कोण अडवू शकणार ? ( सर्वतोपरी वरील वर्णन लागू पडणारे थोर लोकच जेव्हा हेकटपणें नीच मार्ग धरतात तेव्हा "क ईप्सितार्थस्थिरनिश्चय मन पयश्च निम्नाभिमुख प्रतीपयेत् ?" या कालिदासोक्तीस अनुसरून त्याना त्याचे अनुयायी आळा घालू शकत नाहीत, या भयानक घटनेस उद्देशून. ) ०००

शार्दूलविक्रीडित

अब्ज त्वज्जमथाब्जभूस्तत इद ब्रह्माण्डमण्डात्पुन—
र्विश्व स्थावरजगम तदितर त्वन्मूलमित्थ पय. ! ॥
धिक् त्वा चोर इव प्रयासि निभृत निर्गत्य जालान्तरै—
र्बध्यन्ते निरशास्त्वदेकशरणास्त्वामाश्रिता जन्तवः ॥ ८५ ॥

शार्दूलविक्रीडित

पाण्या ! अब्ज तुझ्यांत, त्यांत विधि तो, ब्रह्मांड
तें त्यांतुनी
ब्रह्मांडांतुनि विश्व–सर्वचि असें जन्मे तुझ्यापासुनी ॥
धिक् ! चोरापरि तूं हळूंच सुटुनी जातोस जाळ्यांतुनी;
प्राणी–आश्रित जे तुझे–अगति ते, जाती तिथें राहुनी
( किंवा बंधनीं ) ॥ ८५ ॥

गद्यार्थ—हे पाण्या ! तुझ्यात अब्ज ( कमल; पाण्यात जन्मणारें. ) जन्म घत कमलात ब्रह्मदेवाचा जन्म झाला; ब्रह्मदेवापासून ब्रह्माण्ड जन्मले व ब्रह्माडापासून स्थावर जगम विश्व जन्माला आलें—अशा रीतीनें सारें पाहता तुझ्यातून सर्व काही जन्माला आलें. असे असता कोळी जेव्हा जाळे टाकतो तेव्हा, तू तेवढे, चोरासारखें हळूच त्या जाळ्याच्या छिद्रातून सुटून जातोस, आणि, तुझे आश्रित — एकट्या तुझ्याच आधारावर जगणारे—असे जलचर प्राणी बिचारे अगतिक होऊन, ( त्या जाळ्यात राहून गल्यानें ) पकडले जातात. धिक्कार असो तुला ! ( एखादा पुढारी पक्षस्थापना करतो. त्यातली प्रत्येक गोष्ट तोच करीत असल्यानें सर्व अनुयायी त्याला 'पिताजी' समजू लागतात. पण संकटकाळी तो पिताजी तेवढा नेमका हळूच चोरासारखा सुटून जातो, व अनन्यगतिक अनु-

यायाना तेवढा तो खुशाल पकडले जाऊ देतो. अशा घटना राजकारणात घडतातच, त्याना उद्देशून. संस्कृत कवि त्रिकालदर्शीच म्हटले पाहिजेत. )

●●●

### जिह्वान्योक्ति

अनुष्टुभ्

जिह्वे ! प्रमाण जानीहि भोजने भाषणेऽपि च।
अतिभुक्तिरतीवोक्तिः सद्यः प्राणापहारिणी ॥८६॥

अनुष्टुभ्

जिव्हे ! औचित्य तूं जाण;—जेवतां बोलतां तसें।
अतिखाणें नि अत्युक्ति प्राणघातीं क्षणीं असे ॥ ८६ ॥

गद्यार्थ— हे जिव्हे ! खाण्यात काय किंवा बोलण्यात काय औचित्याच्या मर्यादा ओळखून वागत जा. अति खाणें किंवा अति बोलणें दोन्ही त्वरित मरणात जाणेंच होत. ( अवाक्याबाहेर, हावरटपणानें, अतिरेकी उत्साहानें भलतेंच धाडस करणारास उद्देशून. अति सर्वत्र वर्जयेत्. )

●●●

### तमोऽन्योक्ति

अनुष्टुभ्

तमस्तोम भृशं सोममण्डलोपरि राजसे ।
धूमपानेन किं नाम धाम गम्यमतः परम् ? ॥ ८७ ॥

अनुष्टुभ्

चंद्रावरी तमः पुंजा ! मोठी शोभा तुझी दिसे।
धूमपानें तुला स्थान लभ्य याहुनि कायसें ? ॥ ८७ ॥

गद्यार्थ—हे तमः पुंजा ! चंद्राच्या शुभ्र बिम्बाच्या पार्श्वभूमीवर तुझी शोभा चांगलीच उठून दिसत आहे ( अंधार काळोख व ढगसुद्धा धूर खाऊन वाढतात अशी समजूत ) धूमपान करणाऱ्या ( विड्या ओढणाऱ्या ) तुला याहून उच्चतर स्थान कोठून मिळणार होतें ? ( आधींच नालायक पण चुकून माकून दैवानें मोठ्या पदावर ऐटींत मिरविणाऱ्या व चांगल्या लोकांच्या पाठिंब्यानें ( पार्श्वभूमीनें ) उठून दिसणाऱ्या हलकटाला उद्देशून. )

●●●

### ( तराजू. ) तुलान्योक्ति

आर्या

प्राप्य प्रमाणपदवीं को नामास्ते तुलेऽवलेपस्ते !
नयसि गरिष्ठमधस्तात्तदितरमुच्चैस्तरां कुरुषे ! ॥८८॥

आर्या

आलें प्रामाण्य तुले ! म्हणुनि असे गर्व केवढा तुजसी।
मोठ्यांस नेसि खालीं, क्षुद्रांना उंच उंच चढवीसी॥८८॥

गद्यार्थ— हे तुले ! तुला प्रामाण्य प्राप्त झालें ( गुरु कोण, लघु कोण हें ठरविण्याचा अधिकार मिळाला ) या कारणानें तुला केवढा गर्व ( होऊन तू आधळी झाली आहेस ) झाला आहे ! जे खरे खुरे सत्पात्र ( वजनदार, थोर ) त्याना तू खालीं नेतेस व त्याहून उलटे म्हणजे क्षुद्र, ( वजनात ) हलके असतात त्याना तू वर चढवितेस (जड वजनानें तराजूचें पारडें खालीं जातें व हलक्या वजनानें वर जातें यावर उत्प्रेक्षा) ( अपात्राला न्यायाधीशाचें पद दिलें की असा उरफाटा न्यायच मिळावयाचा, याला उद्देशून. )

●●●

आर्या

गुरुषु मिलितेषु शिरसा प्रणमसि, लघुषून्नता, समेषु समा ॥
उचितज्ञाऽपि तुले ! किं तुलयसि गुञ्जाफलैः कनकम् ? ८९

आर्या

गुरु मिळतां शिर नमविसि,
लघुशीं उन्नत, समांसि सम असती।
उचितज्ञ असुनि तुले !
तोलिसि गुंजांसवें सुवर्ण कशी ? ॥ ८९ ॥

गद्यार्थ—हे तुले ! तुला गुरु, श्रेष्ठ, ( वजनदार, जड. ) भेटला कीं तू शिर वाकवितेस ( आपलें पारडें खालीं नेतेस ) लघु, हलकट ( कमी वजनाचा ) भेटला कीं आपलें शिर उंच करतेस ( मान ताठ करतेस, स्वमान दाखवितेस; पारडें वर नेतेस ) समान भेटला ( सारख्या वजनाच्या दोन्ही वस्तु आल्या कीं ) सम वृत्ति धारण करतेस ( दोन्ही पारडीं सारख्या उचीला आणतेस, दांडी समपातळींत आणतेस. ) ( गुरु भेटला कीं, शिर नमविणें, लघुशीं स्वमान राखून राहणें व समानाशीं समवृत्तीनें, बरोबरीच्या नात्यानें वागणें ) याप्रमाणें तुझी वर्तणूक उचितज्ञ माणसाला साजेशी दिसत असताहि, (एका गोष्टीचें मात्र आश्चर्य वाटतें, कीं ) तू गुंजाबरोबर सोन्याची तुलना ( वजन ) कशी करतेस ! ( इतर सर्वत्र उचित वर्तनाचा म्हणून प्रसिद्ध असलेल्या माणसात सुद्धां, एखादी खोड असते,— एखादा चमत्कारिकपणा असतो,—एखाद्या बाबतींत त्याचें तारतम्य सुटतें, हें आपण पाहतोंच ना ? )

●●●

## ( गवत ) तृणान्योक्ति

आर्या

रुद्धस्य सिन्धुतटमनु तस्य तृणस्यापि जन्म कल्याणम् ।
यत्सलिलमज्जदाकुलजनस्य हस्तावलम्बनं भवति ॥९०॥

आर्या

उगवे नदीतटाकीं कल्याणद जन्म त्या तृणाचाही ।
जलांत तेथें कोणा बुडत्या आधारभूत जें होई ॥९०॥

गद्यार्थ—नदीच्या किनाऱ्यावर उगवलेल्या गवताचासुद्धा जन्म धेवढा लोकोपकारक, धन्य, म्हटला पाहिजे; कारण, पाण्यात बुडताना घाबऱ्या झालेल्या माणसाला आधार म्हणून हाताने धरण्यास त्याचा उपयोग होतो. (योग्य स्थळीं, अत्यंत क्षुद्र वस्तुसुद्धा केवढी कल्याणदायी होते.) (तृणाचें आणखी उपकारकत्व प्रकरण १६ श्लोक ८ पहा—तृण चाह वर मन्ये.)

●●●

आर्या

दीप्यन्ता ये दीप्त्यै घटिता मणयश्च वीरपुरुषाश्च ।
तेजः स्वविनाशाय तु भवति तृणानामिव लघूनाम् ॥९१॥

आर्या

जे घडविले झळकण्या, वीर नि रत्नें दिसोत झळकून ।
तृणसम लघुजीवांचें तेजचि टाकी स्वतांस मारून ९१

गद्यार्थ—ब्रह्मदेवानें झळकण्यासाठींच योजना करून ज्यांना जन्म दिलेला आहे, अशीं रत्नें व वीरपुरुष झळकत राहोत. (त्याचें झळकणें त्यांना शोभून दिसतें व पचून जातें कारण ते 'थोर' आहेत.) पण गवतासारख्या गरीब बिचाऱ्या प्राण्यांना त्याचें तेजच (गवत तुकतुकीत, तजेलदार हिरवेंचार असलें, कीं, गुरें प्रथम त्याला खाणार, व कापणारे प्रथम त्यालाच कापून विकणार.) त्याच्या स्वताच्या विनाशाला कारणीभूत होतें. (थोरानीं जें केलें तेंच गरीब क्षुद्रानीं करून चालणार नाही, त्याना तें घातक होतें. राजेसरदाराच्या स्त्रिया जेथें खुशाल मिरवीत, तेथें गरीबाची सुंदर स्त्री सुरक्षित नसे, असा बोभाटा कित्येक संस्थानी राज्याविषयीं आपण ऐकत नव्हतों काय?)

●●●

## (तेली) तैलिकान्योक्ति

उपजाति

अमी तिलास्तैलिक ! नूनमेतां स्नेहादवस्थां भवतोपनीताः ।
द्वेष्योऽभविष्यद्यदमीषु नूनं तदा न जाने किमिवाकरिष्यत् ?
॥ ९२ ॥

इन्द्रवज्रा

तेल्या ! अरे तूं वध या तिलांसी
स्नेहामुळें काय दशेस नेसी ॥
द्वेष्टा जरी तूं असतास त्यांतें
ठावें कुणा, जें करतास तूं तें ? ॥ ९२ ॥

गद्यार्थ— (स्नेह शद्वावर कोटि; एक अर्थ तेल; दुसरा मैत्री. स्नेहात् म्हणजे एक अर्थ तेल मिळविण्यासाठीं; दुसरा अर्थ मैत्रीपायीं.) हे तेल्या ! अरे स्नेहापायीं तू या तिलाची काय दशा करून टाकली आहेस (तेल पिळून पेंडेसारखें निस्सत्त्व केलें आहेस) तें पहा तर खरें; आणि हें सर्व स्नेहाच्या नांवानें ! आणि तू त्याचा 'स्नेहाभिलाषी' असण्याऐवजीं, खरेंच, द्वेष्टा असतास तर काय केलें असतेंस कोण जाणे ! (वरील श्लोकात कोटि योजून विचित्रार्थ काढला असला तरी प्रत्यक्षात, स्नेहीच आपला घात करतात (स्नेहबुद्धीनेंच)—अशा विचित्र अनुभव केव्हा केव्हा येतो, व इंग्रजींत म्हटल्याप्रमाणें God ! Save me from my friends ! देवा ! माझ्या स्नेह्यापासून माझें रक्षण कर असें म्हणण्याची पाळी येतेच ना !)

●●●

## दुग्धान्योक्ति

आर्या

को हि तुलामधिरोहति शुचिना दुग्धेन सहजमधुरेण ?।
तप्तं विकृतं मथितं तथाऽपि यत्स्नेहमुद्गिरति ! ॥ ९३ ॥

आर्या

शुचि मधुर त्या दुधाच्या अल्पहि तुलनेस कोण उतरेल?
त्या तापवा, नि विरजा, घुसळा, तें स्नेह मात्र देईल !
॥ ९३ ॥

गद्यार्थ— (स्नेह शद्वावर कोटि; दुधाकडे अर्थ लोणी, इतरत्र मैत्री) पवित्र, शुभ्र, निर्मल, आणि निसर्गतः मधुर अशा दुधाची तुलना दुसऱ्या कोणत्या वस्तूनें होणार आहे ? त्याला ताप द्या (तापवा किंवा छळ करा.) विकृत करा (बिघाड करा;-ताक घालून विरजा.) किंवा घुसळा (त्रास द्या) तरी तें स्नेहच (लोणी घृत; मैत्री) प्रकट करणार ! (खरे मित्र असेच असतात. ते तप्त, विकृत मथित केले, तरी, स्नेहात अंतर पडू देत नाहींत.)

(दूध हें आदर्श मित्र या विषयीं अत्यंत सुंदर रूपक असलेला श्लोक २ प्रकरण २१ मध्यें पाहा "क्षीरेणात्मगतोदकाय" हा भर्तृहरीचा श्लोक.)

●●●

## ( धोतऱ्याचें फूल ) धत्तूरान्योक्ति

वसंततिलका

धत्तूर ! धूर्त ! तरुणेन्दुविलासयोग्ये
स्थाने पिनाकपतिना विनिवेशितोऽपि ॥
किं कैरवाणि विकसन्ति ? तम प्रयाति ?
चन्द्रोपलो द्रवति ? वार्धिरुपैति वृद्धिम् ? ॥ ९४ ॥

वसंततिलका

**चंद्रास योग्य असल्या स्थळिं धत्तुऱ्या रे**
**तूतें शिवें निजशिरीं जरि ठेविलें रे ॥**
**कां कैरवें विकसती ? तम काय लुप्त ?**
**वाढे समुद्र ? द्रवतो कधिं चंद्रकांत ? ॥ ९४ ॥**

*गद्यार्थ*—हे धोतऱ्याच्या फुला ! ( हीं फुलें शिवाला प्रिय असतात म्हणे ! ) (ज्या जागीं चंद्रकोरेला बसवावयाचें अशा स्थळीं म्हणजे स्वतःच्या मस्तकावर शंकरानें तुला धारण केलें तरी ( तेवढ्यानें तुला चंद्राची थोडीच सर येणार आहे ? ) काय ( तुझ्या प्रभावानें ) कुमुदें ( चंद्रविकासी कमलें ) उमलणार आहेत ? काय अंधार पळून जाणार आहे ? काय चंद्रकांत मण्याला पाझर फुटणार आहे ? काय समुद्राला भरती येणार आहे ? ( चुकून दैवयोगें कोणी एखादा, मोठ्या पदावर आरूढ झाला, तरी त्याच्या जागेवर तो बसला त्याचा प्रभाव तो कुठून दाखवणार ? ) ०००

## धन्वन्तरि ( नमन )

स्रग्धरा

शङ्खं चक्रं जलौकं दधतममृतघटं चारुदोर्भिश्चतुर्भिः
सूक्ष्मस्वच्छातिहृद्यांशुकपरिविलसत्स्कन्धमम्भोजनेत्रम् ॥
कालाम्भोदोज्ज्वलाङ्गं कटितटविलसच्चारुपीताम्बराढ्यं
वन्दे धन्वन्तरिं तं निखिलगदवनप्रौढदावाग्निलीलम् ॥९५॥

स्रग्धरा

**शंखा, चक्रा, जळूला अमृतघट धरी चार हातीं पवित्र**
**घेई जो रेशमाचें सुविमलवसन स्कंधिं; जो पद्मनेत्र ॥**
**तेजानें कालमेघासम; कटिस धरी चारु पीतांबरास**
**वन्दू धन्वंतरी तो अनलसमचि जो रोगरूपी वनास ॥९५॥**

*गद्यार्थ*—आपल्या चार सुंदर हस्तामध्यें जो शंख, चक्र, जळू व अमृतघट धारण करतो, अगदीं तलम, स्वच्छ, मोहक असें रेशमी वस्त्र जो आपल्या स्कंधावर ठेवितो, ज्याचे नेत्र कमलाप्रमाणें कोमल व सुंदर आहेत, ज्याची अंगकांति कालमेघाप्रमाणें रसरशीत आहे, व ज्याच्या कटीसभोंती सुंदर पीतांबर आहे, व अखिल रोगांच्या वनास जो दावानलासारखा आहे, *अशा त्या धन्वन्तरीस मी वंदन करतों.* ०००

## धूमान्योक्ति

पुष्पिताग्रा

सहजमलिनवक्रभावभाजां भवति भवः प्रभवात्मनाशहेतुः ।
जलधरपदवीमवाप्य धूमो ज्वलनविनाशमनुप्रयाति नाशम् ॥ ९६ ॥

वसंततिलका

**जे जन्मतां मलिन, वक्रचि, जन्म त्यांचा**
**आणी पित्यासहचि आत्मविनाश साचा ॥**
**जो धूम, मेघ बनतां, वधितो पित्यास**
**( अग्नीस; ) आणि वधितो मग तो स्वतांस ॥९६॥**

*गद्यार्थ*— जे जन्मतःच मलिन व वक्र, ( पापी आणि वाकड्या चालीचे हा अर्थ माणसाकडे; कोळशाच्या काळ्या कणानीं युक्त व वाकडा, गोल, गिरक्या घेणारा हा अर्थ धुराकडे ) त्यांचा जन्म, त्यांच्या स्वतःच्या जनकाच्या व स्वतःच्याहि नाशाला कारणीभूत होतो. उदाहरण धुराचें. हा जन्मतांच मेघरूप होतो. ( दग हा प्रामुख्यानें पाण्याच्या वाफेचा असतो. असलाच तर अत्यंत सूक्ष्मांश त्यात धुराच्या कणाचा असेल. पण रंग सादृश्यानें बहुधा पूर्वी दग हा धन्याच अंशीं धूमापासून होतो अशी संस्कृत कवींची कल्पना होती असें दिसते— "धूमज्योतिः सलिलमरुतां संनिपातः मेघः" कालिदास. ) आणि आपला पिता जो अग्नि, त्याला, मेघ, जलवृष्टीनें ठार मारतो व मग लगेच स्वतःहि मरून जातो. ०००

## धूलिकान्योक्ति

शार्दूलविक्रीडित

ये जात्या लघवः सदैव गणनां याता न ये कुत्रचित्
पद्भ्यामेव विमर्दिताः प्रतिदिनं भूमौ निलीनाश्चिरम् ॥
उत्क्षिप्ताश्चपलाशयेन मरुता पश्यान्तरिक्षे सखे
तुङ्गानामुपरि स्थितिं क्षितिभृतां कुर्वन्त्यमी पांसवः ॥९७॥

शार्दूलविक्रीडित

**जन्मानें लघु; अल्पही न गणना केव्हां जयांची कुठें**
**पायीं ज्या तुडवीत सर्व, नित, जे आलिंगिती भूमितें**
**धूळीचे कण, मूर्ख वायु उडवी जे अंतरिक्षांतरी**
**डौलानें वसती पहा गिरिचिया उत्तुंग शृंगांवरी ॥९७॥**

गद्यार्थ— जे जन्मतः लहान, क्षुद्र, ज्यांची गणनाच (सख्यामापन किंवा महत्त्वमापन) कधीं कोठें झालेली नाहीं— म्हणजे ज्यांची सख्याच कोणी मोजलेली नाहीं किंवा जे कुणाच्या खिजगणतींत नाहींत, जे रोज सर्वांकडून पायाखालीं तुडविले जातात व जे नित्य भूमीलाच बिलगून असतात ते धूळीचे कण, मूर्ख अविचारी वायूनें आकाशात उधळले गेल्याने पहा, आता उंच डोंगराच्या शिखरावर कसे डौलानें आरूढ झाले आहेत. ( राजकारणात, एखाद्या पक्षाच्या क्षणिक लोकप्रियतेच्या वावटळीनें, असेच कितीतरी क्षुद्र, अगण्य, पायी तुडविण्याच्या पात्रतेचे, मुर्दाबर सरपटणारे धूळीचे कण अचानकपणें एकदम मंत्रीपदाच्या गिरिशिखरावर आरूढ झालेले दिसतात हें सर्व काळ लोकाना विदितच आहे. ) ०००

( प्रथमखंडातील प्रकरण १४ मध्य श्लोक २ रा " पादाहत समुत्थाय " हादि धूलिकान्योक्तिसारखाच आहे. )

## ( नदी ) सरितान्योक्ति

आर्या

कतिपयदिनसस्थायी पूरो दूरोन्नतोऽपि भविता ते ।
**तटिनि ! तटद्रुमपातनपातकमेकं चिरस्थायि ॥९८॥**

आर्या

**अल्पचि टिकणारा हा महापूर झणिं निघून जाईल ।**
**सरिते! पीडिशि तटतरु, टिकुनी हें पाप मात्र राहील ९८**

गद्यार्थ—हे नदि ! आज कितीहि प्रचड महापूर तुला आलेला असला, तरी तो फार थोड्या दिवसाचा सोबती आहे. तो लौकरच निघून जाईल. पण त्याच्या सगतीनें तू बेफाट होऊन, तुझे चिरमित्र जे तटतरु त्याना तू उपटून टाकलेंस हें पाप मात्र तुला चिरकालाचें चिकटून राहणार आहे (याचा विचार कर ) ( लोकप्रियतेच्या महापुराच्या लाटेवर बसून मदान्धपणें धुमाकूळ घालून अत्याचार करणारे, जगभर इतिहासभर दिसतात,—तो पूर निघून जातो व त्यानीं केलेली मित्रहत्या तेवढी मागे राहते. ) ०००

उपजाति

छाया प्रकुर्वन्ति नमन्ति पुष्पैः फलानि यच्छन्ति तटद्रुमा ये ।
उन्मूल्य तानेव नदी प्रयाति तरङ्गिणा किं प्रतिपन्नमस्ति ? ॥ ९९ ॥

उपजाति

**छाया धरोनी, नमुनी फुलांनीं**
**पूजी तटींचा तरु जो फलांनीं ॥**
**जाई नदी ही उपटून त्यास**
**स्थिरता न मैत्री ' लहरी ' जनांस ॥ ९९ ॥**

गद्यार्थ—तटावरील जीं झाड नदीवर सावली धरतात, फुलें देऊन जणू नमन करतात, फळें देऊन जणू पूजा करतात त्याच झाडाना नदी समूळ उपटून निघून जाते. ' तरङ्गी ' म्हणजे ' लहरी ' म्हणजेच चचल ( नदीमध्यें तरग म्हणजे लाटा असतात ) माणसाची मैत्री स्थिर कुठे राहिली आहे ? ( रूपक वरील प्रमाणेंच तरङ्गी शब्दावर कोटि ) ०००

आर्या

तटिनि ! चिराय विचारय विन्ध्यभुवस्तव सदापवित्राया ।
शुष्यन्त्या अपि युक्तं किं खलु रथ्योदकादानम् ? ॥१००॥

आर्या

**विंध्यपित्याचा हे नदि ! विचार कर; तूं पवित्र नित्य जरी**
**घेणें गटारगंगा युक्त दिसे का सुकून जाशि तरी ? १००**

गद्यार्थ—हे नदी ! ज्या विंध्य पर्वतात तू उगम पावलीस त्या तुझ्या [ पित्याच्या उच ] भूमीचा विचार कर. तू सदा पवित्र आहेस (हें खरें आहे. आणि त्यामुळेंच विचारावें लागतें कीं) आतां तू सुकून जाण्याचा प्रसग आला तरी ( पाणी वाहतें राहण्याकरितां ) तू आपल्यात गटारगगा मिळवून घेणें युक्त दिसेल का ? ( जात्यंतीन धर्मातीत निर्मळ राष्ट्रीयत्व हें ब्रीद सागणाऱ्या पक्षानीं, या नदीप्रमाणेंच ' वाहते राहण्याकरिता, ' मुस्लीम लीगच्या जातीय गटारगगेचा समावेश आपल्यांत करून घेतल्याचे प्रसग लज्जेचे आहेत ! ) ०००

## (नागवेल) नागवल्ल्यन्योक्ति

वसंततिलका

किं वीरुधा भुवि न सन्ति सहस्रशोऽन्या
यासां दलानि न परोपकृतिं भजन्ते ॥
एकैव वल्लिषु विराजति नागवल्ली
या नागरीवदनचन्द्रमलङ्करोति ॥ १०१ ॥

वसंततिलका

वेली न कां किति सहस्रचि या जगांत
ज्यांचीं दळें न च परोपकृती करीत ॥
वेलींत एक परि शोभत नागवेल
जी सुंदरीवदनचंद्रहि शोभवील ॥ १०१ ॥

गद्यार्थ— ज्यांचीं पानें कोणावर मधीं उपकार करीत नाहींत, अशा अन्य वेली जगात सहस्रों नाहींत काय ! पण वेलींत एक काय ती नागवेलच खरोखरच शोभते; जिचीं पाने (तांबूल रंगानें) सुंदर स्त्रीच्या वदनचंद्राला सुद्धा भूषवितात ! ●●●

## पंखान्योक्ति

वसंततिलका

उत्तुङ्गशैलशिखरस्थितपादपस्य
काकोऽपि पक्वफलमालभते सपक्षः ॥
सिंहो बली गजविदारणदारुणोऽपि
सीदत्यहो तरुतले खलु पक्षहीनः ॥ १०२ ॥

वसंततिलका

उच्चाद्रिशृंगतरुचें फल पक्व खातो
पंखामुळेंच सहजीं वय काकही तो ॥
मारी गजा, हरि असा बलवान् असून
लोळे तरुतळिंच पंख नसे म्हणून ॥ १०२ ॥

गद्यार्थ— उंच डोंगराच्या शिखरावरील झाडाचींसुद्धा पक्व फळें य कश्चित् कावळा खाऊ शकतो, कारण केवळ त्याला पंख आहेत म्हणून. याच्या उलट, हत्तीला फाडून टाकण्याइतकी भयंकर शक्ति ज्याला आहे असा सिंह झाडाच्या मुळाशीं लोळत पडतो, कारण केवळ त्याला पंख नाहीं म्हणून ! ( हें सर्वांतलें वैषम्य सर्वत्रच आहे. साधन, केव्हां केव्हां अगदीं क्षुद्र वाटतें पण त्यायोगान घडणाऱ्या कृतींमध्यें फार मोठें अंतर पडतें, तें पंखाच्या दृष्टान्तानें दर्शविलें आहे. ) ●●●

## पद्मान्योक्ति

शार्दूलविक्रीडित

( मागें कमलान्योक्ति पहा. )

पौलोमीपतिकानने विलसता गीर्वाणभूमीरुहा
येनाघ्रातसमुज्झितानि कुसुमान्याजघ्रिरे निर्जरैः ॥
तस्मिन्नद्य मधुव्रते विधिवशान्माध्वीकमाकाङ्क्षति
त्वं चेदञ्चसि लोभमम्बुज तदा किं त्वां प्रति ब्रूमहे ? १०३

शार्दूलविक्रीडित

इंद्राच्या वनिं देववृक्ष फुलुनी, त्यां जीं फुलें लागलीं,
ज्यानें हुंगुनि टाकितांहि परि तीं देवादिकीं हुंगिलीं ॥
तो भुंगा, मधु आज, दुर्गतिमुळें तूतेंच याचीतसे,
पद्मा तूं जर येथ लोभ धरिशी–मी काय बोलूं कसें ? १०३

गद्यार्थ— हे पद्मा ! इंद्राच्या उपवनात देववृक्ष फुलून त्यांना जीं फुलें लागलीं, तीं ज्यानें हुंगून टाकल्यावर देवानासुद्धा हुंगण्यास पात्र वाटलीं असा ( थोर योग्यतेचा ) हा भ्रमर, आज, केवळ त्याला वाईट दिवस आले म्हणून तुझ्यापाशीं मधाची याचना करण्यास आलेला असता, तू जर लोभ धरून ( गाय पान्हा चोरते तसा ) याला मध घेऊ दिला नाहींस तर आता तुझ्या ( वेडेपणा ) पुढें मी तरी काय बोलावें ! ( ज्याची थोरवी आपल्यास माहीत नाहीं असा अतिथि किंवा याचक आपल्याकडे येतो तेव्हा आपल्याकडून अज्ञानानें त्याचा अपमान होण्याचा संभव असतो त्या घटनेस उद्देशून. ) ●●●

## (पळस) पलाशान्योक्ति

वसंततिलका

मा गर्वमुद्वह विमूढपलाशपुष्प !
यत्षट्पदः श्रयति मामतिगन्धलुब्धः ।
रे मालतीविरहतो ज्वलदग्निरूप
त्वां मृत्युकारणमवेत्य समाश्रितोऽसि ॥ १०३ अ ॥

आर्या

होवो पळसफुला ! तुज मूर्खा गर्व न असाच चित्ताला
कीं गंधलुब्ध षट्पद आश्रय घेण्यास मजकडे आला ॥
त्या मालतीविरह रे घडतां, देण्यास जीव साधन तो
बघतां, अग्निच तुजला समजुनि तो त्यामधें
उडी घेतो ॥ १०३ अ ॥

गद्यार्थ—हे मूर्खा पळसफुला ! "गंधलुब्ध होऊन हा भुंगा माझ्या आश्रयास आला आहे" असा गर्व तूं वाहूं नकोस. (खरी गोष्ट अशी आहे, कीं, ) त्याला मालतीपुष्पाचा विरह घडताच, तो जीव देण्यास निघाला असतां, तुझ्या लाल रंगाला, जीव देण्याचें साधन विस्तवच समजून तो (आत्महत्येसाठीं) तुझ्या आश्रयास आला आहे. (मूर्ख लोक, कित्येक मोठ्या गोष्टींचें श्रेय स्वतःकडे घेऊं पाहतात त्यांना उद्देशून. ) ●●●

## पारिजातान्योक्ति

अनुष्टुभ्

पारिजाततरुं यावन्न लभेत मधुव्रतः ।
भ्रमणं तावदेवास्य कुञ्जे कुञ्जे तरौ तरौ ॥१०४॥

आर्या

जोंवरि न भ्रमराला कुठेंतरी पारिजात ये दिसुन ।
वृक्षोवृक्षीं कुंजोकुंजीं याचें सरेल न भ्रमण ॥ १०४ ॥

गद्यार्थ—जोंपर्यंत भ्रमराला कुठेंतरी एखादा पारिजात दृष्टीस पडत नाहीं तोंवर त्याचें झाडाझाडांतून कुंजांकुंजांतून फिरणें काहीं संपणार नाहीं. (प्रेमवेड्याचें वर्णन. प्रियप्राप्ति होईपर्यंत त्याचें झाडाझाडांतून, कुंजाकुंजांतून चकरा मारणें चालूच रहायचें.) ●●●

आर्या

परिमलसुरभितनभसो बहव कनकाद्रिपरिसरे तरव ।
तदपि सुराणा चेतसि निवासितमेव पारिजातेन ॥१०५॥

आर्या

सुरभि नभा करणारे, मेरुपरिसरीं असून वृक्ष किती ।
तरु पारिजात एकचि परि वसला घर करून सुरचित्तीं

गद्यार्थ—आकाशाला सुगंधित करून सोडणारे, असे किती तरी वृक्ष, मेरु पर्वताच्या समोवार आहेत. परंतु देवांच्या हृदयात, एका पारिजातानेंच काय ते अढळ स्थान प्राप्त करून घेतलें आहे. (प्रेम हें कोणाचें कोणावर का बसावें याला कारणें देता येत नाहींत. आन्तर:कोऽपि हेतुः किंवा भिन्नरुचिर्हि लोकः! असे कांहींतरी म्हणावें. ) ●●●

## पुष्पान्योक्ति

वसंततिलका

रे पुष्प ! सुंदर ! मनोहर ! चारुवर्ण !
त्वं शोभसे स्वपदभूषण सम्प्रतीह ।।
कालेन किन्तु कियता किल ते दलानि
हा कोमलानि विगलन्ति पुरा धरण्याम् ॥ १०६ ॥

म्लानिं व्रजन्तु सकलान्यथ ते दलानि
वर्णो विनश्यतु तनुर्विलयं प्रयातु ।।
लोकंपृणः परिमलस्तु तवास्ति कोऽपि
येनैव जन्म सफलीक्रियते तवेह ।। १०७ ।।

त्वद्वद्वयोऽभिनवमस्तु विलोभनीयं
रूपं च नाम रमणीयतर नराणाम् ।।
हा ! हन्त ! कालवशतोऽखिलमेति नाश
त्वत्सौरभेण सदृश यश एव शेषम् ।। १०८ ।।

वसंततिलका

हे पुष्प सुंदर ! मनोहर ! चारुवर्णे !
स्वस्थान आज असशी जरि भूषवून ॥
हा ! पाकळ्या मृदु तुझ्या किति काळमानें
जाणें गळून धरणीवर कोण जाणे ॥ १०६ ॥

जावोत हीं तव दलें सगळीं सुकोनी
जावोच रंग विटुनी, तनु ही मरोनी ॥
हा एक गंधचि तुझा सुखवो जगास
तेणेंच ये सफलता तव जीवनास ॥ १०७ ॥

तारुण्य त्वत्समचि मोहक होइ साचें
त्याहून रूप रमणीय असो नराचें ॥
कालान्तरें सकल हें जरि नष्ट होई
कीर्तीच एक तव गंधसमान राही ॥ १०८ ॥

गद्यार्थ— (या तीन श्लोकांच्या पुष्पान्योक्तींत कै. गु. म. पा. ओक यांनीं पुष्पाच्या दृष्टांतानें, फुलाचें सर्व गेलं तरी सुगंध मागें राहतो त्याप्रमाणेंच माणसाचें, इतर सर्व नष्ट झालें तरी कीर्ति मागें राहते हें दर्शविलें आहे. ) हे सुंदर, मनोहर व सुरेखरंगाच्या पुष्पा ! तू आज झाडावर किंवा वेलीवर ज्या स्थानीं आहेस त्या स्थानाला भूषवीत आहेस, हें खरें;— परंतु हाय ! हाय ! ह्या कोमल पाकळ्या किती अल्प काळांतच जमिनीवर गळून पडणार आहेत कोण जाणे. तुझ्या पाकळ्या सर्व कोमेजून जावोत, रंग विटून जावो, किंवा, सर्व तुझा देहच नाश पावो. पण तुझा हा एक अवर्णनीय गंध जो आहे, तो जगाला संतुष्ट करीत राहो; म्हणजे, तेवढ्यानें तुझ्या जन्माचें सार्थक होणार आहे.

मनुष्याचेंहि असेच आहे. तुझ्यासारखेंच त्याचेंहि, विलोभनीय असें यौवन, किंवा त्याहून रमणीय असें रूप, हें सर्व काळवशात् नष्ट होतें; परंतु तुझ्या सुगंधाप्रमाणें त्याची कीर्ति तेवढीच शिल्लक राहते. ●●●

## पुस्तकान्योक्ति

अनुष्टुम्

तैलाद्रक्षेज्जलाद्रक्षेद्रक्षेच्छिथिलबन्धनात् ।
मूर्खहस्ते न दातव्यमेव वदति पुस्तकम् ॥ १०९ ॥

आर्या

" जल, तैल, सैल बधन, यांपासुनि मज सदैव रक्षावें । "
वदतें पुस्तक सुजना, " मूर्खकरीं मज कधीं न तूं द्यावें "
॥ १०९ ॥

गद्यार्थ— पुस्तक हें मनुष्याला म्हणत असतें, कीं, " माझ्या तू तेलाचे डाग पडण्यापासून, पाण्यानें भिजलें जाण्यापासून, आणि माझी बांधणी खिळखिळी, सैल होईल असे धसक् फसक् वापरण्यापासून माझें रक्षण कर. आणि शेवटीं पण सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही कीं, मला मूर्खाच्या हातीं जाऊं देऊं नकोस."

●●●

शार्दूलविक्रीडित

संपाल्य सदपत्यवत्परकराद्रक्ष्य च सुक्षेत्रवत्
संशोध्य व्रणिनोऽङ्गवत् प्रतिदिनं वीक्ष्य च सन्मित्रवत् ॥
वध्य बन्धवदक्षय च हि, न विस्मर्यं हरेर्नामवत्—
नैव सीदति पुस्तकं किल कदाऽप्येतद्गुरूणां वच ॥११०॥

सुमंदारमाला

परापासुनी रक्ष सुक्षेत्र जैसें,
तया पाळणें तूं सुपुत्रापरी
व्रणाचे परी त्या सदा शुद्ध ठेवी,
पहा प्रत्यहीं त्या सुमित्रापरी ॥
तया बन्धनाचे परी घट्ट बांधी,
नको विस्मरूं ईशनामासम
अशानें कधीं पुस्तकातें न बाधा,
गुरूंचा असे बोध हा उत्तम ॥ ११० ॥

गद्यार्थ— " चांगल्या मुलाचें करतोस, तितक्या मायेनें व काळजीनें पुस्तकाचें तूं संगोपन कर, चांगल्या शेताचें करतोस तितक्या दक्षतेनें त्याचें परक्याच्या हातापासून रक्षण कर. एखादी जखम जितकी स्वच्छ ठेवतोस तितकें पुस्तकहि निर्मळ ठेव, सन्मित्राला जसा प्रत्यहीं एकदा तरी पहातोस ( भेटतोस ) तद्वतच पुस्तकावरून रोज एकदातरी नजर फिरवीत जा. बेड्या घट्ट बांधाव्या तितकी पुस्तकाची घट्ट बांधणी आहे–सैल नाहीं याची रोज खात्री करून घे; आणि ईश्वराचें नाम हें ज्याप्रमाणें कधींहि विसरायचें नसतें तसेंच पुस्तकाचेंहि कधीं विस्मरण घडूं देऊं नकोस...अशा तऱ्हेनें वागलें असता पुस्तकाला बाधा पोंचत नाहीं–" हा गुरूचा उपदेश आहे

●●●

## बकान्योक्ति

वंशस्थ

न कोकिलानामिव मञ्जु गुञ्जितं
न लब्धलास्यानि गतानि हंसवत् ॥
न बर्हिणानामिव चित्रपक्षिता
गुणस्तथाऽप्यस्ति बके बकव्रतम् ॥ १११ ॥

वंशस्थ

न कोकिलांचेसम गोड कूजन
लालित्य हंसापरि तें गतींत न ॥
मोरापरी पक्ष जरी न चित्रित
मोठा बकाचा गुण (!) हो बकव्रत ॥१११॥

गद्यार्थ— ( वक्रोक्ति ) बगळ्याला कोकिळासारखें मंजुल कूजन करता येत नाहीं, हंसाप्रमाणें त्याच्या गतीला लालित्य लाभलेलें नाहीं, किंवा मोराप्रमाणें त्याचीं पिसें चित्रविचित्र रंगानीं भूषित नाहींत पण (हें सर्व नसलें म्हणून काय झालें ! बगळा काहीं अगदीं निर्गुण आहे असें समजूं नका !) बकध्यान ( लावून विश्वास दाखवून जलचराना गट्ट करणें ) हा मोठा गुण त्याच्यापाशीं आहेच कीं !

●●●

वसंततिलका

हंस प्रयाति शनकैर्यदि, यातु तस्य
नैसर्गिकी गतिरियं न हि तत्र चित्रम् ॥
गत्या तया जिगमिषुर्बक एव मूढ-
श्चेलो दुनोति सकलस्य जनस्य नूनम् ॥ ११२ ॥

वसंततिलका

चालेच हंस हळुं तें न विचित्र वाटे
नैसर्गिकीच गति ती असते तयाते ॥
आणूं बघे गति तशी बक मूर्खची तो
साऱ्या पहा जनमना दुखवून जातो ॥ ११२ ॥

गद्यार्थ— हंस हा सुंदर मंद गतीनें जर चालत असेल तर तर चालो, त्याची ती निसर्गदत्त गति असल्यानें, तें कांहीं विचित्र वाटत नाहीं. परंतु एखादा मूर्ख बगळा जेव्हा का त्याच्या गतीची नक्कल करूं बघतो, तेव्हा सर्व जनांच्या हृदयाला, तें दृश्य बोंचल्याशिवाय रहात नाहीं. (यत्किंचित् पात्रता नसलेल्यानें थोरामोठ्यांचा भाव आणणें हें असेंच पीडक वाटतें ) ●●●

अनुष्टुभ्

राम: —" पश्य लक्ष्मण ! पम्पायां बकः परमधार्मिकः ।
शनैर्मुञ्चति पादाग्रं प्राणिनां वधशङ्कया"११२
मत्स्य —" सहवासी विजानाति सहवासिविचेष्टितम् ।
बकः किं वर्ण्यते राम ! येनाहं निष्कुलीकृतः."॥

इंद्रवज्रा

राम—"पंपेंत हे लक्ष्मण ! घे बघून !
धर्मिष्ठ मोठा बक ये दिसून ॥
प्राणी कुणीही न मरो म्हणून
चौड्यावरी चालतसे जपून" ॥११३॥
मासा उत्तर देतो—"शेजारच्याला दिसतात खास ।
शेजारच्याचे लपलेहि दोष ॥
निर्वंश केलें मज ज्या बकानें
तो स्तुत्य रामा ! तुजला कशानें

गद्यार्थ— ( रामायणातला प्रसंग. पंपा सरोवरात जपून पावलें टाकीत चाललेला बगळा पाहून, निष्पाप, सरळबुद्धीच्या रामाला तो मोठा धार्मिक अहिंसावादी वाटला. मत्स्यानें त्याचा भ्रमनिरास केला—) राम म्हणतो—"लक्ष्मणा ! हा बघ पंपा सरोवरात, एक परमधार्मिक बगळा कोणी, जलचर चिरडून मरू नये, म्हणून, मोठा जपून, हळूच, चौड्यावर चालत आहे." मत्स्य त्याला उत्तर देतो—"शेजारच्यालाच शेजाऱ्याचें चरित्र व चारित्र्य नीट कळतें. रामा ! अरे, ज्यानें माझें सर्व कुळ खाऊन फस्त केलें, तो बगळा तुला वर्णनीय वाटावा ?" ( शुभ्र वस्त्रधारी, परमधार्मिक, अहिंसाव्रताचें सोंग आणून, जपून पावलें टाकीत, लोकांना विश्वास दाखवीत, त्यांचा कसा नि पात करतात, हें सुपरिचितच आहे. ) ●●●

वसंततिलका

उत्कन्धरो विततनिर्मलचारपक्षो
हंसोऽयमत्र नभसीति जनैः प्रतीतः ।
गृह्णाति पल्वलजलाच्छफरीं यदाऽसौ
ज्ञातस्तदा खलु बकोऽयमितीह लोके ॥ ११५॥

वसंततिलका

फैलावुनी विमल पंख, उडे नभांत
तैं त्यास हंस जन हा समजे मनांत ॥
मासे जधीं, रपुनि, हा डबक्यांत खाई
खात्री पटे झणि तदा बक मात्र हा, ही ॥११५॥

गद्यार्थ— बगळा जेव्हा खादे उचलून, स्वच्छ पांढरे पंख फैलावीत आकाशात उडतो, तेव्हा, जगाला वाटतें, तो हंसच आहे. पण जेव्हा का तो ( घाणेरड्या ) डबक्यातून ( चोचीनें ) मासे उचलतो, तेव्हां मात्र, हा बगळा याची जगाला खात्री पटते. ( हंस हा मोत्याचा, कमलतंतूचा चारा खातो. ) ●●●

शार्दूलविक्रीडित

" कस्त्वं लोहितलोचनास्यचरणो ? " " हंस " " कुतो ? "
" मानसात् "
" किं तत्रास्ति ? " "सुवर्णपङ्कजवनान्यम्भः सुधासन्निभम्।
रत्नानां निचयाः प्रवाललतिका वैदूर्यरोहि क्वचित्"
" शम्बूका न हि सन्ति ? " " नेति " च बकैराकर्ण्य
ही ही कृतम् ॥ ११६ ॥

सुमंदारमाला

" मुखीं, लाल, नेत्रीं पदीं कोण तूं ? " " हंस, "
" कोठून तूं ? " " मानसापासुनी ! "
" असे काय तेथें ? " " वनीं स्वर्णपद्में,
तसें गोड पाणी सुधेच्यापरी ॥
तिथें रत्नराशी नि वेली प्रवाळी—
नि वैदूर्य ! " " नाहीं तिथें शंबुक ? "
" नसे " ऐकुनी तुच्छतेनेंच " ही ही "
करोनी तदा हासले ते बक ! ॥ ११६ ॥

गद्यार्थ—( मानससरोवरापासून एक हंस, बगळ्यांच्या समुदायात येऊन दाखल झाला. त्यावेळीं बगळ्यांची व त्याची झालेली प्रश्नोत्तरें— ) बगळे विचारतात—" डोळे, तोंड व पाय लाल असलेले कोण हो तुम्ही पाव्हणे ? " हंस उत्तरतो, " मी हंस ! " बगळे विचारतात, " आलात कुठून ? " हंस सांगतो—" मानससरोवरापासून ! " बगळे विचारतात, " तिथें काय आहे ? " हंस सांगतो—" तिथें सुवर्णकमळांचीं वनें, अमृतासारखें मधुर पाणी, रत्नांच्या राशी, पोंवळ्याचे वेल, व क्वचित् वैदूर्यरत्नांचीं झाडं सुद्धां . ! " बगळे विचारतात,

(या सर्व लावलाव गप्पा नकोत.) तिथें शंबूक (गोगलगायी-सारखा आंत किडा असलेले शंख, शिंपले,) नाहींत का?" हंस, "नाहींत" म्हणताच, तें ऐकून ही ही करून ते बगळे त्या हंसाला व त्याच्या त्या मानससरोवराच्या वैभवाला तुच्छ लेखून फिदी फिदी हसले! (कै. शि. म. परांजपे यानीं त्यावेळच्या 'काळ' पत्रात, दुष्काळी कामावर खडी फोडणाऱ्या मजुराची एक गोष्ट लिहिली. त्यात "या कष्टी जीवनाला सोडून तू स्वर्गास चल" असे सांगितलें असता तो मजूर म्हणतो—"अरे आहे काय तुमच्या त्या स्वर्गात? तेथ काय दयाळू इंग्रज सरकारचें राज्य आहे? तेथें काय वारंवार असे दुष्काळ पडतात? दुष्काळ पडला, कीं, अशीं दुष्काळी कामें निघून तिथें काय अशी खडी फोडायची संधि मिळत असेल? जा, हें असलें वैभव जिथें नाहीं, तो स्वर्ग हवा आहे कोणाला!" त्या गोष्टीची व या श्लोकाची तुलना करून बघण्याजोगी आहे.)

●●●

शार्दूलविक्रीडित

"पक्षद्वन्द्वविराजितोऽहममलो मीनान् प्रसेवे सदा
पुष्टाङ्गः स कलादिभिः परिवृतश्चन्द्रः समः किं मम?॥
सर्वस्थाणुशिरोगतोऽहं" ममल चन्द्र बको हासते!
मात्सर्येण दुरात्मकोऽपि सुजन दृष्ट्वा सदा हासते ॥११७

शार्दूलविक्रीडित

**"पक्षद्वंद्व मलाहि निर्मळहि मी मीनां सदा सेवितों**
**मी हा पुष्ट, कला कमीअधिक ज्या, मत्तुल्य का चंद्र तो?**
**सर्वस्थाणुशिरींहि मीच" बक हा त्या श्वेतचन्द्रा हसे!**
**मात्सर्ये सुजनास दुष्टहि सदा कीं हासती हो असे ११७**

गद्यार्थ— (अडीच ओळी द्व्यर्थी.) बगळा म्हणतो—(तुमच्या त्या चंद्राची फुशारकी मला नका सांगू.) चंद्र पक्षद्वंद्वविराजित, (म्हणजे त्याला शुक्लपक्ष, कृष्णपक्ष, असे दरमहिन्यास दोन पक्ष असतात,) तर मलाहि दोन पक्ष (म्हणजे दोन पंख) आहेत, (पण, ते दोन्ही शुभ्र म्हणजे पांढरेच आहेत,) मी निर्मल आहें—(चंद्रावर डाग आहे,) चंद्र केव्हांतरी मीनराशीला लागतो — मी तर सदासर्वकाळ मीनांच्या (मत्स्यांच्या) राशीला (लागून त्यांना खात) असतो, मी नेहमीं पुष्टांग तर चंद्र एक पौर्णिमेलाच काय तो पुष्टांग, इतर वेळीं कमी अधिक कलांना युक्त— असा चंद्र काय माझ्याशीं तुल्य आहे? चंद्र फार तर एका स्थाणूच्या (शंकराच्या) शिरावर बसलेला — पण मी सर्व स्थाणूंच्या (झाडांच्या) शिरावर बसणारा!" असे म्हणून (पांढरा) बगळा पांढऱ्या चंद्रास हसतो! दुर्जन असेच मत्सरानें सुजनास हसतात. ●●●

## बकुलान्योक्ति

शिखरिणी

निसर्गादारामे तरुकुलसमारोपसुकृती
कृती मालाकारो बकुलमपि कुत्रापि निदधे ॥
इदं को जानीते यदयमिह कोणान्तरगतो
जगज्जालं कर्ता कुसुमभरसौरभ्यभरितम् ॥ ११८ ॥

शिखरिणी

**निसर्गे माळी जो तरुरचनकार्यात कुशल**
**तरी लावी बागेतचि कुठतरी 'क्षुद्र' बकुल ॥**
**कुणा हें ठावें कीं, बकुल इथ कोणांत पडुनी**
**(किंवा, अज्ञात असुनी)**
**स्वपुष्पांच्या गंधें अखिल जग टाकील भरुनी ॥११८॥**

गद्यार्थ— जन्मस्वभावानेंच, झाडांची रचना करण्याच्या कामात कुशल, अशा माळ्यानें, (चुकून त्याचें महत्त्व लक्ष्यात न राहून; क्षुद्र समजून) बकुळाचें झाड, उद्यानात कुठेतरी (काना कोपऱ्यात) लावलें. पण (बकुळ तें बकुळ. तें आपले गुण थोडेच सोडणार?) कुठेतरी कोपऱ्यात पडलेलें व म्हणून अज्ञात राहिलेलें हें बकुलाचें झाड आपल्या फुलांच्या सुगंधानें सर्व जग लौकरच भरून टाकणार आहे याची पूर्वकल्पना कोणाला आली होती? (श्लोक २७ व श्लोक ८२ यात अशीच कल्पना आली आहे. ११९ व्या श्लोकातहि तशीच.) ●●●

शिखरिणी

दधानः प्रेमाणं तरुषु समभावेन, निपुणो
न मालाकारोऽसावकृत करुणां बालबकुले ॥
अयं तु द्रागुद्यत्कुसुमनिकराणां परिमलैः
दिगन्तानातेने मधुपकुलझङ्कारभरितान् ॥ ११९ ॥

शार्दूलविक्रीडित

**ठेवी प्रेम समानभाव धरुनी जो सर्व वृक्षावरी**
**तो माळी करुणा न बालबकुला कांहीं निराळी करी ॥**
**यानें मात्र क्षणीं धरून सुमनें, त्याच्या सुगंधासवें**
**केलें व्याप्त दिशास, भृंग जमले त्याच्याहि**
**गुंजारवें ॥ ११९ ॥**

गद्यार्थ—जो माळी, सर्व झाडावर, समभावानें, सारखें प्रेम धरितो, त्यानें बालबकुलाच्या रोपाच्या बाबतींत, कांहीं निराळी विशेष अशी दयाबुद्धि, पक्षपातवृत्ति ( दाखववयास हवी होती पण ) दाखविली नाहीं. पण, या बकुलानें मात्र, लैकर फुलें धरून, त्याच्या सुगंधानें व त्याच्यामुळें जमलेल्या भ्रमराच्या झुंडींच्या गुंजारवानें सर्व दिशा व्यापून टाकल्या. ( २७, ८२, ११८ या श्लोकातल्या सारखीच कल्पना. सच्चाखुऱ्या सत्पात्र, गुणी माणसाला, वाटेल त्या परिस्थितींत फेकण्यात आलें, तरी तो आपल्या गुणप्रकर्षानें अग्रपूजेचा मान मिळविल्याशिवाय रहात नाहीं. ) ●●●

## बलिराजाची महती

अनुष्टुभ्

लक्ष्मीपयोधरोत्सङ्गकुङ्कुमारुणितो हरेः ।
धन्यो बलि. स येनासौ भिक्षापात्रीकृत' करः ॥ १२० ॥

वसततिलका

लक्ष्मीपयोधर धरूनचि ज्या हरीचा
लागून कुंकुम बने कर लाल साचा ॥
भिक्षार्थ पात्र असल्याहि करा करीतो
तो धन्य धन्य जगतीं बलि एक होतो ॥ १२० ॥

गद्यार्थ—( वामनावतारात विष्णूला बलिराजापुढें भिक्षेसाठीं हात पसरावा लागला ही कथा परिचितच आहे. ) ( प्रत्यक्ष सपत्नीची देवता जी ) लक्ष्मी तिचा पयोधर धरल्यानें, त्यावरील कुंकुमानें, लाल रंगलेला विष्णूचा हात, ज्यानें स्वत पुढें, भिक्षेचें पात्र म्हणून पसरावयास लावला तो बली धन्य ! ( आपल्या औदार्यानें, निर्धनाना, मध्यमाना, 'श्रीमताना' सुद्धा कोणी आपल्यापाशीं याचना करायला लावील. पण बलीनें याचक केलें तें प्रत्यक्ष श्री'पतीला' ! म्हणून अपूर्वाई. ) ●●●

## भार्गव ( परशुराम ) महती

उपेन्द्रवज्रा

कुलाचला यस्य महीं द्विजेभ्य प्रयच्छत सीमदपत्वमापु. ।
बभूवुरुत्सर्गजल समुद्रा स रैणुकेय श्रियमाननोतु ॥ १२१ ॥

वसततिलका

ज्यानें द्विजांस जग हें जधिं दान केलें
सीमाशिला तधिं कुलाचल हेच झाले ॥
दानोदकापरि समुद्रहि सर्व होते
देवो सदा विभव, भार्गव तो जगातें ॥ १२१ ॥

गद्यार्थ— ज्या रेणुकेच्या पुत्रानें म्हणजे भार्गव परशुरामानें ( पृथ्वीचा स्वत उपभोग न घेता ) तिचें ब्राह्मणाना दान केलें, तेव्हा कुलपर्वत, हे जणू काय चतु सीमा दर्शविणारे खुणेचे दगड झाले, तसेंच समुद्र हे दान देताना हातावर सोडण्याचे उदक बनले, असा तो महाप्रतापी, नि स्वार्थ व दानशूर परशुराम जगास वैभव देवो. ●●●

## भ्रमरान्योक्ति

आर्या

येनामन्दमरन्दे दलदरविन्दे दिनान्यनायिषत ।
कुटजे खलु तेनेहा तेने हा ! मधुकरेण कथम् ॥ १२२ ॥

आर्या

जे कां बहुलमरंदीं विकसतकमलीं दिनांस घालविती ।
कैशी येशा मधुपां इच्छा कुटजांमती असावी ती ? ॥

गद्यार्थ— ज्या भ्रमरानें भरपूर मध असलेल्या उमलल्या कमलात दिवस घालविले, त्यानेंच आता हायहाय ! ( मध नसलेल्या क्षुद्र ) कुटजाच्या फुलाची स्पृहा कशी धरावी ? (फुलें वेचलीं तेथें गोवऱ्या वेचायची पाळी मोठ्यावर सुद्धा येते. Alas ! How have the mighty fallen – असें इग्रजींत म्हटलें आहेच. ) ●●●

रथोद्धता

किं न पश्यसि महेन्द्रदिङ्मुखे शीतदीधितिरसावुदश्चति ॥
मीलितैव नलिनीह मा कृथास्तन्मधुव्रत ! मुधा गतागतम्

रथोद्धता

कां दिसे न यद पूर्व बाजुला
चद्र येइ उदयास तो तुला ? ॥
ही मिटेच नलिनी मधुव्रता
येरझारहि करू नको वृथा ॥ १२३ ॥

गद्यार्थ— हे मधुव्रता ! पूर्व दिशेला तो शीतल किरणाचा चद्र उदयास येत आहे तें तुला दिसत नाहीं का ? ही नलिनी बघ आता मिटलीसुद्धा—आता उगाच येथें चकरा कशाला मारतोस ? ( प्रियेच्या भोंवतीं, प्रणयाराधनासाठीं, तिचें दर्शन, शब्दश्रवण, सहवास, इत्यादिरूपी मधु चाखण्यासाठीं दिवसभर कदाचित् तिच्या पालकाच्या नकळत—रुजी पालकाच्या प्रिय-कराला, कवि, अन्योक्तीनें सागतो कीं, आतां तिचे धर्डील घरीं आले व घराचीं दारें बंद झालीं तेव्हां आतां तुझ्या येरझारा पुरे कर. ) ●●●

रथोद्धता

नीरजान्यपि निषेव्य निर्भरं नीरसानि कुटजानि वाञ्छसि ॥
चञ्चलत्वमिह चञ्चरीक ते साहसं कथमिदं विमोक्ष्यसि ?
॥ १२४ ॥

रथोद्धता

तूं यथेच्छ कमलांस सेवुनी गंधहीन कुटजांस वांछिसी ॥
चंचलत्व तव आणि साहस भृंग हें सकल केवि सोडिसी ? ॥ १२४ ॥

गद्यार्थ— हे भ्रमरा ! तू (मधुपूर्ण) कमलाचा यथेच्छ उपभोग घेतलास, तरी, अजून, नीरस गंधहीन कुटजपुष्पाची तुला इच्छा असावी ! तुझे हें चंचलत्व आणि हें साहस, तू केव्हा कसा सोडणार ? (अतिकामलोभी पुरुषाला, घरीं सुंदर स्त्री आतृप्ति सुख देत असता, चंचल आणि साहसी वृत्तीनें तो बाहेर गटारात शेण खायला जातो, याला उद्देशून.) ●●●

रथोद्धता

पीतमत्र मधु यापिताः क्षपा भृङ्ग ! सर्वमचिरेण विस्मृतम् ? ।
हीनमानसुषमा हिमागमे पद्मिनीं यदिह नावलोकसे ? ॥ १२५ ॥

रथोद्धता

पीत जेथ मधु, कंठिल्या निशा
भृंग ! तें विसरसी क्षणीं कसा ? ॥
क्षीण कान्ति शिशिरें जिची अशी
पद्मिनी तुज दिसे न ही कशी ? ॥ १२५ ॥

गद्यार्थ— हे भ्रमरा ! ज्या पद्मिनीच्या मुखकमलामध्यें मध प्यालास, व रात्रींच्या रात्री घालविल्यास, तें सर्व, इतक्या थोड्या कालावधींतच विसरलास ? अरे आज हिमपातानें, (हिंवाळ्यातील दहिंवरानें) मान व सौंदर्य सर्व नष्ट झालेली, ही पद्मिनी, (या बाजूनें तूं इतके वेळा आला गेलास तरी) तुला बघावीशी सुद्धा वाटू नये अशी ठरली काय ? (स्वपत्नीचें, म्हणा, कीं वाराङ्गनेचें म्हणा, आयुष्यांतील शिशिरऋतु म्हणजे वार्धक्य आल्यानें सर्व मान, सौंदर्य वगैरे लुप्त होऊन हीन दशा झाल्यावर, पुरुषानें पूर्वीचे सर्व सुखोपभोग विसरून, तिच्याकडे आता ढुकूनसुद्धां पाहू नये या कृतघ्नतेस उद्देशून !) ●●●

प्रहर्षिणी

आनम्राः स्तबकभरेण पल्लविन्यः
शोभन्ते कति न लताः परागपूर्णाः ? ॥
आमोदे मधुनि च मार्दवे च तासां
यो भेदः स खलु मधुव्रतैकवेद्यः ॥ १२६ ॥

प्रहर्षिणी

वेली या किति न परागपल्लवांनीं
पुष्पांनीं अतिशय शोभती लवोनी ? ॥
त्यांचे ते मधु, मृदुता, सुगंध यांत
जाणे तो मधुकर एक काय भेद ! ॥ १२६ ॥

गद्यार्थ— फुलांच्या गुच्छांनीं किंचित् वाकलेल्या, पल्लवांनीं भरलेल्या व परागांनीं पूर्ण अशा वेली काय थोड्या का शोभताहेत ? पण त्यांच्या मधात, मृदुपणांत, सुगंधात जे सूक्ष्म भेद आहेत ते जाणण्यास रसवेत्ता एकटा मधुकरच समर्थ आहे. (साधारण पुरुषाला, भरगच्च तारुण्यानें मुसमुसलेल्या सर्व स्त्रिया सारख्याच आकर्षक वाटतात, पण मधुव्रतासारखे बारा गावचें पाणी प्यालेल्या रगेल कामी पुरुषालाच त्यांचे मधु, मृदुता, सुगंध, यातले सूक्ष्म भेद उमगतात. सर्व श्लोकच द्व्यर्थी आहे.) ●●●

वसंततिलका

अन्यासु तावदुपमर्दसहासु भृङ्ग !
लोल विनोदय मनः सुमनोलतासु ॥
मुग्धामजातरजसं कलिकामकाले
व्यर्थं कदर्थयसि किं नवमल्लिकायाः ? ॥ १२७ ॥

वसंततिलका

तूं हाल जे करिशि, सोसति भृंग ! जीस
त्या पुष्पवल्लिंतचि तूं रमवी जिवास ॥
मुग्धा, न जीस रज ये, नवमल्लिकेची
तीं कां अकालिं कळि कुस्करिशी उगाची ? ॥ १२७ ॥

गद्यार्थ—हे (निर्दय) भृंगा ! तू करतोस ते हाल ज्यांना सोसत असतील, अशा अन्य कुठल्या पुष्पवेलींत, तू आपला जीव खुशाल रमव. पण अजातरज अशा नवमल्लिकेच्या या मुग्ध कळिकालेल्या अकालींच का कुस्करतोस ? (प्रौढांगनांशीं निर्दय रति करण्यास सरावलेल्या कामी पुरुषानें, अजातरज मुग्ध

बालिकेशीं, अकालीं, घसमुसळेपणा केल्यास, तिनें विचारीनें दुसरें काय म्हणावें ? )

●●●

वसततिलका

एणीदृशः श्रवणसीम्नि यदा नयन्ति
तेनैव तस्य महिमा नवचम्पकस्य ।
त्वं तत्र नो विहरसे यदि भृङ्ग ! तेन
नैतस्य काचिदपि सा तु तवैव हानिः ॥ १२८॥

वसततिलका

**कर्णी मृगाक्षि जधिं खोविति चपकातें**
**तेणेंच त्या परमवैभव प्राप्त होतें ॥**
**भृंगा ! जरी विहरसी नच तूंहि तेथें**
**त्याला मुळीं न, घडते परि हानि तूतें ॥१२८॥**

*गद्यार्थ*—चाफ्याचें ताजें फूल, मृगनयना जेव्हा आपल्या कानावर खोवतात, तेव्हा, त्या नुसत्या सन्मान्यपददानानेंच चपकाला काय मोठेपणा मिळावयाचा तो मिळून जातो ! हे भृंगा, तू तेथें त्या चपकाभोंवतीं गुंजारव करून रुजी घालण्यात उपस्थित नसलास, तर त्यात त्या चपकाची काहींच हानि घडत नाहीं. घडते ती तुझीच (“अत्यंत सत्पात्र गुणी सज्जनाचा सत्कार समारंभ झाला. त्यासगी हेवेदावे किंवा मात्सर्य किंवा स्वत चें महत्त्व दाखविण्यासाठीं वर्तमानपत्राचे वार्ताहर, (जे भगवत् काल्या शाईनें असल्या प्रसगाचें वर्णन करून प्रसिद्धि देऊ शकले असते ते ) त्यावेळीं उपस्थित नव्हते, त्याना कवि म्हणतो “अरे त्या थोर माणसाची यात काहींच हानि नाहीं.. त्याचा सन्मान व्हायचा तो झाला. पण तुमची मात्र वृत्तपत्राचे रकाने न भरता आल्यानें पोटाची पैदास कमी झाली ! इतकेंच.”)

●●●

वसततिलका

मा गा विषादमलिपोतक ! केतकीना—
मन्तर्निगूढमनवाप्य मधुप्रकर्षम् ॥
लाभः स एव परमो ननु कण्टकाना
श्रेणीभिरक्षतशरीरतया प्रयासि ॥ १२९ ॥

वसततिलका

**लाभे न गुप्त मध आतिल केवड्याचा**
**मानू नकोस मनिं भृंग ! विषाद याचा ॥**
**कांट्यातुनी सुटसि ओरखड्याविनाची**
**मोठा खरा घडतसे तुज लाभ हाची ॥ १२९ ॥**

*गद्यार्थ*— हे भृंगा ! ( तू केवड्यापाशीं मध मिळण्याच्या अपेक्षेनें गेलास खरा पण ) तुला केवड्यात, आत आत गुप्त दडवून ठेवलेला मधाचा साठा मिळाला नाहीं, या गोष्टीमुळें, तू विषण्ण होऊ नकोस. त्या केवड्याच्या कटकपक्तीनीं ओरबाडला न जाता, सुस्वरूप देहानें, तू सुटून आलास, हेंच तू आपलें मोठें भाग्य समज. ( भिक्षु माणसानें गुप्त दाबून ठेवलेल्या धनापैकीं काहीं मिळेल, म्हणून, याचक त्याच्याकडे जातो, व निराश होऊनच परत येतो, तेव्हा त्याच्या दारच्या कुत्र्यानीं ओरबाडलें नाहीं, एवढेच नशीब समजून त्यानें स्वस्थ बसावें. )

●●●

आर्या

अभिनवमधुलोलुपस्त्वं तथा परिचुम्ब्य चूतमञ्जरीम् ।
कमलवसतिमात्रनिर्वृतो मधुकर ! विस्मृतोऽस्येना कथम् ?
॥ १३० ॥

आर्या

**नवमधुलोलुप भृंगा ! चुंबुनि तू आम्रमंजरी तशी, ।**
**केवळ कमलवसतिनें तोषुनि तूं तिजसि केंवि विस्मरसी ?**
**॥ १३० ॥**

*गद्यार्थ*— ( ही प्रख्यात व खरीखुरी अन्योक्ति महाकवि कालिदासाच्या शाकुंतलाच्या पाचव्या अकात आली आहे. दुष्यन्ताच्या अनेक बायकापैकीं एकीवरचें त्याचें प्रेम ( तिचें तारुण्य सपल्यानें ) नवमधुलोलुपवृत्तीनें सपलें, व दुसरीवर बसलें. ही दुसरी बहुधा रतितृप्ति देणारी नवयौवना नमावी. तिच्या इतर गुणामुळें, तिच्या फेवळ सहवासावरच दुष्यंत संतुष्ट असावा, असें या श्लोकावरून दिसतें. म्हणून ती पहिली, दुष्यन्ताला उद्देशून, हा श्लोक म्हणते— ) हे नवमधुलोलुप भृंगा ! पूर्वी आम्रमंजरीचा यथेच्छ उपभोग त्या तन्हेनं घेतलास ! आणि कमलात ( त्यात मध किंवा सुगध मिळण्याची आशा नसता ) फेवळ वसति करायला मिळाली, एवढ्यावरच संतुष्ट होऊन तू आज त्या आम्रमंजरीला कसा विसरलास !

●●●

मात्यभारा

भ्रमर ! भ्रमता दिगन्तराणि क्वचिदासादितमीक्षितं श्रुतं वा।
वद सत्यमपास्य पक्षपातं यदि जातीकुसुमानुसारि पुष्पम् ?
॥ १३१ ॥

मालभारणी किंवा मात्यभारा

भ्रमरा ! फिरतां दिशोदिशीं रे
दिसलें कां कधिं ऐकिलें, मिळालें ॥
वद सत्य, त्यजून पक्षपात
कुठ जाईसम पुष्प या जगांत ? ॥ १३१ ॥

गद्यार्थ—हे भ्रमरा ! तू दिशादिशात फिरणारा व (त्यामुळें सान्या फुलांचे रुचिभेद जाणणारा) (श्लोक १२६ पहा.) म्हणून तुला विचारतों, आणि तुझा एकाद्या फुलाविषयीं पक्षपात असेल तो बाजूस सारून तू सत्य मात्र सांग, कीं, जाईच्या फुलासारखें फूल तुला कधीं कुठें सापडलें, किंवा तू ऐकलें आहेस काय ? किंवा पाहिलें आहेस काय ?

●●●

शार्दूलविक्रीडित

नीतं जन्म नवीननीरजवने पीतं मधु स्वेच्छया
मालत्या कुसुमेषु येन सततं केली कृता हेलया ॥
तेनेयं मधुगन्धलुब्धमनसा गुञ्जालता सेव्यते
हा धिग्दैवकृतं ! स एव मधुपः का का दशां
नागतः ? ॥ १३२ ॥

शार्दूलविक्रीडित

स्वच्छन्दें मधु पीत, पंकजवनीं आजन्म जो राहिला
मोदें मालतिच्या फुलांत रमुनी जो नित्यची खेळला
ऐशाही मधुगंधलुब्ध मधुपें गुंजालता सेविली !
धिग् दैवा न कशी कशी करुण ही यातें दशा पातली !
॥ १३२ ॥

गद्यार्थ—ज्यानें स्वच्छन्दानें मध पीत, कमलाच्या बनात जन्म काढला, ज्यानें नेहमीं मालतीफुलात आनंदानें क्रीडा केली, त्याच मध व सुगंध याना भाळणाऱ्या भ्रमरानें, आज पहावें, तों, गुंजेच्या वेलीशीं रममाण होण्याची पाळी आली ! धिक्कार असो दैवाच्या दुर्गतीस ! या बिचाऱ्यावर आणखी काय काय दशा दशा करून सोडणारे प्रसंग येऊन गेले नसतील ?

●●●

शार्दूलविक्रीडित

प्रारम्भे कुसुमाकरस्य परितो यस्योल्लसन्मञ्जरी—
पुञ्जे मञ्जुलगुञ्जितानि रचयस्तानातनोरुत्सवान् ॥
तस्मिन्नद्य रसालशाखिनि दशां दैवात्कृशामञ्चति
त्वं चेन्मुञ्चसि चञ्चरीक ! विनयं नीचस्त्व—
दन्योऽस्ति कः ? ॥ १३३ ॥

शार्दूलविक्रीडित

येतां गोड वसंत, येति फुलुनी त्या मंजरींभोंवतीं
केला उत्सव साजरा जिथ तुवां गुंजारवांसंगतीं ॥
दैवें आम्रतरूस त्याच कुदशा येऊन तो वाळतां,
*भृंगा ! सोडिसि त्यास तूं, तर गमे तूं मूर्त रे नीचता* १३३

गद्यार्थ— वसन्त ऋतु लागताच, फुलून येणाऱ्या ज्या आम्र्याच्या मोहोराच्या गुच्छातून, मञ्जुळ गुंजारव करीत, तू त्या तऱ्हेनें महोत्सव साजरे केलेस, तोच आम्रवृक्ष, आज दुर्दैवानें वाईट दशा प्राप्त होऊन, सुकून जात असता, हे भ्रमरा, साधी सभ्यता सोडून, याचा जर त्याग करणार असशील, तर तुझ्या-इतका नीच अन्य कोण ? (वैभवापुरती मैत्री ठेवणारे, व कठीणकाळीं सोडून जाणारे, मामापुरते मामा सर्वत्र आहेतच.)

●●●

आर्या

मलिनेऽपि रागपूर्णां विकसितवदनाममन्दजल्पेऽपि ।
त्वयि चपलेऽपि च सरसां भ्रमर कथं वा सरोजिनीं त्यजसि

आर्या

प्रेमल तुज मलिनासिहि,
बडबड तव तरि जिचें वदन उमले ।
तुज चंचलासि सरसा,
त्यजिसि अशी पद्मिनीहि केवि अले ? ॥१३४॥

गद्यार्थ— तू मलिन (काळा, पापी) असलास तरी तुझ्याशींहि प्रेमपूर्ण वृत्ति ठेवणाऱ्या, तू अति बडबड्या असलास तरी आपलें वदन विकसितच ठेवणाऱ्या (तुझ्या बडबडीला विटून तोंड वाकडें न करणाऱ्या) तू चचल वृत्तीचा असूनहि तुझ्याशीं स-रस राहणाऱ्या कमलिनीचा, हे भृंगा, तुझ्यानें त्याग करवतो तरी कसा ? (अत्यंत गुणी सहनशील पतिव्रतेचा त्याग करणाऱ्या उल्लूना उद्देशून.)

●●●

शिखरिणी

चलापाङ्गां दृष्टिं स्पृशसि बहुशो वेपथुमतीं
रहस्याख्यायीव स्वनसि मृदु कर्णान्तिकचरः ।।
करौ व्याधुन्वत्याः पिबसि रतिसर्वस्वमधरं
वयं तत्त्वान्वेषान्मधुकर ! हतास्त्वं खलु कृती ।।१२५।।

शिखरिणी

**कटाक्षें हाले त्या बहु चलित नेत्रास भिडसी**
**हळूं कर्णापाशीं मधुर गुजगोष्टीच वदसी ॥**
**पिटी हस्तें झाडी तुजसि तरि रत्यर्क अधरा**
**अम्ही तत्त्वान्वेषी फुकट ! सुकृती तूंच भ्रमरा ।।१२५।।**

गद्यार्थ— ( शाकुंतल, पहिल्या अंकांत, दुष्यंत-शकुंतला भेटीच्या वेळीं ती कोण, कुळली, मुनिकन्या कीं क्षत्रियकन्या इत्यादि माहिती ( तत्त्वान्वेष ) दुष्यन्त विचारीत होता, एवढ्यांत एक भुगा, जणू तें कमल समजून शकुंतलेच्या मुखाभोंवतीं फिरूं लागला; त्यास दुष्यंत म्हणतो—( भयानें ) कटाक्षक्षेपानें चलित अशी तिच्या नेत्रांस, तूं स्पर्श करीत आहेस; जणूं गुजगोष्टी कराव्या, तसा तू तिच्या कानापाशीं गुणगुणत आहेस, ती हातांनीं तुला झटकून टाकीत असतांहि, रतिसुखाचें सार, असें अधरामृत तू पीत आहेस ! आम्ही इकडे तत्त्वविचारच करीत बसून निष्फल ! तूं मात्र लग्गा साधलास खरा भ्रमरा ! ( धाडसानें कार्य साधतें; अतिविचारानें नासतें. ) ●●●

आर्या

इह रूपमात्रसारे चित्रगते किमिति कनककमलेऽस्मिन् ।
न रसो नापि च गन्धो मधुकरबन्धो वृथा भ्रमसि ।।१२६।।

आर्या

**चित्रित कनककमल हें—रूपच केवळ खरें असे यास !**
**ना रस, ना वास, इथें कां रे भ्रमरा उगाच फिरतोस ?**

गद्यार्थ— हे भ्रमरा, अरे हें कांहीं खरें सुवर्णकमल नाहीं तर नुसतें चित्र आहे. यांत वस्तु नाहीं केवळ रूप तेवढें खरें आहे. यांत ना रस, ना वास; तरी वेड्या, का वृथा येथें रुंजी घालतोस ? ( असल प्रेमवेडाच तो ! प्रियेचें नुसतें चित्र पाहून वेडे होणारे प्रेमी, काय करतील, सांगता येत नाहीं ! ) ●●●

शिखरिणी

उपानीतं दूरात्परिमलमुपाघ्राय मरुता
समायासीदस्मिन्मधुरमधुलोभान्मधुकरः ।।
परो दूरे लाभः कुपितफणिनश्चन्दनतरोः
पुनर्जीवन्यायाद्यदि तदिह लाभोऽयमतुलः ।। १२७ ।।

स्रग्धरा

**वायूनें आणिला तो परिमल दुरुनी, हुंगुनी भृंग झाला**
**लोभी, त्या सेविण्यातें सुमधुर मधु, त्या चन्दनालागिं गेला ॥**
**राहो तो लाभ दूरी; कुपित भुजग जे तेथ त्यांच्याकडून**
**भृंगा ! येसी जिता तूं सुखरुप तर तो लाभ मोठाच मान ।।१२७।।**

गद्यार्थ—वाऱ्यानें दुरून कुठून तरी चंदनाचा सुगंध आणला, तो हुंगून, भ्रमर, लोभाविष्ट होऊन, त्याचा सुमधुर मधु मिळविण्यासाठीं चन्दनवृक्षापाशीं गेला. तो थोर लाभ तर दूरच राहो. परंतु, त्या चंदनावरच्या कुपित सर्पांच्या तडाख्यातून, जगून वाचून, सुखरूपपणें, तूं परत आलास, तर हे भ्रमरा ! तोच मोठा लाभ झाला असे तू समज. ( उद्दिष्ट श्लोक १२९ मधल्यासारखेंच. ) ●●●

## मयूरान्योक्ति

शार्दूलविक्रीडित

एतस्मिन्मलयाचले बहुविधैः किं तैरकिञ्चित्करैः
काकोलूककपोतकोकिलकुलैरेकोऽपि पार्श्वस्थितः ।।
केकी कूजति चेत्तदा विघटितव्यालावलीबन्धनः
सेव्यः स्यादिह सर्वलोकमनसामानन्दनश्चन्दनः ।।

शार्दूलविक्रीडित

**हे कोकीळ, कपोत काक, मलयीं व्हावे कशाला इथें ?**
**ज्यांचा ना उपयोग ! एक जवळीं हा मोर राहे जिथें ॥**
**यत्केकारव ऐकतांच गळुनी सर्पादि तीं बंधनें —**
**होई चंदन सेव्य—जो सुखवितो साऱ्या जनांचीं मनें ।।१२८।।**

गद्यार्थ— येथें या मलयपर्वतावर, कावळे, घुबडें, कपोत इत्यादि नानाविध पक्षी हे कशाला हवेत ? कारण ते निरुपयोगी ( कांहींहि न करणारे ) आहेत. पण एक हा जवळ असलेला मोर जर मुखांतून केकारव काढील तर ( तेवढें पुरें आहे ) त्यामुळें अखिल जनमनाला आनंददायक असा चंदन, सेव्य ( लभ्य व उपभोग्य ) होऊं शकतो. ( आपत्प्रसंगीं उपयोगी पडणारा, एक सन्मित्र पुरे. सोळभोक ज्मा करून काय उपयोग? ) ●●●

आर्या

यन्नादपि क पश्यति शिखिनामाहारनिर्गमस्थानम् ।
यदि जलदनिनदमुदितास्त एव मूढा न नृत्येयु ? ॥ १३८ अ ॥

आर्या

खाइ, फिरे मोर कुठें हें जाणायास कोण यत्न करी ? ।
हर्षुनि घनघननादें खुळा स्वयें तोच नाचता न जरी ?

गद्यार्थ— मोर हा, आहार काय, विहार काय, कोठें करतो, याचा, जर तो वेडयासारखा मेघगर्जनेनें आनदानें नाचला नसता, तर कोण मोठ्या जिज्ञासेनें यत्नपूर्वक शोध करण्यास गेलें असतें? (काहीं विशेष गुणवत्ता कोणात असली, तर जग त्याच्या चरित्राचा शोध घेणार. एरवीं कोणाला कोणाची पर्वा आहे ?) •••

मलयान्योक्ति
वसंततिलका

किं तेन हेमगिरिणा रजताद्रिणा वा
यत्राश्रिता हि तरवस्तरवस्त एव ॥
मन्यामहे मलयमेव यदाश्रयेण
शाखोटनिम्बकुटजा अपि चन्दनाः स्युः ॥१३९॥

वसंततिलका

ते व्यर्थ हेमगिरि अन् रजताद्रि उच्च
ज्यांच्यावरील तरु केवळ ते तरूच ॥
तो श्रेष्ठची मलय, जेथिल वृक्षपंक्ति
निंबादिही सकल चंदनरूप होती ॥१३९॥

गद्यार्थ— मोठे उंच व मौल्यवान सुवर्णपर्वत किंवा चांदीचे पर्वत असतील तरी काय त्यांचा उपयोग ? कारण त्यांच्या आश्रयानें वाढलेलीं झाडें हीं केवळ (तीं व तशीं) झाडेच राहतात. म्हणून मलयपर्वतच आम्ही सर्वश्रेष्ठ मानतों. कारण त्याच्या आश्रयानें वाढलेली शाखोट, लिंब, कुटज असलीं क्षुद्र झाडें सुद्धा चंदनच होऊन जातात. (चन्दनसान्निध्यानें त्यानाहि सुगंध लागून तीं चंदन म्हणूनच विकलीं जातात.) (सद्गुणाची खरी परीक्षा यातच आहे, कीं, स्वतः गुणी असून भागत नाहीं—तर सान्निध्यात येणारांनाहि गुणी करून उन्नत केलें पाहिजे.) •••

मान्त्रिक वर्णन
शार्दूलविक्रीडित

भेकेन क्वणता सरोषपरुषं यत्कृष्णसर्पानने
दातु कर्णचपेटमुज्झितभिया हस्तः समुल्लासितः ॥
यच्चाधोमुखमक्षिणी विदधता नागेण तूष्णीं स्थितं
तत्सर्वं विषमन्त्रिणो भगवतः कस्यापि लीलायितम् ॥

शार्दूलविक्रीडित

कानीं थप्पड द्यावयास, न भितां जें कृष्णसर्पाननीं
जाई हात उगारुनी, गुरगुरे बेडूक जें कोपुनी ॥
खालीं अप्रतिकार पाहत असा, जें नाग तेव्हां वसे—
वाटे सर्वसमर्थ-मांत्रिककृता ती खास लीला असे ॥

गद्यार्थ—काळ्या सर्पाच्या कानावर थप्पड देण्यास, बेडूक रागारागानें गुरगुरत निर्भयपणें, सर्पाच्या तोंडावर हात उगारून धावून जातो काय, आणि सर्प, तोंड खालीं करून डोळे जमिनीकडे लावून, प्रतिकार न करता गप्प बसतो काय—हा सर्व विलक्षण प्रकार म्हणजे कोण्या महामान्त्रिकाची लीला दिसते ! •••

मालतीकुसुमान्योक्ति
वसंततिलका

किं मालतीकुसुम ! ताम्यसि निष्ठुरेण
केनापि यत्किल विद्धनमितो लताग्रात् ? ॥
लोकोत्तरेण निजसद्गुणगौरवेण
को नामुना शिरसि नाम न करिष्यति त्वाम् ? ॥ १४१ ॥

वसंततिलका

कां मालतीसुम ! खुडी लतिकेवरून
कोणीहि निष्ठुर म्हणूनचि होसि खिन्न ? ॥
गंधा, जगीं तव अलौकिकशा भुलून
तूतें शिरावर धरील न कोण कोण ? ॥ १४१ ॥

गद्यार्थ—हे मालती पुष्पा ! कुणीतरी निष्ठुरानें तुला या लतेवरून खुडून घेतलें, याकरीं का तू खिन्न झालें आहेस ? तुझ्या लोकोत्तर सद्गुणाना भाळून तुला कोण शिरावर धारण करणार नाहीं ! (हे नवपरिणीते ! आईच्या मांडीवरून 'पितराच्या वेलीवरची ही मुग्ध मनोहर मल्लिका' कोण्या निष्ठुरानें

( तुझ्या पतीनें ) खुडून नेल्याबद्दल खेद मानू नकोस तुझ्या सच्छील सौंदर्यादि सद्गुणाना मोहून पतीनें तुला शिरोधार्य करावें यांतच तुझे साफल्य नाहीं का ? )

●●●

## ( माळी ) मालाकारान्योक्ति

मन्दाक्रान्ता

तोयैरल्पैरपि करुणया भीमभानौ निदाघे
मालाकार ! व्यरचि भवता या तरोरस्य पुष्टिः ॥
किं सा शक्या जनयितुमिह प्रावृषेण्येन वारा
धारासारानपि विकिरता विश्वतो वारिदेन ? ॥१४२॥

मन्दाक्रान्ता

माळ्या ! थोडें जल असुनिही, सूर्य जैं होरपाळी
(आस्थेनें) मायेनें तू करिसि तरुची वाढ जी उष्णकाळीं ॥
तैशी कां तो कधि करुं शके मेघही पावसाळी
धारांनीं जो जलमय करी विश्वही अल्पकाळीं॥ १४२ ॥

गद्यार्थ— जगाला सूर्य होरपाळून टाकीत आहे, अशा उन्हाळ्यात अगदीं थोड्याशा पाण्यानेंसुद्धां, हे माळ्या, या तरूची, मायेनें, आस्थेनें, जी वाढ तू करून दाखविलीस, ती, साऱ्या विश्वाला, जलधारांनीं जलमय करून सोडणाऱ्या, पावसाळी मेघाला, तरी, करून दाखविणें शक्य होईल काय ? ( स्वत च्या जिवाचा उन्हाळा करून, अत्यन्त दारिद्र्यातसुद्धां, मायेनें, आई आपल्या बाळकाचें सगोपन जितकें चांगलें करील, तितकें, श्रीमतांनीं, आपल्या मुलाचें वैभवशाली शुश्रूषालयात, भारी पगारी परिचारिका ठेवून करविलेलें सगोपन चागलें होईल काय ? )

●●●

## मुनि(भक्त)जनान्योक्ति

शार्दूलविक्रीडित

पृथ्वी तावदियं महत्सु महती, तद्वेष्टनं वारिधिः
पीतोऽसौ कलशोद्भवेन मुनिना, स व्योम्नि खद्योतवत् ॥
तद्विष्णोः परमं पदं कलयत. पूर्णं पदं नाभवत्
सोऽपि त्वद्हृदि वर्तते खलु हरिस्त्वत्त परः को महान् ? १४३

शार्दूलविक्रीडित

थोरांहूनहि थोर पृथ्वि; उदधी वेष्टी तिलाही परी
प्याला त्यास अगस्ति, तोहि नभिं ज्या हो काजव्याचे परी
चाले विष्णु तदा, न एक पदही तें ज्या जहालें पुरें
राहे त्वद्हृदिं तो ! तुझ्याहुनि मुने ! मोठा कुठें कोण रे ?
॥ १४३ ॥

गद्यार्थ— सर्व मोठ्या वस्तूहून, पृथ्वी ही मोठी म्हणतात; परतु तिलाहि समुद्र सर्वबाजूंनीं वेष्टितो; इतका समुद्र मोठा, पण त्याला अगस्ति पिऊन गेला, म्हणून, अगस्ति फार मोठा म्हणावा, तर तो *अगस्ति ( चा तारा ) आकाशात, फार तर* एखाद्या काजव्याइतपतच चमकतो; एवढें मोठें आकाश पण ( वामनावतारात तीन पावलें टाकावयास जातां ) तें त्याच्या *एका पावलाला पुरेसेंसुद्धा भरलें नाहीं. ) आणि अशरीरीनें* या सर्वांहून मोठा जो विष्णु, तो तुझ्या हृदयात वसति करतो ! तेव्हा हे मुने ! हे भक्ता ! तुझ्याहून मोठा कोण ?

●●●

## मुरली अन्योक्ति

वैतालीय

मुरली महनीयवंशजा परपुंसा परिचुम्बिता सती ॥
विजने विपिने भयातुरा परमेशं स्मरती ररास सा ॥ १४४ ॥

आर्या

सद्वंशजात मुरली परपुरुषें चुंबितां सती रानीं ।
विजनीं भिउनी जाउनि आक्रंदे जणुं परेश आठवुनी
(आळवुनी) ॥ १४४ ॥

गद्यार्थ— ( दोन शब्द द्व्यर्थी. सद्वशजात = चागल्या वेळूपासून बनविलेली हा अर्थ मुरलीकडे, सत्कुलात जन्मलेली हा अर्थ स्त्रीकडे. परपुसा = परपुरुष जो कृष्ण त्यानें – हा अर्थ मुरलीकडे, परक्या पुरुषानें हा अर्थ स्त्रीकडे. ) परपुरुषानें रानात एकान्तात सद्वशजा मुरली चुंबिली ती बिचारी भिऊन परमेशाला आळवून रोदन करती झाली ( विनयमगासारखं वर्णन. )

●●●

शार्दूलविक्रीडित

सौधं धाम मुखाम्बुजं भगवतो तत्रासनप्राशनं
शय्या चाधरपल्लवोऽथ मृदुलाङ्गुष्ठस्तदुच्छीर्षकम् ॥
अङ्गुल्यस्तव सेवने निरलसा भ्रमः विमन्य सुख
हा ! हा ! वैरिणि ! हे तथाऽपि मुरलि ! त्वां नैति
निद्राऽपि किम् ? ॥ १४५ ॥

शार्दूलविक्रीडित

कृष्णाचें मुखपद्म सौधचि, तिथें तूं आसवातें पिशी
शय्या त्या अधरीं, तसा मृदुल तो अगुष्ठ तूतें उशी ॥
त्वत्सेवारत दक्ष अगुलि, कुठें गे सौख्य तें याहुनी ?
कां गे झोंप तरीहि येइ न तुला हे वांसरी
वैरिणी ? ॥ १४५ ॥

गद्यार्थ—( कुणी विरहिणी गोपी, दुरून रानभर कृष्णाची मुरली ऐकू येत राहिल्यानें, पण, स्वता मिळण्यास असमर्थ असल्यानें व त्यामुळें तळमळत, तडफडत, निद्राविहीन अवस्थेंत पडल्यानें, चिडून त्या मुरलीला म्हणते— ) कृष्णाचें मुखकमलरूप सौध धाम (अमृतमय स्थान,) ( दुसरा अर्थ गच्ची असलेलें घर, ) तुला लाभलें; तेथें, तू आसवप्राशन म्हणजे कृष्णाचें चुम्बनामृत पितेस, ( दुसरा अर्थ मद्यप्राशन करतेस ), त्याचा अधरपल्लव ही तुला मृदुल शय्या लाभली, त्याचा मृदुपुष्ट आंगठा ही उशी मिळाली, ( निरनिराळे सूर काढण्यासाठीं तुझ्या अंगावरून फिरणाऱ्या ) तुझी सेवा करण्यात दक्ष, अशा त्याच्या अगुली (तुझे हातपाय चेपायला मिळाल्या,) (गच्चीवर, आसव पीत, गादीवर पडून, उशीवर डोकें टेकून, हातपाय चेपले जात आहेत, यापेक्षां निद्रा येण्यास अनुकूल परिस्थिति कोणती ? ) याहून अधिक सुख तें काय असायचें ? अशी इतक्या सुखात लोळत असतहि, हे वैरिणी मुरली ! तुला झोंप येऊ नये काय ? ( कृष्णाच्या हातात आडव्या निजलेल्या ओठाला ओठ बिलगलेल्या, आगठ्यावर टेकलेल्या, त्याच्या अगुली तिच्या अगावरून फिरत असलेल्या मुरलीचें चित्र डोळ्यापुढें आणावें. इतकें सुंदर सपूर्ण रूपक फार क्वचित् आढळतें. )

●●●

(मुसळ) मुसलान्योक्ति

मालिनी

जगति विदितमेतत्काष्ठमेवासि नून
तदपि च किल सत्य कानने वर्धितोऽसि ॥
नवकुवलयनेत्रीपाणिसङ्गोत्सवेऽस्मिन्
मुसल ! किसलय ते तत्क्षणाद्यन्न जातम् ॥ १४६ ॥

मालिनी

विदितचि मुसळा ! त्वद्देह हा लांकडाचा
परि अधिक खरें कीं ‘जगली’ तूंच साचा ॥
धरिति तुज जधीं त्या पद्मनेत्री करानीं
पुलकिततनु तूं कां होशि ना पल्लवांनीं ? ॥ १४६ ॥

गद्यार्थ— हे मुसळा ! साऱ्या जगाला माहीत आहे, कीं, तू निव्वळ लाकूडच आहेस. पण त्यातल्या त्यात अधिक सत्य हें आहे कीं तू रानात वाढलेलें ‘जगली’ आहेस. कारण तसें नसतें तर, टवटवीत कमलासारखे सुदर नेत्र असलेल्या तरुण सुंदरी, तुला हातानीं धरतात त्या महानदप्रसगीं, तुझ्या अगावर तत्क्षणींच पल्लवरूपी रोमाच फुटून यावयास नको होते काय ?

●●●

मेघान्योक्ति

प्रहर्षिणी

दीनानामिह परिहाय शुष्कसस्यान्यौदार्यं प्रकटयतो महीधरेषु
औन्नत्य परममवाप्य दुर्मदस्य ज्ञातोऽय जलधर तावको
विवेक ! ॥ १४७ ॥

प्रहर्षिणी

दीनांचीं त्यजुनि इथेंच शुष्क शेतें
औदार्या प्रकटविसी महीधरांसें ॥
झालासे तव हृदयीं मदातिरेक
हे मेघा ! मज कळला तुझा विवेक ! ॥ १४७ ॥

गद्यार्थ— गरीब बिचाऱ्या शेतकऱ्याचीं इथें वाळून चाललेलीं, धान्याचीं शेतें, सोडून, हे मेघा ! तूं आपला उदारपणा डोंगराना दाखवीत बसला आहेस, ( डोंगरावर पाऊस; शेतावर काहीं नाहीं. ) यावरून तुला अत्यत मद झाला असून, तुझा ( वक्रोक्तीनें ) विवेक (?)मला कळून चुकला ! ( समाजात जो तो आपापल्या सामाजिक पातळींतच वावरतो. श्रीमत हे श्रीमतानाच आहेर, देणग्या, भेटी, देतील. गरिबाना त्यातलें चुकून सुद्धा काहीं मिळत नाहीं. श्रीमताना त्या औदार्याची, देणग्याची आवश्यकताहि नसते,— आणि गरिबाना आवश्यक असून, त्या अलभ्य असतात ! पण मदोन्मत्ताना विवेक असणार कुठून ?)

●●●

द्रुतविलंबित

पितर वारिद ! वारि ददातुरे चिरपिपासित चातकपोतके।
प्रचलिते मरुति क्षणमन्यथा क्व च भवान् क्व पय क्व च चातक ?
॥ १४८ ॥

द्रुतविलंबित

जलद ! दे जल चातकबालका
चिरतृषादव-पीडित हा न कां ? ॥
क्षणभरें जर वादळ रे उठे
जल कुठें ? कुठ चातक ? तू कुठें ? ॥ १४८ ॥

हेंच शार्दूलविक्रीडित

**दे या चातकबालका, जल तुझें हे वारिदा शीतसें**
**हा तापून दवाग्निनें, तृषितही फारा दिसांचा असे**
**ना देशी तर हा क्षणांत तुजला नेईल वायू दुरी**
**कोठें चातक? तूं कुठें? जल कुठें? तात्पुत्री हो**
**तरी ॥ १४८ ॥**

गद्यार्थ—हे मेघा, दावाग्नीनें तापलेल्या, बहुतकाल तृषार्त अशा या चातकबालकाला तुझें पाणी दे. (आणि, तें त्वरितच) न देशील, तर, संभव आहे, कीं, क्षणभरात वादळ उठेल- आणि मग कुणीकडे तू, कुणीकडे पाणी आणि कुणीकडे चातक असे होऊन जाईल (सत्कार्य करायचें तें त्वरित करून टाकावें. विलंब लावल्यास कदाचित् ती संधि पुन्हा येणारहि नाहीं.) ●●●

अनुष्टुभ्

यदम्बुकणमादाय प्राप्तोसि जलदोन्नतिम् ।
तस्योपर्यम्बुधेर्गर्जन्मालिन्यस्योचित हि तत् ॥१४९॥

अनुष्टुभ्

**ज्या अब्धीच्या जळें मेघा ! उन्नती तुज लाभते।**
**गर्जणें त्यावरी तूं हें त्वन्मालिन्या च शोभतें॥ १४९ ॥**

गद्यार्थ—हे मेघा! ज्या समुद्राचे जलकण घेऊन तू या उच्च पदाला (आकाशात) पोंचला आहेस, त्याच समुद्रावर, (अक्षरश: वर) तू गर्जना करावीस, (गुरगुरावेंस; उर्मटपणा दाखवावा,) हें तुझ्या मालिन्यालाच (रंगानें मलीन; शीलानें हलका) शोभतें. (जगतल्या साऱ्या कृतघ्नांना उद्देशून.) ●●●

आर्या

एकस्य तस्य मन्ये धन्यामभ्युन्नतिं जलधरस्य ।
विश्वं सशैलकाननमाननमवलोकते यस्य ॥ १५० ॥

आर्या

**उन्नति त्या मेघाची एकाची धन्य या जगीं दिसते।**
**गिरि-वन-सह विश्व उभें आतुर ज्याच्या मुखाकडे**
**बघतें ॥ १५० ॥**

गद्यार्थ—ज्याच्या मुखाकडे, पर्वत, अरण्यांसहित सारें जग अपेक्षेनें, आतुरतेनें, बघतें, त्या एकट्या मेघाचीच काय ती उन्नति, (उच्च पदाला चढणें) मला धन्य वाटतें. (सर्वांची उन्नति सारखी जगत्कल्याणकारक नसते. आत्मकेन्द्रित स्वार्थी माणसे उच्च पदीं चढून उपयोग काय? उदारांची उन्नति हीच काय ती धन्य.) ●●●

रथोद्धता

मुञ्च मुञ्च सलिलं दयानिधे !
नास्ति नास्ति समयो विलम्बने ॥
अद्य चातककुले मृते पुन—
र्वारि वारिधर किं करिष्यसि ? ॥ १५१ ॥

रथोद्धता

**देइ देइ जल वारिदा त्वरें**
**येथ वेळ न विलंबनास रे ॥**
**होति चातकचि नष्ट हे जर**
**काय रे करिशि त्या जला तर ? ॥ १५१ ॥**

गद्यार्थ—हे जलधरा! तुझ्या वृष्टीच्या धारा लौकर लौकर सोड. ही विलंब करण्याची वेळ नव्हे. हे चातकच सर्व जर आज (तू जलदान न केल्यानें) मरून गेले, तर, तुझ्या त्या पाण्याचें तू काय करणार आहेस? (सरकारी लाल फितीची, दीर्घसूत्रीपणाची लक्षण, केव्हा, केव्हा, इतकी लागते, कीं, जनतेवरील संकट निवारण करण्याचें कार्य, त्या संकटानें, उदाहरणार्थ, पूर, आग, धरणीकंप, रोगाची साथ, इत्यादिमुळें संपूर्ण संहार व्हावयाचा तो होऊन जाईपर्यंत, सुरू सुद्धा होत नाहीं अशा वेळीं जनतेचा आक्रोश काय असेल तें वरील श्लोक दर्शवितो.) ●●●

उपजाति

आपो विमुक्ताः क्वचिदाप एव
क्वचिन्न किञ्चिद्गरलं क्वचिच्च ॥
यस्मिन् विमुक्ताः प्रभवन्ति मुक्ता
पयोद तस्मिन्विमुखः कुतस्त्वम् ? ॥ १५२ ॥

उपजाति

**तूं वर्षिलें तें जलरूप कोठें**
**कोठें न कांहीं, विष होइ कोठें ॥**
**जिथ्यात तें वर्षुनि होइ मोती**
**मेघा! रुचे का तुज ती न शुक्ति? ॥ १५२ ॥**

गद्यार्थ—हे मेघा! तूं जें पाणी वर्षितोस ( त्याचें पुढे काय होतें ह्याचा कधीं विचार केला आहेस कां ? ) तें कुठें पाणीच राहून त्याच स्वरूपांत सांठतें ( नद्या, तलाव, विहिरी इत्यादींत ) कुठें त्याचा कांहींच मागमूस दिसत नाहीं—( जमिनींत शोषल्यानें...उष्ण वस्तूवर पडून वाफ होऊन गेल्यानें इत्यादि ) कुठें कुठें तर ( विषारी वस्तूवर पडून वाहण्यानें ) तें विष सुद्धां होऊन जातें. पण ज्या एका ठिकाणीं पडलें असतां, पाण्याचे मोती होऊन जातात, त्या सागरांतल्या शुक्तीशीं तूं विमुख कां ( ती तुला कां आवडूं नये ? ). ( आपल्या दातृत्वाचा जेथें अधिकांत अधिक सदुपयोग होईल, त्या स्थळाऐवजीं, इतरत्रच, त्याची परिणति न पाहतां, खैरात करणारे तारतम्यरहित दाते असतातच ना ? ) ●●●

उपजाति

पानीयमानीय परिश्रमेण
पाथोद पाथोनिधिमध्यतस्त्वम् ॥
कल्पद्रुमे सीदति सामिलाषे
महोषरे वर्षसि किन्निमित्तम् ? ॥ १५३ ॥

इन्द्रवज्रा

आणून पाणी बहु तूं श्रमून
हे वारिदा ! वारिधिच्यामधून ॥
सोत्कंठ तो कल्पतरु त्यजून
ही क्षार भू शिंपिसि कां म्हणून ? ॥ १५३ ॥

गद्यार्थ— हे मेघा ! पुष्कळ कष्ट करून, अगदीं समुद्राच्या मध्यभागांतून, तू एवढें पाणी आणून, इकडे हा कल्पतरु तुझ्याकडे अपेक्षेनें पहात, झडून जात असताहि, त्या खारटणावर कां वृष्टि करीत आहेस ? ( उद्दिष्ट श्लोक १५२ प्रमाणें ) ●●●

वसंततिलका

एतेषु हा ! तरुणमारुतधूयमान—
दावानलैः कवलितेषु महीरुहेषु ॥
अम्भो न चेज्जलद मुञ्चसि मा विमुञ्च
वज्रं पुनःक्षिपसि निर्दय कस्य हेतो: ? ॥ १५४ ॥

वसंततिलका

हा ! वादळें भडकुनी वणवा जयांस
घेरी चहूंकडुनि दीन अशा तरूंस ॥
देणें नसेल तर देऊं नको जलास
हे क्रूर ! वज्र तिथ फेकिसि तूं कशास ? ॥१५४॥

गद्यार्थ—सोसाट वाऱ्यांनीं झडपल्यानें, भडकलेल्या वणव्यानें, अरेरे, ज्या बिचाऱ्या झाडांना घेरून, गिळून, टाकलें आहे, अशांच्या वर तुला जलवर्षाव करायचा नसला, तर करूं नको, पण, हे निर्दय मेघा ! आणखी त्यांच्यावर वीज कां फेकीत आहेस ? ( सासूच्या जाचाला कंटाळून, पत्नीनें, आपल्या पतीकडे साहाय्यार्थ धाव घ्यावी, तर, त्यानेंच तिला लाथ मारावी, असे झालें ! ) ●●●

शार्दूलविक्रीडित

कर्तव्यो हृदि वर्तते यदि तरोरस्योपकारस्त्वया
मा कालं गमयाम्बुवाह ! समये सिञ्चैनमम्भोभरैः ॥
शीर्णे पुष्पफले दले विगलिते मूले गते शुष्कतां
कस्मै किं हितमाचरिष्यसि परीतापस्तु ते स्यास्यति १५४ अ

शार्दूलविक्रीडित

इच्छा या तरुचें भलेंच करण्या मेघा ! तुला रे जर
धो धो वृष्टि विनाविलंब करणें तूं या तरूच्यावर ॥
जातां पुष्पफलें, दलें हि गळुनी, जातां मुळें वाळुनी
कोणाचें करणार तूं हित ? उरे रे ताप तूतें मनीं
॥ १५४ अ ॥

गद्यार्थ— हे मेघा ! या झाडावर तुला उपकार करावयाचाच असेल, तर उशीर न लावतां याच्यावर धो धो वृष्टि कर ! कारण, एकदां का या झाडाचीं, फुलें, फळें, पालवी झडून गेलीं व मुळें सुकून गेलीं, कीं, नतर मग तूं कोणाचें काय हित करणार आहेस ? तुला मात्र ( सूर्याचा ) ताप ( सहन करणें ) एवढेंच शिल्लक राहील. ●●●

वसंततिलका

शृण्वन्पुरः परुषगर्जितमस्य हन्त
रे पान्थ ! विह्वलमना न मनागपि स्याः ॥
विश्वार्तिवारणसमर्पितजीवनोऽयं
नाकर्णितः किमु सखे भवताम्बुवाहः ? ॥ १५५ ॥

वसंततिलका

**पेकून पांथ ! अति कर्कश गर्जितास**
**येवो मुळीं न तव विह्वलता मनास ॥**
**विश्वार्तिनाश जगिं जीवनकार्य ज्याचें**
**तूं पेकिलेंस न च गर्जित कां घनाचें ? १५५**

गद्यार्थ— हे पांथा ! पुढें मोठी कठोर गर्जना ऐकू येत आहे तिच्यामुळें तूं मनात विह्वळ होऊं नकोस. ( तुला सिंह वाटून भय वाटलें असेल ! ) विश्वाचें दुःख निवारण करण्यासाठीं, ज्यानें आपलें जीवन ( पाणी, जीवित. ) समर्पिलें आहे, अशा मेघाचें तू कधीं, पूर्वी, गर्जित ऐकलें नाहींस कीं काय ? ●●●

वसंततिलका

यत्पल्लवः समभवत्कुसुमं यदासी-
त्तत्सर्वमत्रभवतः पयस प्रसादः ॥
यद्रूरुहे फलविधौ न ददासि वारि !
प्राचीनमम्बुद ! यशो मलिनीकरोषि ॥ १५६ ॥

वसंततिलका

**ये पालवी, पुढति पुष्पहि ये तरूस ।**
**तें श्रेय सर्व जलदा ! तुझिया जलास ॥**
**येण्या फळें जर न देशि जला तयास**
**तूंची जुन्या मळविशील तुझ्या यशास ॥ १५६ ॥**

गद्यार्थ—हे मेघा ! झाडाला पालवी फुटली, पुढें फुलेंहि लागलीं, ही सर्व तुझ्या जलाचीच कृपा आहे. आता त्या झाडाला फळें लागण्याच्या नेमक्या वेळींच जर तू (आपली कृपा आटवून, पाम्हा आखडून, ) जल देण्याचें नाकारलेंस तर, तुझ्या पूर्वापार चालत आलेल्या कीर्तीला, तूंच मलिन करशील (एका आश्रित, मुलाचें एका उदार गृहस्थानें, बालपणीं चागलें संगोपन केलें पण शिक्षणाच्या वेळीं हात आखडले;—एका प्रत्यक्ष बापानें आपल्या मुलीला संगोपन करून शिक्षणहि दिलें पण तिला तो लग्न करू देईना...अशी विचित्र उदाहरणें घडलीं आहेत. अनारम्भो हि कार्याणां प्रथमं बुद्धिलक्षणम् । प्रारब्धस्यान्त-गमनं द्वितीयं बुद्धिलक्षणम् ॥ ) ●●●

मालिनी

दवदहनजटालज्वालजालाहतानां
परिगलितलतानां म्लायतां भूरुहाणाम् ॥
अयि जलधर ! शैलश्रेणिशृङ्गेषु तोयं
वितरसि बहुकोऽयं श्रीमदस्तावकीनः ॥ १५७ ॥

मालिनी

**अतिभयद दवाग्नी होरपाळी जयांस**
**गळति जिथुनि वेली, म्लान पेशां तरूंस ॥**
**त्यजुनि करिशि वृष्टी अद्रिच्या शेखरांस**
**जलद ! मद तुला हा वैभवाचाच खास ॥१५७॥**

गद्यार्थ—दावानलाच्या वाटोळ्या गरगर फिरणाऱ्या ज्वालांनीं होरपाळून टाकलेल्या, ज्याच्या अंगावरच्या आश्रित वेली गळून पडत आहेत, अशा, मलूल झाडाकडे ढुंकून सुद्धां न पाहतां, हे जलधरा ! डोंगराच्या रागांच्या शिखरावर पुष्कळ वृष्टि करतोस, हा तुला तुझ्या उन्नतवैभवाचा केवढा मद चढला म्हणावयाचा ! ( उद्दिष्ट श्लोक १४७ प्रमाणेंच. ) ●●●

शार्दूलविक्रीडित

कासारेषु सरित्सु सिन्धुषु तथा नीचेषु नीरग्रहं
धिक् तत्रापि शिरोनतिः किमपरं हेयं भवेन्मानिनाम् ? ॥
इत्यालोच्य विमुच्य चातकयुवा तेषु स्पृहामादराद्
उद्ग्रीवस्तव वारिवाह कुरुते धाराधरालोकनम् ॥ १५८ ॥

शार्दूलविक्रीडित

**" सारे अब्धि तसे तडाग सरिता नीचस्थ ! यांच्यापुढें**
**माना वांकविणें जलास्तव किती ही मानहानी घडे ! ॥ "**
**वाटे चातक हा विचार करुनी सर्वांस त्यां सोडुनी**
**हे मेघा ! तव वृष्टि सादर बघे मानेस उंचावुनी ॥ १५८ ॥**

गद्यार्थ— समुद्र काय, नद्या काय, तलाव काय, हे सारे नीचस्थ, ( अगदीं खोल जागीं असलेले ). आणि पाण्यासाठीं या नीचाच्या पुढें माना वाकविणें, ही, मानी पुरुषाला केवढी मानहानिकारक गोष्ट ! हा विचार करून, हे मेघा ! हा तरुण चातक, त्या सर्वांना सोडून जलधाराची वृष्टि करणाऱ्या-तुझ्याकडेच मोठ्या आदरानें, वर मान करून पाहत आहे. ( तू उच्चस्थ; तुझ्याकडे मानी पुरुष आला आहे. त्याचा तूं अपमान करून नको) (साधारणपणें श्लोक ६७ प्रमाणेंच.) ●●●

शार्दूलविक्रीडित

ग्रीष्मे भीष्मतरैः करैर्दिनकृता दग्धोऽपि यच्चातक-
स्त्वां ध्यायन्घन वासरान् कथमपि द्राघीयसो नीतवान् ॥
दैवाल्लोचनगोचरेण भवता तस्मिन्निदानीं यदि
स्वीचक्रे करकानिपातनकृपा तत्क प्रति ब्रूमहे ॥१५९॥

शार्दूलविक्रीडित

ग्रीष्मीं सूर्य निजप्रचंड किरणीं ज्या चातका पोळतो
तूतें ध्यातचि ते सुदीर्घ दिन जो कैसे तरी कठितो ॥
आता दैववशें तया दिसुनिही—गाराचिया वृष्टिनें
हे मेघा ! करिशी कृपा जर अशी, आम्ही कुणा
बोलणें ? ॥ १५९ ॥

*गद्यार्थ*— उन्हाळ्यात, सूर्याच्या भयंकर किरणांनीं पोळला जात असताहि—तुझें ध्यान मरीत, जो चातक, ते दीर्घ दिवस कसे तरी कठितो, त्याच चातकाच्या आता तू दैवयोगं दृष्टीस पडल्याबरोबर ( पाणी देण्याऐवजीं ) ( थाड थाड झोडपून काढणाऱ्या ) गाराच्या वृष्टीची कृपाच जर दाखवणार असशील, तर, हे मेघा ! आता आम्हीं बोलणार तरी काय अन् कुणाला ? ( रावणाच्या वनवासात ते भयंकर दिवस काढून परत रामाकडे आल्यावर दुसरा वनवास सीतेला घडला तसाच प्रकार ! ) ●●●

अनुष्टुभ

त्वमेव चातकाधार इति केषां न गोचरः ।
किमम्भोद ! वदास्माकं कार्पण्योक्तिं प्रतीक्षसे ॥ १६० ॥

अनुष्टुभ्

चातका तूच आधार हें का ज्ञात नसे कुणा ?।
आमुच्या दीनवाणीची वाट का पाहसी घना ? ॥ १६० ॥

*गद्यार्थ*— चातकाचा आधार तूच हें काय कोणाला माहीत नाहीं ? मग हे मेघा ! आमच्या दीनवाणीची वाट का पाहत आहेस ? ( हे उदार पुरुषा, सर्व याचकाचा आधार तूंच. पण मग आमच्याकडून दीनवाणे याचनाशब्द येण्याची का वाट पहातोस ? द्यावयाचें तें, याचकाला लज्जा न आणतां, आपण होऊन द्यावें, हें खरें औदार्य ! ) ●●●

अनुष्टुभ्

चातकः स्वानुमानेन जलं प्रार्थयतेऽम्बुदात् ।
स स्वोदारतया सर्वां प्लावयत्यम्बुना महीम् ॥ १६१ ॥

वसततिलका

प्रार्थीत चातक घना स्वबलानुसार
" दे शीत गोड जलबिंदुच दोनचार " ॥
तो मेघ थोर अपुल्या हृदयानुसार
पृथ्वी भरून पसरी जल सर्व दूर ॥ १६१ ॥

*गद्यार्थ*— ( चातकाला कितीसें पाणी पिण्याची शक्ति असणार ? ) म्हणून तो आपल्या शक्तीच्या मानानच ( चार दोन बिंदु ) जलाचीच मेघाला प्रार्थना करतो. परंतु मेघ हा मात्र आपल्या महोदार वृत्तीला अनुसरून सर्व जगालाच जलमय करून सोडतो ! ( खरे उदार आहेत, ते, याचकाची मागणी क्षुद्र असली, तरी, स्वतःच्या थोर औदार्याला शोभेसेंच देतात. कै. विठ्ठलदास ठाकरसी याजकडे कै. महर्षि अण्णासाहेब कर्वे महिलाविद्यापीठासाठीं, देणगी मागण्यास गेले. मागून मागून, ते, किती मागणार होते ? पण, ठाकरसींनीं १५ लाख रु. देणगी देऊ करून कर्व्यांना, इतकें चकित केलें, कीं, क्षणभर, " मी स्वप्नात तर नव्हे ? " असें कर्व्यांना वाटल्याशिवाय राहिलें नाहीं ) ●●●

शार्दूलविक्रीडित

आरामाधिपतिर्विवेकविकलो नूनं रसा नीरसा
वात्याभिः परुषीकृता दश दिशश्चण्डातपो दुःसहः ॥
एवं धन्वनि चम्पकस्य सकले संहारहेतावपि
त्वं सिञ्चन्नमृतेन तोयद ! कुतोऽप्याविष्कृतो वेधसा १६२

शार्दूलविक्रीडित

बागेचा धनि मूर्ख, आणि धरणी गेली पुरी वाळुन
आंधीनें जणु धुंद या दशदिशा ! हें ऊनही सह्य न ॥
चाफ्याला स्थिति नाशकारक मरूमध्ये असे ही जरी
सिंपाया अमृता, घना ! विधि तुला धाडी कुठोनी तरी ! ॥

*गद्यार्थ*— उद्यानाच्या धन्याला, चपकाची जपणूक कशी करावी, याचें ज्ञान नाहीं, जमीन सर्व सुकून नीरस झाली आहे आंधी ( धुळीन आंधळे करून सोडणारें वादळ ) उठून, दशदिशा धुंदकारल्या आहेत सूर्याचा ताप सहन होईनासा झाला आहे, अशी, मरुप्रदेशातल्या चंपकाला, सर्व परिस्थिति नाशकारक झाली असता, अहाहा ! ब्रह्मदेवान सुदैवानें, त्याच्या वर अमृतवृष्टि करण्यासाठीं, हे मेघा ! कोठून तरी तुला पाठवून दिलं ! ( भयंकर प्राणसंकटातहि अचानक, अकल्पित, चमत्कार झाल्याप्रमाणें, ईश्वरी कृपा होऊन संकटग्रस्ताला पुनर्जीवन लाभावें या धन्येस उद्देशून ! ) ●●●

वसंततिलका

आश्वास्य पर्वतकुलं तपनोष्णतप्त-
मुद्दामदावविधुराणि च काननानि ।
नानानदीनदशतानि च पूरयित्वा
रिक्तोऽसि यज्जलद सैव तवोत्तमश्रीः ॥१६३॥

वसंततिलका

पीडा हरून रवितप्तचि पर्वतांची
दावानलांत जळत्या सगळ्या वनांची ॥
मेघा ! नद्यांमधुनि तूं भरुनी जलातें
झालास रिक्त तरि वैभव तेंच तूतें ॥ १६३ ॥

गद्यार्थ— सूर्याच्या प्रखर किरणांनीं तापलेल्या पर्वतराजींचें शांतवन करून, वणव्यानें पोळलेल्या रानावनांची आग विझवून, आणि अनेक नद व नद्यांना पाण्यानें भरून टाकून, त्यामुळें हे मेघा ! तूं रिकामा झाला आहेस, हेंच तुझें सर्वोच्च वैभव आहे. ( कोणी रिक्त असला, तर तो कशानें रिक्त झाला, हेंच महत्त्वाचें आहे. व्यसनांनीं, मूर्ख उधळपट्टीनें रिक्त होणारे, आणि दानानें रिक्त होणारे एकाच मापानें कसे मोजता येतील ? यज्ञांत सर्वस्वाचें दान करून पूर्ण निर्धन झालेल्या रघुराजाविषयीं, प्रकरण १५ मधील १६ वा "– स्वस्त्यस्तु ते निर्गलिताम्बुगर्भे " हा श्लोक पाहावा. ) ●●●

आर्या

नैताः स्वयमुपभोक्ष्यसि मोक्ष्यसि चेज्जलद यत्र कुत्रापि ।
तत्किं तत्र न मुञ्चसि मुक्ता मुक्ता भवन्ति यत्रापः ॥ १६४ ॥

आर्या

उपभोगसी स्वयें न च,
जर घन ! सोडिसि कुठेंतरी पाणी ।
तर कां तिथें न वर्षिसि
जेथें मोती घडे जलामधुनी ? ॥ १६४ ॥

गद्यार्थ— मेघा ! अरे, तूं वर्षाव करतोस तें पाणी तूं स्वतां तर, कांहीं उपभोगीत नाहींस, आणि, कुठेंतरीं तुला तें ओतावयाचेंच ! तर मग ज्या ठिकाणीं तें वर्षिलें असतां, पाण्यापासून मोतीं उत्पन्न होतात, त्या ठिकाणींच तें कां ओतीत नाहींस ? ( उद्दिष्ट याच प्रकरणातील श्लोक १५२ प्रमाणें. ) ●●●

शार्दूलविक्रीडित

निष्पद्मं शिशिरेण धीवरगणैर्निर्मत्स्यनिष्कूर्मकं
व्याधैर्निर्विहगं निरम्बु रविणा निर्नालकं दन्तिभिः ।
निःशालूकमकारि शूकरगणैर्नामैकमात्रं सरो ।
हे जीमूत ! परोपकारक ! पयोदानेन मां पूरय ॥ १६५ ॥

शार्दूलविक्रीडित

पद्मां शैत्य हरी, नि धीवर वधी मत्स्यां नि कूर्मांप्रति
पक्ष्यां व्याध, जलास सूर्य, गज हे नालांसही नाशिती ॥
कंदां डुक्कर खाति, केवळ उरे हें नांव 'मोठें तळें'
हे पाथोद ! परोपकारक ! भरीं, देऊन मातें जळें ॥१६५॥

गद्यार्थ— (सरोवर, आपल्या दुःस्थितीचें वर्णन करून मेघाचा धांवा करीत आहे. ) थंडीनें माझ्यातील साऱ्या कमलांचा संहार केला, कोळ्यांनीं सर्व मत्स्य व कासवेंहि नाहींशीं केलीं, व्याधांनीं सर्व पक्षी नष्ट केले; सूर्यानें पाणी वाळवून टाकलें; ( कमळें जाऊन ) नुसते कमलवेलींचे नाळ राहिले होते तेहि हत्तींनीं उपटून घेतले, कमलवेलींचे कंद उरले होते ते डुकरांनीं खाऊन टाकले—आतां माझें 'मोठें तळें' हें नांव तेवढें उरलें आहे, तेव्हां हे परोपकारी मेघा ! मला जलदान करून पुन्हा भरून टाक. ( काप गेले; भोकें उरलीं अशी दशा. ) ●●●

शिखरिणी

तवैव प्रावीण्यं जलद ! जगदानन्दकरणं
यदम्भःपालीराहरसि खलसत्त्वाज्जलनिधेः ॥
निसर्गात्क्षारास्ता नयसि च कथंचिन्मधुरता-
मथासारैस्तासां युगपदुपकर्ताऽसि जगतः ॥ १६६ ॥

शार्दूलविक्रीडित

आनंदप्रद या जगा तवचि हें कौशल्य मेघा ! भलें !
पाणी पुष्कळ, दुष्टचित्तचि अशा घेसी समुद्रांतलें ॥
खारें मूळ, तरीहि गोड करिशी तें केंवि कोणा फळे !
देशी त्यासमवेत सौख्य जगता तूं वृष्टिधारांमुळें १६६

गद्यार्थ— हे मेघा ! तुझ्या एकट्याचेंच हें कौशल्य साऱ्या जगाला आनंददायी असें आहे कीं, खल म्हणजे दुष्ट, आहेत सत्त्व म्हणजे प्राणी ( भयंकर मत्स्य नक्रादि ) ज्याच्यांत अशा समुद्राचें पुष्कळ पाणी तूं ओढून घेतोस आणि मूळचें तें खारें पाणी, कसें कोण जाणे तूं गोड करतोस आणि त्या गोड पाण्याच्या वृष्टीसमवेतच सर्व जगाला सौख्य देत असतोस. ●●●

शार्दूलविक्रीडित

तापं लुम्पसि सर्वशः प्रकुरुषे मुक्ताफलं शुक्तिषु
क्षेत्रं सिञ्चसि, किञ्च पल्लवयसि श्रीखण्डमुख्यान्द्रुमान् ॥
क्षारं क्षारमिदं जलं जलनिधेरादाय जीमूत हे!
विश्वं जीवयसि, प्रसिद्धिकरणे प्रौढोऽस्ति कस्ते गुणान्?

शार्दूलविक्रीडित

तापा नाशिसि सर्वतां, वितरसी शुक्तींत मोत्यें नवीं
शेतें शिंपिसि, चंदनादि तरुतें तूं आणिसी पालवी ॥
मेघा! क्षारचि, अंधितून जल हें घेवोनिया खेचुनी
विश्वा जीवन देसि; सद्गुण तुझे वर्णूं शके कां कुणी?

गद्यार्थ— हे मेघा! सर्व बाजूंनीं, सर्वांचा ताप तूं हरण करतोस; शिंपल्यांत मोतीं उत्पन्न करतोस; शेती शिंपतोस, चंदनादि झाडांना पालवी उत्पन्न करतोस; समुद्रांतून अगदीं खारें खारें पाणी तूं खेचून घेतोस, आणि (तें गोड करून) सर्व विश्वाला जगवितोस! तुझे गुण वर्णावयास कोण समर्थ आहे?

●●●

आर्या

पाथोनिधिमधि पायो वितरसि पाथोद किं तेन!।
दिनकरकराभितप्तं चातकपोतं न तोषयसि ॥ १६८ ॥

आर्या

हे जलदा! जल देशी
जलनिधिला; बोल यांत फल काय?।
चातकपोत उन्हानें
पोळे त्या कां न तोषविसि? हाय! ॥ १६८ ॥

गद्यार्थ— हे मेघा! तूं समुद्रावर आपल्या पाण्याचा वर्षाव करतोस त्याचें फल काय सांग पाहू! इकडे पहावें, तों बिचारें चातकाचें पिल्लू, उन्हानें भाजून निघत आहे, त्याला मात्र पाणी पाजून, तूं तुष्ट करीत नाहींस, याला काय ह्मणावें? ●●●

रथोद्धता

चातकस्य मुखचञ्चुसम्पुटे नो पतन्ति यदि वारिबिन्दवः।
सागरीकृतमहीतलस्य किं दोष एव जलदस्य दीयते ॥१६९

रथोद्धता

वारिबिंदु जर चातकाचिया
एकही न पडला मुखांत या ॥
भूतलास जलधीच जो करी
दोष त्या कुठुनि अंबुदावरी? ॥ १६९ ॥

गद्यार्थ— चातकाच्या चोंचींत, (मेघांची वृष्टि चालू असतां) एखादाहि जलबिंदु पडला नाहीं तर, ज्यानें साऱ्या भूमितलाला समुद्र करून सोडलें आहे, अशा त्या मेघाला काय दोष? (चातकाची चोंच उघडली, तरी ती इतकी चिमुकली कीं, पावसाबरोबर असलेल्या वाऱ्यामुळें, तींत एकसुद्धा थेंब पडत नाहीं, असेहि केव्हांकेव्हां घडतें. त्याला मेघानें काय करावें? वरील १६८ व्या श्लोकातल्या प्रश्नाला अंशतः उत्तर या श्लोकांत आहे.)

●●●

रथोद्धता

याचते त्रिचतुरः पयःकणांश्चातको जलधरं पिपासया ॥
सोऽपि पूरयति विश्वमम्भसा हन्त हन्त महतामुदारता
॥ १६९अ ॥

रथोध्दता

याचिले उदकबिंदु थोडके
जैं घनाप्रति पिपासु चातकें॥
तो भरी अखिल विश्वही जळें
थोर हे किति उदार चांगले ॥ १६९ अ ॥

गद्यार्थ— चातक बिचारा तान्हेला होऊन मेघापाशीं तीनचार थेंब पाणी मागतो पण मेघ सारें विश्व जलानें भरून टाकतो! अहाहा! थोर लोकांची उदारताहि केवढी थोर! ●●●

मेरु सुवर्णपर्वतान्योक्ति

शार्दूलविक्रीडित

ये सन्तोषनिरन्तरप्रमुदितास्तेषां न भिन्ना मुदो
ये त्वन्ये धनलोभसंकुलधियस्तेषां न तृष्णा हता ॥
इत्थं कस्य कृते कृतः स विधिना तादृक्पदं सम्पदां?
स्वात्मन्येव समाप्तहेममहिमा मेरुर्न मे रोचते ॥१७०॥

शार्दूलविक्रीडित

**संतोषें मुदितांचिया न मनिंचे ते मोद वा मंगले**
**वित्तें लुब्ध अशांचिया न मनिंच्या तृष्णेस वा नाशिलें**
**ऐसा मेरु रची कुणास्तव विधी सौवर्ण मोठा निधि**
**ज्याचे स्वर्ण जिरे स्वतांतचि असा कोणा रुचे का कधीं ?**

गद्यार्थ-- ज्यांचीं हृदयें संतोषामुळें निरन्तर आनंदित आहेत ( अशाच्या हृदयात ज्या सुवर्णगिरि मेरूनें आपल्या अपार वैभवानें लोभ उत्पन्न करून ) त्यांच्या संतोषानंदित वृत्तींचा भंग करण्यात यश मिळविलें नाहीं; किंवा धनलुब्धाच्या मनातली धनतृष्णा ( त्याना नकोसे होईल इतके सुवर्ण देऊन ) मारून टाकली नाहीं ; असा तो सुवर्णाचा महान निधि, कीं ज्याच्या सुवर्णाची महती स्वतापुरतीच--असा मेरु ब्रह्मदेवानें उत्पन्न तरी कोणासाठीं केला आहे ? ( या याच्या निरुपयोगी-पणामुळें ) मला तो मुळीं आवडत नाहीं ●●●

## मौक्तिकान्योक्ति

वसततिलका

रत्नाकरात्परिहृता वसति. किमन्य--
दङ्गीकृत कठिनवेधनदु.खभार ॥
वक्षोजकुम्भपरिरम्भणलोलुपेन
किं किं न तेन विहित बत मौक्तिकेन ! ॥ १७१ ॥

वसततिलका

**रत्नाकरस्थ वसती निज सोडिली तीं**
**दु.खेंहि विंधन विधींतिल सोशिलीं तीं ॥**
**स्त्रीवक्षसंगतिसुखांतिल लालचीनें**
**केलें न काय नि किती बघ मौक्तिकानें ॥ १७१ ॥**

गद्यार्थ-- रत्नांचा साठा अशा समुद्रात वास लाभला, तरी तो सुद्धा सोडून ते बाहेर पडले ; स्वतःच्या देहाला आरपार भोंक पाडून घेण्याच्या भयंकर यातनाहि त्यानें सोसल्या ! स्त्रीच्या स्तनाचें आलिंगन लाभावें या लालचीनें मौक्तिकानें काय काय केलें नाहीं ! ●●●

अनुष्टुभ्

**मुक्ताहार ! गुणीभूय नोपसर्प्यः स्तनस्त्वया ।**
**विभवे यस्य काठिन्य व्यर्थं तदुपसर्पणम् ॥ १७१ अ ॥**

आर्या

**गुणयुत होउनि मुक्ताहारा ! जाऊं नको स्तनाजवळीं ।**
**जो कठिण वैभवातहि व्यर्थचि जाणें न का तयाजवळीं**

गद्यार्थ-- हे मोत्याच्या हारा, तू गुणवान् होऊन ( दोऱ्यात-ओवला जाऊन ) स्त्रीच्या स्तनाजवळ जाऊ नको. वैभवातच जो कठिण त्याच्याजवळ जाणे व्यर्थच असतें. ( गुण = दोरा व सद्गुण ) ( कठिन = स्तनाकडे घट्ट, माणसाकडे कठोर हृदयाचा) ( वैभव = स्तनाकडे तारुण्य; माणसाकडे वैभवकाळ. ) ●●●

## रंगान्योक्ति

वसततिलका

हे रङ्ग ! हेमतुलया तुलितोऽसि नित्य
मान जहीहि; किमु पश्यसि नो विशेषम् ? ॥
स्वर्णं सरत्नघटित नृपशेखरेषु
त्व पाप ! पामरवधूचरणेषु लीनः ॥ १७२ ॥

वसततिलका

**रंगा ! मिळे तुज सुवर्णतुला म्हणून**
**हर्षू नको, बघ तुम्ही किति भिन्न भिन्न ! ॥**
**रत्नासवे नृपशिरीं चढतें सुवर्ण**
**तूं क्षुद्र ! पामरवधूचरणींच लीन ॥ १७२ ॥**

गद्यार्थ--( पाश्चात्यानीं कृत्रिम रंग काढण्यापूर्वी प्राचीन काळीं रंग हे सोन्यामोलाने विकले जात असत. ) हे रंगा ! सुवर्णाचें वजन दुसऱ्या पारड्यात घालून तुझे नेहमीं वजन केलें जात असल्यानें ( महान् राजे, श्रीमंत, दाते स्वतःचीं सुवर्णतुला करतात तशी ) सुवर्णतुला तुला लाभली या घमेंडीनें, गर्वानें फुगून जाऊ नकोस. तुम्हा दोघांत केवढी भिन्नता आहे, ती तुला दिसत नाहीं का ? सुवर्ण हें रत्नांशीं निगडित होऊन राजाच्या शिरावर ( मुकुटरूपानें ) चढून बसत आणि क्षुद्रा ! तू हलकट स्त्रियांच्या पायीं लीन होऊन बसतोस. ( पूर्वी विलासी स्त्रिया, विशेषत वेश्या पायाचे तळवे रंगवीत असत. ) ( थोरामोठ्यांच्या चरित्रात्ल्या, कचित् चुकून एखाद्या बाबतीत साम्य स्वतात असलें, कीं तेवढ्यानें क्षुद्रानीं त्या थोरामोठ्यांची बरोबरी करू पहाणें हास्यास्पद नव्हे का ? गुपारी पार ग्यातो म्हणून टिळक, किंवा गुडघी रोग झाला म्हणून शिवाजी कोणी होतो काय ? मडकीं करणारा स्वत ला ब्रह्मदेव म्हणवू लागला ( प्रथमखंड-प्रकरण २ श्लोक ३९ ) किंवा कविता करता आली कीं, " मी कालिदास ,, ( प्रकरण २ श्लोक ३७ ) म्हणविणारासारखेंच हें.) ●●●

## रत्नान्योक्ति

द्रुतविलंबित

कनकभूषणसङ्ग्रहणोचितो यदि मणिस्त्रपुणि प्रणिधीयते ॥
न स विरौति न चापि स शोभते भवति योजयितुर्वचनीयता ॥१७३॥

द्रुतविलंबित

कनकभूषणिं योग्य जडावया
कथिलिं रत्न असें बसवोनिया ॥
कधि रडे न, न तें खुलतें जरी
मलिन योजककीर्ति ठरे परी ॥ १७३ ॥

गद्यार्थ—सोन्याच्या अलंकारांत जडवून बसविण्याच्या पात्रतेचें एखादें रत्न जर कोणी कथिलांत जडविलें तर, तें रत्न, स्वतः कांहीं रडून आक्रोश करीत नाहीं; किंवा, आनंदानें मोठें झळकत नाहीं; हें खरें; परंतु, ज्यानें ही योजना केली त्याच्या योजकतेबद्दल (म्हणजे अप्रयोजकतेबद्दल) त्याची मात्र निंदा झाल्याशिवाय राहात नाहीं, (संकोची वृत्तीनें, महान् पात्रतेच्या सज्जनानीं, परकृत अपमानाबद्दल कुरकुर न केली, म्हणून काय झालें ? *अपमान करणाराला कांहीं अक्कल नसावी काय ?*)

●●●

शार्दूलविक्रीडित

आघ्रातं, परिलीढमुग्रनखरैः क्षुण्णं च यच्चर्वितं
क्षिप्तं यद्भुत नीरसत्वकुपितेनेति व्यथां मा कृथाः ॥
हे सद्रत्न ! तवैतदेव कुशलं यद्वानरेणाग्रहा—
दन्तःसारविचारणव्यसनिना चूर्णीकृतं नाश्मना ॥१७४॥

शार्दूलविक्रीडित

हुंगे; चाटितसे; नखें कुरतडे; चावून फेकी दुरी
"नाहीं गोड" म्हणून वानर तुला संतापुनी तो, तरी–
कधी होइ न; तो चुरा न करितो, पाहावया आंतलें
ठेचोनी दगडांवरी, समज हें रत्ना ! तुझें भाग्य रे १७४

गद्यार्थ— हे रत्ना ! तूं माकडाच्या हातांत सांपडलेंस; तेव्हां तो तुला हुंगून पाहतो, चाटतो, नखांनीं कुरतडतो, चावतो, आणि आंत कांहीं गोड रस नाहीं, हें आढळल्यानें, रागावून, तुला भिरकावून देतो, यानीं तूं दुःखी होऊं नको ! प्रत्येक वस्तूंत, आंत काय आहे, हें पाहण्याचा माकडाचा जो स्वाभाविक नादिष्टपणा, त्याला अनुसरून, त्यानें, तुला दगडानें ठेचून तुझें चूर्ण केलें नाहीं, हेंच तुझें मोठें भाग्य समज. (अरसिकाचे हातीं काव्य, तसेच मर्कटाचे हातीं रत्नमणि. कोकिलाविषयीं असाच श्लोक ४९ याच प्रकरणांत पहा.)

●●●

## रोहिणी (चंद्रपत्नी) विषयक अन्योक्ति

वसततिलका

भो रोहिणि ! त्वमसि रात्रिचरस्य भार्या
ह्येनं निवारय पतिं सखि दुर्निवारम् ॥
जालान्तरेण मम सद्मनि संनिविष्टः
श्रोणीतटं स्पृशति किं कुलधर्म एषः ? ॥ १७५ ॥

वसंततिलका

हे रोहिणी ! तव निशाचर चंद्र नाथ
ठेवी तया अवखळास नियंत्रणांत ॥
जाळींतुनी मम गृहांत शिरून मागें
स्पर्शी करें जघन, हा कुलधर्म कां गे ? ॥ १७५ ॥

गद्यार्थ— हे रोहिणि ! तूं निशाचर चंद्राची पत्नी; तेव्हां आपल्या अवखळ उच्छृंखळ नवऱ्याला जरा आवरून धर. (स्वतःच्या घरांत किंवा बाहेर शेण खायला जातो, तिथें वाटेल तो धुमाकूळ घालूं दे; पण आतां हा, अधिक धीट होऊन) माझ्या (शेजारणीच्या) घरांत जाळींतून शिरून मागून, माझ्या श्रोणीभागास, करांनीं (किरणांनीं,) स्पर्श करतो, ही काय सभ्य माणसांची रीत झाली ? (व्यभिचारी बाहेरख्यालीं माणसाबद्दल त्याच्या बायकोकडे, शेजारणीची तक्रार.) रात्रिचर शब्दावर कोटी.

●●●

## लेखनी विषयक अन्योक्ति

स्रग्धरा

विप्रेभ्यः साधुदानं, रिपुजनसुहृदां चोपकारान्कुरुध्वं
सौजन्यं बन्धुवर्गे, निजहितमुचितं स्वामिकार्यं यथार्थम् ॥
श्रोत्रे ते तथ्यमेतत्कथयति सततं लेखनी भाग्यशालिन् !
नो चेन्नष्टेऽधिकारे मम मुखसदृशं तावकास्यं भवेद्धि ॥१७६॥

स्रग्धरा

"द्यावीं विप्रांस दानें; उपकृति करणें मित्रशत्रूंसही या
बंधूंशीं गोड वर्ते; स्वहितसह करी योग्य ती स्वामिसेवा
हे मंत्र्या ! लेखणी ही श्रवणिं तव वदे "यापरी वागसी न
(सत्ता) हुद्दा जाईल तेव्हां मलिन मुख तुझें होइ,
माझ्यासमान" ॥ १७६ ॥

गद्यार्थ— मंत्र्यांच्या कानावरची लेखणी त्याला म्हणते, ( "तुझ्या हाती अधिकार व संपत्ति आहे तोंवर ) ब्राह्मणांना चांगले दान दे; शत्रु असोत, मित्र असोत, सर्वांना उपकृत करून ठेव; नातेवाईकांशी सौजन्याने वाग; स्वतःचे हित व त्यांचबरोबर योग्य ते स्वामीकार्यहि कर." हे मंत्र्या! ( दुसरें कोण तुला एवढा सदुपदेश करणार आहे ? ) तूं भाग्यशाली ! म्हणून तुझ्या सतत कानाशीं लागून, ही लेखणी तुला असें सांगत आहे, कीं, जर तूं याप्रमाणें वागला नाहींस, तर तुझा एकदां का अधिकार नष्ट झाला, म्हणजे मग, तुझें मुख, हें माझ्या ( लेखणीच्या ) मुखासारखेंच ( मलिन ) होईल. ●●●

## वसंतान्योक्ति

उपजाति

पत्राणि जीर्णानि फलं विनष्टं
छाया गता पक्षिकुलैः प्रयातम् ।।
वसन्त ! जानीहि तवाशयाऽसौ
समुन्नतिं नैव जहाति वृक्षः ॥ १७७ ॥

उपजाति

सुकून पानें, फल नष्ट झालें
छायाहि गेली, खगही उडाले ॥
तुझीच आशा धरुनी वसंत !
'मोठेपणा' वृक्ष न सोडितात ॥ १७७ ॥

किंवा वसंततिलकेत—

पानें सुकून फलही जरि नष्ट झालें
छाया नुरे, खगहि सर्व जरी उडाले ॥
आशा तुझीच धरुनी निज 'उच्च' वृत्ति
धारे वसंत ! बघ वृक्ष न सोडिताती ॥ १७७॥

गद्यार्थ— पानें सुकून गेलीं, फल नष्ट झालें, सांवली उरली नाहीं, पक्षी उडून गेले, तरी, हे वसंता ! तुझ्या आशेवर हा वृक्ष आपली ( अक्षरशः ) उंच वृत्ति सोडीत नाहीं. ( ज्याच्या आधाराच्या भरंवशावर 'समुन्नत' सुद्धा आपली 'उन्नति' टिकवून धरतात—कठीण काळांत सुद्धां—तो केवढा भाग्यशाली ! ) ●●●

## विहीर, ( वापी ) कूपान्योक्ति

शार्दूलविक्रीडित

आस्तां तावदहो समुद्रमहिमा दूरेऽपि कर्णप्रियः—
स्तीरे यस्य पिपासयैव मरणं प्राप्नोति शीघ्रं जनः ॥
तस्मादम्बुनिधेर्वरं लघुसरः कूपोऽथवा वापिका
यत्र स्वात्मकरद्वयेण सलिलं पेपीयते स्वेच्छया १७८

शार्दूलविक्रीडित

ठेवा दूरचि हो समुद्रमहिमा—तो गोड कानां जरी
तान्हेनेंच मरे जिथें जन झणीं प्रत्यक्ष तीरावरी ॥
वाटे पुष्करिणी, विहीर अथवा छोटीं तळीही बरीं
स्वेच्छेनें जल ये कुणासहि पितां जेथून दोन्ही करीं १७८

गद्यार्थ— अहो ! वर्णन करतांना तो कानांना जरी गोड लागला तरी समुद्रमहिमा दूरच ठेवा ! कारण त्या समुद्राच्या प्रत्यक्ष तीरावर माणूस, अगदीं तहानेनेंच लौकर मरून जातें. म्हणून वाटतें, कीं, असल्या तुमच्या त्या समुद्रापेक्षां, पुष्करिणी, विहीर किंवा लहानसें तळें हीं सुद्धां फार बरीं,—ज्या ठिकाणीं आपल्या दोन्ही हातांनीं कोणासहि यथेच्छ पाणी पितां येतें. ( नुसत्या संग्रहशील श्रीमंतांपेक्षां, यथाशक्ति, अल्पस्वल्प, फूल नाहीं फुलाची पाकळी, देणारे गरीब बिचारे किती तरी बरे. ) ●●●

आर्या

नितरां नीचोऽस्मीति त्वं खेदं कूप मा कदाऽपि कृथाः।
अत्यन्तसरसहृदयो यतः परेषां गुणग्रहीताऽसि ॥१७९॥

आर्या

'मी नीच फार' म्हणुनी कूपा ! कष्टू नकोस; हृदय तुझें
अत्यंत सरस असुनी गुण घेती तूं सदैव दुसऱ्यांचे १७९

गद्यार्थ—( नीच=( विहिरीकडे ) खोल; ( अन्यत्र ) हल्का. सरस=( विहिरीकडे ) जलपूर्ण; ( अन्यत्र ) रसिक; हृदय=( विहिरीकडे ) अंतर्भाग; (इतरत्र ) मन, हृदय; गुण=( विहिरीकडे ) दोरी, पाणी काढण्याची; ( अन्यत्र=सद्गुण; ) हे कूपा ! 'मी फार नीच' या विचारानें उगाच तूं कष्टी होऊं नकोस. कारण तुझें हृदय अत्यंत सरस असून, परक्यांचें गुणग्रहण करण्यास तूं तत्पर आहेस. ( हृदय रसज्ञ असेल, व, दुसऱ्यांचे गुणग्रहण करण्याइतकी ऋजुता असेल, तर असा नीच मनुष्यहि थोरच समजला पाहिजे. ) ●●●

शार्दूलविक्रीडित

किं जातोऽसि चतुष्पथे ? घनतर छन्नोऽसि किं छायया ?
छन्नश्चेत्फलितोऽसि किं ? फलभरैराढ्योऽसि किं संनतः ? ॥
हे सद्वृक्ष ! सहस्व सम्प्रति सखे शाखाशिखाकर्षण —
क्षोभोत्पाटनभञ्जनानि जनतः स्वैरेव दुश्चेष्टितैः ॥ १८६ ॥

शार्दूलविक्रीडित

चौमार्गी रुजलास कां ? धरिसि कां तू दाट छाया अति ?
देशी त्यांतुनि कां फळें ? फलभरें तू नम्र कां खालतीं ? ॥
पापाचें फळ आपुल्याच तरु ! हें सोशी, करी जें जन-
चाळे-कोपुनि तोडिती तव फळें, फांद्या तुझ्या
ओढुन ॥ १८६ ॥

गद्यार्थ—आधीं, तू या चव्हाठ्यावर उगवलासच का ? बरें उगवलास तर उगवलास, पण, एवढी घनदाट छाया का धारण करतोस ? बरें; एकवेळ तेंहि चाललें असतें; पण, त्यातच तू फलसपन्न कशाला झालास ? बरें एवढ्यावरच भागावें तर तेंहि नाहीं. तू फलभार घेऊन नम्रपणें इतका खालीं का वाकलास ? हे वृक्षा ! या तुझ्या सान्या पापाचें फल म्हणजे आला गेला, आता तुझ्या फांद्यारूपी शेंड्या, धरून, ओरबाडून, फळें तोडीत, शाखा मोडीत राहणार, हें सर्व आता सोशीत बैस ! ( सर्व तऱ्हेची गुणसपत्ति असून, ती उघड्यावर माडून ठेवायची-तिचें योग्य तें सरक्षण करावयाचें नाहीं,—मग ती चोरावारी जाण्याशिवाय दुसरें काय होणार ? अरक्षित गुण हे प्राणघातक वैरी कसे ठरतात याविषयीं प्रकरण ३ मधील श्लो. १७ ' मास मृगाणा ' हा श्लोक पहावा ) ●●●

अनुष्टुभ्

छायामन्यस्य कुर्वन्ति तिष्ठन्ति स्वयमातपे ।
फलान्यपि परार्थाय वृक्षाः सत्पुरुषा इव ॥ १८७ ॥

अनुष्टुभ्

छाया अन्यांस देती जे उन्हातचि स्वतां जरी ।
फळें देती दुज्यांसाठीं, वृक्ष सत्पुरुषापरी ॥ १८७ ॥

गद्यार्थ—जे स्वता उन्हात तापत उभे राहून, छाया मात्र दुसऱ्याना देतात; आणि ( प्रसूतिवेदना स्वता भोगून ) फळेंहि दुसऱ्यानाच देतात, असे, वृक्ष, हे खरोखर सर्व प्रकारें सत्पुरुषासारखेच होत. ●●●

शार्दूलविक्रीडित

मूलं स्थूलमतीवबन्धनदृढं शाखाः शतं मांसला
वासो दुर्गमहीधरे तरुपते ! कुत्रास्ति भीतिस्तव ? ॥
एकः किन्तु मनागयं जनयति स्वान्ते ममाधिज्वरं
ज्वालालीवलयीभवन्नकरुणो दावानलो घस्मरः ॥ १८८ ॥

शार्दूलविक्रीडित

वृक्षा ! जाड नि घट्ट मूळ तुजला, शाखा किती पुष्ट या;
राहाया गिरि उंच;—कारण तुला कांहींच नाहीं भया ॥
आणी मन्मनिं भीति अल्प परि रे—दावानल क्रूर हा
ज्वालांच्या वलयांत रान अवघें जो खात आला
पहा ॥ १८८ ॥

गद्यार्थ—हे वृक्षा ! तुझे मूळ चागलें जाड व जमिनींत पक्कें जखडलेलें आहे तुझ्या फांद्या घट्टपुष्ट असून सख्येनेंहि पुष्कळ आहेत, तुझी वसति उच दुर्गम पर्वतावर आहे-असे सर्व पाहिलें, म्हणजे वाटतें कीं तुला भय कसाचें ? परतु माझ्या मनामध्यें एकच गोष्ट, थोडी भयव्यग्रता उत्पन्न करीत आहे; ती ही,—तो पहा क्रूर वणवा आपल्या ज्वालान्च्या वेटोळ्यात घेऊन सारें रान खात खात येत आहे. ( सर्व काहीं ठीक आहे असे वाटत असतें व मनुष्य निर्भयपणें वागत असतो त्याच वेळीं त्याच्या बेसावधपणाचा फायदा संकटें घेतील असा सभव असतो. तेव्हा सावधानपण सदा सर्वकाळ ठेवणें आवश्यक असतें. ) ( कै. शि. म. परांजपे यान्च्या काळातील निवडक निबधात, " तें झाड अजून आहे ना हो ? " या नावाचा एक लघुनिबध ( भाग १० पान ९० ) आहे, त्यातील व या श्लोकातील कल्पनासाम्य पहाणें अतिशय उद्बोधक होणारें आहे. ) ●●●

अनुष्टुभ्

पत्रपुष्पफलच्छायामूलवल्कलदारुभिः ।
धन्या महीरुहा येभ्यो निराशा यान्ति नार्थिनः ॥ १८९ ॥

आर्या

फल, पुष्प, पर्ण, छाया, वल्कल लांकुड, मूळ जे देती ।
तरुवर ते धन्य जगीं निराश कधिं याचकां न
जे करिती ॥ १८९ ॥

गद्यार्थ—पानें, फुलें, फळें, सावली, मूळ, वल्कलें, लाकूड यापैकीं, कोणत्या ना कोणत्या तरी प्रकारें, माणसाला उपकारक होणारे तरुवर, खरे धन्य होत; कारण, त्यांच्याजवळ आलेले कोणीहि याचक, निराश होऊन परत जात नाहींत. ●●●

आर्या

हिमसमयो वनवह्निर्जवनः पवनस्तडिल्लताविभवः ।
सर्वं सहसे यावत्तावद्द्रुम ! कुरु सदा परोपकृतिम् ॥ १९० ॥

आर्या

वणवे आणि हिंवाळे, द्रुतगति वारे, विजाहि, ज्या पडती।
सहन करूं शकसी तूं तोंवर कर हे तरो ! परोपकृति ॥

गद्यार्थ— थंडीचा गारठा, वणव्याची आग, सोसाट्यानें वाहणारे वारे, लखलखणाऱ्या विजा, हें सर्व सहन करण्याची, तुझ्यात जोंपर्यंत शक्ति आहे, तोंपर्यंत, हे तरो ! तू नित्य परोपकार करीत रहा. ●●●

आर्या

अध्वन्यध्वनि तरव पथि पथि पथिकैरुपास्यते छाया ।
विरल. स कोऽपि विटपो यमध्वगो गृहगत स्मरति ।१९१

आर्या

मार्गीमार्गीं तरु, ज्यां छायेस्तव सेवितात पांथस्थ ।
विरलचि परि तो तरु, ज्या घरीं जाउनीहि नित्य
स्मरतात ॥ १९१ ॥

गद्यार्थ— मार्गामार्गांतून झाडे असतात व रस्त्या[illegible] पांथस्थ कुणातरी वृक्षाच्या सावलीत बसतात[illegible] असा वृक्ष असतो, कीं, ते पांथस्थ घरीं पोंचल्यावर सुद्धा ज्याची आठवण काढीत असतात. (असे स्नेही दुष्काळ. पण प्रेमाची ओढ लावणारे क्वचित्. ) ●●●

उपजाति

कश्चित्तरु पल्लवमाददाति कश्चित्प्रसूनानि फलानि कश्चित् ।
पर करालेऽस्य निदाघकाले मूले न दाता सलिलस्य
कश्चित् ॥ १९२ ॥

उपजाति

तोडी कुणी पल्लव ते नवीन
फुलें फळें नेइ कुणी खुडून ॥
भयाण याच्या परि उष्णकाळीं
कुणी मुळाशीं न जलास घाली ॥ १९२ ॥

गद्यार्थ— कोणी झाडाची ताजी पालवी तोडून घेतो, कुणी फुलें, कुणी फळें खुडून घेतो. परंतु भयंकर अशा उन्हाळ्यात ( झाड बिचारें करपून जात असता ) याच्या मुळाशीं पाणी घालणारें मात्र कोणी नाहीं ! ( उपकार घेणारे सर्व, परंतु कृतज्ञतेनें उपकारकर्त्यांची परतफेड करणारें कोणी नाहीं ) ●●●

अनुष्टुभ्

अहो एषा वर जन्म सर्वप्राण्युपजीवनम् ।
धन्या महीरुहा येभ्यो निराशा यान्ति नार्थिनः ॥ १९३ ॥

अनुष्टुभ्

धन्य ते ! जे स्वयें होती सर्वांचें उपजीवन ।
धन्य वृक्ष ! कधीं देई निराशा याचकांस न ॥ १९३ ॥

गद्यार्थ— त्याचा जन्म धन्य कीं जे सर्वांची उपजीविका चालवतात; तद्वतच धन्य ते वृक्ष, कीं ज्यांच्यापाशीं येणारे याचक कधीं विन्मुख परत जात नाहींत. ●●●

वैद्यान्योक्ति

अनुष्टुभ्

वैद्यराज ! नमस्तुभ्य यमराजसहोदर ।
यमस्तु हरति प्राणान्वैद्य प्राणान्धनानि च ॥१९४॥

आर्या

वैद्यराज ! घ्या तुम्हां नमस्कृति ही ।
प्राणचि हरितो यम, परि,
हरिता प्राणासवें तुम्ही धनही ॥ १९४ ॥

गद्यार्थ— हे यमराजाचे सख्खे बंधु वैद्यराज ! तुम्हाला नमस्कार असो. ( यमाच्यापेक्षां आपण वरचढच ! ) कारण यम केवळ प्राण हरण करतो, पण तुम्ही प्राण आणि धन दोन्ही हरण करता ! ●●●

अनुष्टुभ्

वैद्यराज ! नमस्तुभ्य क्षपिताशेषमानव !
त्वयि विन्यस्तभारोऽयं कृतान्तः सुखमेधते ॥ १९५ ॥

आर्या

मानवजात्युच्छेदक ! वैद्यराज ! घ्या तुम्हां नमस्कार ।
राहे सुखांत यम हा तुम्हावरी टाकुनी स्वकार्यभार १९५

गद्यार्थ— अहो अखिलमानवजात्युच्छेदक वैद्यराज ! तुम्हास हा नमस्कार घ्या ! तुम्हावर आपल्या कार्याचा ( सर्व प्राण्याचा संहार करण्याचा ) भार टाकून यम अगदीं सुखात आहे. ●●●

अनुष्टुभ्

चिता प्रज्वलिता दृष्ट्वा वैद्यो विस्मयमागत ।
"नाहं गतो, न मे भ्राता,कस्येदं हस्तलाघवम् ?" ॥१९६॥

आर्या

जळती चिता बघोनी आश्चर्ये वैद्य हा स्तिमित झाला ।
मी, ममबंधु न गेलों, मग कोणी दाविली स्वहस्तकला ?

गद्यार्थ— चिता पेटलेली पाहून वैद्य आश्चर्यचकित झाला. (कारण हा रुग्ण याच्याकडे औषधास आला नव्हता.) तो म्हणतो, "या ठिकाणीं मी गलों नव्हतों, व ( मी त्याच्या मृत्यूची तयारी केली नव्हती, म्हणून अर्थात्, ) माझा भाऊ यमहि गेला नाहीं, मग या रुग्णाला ठार करण्याचें हें हस्त कौशल्य कोणाचें ? (आम्हा दोघांशिवाय माणसाला मृत्यु देणारें दुसरें कोणी नाहीं. ) ●●●

उपजाति

नटोऽपि दद्याद् गणकोऽपि दद्या—
त्समर्थित पाशुपतोऽपि दद्यात्।
वैद्य कथ दास्यति याचमानो
यो मर्तुकामादपि हर्तुकाम ? ॥ १९७ ॥

आर्या

नट, गणक, पाशुपतही विनवुनि धन एकवेळ देईल !
मरुं बघत्या हरु बघनो ( मरत्यासहि लुटतो जो )
विनवुनि तो वैद्य केवि देईल ? ॥ १९७ ॥

गद्यार्थ—नटहि एकवेळ देईल, कुडबुड्या ज्योतिषीहि देईल, कफल्लक शिवभक्तहि विनति केल्यास कदाचित् देईल ( हे तिन्ही दातृत्वशून्य समजले जात असावे ) पण मरू बघ णारालाहि हरू बघणारा ( मृत्युशय्येवरील रुग्णासहि लुटू पाह णारा ) वैद्य विनवूनसुद्धा कसचा देतो ! ●●●

अनुष्टुभ्

व्याधेस्तत्त्वपरिज्ञान वेदनायाश्च निग्रह ।
एतद्वैद्यस्य वैद्यत्व न वैद्य प्रभुरायुष ॥ १९८॥

अनुष्टुभ्

जाणणें तत्त्व रोगाचें वेदनास निवारणें ।
हेंच वैद्यत्व वैद्याचें–आयुष्याचा न तो धनी ॥ १९८ ॥

गद्यार्थ— रोगाचें अचूक ज्ञान करून घेणें, रुग्णाच्या वेदना दूर करणें, हें वैद्याचें वैद्यत्व होय वैद्य ( झाला म्हणून ) कांहीं कोणाच्या आयुष्याचा स्वामी नसतो. ●●●

शङ्करान्योक्ति

शार्दूलविक्रीडित

निष्प्राणे त्वयि भस्म क समभवन्नन्दादरश्चन्दने ?
क क्षौम कलयाचकार न कृती, कृत्तिं वसाने त्वयि ? ॥
धत्तूरस्पृहयालुता त्वयि गते तत्त्याज क केतकीं ?
स्वातन्त्र्याज्जहिहि त्वमीश्वर गुणाल्लोकोऽस्ति तद्ग्राहक ॥

शार्दूलविक्रीडित

भस्मा चर्चिसि तूं ,त्यजी तरि कुणी का चदनीं आदर ?
चर्मा पांघरसी, न कोण तरिही वस्त्रें धरी सुदर !
तूतें धत्तुर आवडे तरि कुणी दे केतकी टाकुन ?
नि संगें गुण शकरा ! त्यजिसि जे घेतील ते ते जन ॥

गद्यार्थ— तू आपल्या अगावर भस्माचा लेप देतोस, म्हणून काय, चदनलेपाविषयी कोणाचा आदर कमी झाला आहे ? तू हत्तीचें कातडें नेसून वसतोस, म्हणून सुदर रेशमी वस्त्रें कोणी शीत नाहीं ? तुला धोत्र्याचें फूल आवडू लागलें, म्हणून काय कुणी केवडा टाकून दिला आहे ? सर्व संगातून स्वतत्र होण्यास्तव हे शकरा तू जे जे गुण, ( चागल्या वस्तु ) टाकीत जाशील , त्या त्या वस्तूचे लोक ग्राहक आहेत. ( संपूर्ण नि संग होणें हें ध्येय ठीक आहे पण त्याचें व्यवहारात आचरण अशक्यच होत. कित्येक आश्रमातील वैराग्यशील पणाचे वर्तनाचे नियम जितके अधिक कडक तितका त्याचा मग अधिक—तितका अप्रामाणिकपणा अधिक , ढोंग अधिक. शाळावर गुरूनें बहिष्कार पुकारावा आणि शिष्यांनीं मुलें थेट विलायतेंत शिकायला पाठवावीं , गुरूनें पदयात्रा करावी आणि शिष्यांनीं घरापुढल्या मोटारींत नवनव्या मॉडेलची भर घालावी. आश्रमात सपत्नीक राहणाऱ्या विवाहितांनीं सुद्धा ब्रह्मचर्य पाळावें असा नियम करावा की लौकरच आश्रमात पाळणे हलू लागल्याचे प्रकार जगानें पाहिलेच आहेत. ) ●●●

## शङ्खान्योक्ति

आर्या

कीटगृह कुटिलोऽन्त: कठिन क्षाराम्बुसम्भवः शून्य। ।
शङ्ख श्रीपतिनिकटे केन गुणेन स्थितिं लेभे १॥ २०० ॥

वसततिलका

जो आत पोकळ नि वक्र, किड्यास वास
क्षारांबु–जात नि कठीणचि देह ज्यास ॥
कोण्या गुण परि कळे न च शखही तो
विष्णूसमीप पद उच्चचि मेळवीतो ? ॥ २०० ॥

गद्यार्थ— जो स्वता किड्याचें घर, आतून वक्र व पोकळ, ज्याचा जन्म खाऱ्या समुद्रात, आणि, ज्याचा देह अतिशय कठिण, असा शख कोणत्या गुणाच्या बळावर, श्रीविष्णूच्या जवळ स्थान मिळवून बसला तें काहीं कळत नाहीं ( सवस्ती अपात्र माणस, मोठ्या पदावर कशा चढतात, ह्या गूढाचा उकल होत नाहीं. शकराच्या डोक्यावर चढलेल धोतऱ्याच फूल ( श्लोक ९४ पहा ), देवमदिरावर चढलेला ताम्रकलश ( श्लोक २२ ), सुवर्णपजरातला कावळा ( श्लोक ३५ ), डोंगराच्या शिखरावर आरूढ झालेली धूळ ( श्लोक ९७ ), या सर्वांत हाच सूर आहे.)

●●●

शिखरिणी

क वाम्भोधौ जन्म क च वपुरिद कुन्दधवल
क चावासस्थान कृतमहह विष्णो करतलम् ॥
क नीचानामास्ये परिणतिरिय चुम्बननिधा—
न्निती्राय शङ्ख करुणकरुण रोदिति मुहु ॥ २०१॥

शिखरिणी

" समुद्रीं जन्मे मी तनु मज मिळे कुंदधवल
वसायाही लाभे सुविमल हरीचें करतल ॥
अशा मातें चुंबी पकडुनि मुखीं नीच जन तो "
म्हणोनी, का, वाटे, अतिकरुण हा शख रडतो २०१

गद्यार्थ— ( कोण्या वैरागी भिकाऱ्यानें शख वाजवला त्यात करुण सुर भासून कवि त्यावर उत्प्रेक्षा करतो— ) " मी महान् विशाल अशा समुद्रांत जन्मास आलों, कुदफुलासारखा स्वच्छ निर्मल असा देह मला लाभला, आणि रहायला जागा मिळाली श्रीविष्णूच्या पवित्र करामध्यें ! ही परिस्थिति कोठें १ आणि, आज हा नीच माणूस मला पकडून आपल्या मुखानें चुबीत आहे, ही परिस्थिति कोठें ? " अशा आपल्या दु:स्थितीच्या विचारानींच, जणू काय, हा शख वारवार अतिकरुण रडत आहे.

●●●

द्रुतविलबित

जलनिधौ जनन धवल वपुर्मुररिपोरपि पाणितले स्थिति ।
इति समस्तगुणान्वित शङ्ख ! भो कुटिलता हृदये न निवारिता ! ॥ २०२ ॥

द्रुतविलबित

जनन अंधित, शुभ्र तनू वरी
सतत वासहि विष्णुचिया करीं ॥
असुनि शख ! तुला सगळे गुण
हरिसि का हृदिंचें कुटिलत्व न ? ॥ २०२ ॥

गद्यार्थ— ( कुटिलता = शखाच्या आत मळसूत्रासारखी रचना असते ती, दुसरा अर्थ वक्रवृत्ति. ) समुद्र हें तुझ जन्म स्थान, देह शुभ्र निर्मल आणि वसति श्रीविष्णूच्या हातांत ! असे सारे गुण तुझ्यामध्यें असता, हे शखा ! तुझ्या आतली कुटिलता तू कशी काढून टाकीत नाहींस ? ( पण असा प्रश्न विचारणं हेंच शखपणाचें लक्षण आहे शखाला एवढें कळत असतें तर त्याला शख कोणी म्हटलें असतें ? )

●●●

## शुकान्योक्ति

आर्या

शुक ! तव पठनव्यसन नैव गुण किन्तु दूषणाभास ।
समज नि येनामरण शरण ते पञ्जरे वास ॥ २०३ ॥

आर्या

पठनीं ध्यास तुझा हा गुण न शुका ! सर्व सद्गुणाभास
जो आमरण तुला रे घडवी या पजरामधें वास ॥२०३॥

गद्यार्थ—हे पोपटा ! शिकवलेले शब्द ग्रहण करून, ते पाठ म्हणून दाखविण्याचा, हा जो ध्यास, तुझ्या अगीं आहे, तो, वास्तविक गुण नसून, गुणाचा नुसता आभास आहे—कारण यामुळें तुला आमरण या पिंजऱ्यांत राहणें कपाळीं आलें आहे ! ( अगचे गुणच कसे मारक ठरतात याचीं अनेक उदाहरणें श्लोक १८६ पहा. )

●●●

शिखरिणी

अमुष्मिन्नुद्याने विहगखल एष प्रतिपलं
विलोलं कालोलं कणति खलु यावत्कटुतरम् ॥
सखे तावत्कीर ! द्रढय हृदि वाचं च सरलां
न मौनेन न्यूनो भवति गुणभाजां गुणगणः ॥ २०४॥

शिखरिणी

इथें या उद्यानीं श्रवणकटु जों काकचि करी
मुखें काकाकाका क्षणभर शुका तोंवरि धरी– ॥
मनीं तूं बांधोनी सुदृढ, तव तें मंजु वचन
घटेना मोनानें कधि गुणिजनांचा गुणगण ॥ २०४ ॥

गद्यार्थ— या उद्यानात इथें हा दुष्टपक्षी डोंबकावळा, सारखा का का करून कर्णकटु जोंवर ओरडत आहे तोंवर हे पोपटा ! तुझीं तीं मञ्जुळ ( आणि विदग्ध ) वचनें तू आपल्या हृदयातच कोंडून जखडून ठेव. मोनानें काहीं गुणी माणसाचा गुणसमुदाय कमी होत नाहीं. ( श्लोक ५१ मध्यें कोकिलावरहि अशीच मौन धारणाची पाळी आलेली दिसेल. ) ●●●

शार्दूलविक्रीडित

वासः काञ्चनपञ्जरे नृपकराम्भोजैस्तनूमार्जनं
भक्ष्यं स्वादुरसालदाडिमफलं पेयं सुधाभं पयः ॥
पाठः संसदि रामनाम सततं धीरस्य कीरस्य मे
हा हा हन्त तथाऽपि जन्मविटपिक्रोडं मनो धावति ॥२०५॥

शार्दूलविक्रीडित

राहें कांचनपंजरीं, नृप करें सुस्नान घाली मला
डाळिंबं मधु खावया, अमृतसें हें दुग्धही प्यायला ॥
धोकें मी शुक रामनाम जरि हें लोकांत रात्रंदिन
जन्मे मी जिथ त्या सदा तरुकडे हें धाव घेई मन ॥२०५॥

गद्यार्थ— ( पंजरबद्ध पोपट म्हणतो ) मी सोन्याच्या पिंजऱ्यात रहात आहें, राजा स्वतः आपल्या कोमळ हातानीं मला स्नान घालतो ( किंवा साफसूफ करतो ) गोड रसदार डाळिंबें मला खायला मिळताहेत; अमृतासारखें दूध प्यायला मिळत आहे. सभेंत सतत मी धीरगंभीरपणें रामनामाचा जप करीत असतों .. .. ( हें सर्व खरें ) परंतु मी ज्या ठिकाणीं जन्मलों त्या झाडाच्या कुशींत ( ढोलींत ) जाऊन पडण्याची मनाला फार ओढ लागली आहे. ( अत्यंत श्रीमंत पारतंत्र्याला सुद्धा, अत्यंत दरिद्री स्वातंत्र्याची सर येत नाहीं. ) ●●●

उपजाति

सुभाषितस्याध्ययनानुरक्तं शुकं वराकाः प्रहसन्ति काकाः।
तमेव संसत्सु गिरं किरन्तं दृष्ट्वा भवन्ति त्रपया नतास्याः २०६

उपजाति

सुभाषिताभ्यासक पोपटातें
जे हांसती काक, बघूनिया, ते ॥
सभेंत त्या पाहुनि बोलतांना
लाजून खालीं करतात माना ॥ २०६ ॥

गद्यार्थ— गोडीनं सुभाषितं शिकत असलेल्या पोपटाला पाहून जे बापुडे कावळे त्याला हसत असतात, तेच, पुढें पोपटाला सभेंत, तीं सुभाषितें पाठ म्हणून दाखविताना पाहून, लज्जेनें माना खाली घालतात. ●●●

## शेषान्योक्ति

आर्या

युक्तोऽसि भुवनभारे मा वक्रां वितनु कन्धरां शेष !
त्वय्येकस्मिन् कष्टिनि सुखितानि भवन्ति भुवनानि ॥ २०७

आर्या

धरण्या नियुक्त भुवनें, शेषा ! तूं हालवूं नको मान ।
एक तुझ्या कष्टांवर भुवनें बसलीं सदा सुखावून २०७

गद्यार्थ— हे शेषा ! भुवनें उचलून धरण्यासाठीं तुझी नेमणूक आहे. तेव्हा तू थोडा सुद्धा खादा ( मान ) वाकडा करू नको ! एक तू कष्टत आहेस त्यामुळें सर्व भुवनें सुखी आहेत. ( एकाच्या आधारावर चालेल्या सत्तेत, किंवा एकत्र कुटुंबात, कर्त्याला क्षणभराची सुद्धा विश्रांति घेतां येत नाहीं ! जरा मान हलविली की सगळें गडगडलेच ! ) ●●●

अनुष्टुभ्

बहवः फणिनः सन्ति भेकभक्षणतत्पराः ।
एक एव हि शेषोऽयं धरणीधरणक्षमः ॥ २०७ अ ॥

आर्या

खाती बेडुक ऐसे होती कित्येक सर्प भूमिवरी ।
पृथ्वी उचलूं शकतो ऐसा हा एकमात्र शेष
परी ॥ २०७ अ ॥

गद्यार्थ—वेडूक खाणारे सर्प पुष्कळ आहेत. परंतु पृथ्वी उचलून धरण्याचें सामर्थ्य असलेला शेष हा एकमेव सर्प आहे.

●●●

## समुद्रान्योक्ति

उपजाति

तृषा धराया: शमयन्नशेषा य. सोऽम्बुदो गर्जति गर्जतूच्चैः ॥
यस्त्वेष कस्यापि न हन्ति तृष्णा स किं वृथा गर्जति निस्त्रपोऽब्धि. ? ॥ २०८ ॥

उपजाति

तृष्णा जगाची हरिली समग्र ते गर्जना मेघ करोत उग्र
हरी तृषा अब्धि न जो कुणाची निर्लज्ज तो गर्जत कां वृथाची ?

गद्यार्थ—या पृथ्वीची तहान जो पूर्णपणें शमवितो तो मेघ मोठी गर्जना करतो तर करो ! ( एवढी कामगिरी केली त्यानें प्रौढी मिरवणें एकवेळ ठीक आहे. ) पण जो हा समुद्र कोणाचीहि तृष्णा हरीत नाहीं, तो निर्लज्ज, कां उगाचच गर्जना करीत आहे ? ( काहींहि सत्कार्य न करता, केलेली प्रौढी शोभत नाहीं–उलट किंव वाटते. )

●●●

वसततिलका

स्वस्त्यस्तु विद्रुमवनाय नमो मणिभ्य
कल्याणिनी भवतु मौक्तिकशुक्तिमाला ॥
प्राप्त मया सकलमेव फल पयोधे !
यद्दारुणैर्जलचरैर्न विदारितोऽस्मि ॥ २०९ ॥

वसंततिलका

तीं पोंवळीं, मणिहि, शुक्ति तयांत मोतीं,
सारीं असोत लखलाभ तुझीं तुला तीं ॥
ना फाडिलें मज तुझ्या अतिघोर नक्रें
हे अब्धि ! यांत फल सर्व मला मिळालें ॥२०९॥

गद्यार्थ—( समुद्रांतली जल्पाउ संपत्ति मिळवावयास गेलेला, पण ती न लाभतां नक्राच्या तडाख्यांतून कसाबसा सुटून आलेला म्हणतो— ) हे समुद्रा ! पोंवळ्याचें तें वन, तीं रत्नें, त्या शिंपा आणि ते मोती हें सर्व तुझें तुलाच लखलाभ असो. (तुझ्या पोटांतल्या) भयंकर जलचरानीं, मला फाडून टाकलें नाहीं, एवढ्यानेंच मला (तुझ्यापासून) काय मिळावयाचें, तें मिळून गेलें. ( उदार, दाते म्हणून कीर्ति असलेल्याच्याकडे याचकानें जावें, तर काहीं पुरस्कार न मिळता, त्याच्या आश्रित दुष्टाच्या हातून जिवंत सुटल्यास, मान्य समजावें यास उद्देशून. श्लोक १२९ व १३७ यात असाच अर्थ आहे. )

●●●

शार्दूलविक्रीडित

एतस्मादमृतं सुरैः शतमखेनोच्चैःश्रवा: सद्गुण·
कृष्णेनाद्भुतविभ्रमैकवसतिर्लक्ष्मी समासादिता ॥
इत्यादिप्रचुरा. पुरातनकथाः सर्वेभ्य एव श्रुता
अस्माभिर्न तु दृष्टमत्र जलधौ मिष्ट पयोऽपि क्वचित् ! ॥

शार्दूलविक्रीडित

देवां सांपडली सुधा; शतमुखा उच्चैःश्रवा सद्गुणी
विष्णूला अतिगूढविभ्रमकरी लक्ष्मी मिळे यांतुनी ॥
वार्ता अद्भुत या जुन्या परिसल्या सर्वांमुखीं, या इथें
आम्हां अब्धिमधें परी न दिसलें पाणीहि गोडे कुठें !

गद्यार्थ—(अमृतमंथन प्रसंगीं) " या समुद्रापासून देवांना अमृत मिळालें, इंद्राला मोठा गुणी उच्चैःश्रवा हा अश्व मिळाला; अत्यंत अद्भुत चमत्कार दाखवणारी लक्ष्मी, हीं यातूनच विष्णूला मिळालीं " असल्या चित्रविचित्र पुराणकथा आम्ही सर्वांच्याच तोंडून ऐकत आलों, पण, या येथें समुद्रकिनाऱ्यावर, आम्ही येऊन तपास करतों, तर, त्या मोठमोठ्या गोष्टी राहू द्या; या समुद्रात नुसतें गोडें पाणीसुद्धा आम्हाला कोठ आढळलें नाहीं. ( मोठ्याची दंतकथांतून, काव्यांतून वर्णिलेली कीर्ति ऐकावी, व मग प्रत्यक्ष त्याचें दर्शन व अनुभव घडावा, व त्यानें संपूर्ण भ्रमनिरास व्हावा, असे प्रकार पुष्कळ वेळा घडतात. ताजमहाला-विषयीं काव्यांतून इतकी अतिशयोक्ति कवींनीं केली आहे कीं ती वाचून व मग ताजमहाल प्रत्यक्ष पाहून निराश, निरस्त—भ्रम झालेले लोक अनेक आहेत. )

●●●

शार्दूलविक्रीडित

पीयूषेण सुरा श्रिया मुररिपुर्मर्यादया मेदिनी
शक्र· कल्पतरुः शशाङ्ककलया श्रीशङ्करस्तोषितः
मैनाकादिनगा निजोदरगता सत्स्थानन स्थापिता–
स्तच्चूलीकरणे घटोद्भव–मुनिः केनापि नो
वारितः ॥ २११ ॥

शार्दूलविक्रीडित

**श्री, विष्णूस; सुधाहि देउन सुरां; पृथ्वीस सीमेमुळें**
**इंद्रा कल्पतरू; शिवा शशिकला देऊन त्वां तोपिलें॥**
**मैनाकादि गिरींस आश्रय दिला पोटांत तूं घालुनी**
**तूर्ते आचमितां अगस्ति, उदधे ! त्या वारिलें ना कुणी !**

गद्यार्थ—हे सागरा ! विष्णूला लक्ष्मी देऊन, देवाना अमृत देऊन, पृथ्वीला समुद्रवलयाची मर्यादा देऊन, इद्राला कल्पवृक्ष देऊन आणि शंकराला चंद्रकोर देऊन तू संतुष्ट केलेंस; तसेच मैनाकादि पर्वताना आपल्या पोटात आश्रय देऊन निर्भय केलेंस, पण बाबारे ! अगस्ति मुनीनें एका आचमनात तुला प्राशन केले त्यावेळीं त्याचा हात धरायला कोणीसुद्धा धावून आलें नाहीं ! (कोण येणार ? उपकार घेतात, ते कृतज्ञतेनें परतफेड करण्यासाठीं नव्हेच ! "गरज सरो–आणि वैद्य मरो" हीच जगाची रीत आहे.) ●●●

पृथ्वी

इतः स्वपिति केशवः कुलमितस्तदीयद्विपा–
मितश्च शरणार्थिनः शिखरिणा गणाः शेरते ॥
इतोऽपि वडवानलः सह समस्तसंवर्तकै–
रहो विततमूर्जितं भरसहं च सिन्धोर्वपुः ॥ २१२ ॥

पृथ्वी

**निजे इथचि विष्णु, शत्रुगणही तयाचा इथें**
**गिरी शरण येति तेहि निजले पहा हे इथें ॥**
**इथेंच वडवाग्नि अन् प्रलयमेघ सारे पहा**
**अहा किति विशाल भारसह अब्धिचा देह हा॥२१२॥**

गद्यार्थ—इथे विष्णु (आपल्या शेषशयनावर) झोपलेला आहे—तर येथे दुसरीकडे त्याच्या शत्रूचा गण पडलेला आहे; इंद्राच्या वज्राला भिऊन आश्रयाला आलेल्या डोंगराचे टोळके हि इथेच निजलेलें आहे; इथेच एकीकडे वडवाग्निहि आहे आणि त्याच्याच समवेत प्रलयमेघहि इथेंच आहेत, अहाहा ! किती अफाट, विशाल व केवढा भार सहन करणारा समुद्राचा देह हा ! ●●●

वसंततिलका

आदाय वारि परितः सरितां मुखेभ्यः
किं तावदर्जितमनेन दुरर्णवेन ? ॥
क्षारीकृतं च वडवादहने हुतं च
पातालकुक्षिकुहरे विनिवेशितं च ॥ २१३ ॥

वसंततिलका

**चोहींकडून जल घेत नदीमुखांचें**
**दुष्टाब्धिनें मिळविलें तरि काय साचें ? ॥**
**खारें करून, वडवाग्नित होमुनीया**
**पाताळिं कुक्षितचि ठेवुनि नेइ वाया ॥ २१३ ॥**

गद्यार्थ—चोहोंबाजूनीं नद्यांच्या मुखातलें पाणी घेऊन, या दुष्ट समुद्रानें (नदी ही स्त्री; त्याच्या 'ताडचें पाणी' पळविणें हा दुष्टपणा अशी कोटि !) शेवटीं मिळविलें तरी काय ? तर आधीं गोड होतें त्याला खारें करून टाकलें; नंतर त्याची वडवानलांत आहुति दिली, आणि शेवटीं पाताळाइतक्या खोल, अशा, आपल्या कुशींत (कोणाला मिळू नये अशा रीतीनें) ठेवून दिलें; (व अशा रीतीनें वाया मात्र घालविलें.) ●●●

आर्या

यद्यपि बद्धः शैलैर्यद्यपि गिरिमथनमुषितसर्वस्वः ।
तदपि परभीतभूधररक्षायां दीक्षितो जलधिः ॥ २१४ ॥

आर्या

**जरि सीमित शैलांनीं,**
**गिरिमथनें हरुनि सर्व जरि नेलें ।**
**तरि परभीत गिरींचें**
**रक्षण हें व्रत न अब्धिनें त्यजिलें ॥२१४॥**

गद्यार्थ—समुद्राला, तो अमर्याद पसरला असता, आवरून धरला, मर्यादा घातली, बांधून ठेवला तो डोंगरानी; घुसळून काढून, त्यातलीं सर्व रत्नें देवदानवाना चोरून नेण्यास साह्य केलें तेंहि मंदर नावाच्या एका (रवीचें स्वरूप घेतलेल्या) डोंगरानेंच ! (तेव्हा या कटु अनुभवावरून, खरें म्हणजे समुद्रानें डोंगराचें कायमचें वैरच धरावयास हवें होतें.) परंतु (महोदार माणसे शत्रूलाहि आश्रय देतात त्यास अनुसरून) (इंद्राच्या वज्रास भ्यालेल्या) मैनाकादि डोंगराचें संरक्षण करण्याचें समुद्राचें व्रत चालूच आहे ! ●●●

आर्या

किं खलु रत्नैरेतैः ? किं पुनरभ्रायितेन वपुषा ते ?
सलिलमपि यन्न तावत्तवार्णव वदनं प्रयाति तृषितानाम् ॥ २१५ ॥

आर्या

**रत्नें हीं तव, तनु या घननीलहि असुनि काय कामाची ?**
**जोंवरि हे उदधे ! तव जल हें हरितें तृषा न तृषितांची**

गद्यार्थ— हे समुद्रा ! जर तुझें हें पाणी तृषिताच्या तोंडांत जात नाहीं, तर, तुझ्या या रत्नांचा, किंवा मेघश्याम अशा देहाचा काय उपयोग ? ( गोरा गोमटा आणि कपाळ करटा ! )

अनुष्टुभ्

अधः करोषि रत्नानि मूर्ध्ना धारयसे तृणम् ।
दोषस्तवैष पाथोधे ! रत्नं रत्नं तृणं तृणम् ॥ २१६ ॥

अनुष्टुभ्

खालीं तूं ठेविसी रत्नें शिरीं घेतोस तूं तृणें !
तुझाच दोष हा अब्धे ! रत्न रत्न; तृणें तृणें ॥२१६॥

गद्यार्थ— रत्नांना तू खालीं ( नीच ) स्थान देतोस व गवताला तू डोक्यावर धारण करतोस, हा, हे सागरा ! तुझाच दोष आहे ! रत्नें तीं रत्नें, तृणें तीं तृणें !( सागर हा पृथ्वीवरील सर्व वस्तूत मोठा ! पण म्हणून काय त्यानें या श्लोकातल्या-सारखा पात्रापात्रविवेकाचा अभाव दाखविल्यास, जग त्याला नावें ठेविल्याशिवाय राहणार आहे ? )

●●●

## ( वायु-वादळ ) समीरणान्योक्ति

द्रुतविलम्बित

अहह ! चण्डसमीरण ! दारुणं किमिदमाचरितं चरित त्वया
यदिह चातकचञ्चुपुटोदरे पतति वारि तदेव निवारितम्

द्रुतविलंबित

अहह ! निर्दय चण्डसमीरणा !
करिशि घोर कशी कृति दारुणा ॥
पडति चातकचचुत जीं जलें ।
हरनि त्यांसचि, तूं न पडूं दिलें ॥ २१७ ॥

गद्यार्थ— हे प्रचंड वादळा, तू हें केवढें निर्दय काम करून ठेवलेंस, कीं, चातकाच्या चिमुकल्या चोंचीच्या पुडांत ( जें काय अल्पस्वल्प ) पाणी पडत होत तें ( तू आपल्या सोसाट्यानें दुसरीकडे वाहवून नेऊन ) पडूं दिलें नाहींस ( स्वताला उपयोग नसला तरी दुसऱ्याला तें मिळू न देणारे ग हाणीतले कुत्रेच हे.)

●●●

## सर्पान्योक्ति

शार्दूलविक्रीडित

मौली सन्मणयो, गृहं गिरिगुहा, त्यागः किलात्मत्वचो
निर्यत्नोपनतैश्च वृत्तिरनिलैरेकत्र चर्येदृशी ॥
अन्यत्रानृजुवर्तमा, द्विरसना, वक्त्रे विषं, वीक्षण—
सर्वामंगलसूचकं, कथय मो भोगिन् ! सखे किंन्विदम् ? ॥

शार्दूलविक्रीडित

रत्नें थोर शिरीं , गुहेंत वसती ; त्यागें त्वचाही झडे
खाणें वायु अयत्नलभ्य ; असली ही वृत्ति एकीकडे !
जाणें वक्र ; जिभाहि दोन, विष त्या तोंडांत दृष्टी पडे~
तेथें मंगलनाश सर्प वद रे हें सर्व कोणीकडे ? ॥२१८॥

गद्यार्थ— डोक्यावर महान रत्नें धारण करणें ( हें या ठिकाणीं श्रीमती ( वैभवाचें ) लक्षण न समजता गुणग्राहकतेचें लक्षण समजलें पाहिजे कारण यातील बाकीचें वर्णन मुनिमताचें आहे. ) गुहेंत राहणें, त्याग एवढा मोठा, कीं, अंगावरची त्वचा ( कात ) सुद्धा ( वारवार ) टाकणें ; अप्रयत्नानें, सहजीं मिळणारा वायु, हाच भक्षून चरितार्थ करणें, — ही ( एकंदर साधु, मुनि, तापस यांना शोभणारी ) तुझी दिनचर्या एकीकडे ; आणि अन्यत्र वाकड्या चालीनें चालणें, दोन जिभा असणें, तोंडात विषाचा साठा ठेवणें, आणि ज्याच्यावर दृष्टि पडेल त्याचें अमंगल्य ओढवायचें असे डोळे ...हें सारें कोणीकडे ? सर्पा ! याची संगति कशी लावावयाची सांग ! ( पूर्वीकडून तापस महात्मे दिसणाऱ्याच्या पोटांत अनेकदा सर्पांचे गुण एकवटलेले दिसतात अशीं उदाहरणें असतातच. )

●●●

## ( तडाग ) सरोवरान्योक्ति

वसंततिलका

आपेदिरेऽम्बरपथं परितः पतङ्गा
भृङ्गा रसालमुकुलानि समाश्रयन्ति ॥
सङ्कोचमञ्चति सरस्त्वयि दीनदीनो
मीनो नु हन्त कतमां गतिमभ्युपैतु ? ॥ २१९ ॥

वसंततिलका

आकाशमार्गिं खग भोंवतिंचे उडाले
सारे रसालमुकुलांप्रति भृंग गेले ॥
तूं आटतां परि सरोवर ! हीन दीन
जाती दयाजनक काय दशेस मीन ? ॥ २१९ ॥

गद्यार्थ— भोंवतालच्या पक्ष्यांनीं आकाशाचा मार्ग धरून ते उडून गेले ; भृंग आंब्याच्या मोहोराच्या आश्रयाला निघून गेले ; परंतु हे सरोवरा ! ( तू आटत जाऊन ) तुझ्या विस्ताराचा संकोच झाला, म्हणजे, गरीब बिचाऱ्या मत्स्यांची काय वाट होणार ? त्यांची स्थिति किती दयाजनक होणार !

●●●

शिखरिणी

इयत्यां सम्पत्तावपि च सलिलानां त्वमधुना
न तृष्णामार्तानां हरसि यदि कासार! सहसा॥
निदाघे चण्डांशौ किरति परितोऽङ्गारनिकरं
कृशीभूतः केषामहह परिहर्तासि खलु ताम्! २२०

शिखरिणी

असोनी आतां ही विपुल जलसंपत्ति तुजसी
तडागा! आर्तांची जर झणिं तृषा तूं न हरिसी
जधीं ग्रीष्मीं सूर्य प्रखर पसरी आग भवतीं
सुकोनी जातां तूं हरिशिल कुणाची तधिं किती?

गद्यार्थ— (एका तलावाला बधारा फार उंच असल्यानें दोरी लावून थोडें थोडें पाणी काढावें लागे; इतर तलावाकारखें काठावर जाऊन हातांनीं पिण्याजोगें नव्हतें त्याला उद्देशून—) हे तडागा! आज आता तुझ्यापाशीं एवढी मोठी जलसंपत्ति असून सुद्धां, तू जर, तहानेनें व्याकुल झालेल्याची तृष्णा त्वरित शांत करीत नाहींस, तर उन्हाळ्यात सूर्य जेव्हां प्रखर किरणांचे अंगार चोहोंकडे फेकीत असेल आणि तू जेव्हा पुष्कळ रोडावलेला असशील, तेव्हा कोणाची तहान शमविणार? (भरपूर वैभव असतां मुक्तहस्तानें दान न देता, हात आखडून धरणाऱ्या दात्यास उद्देशून.) ●●●

शार्दूलविक्रीडित

"याते मय्यचिरान्निदाघमिहिरज्वालाशतैः शुष्कतां
गन्ता क प्रति पान्थसन्ततिरसौ सन्तापमालाकुला?"॥
एवं यस्य निरन्तराधिपटलैर्नित्यं वपुः क्षीयते
धन्यं जीवनमस्य मार्गसरसो धिग्वारिधीनां जनु ॥२२१

शार्दूलविक्रीडित

"जातां मी सुकुनी निदाघरविच्या ज्वालांमुळें सत्वरी
जाती पांथ उन्हांत होरपळतां कोणाकडे हे तरी?"॥
चिंता ही मनिं लागुनी क्षय जया देहा सदा लागला
तो मार्गस्थ तडाग धन्य जगतीं! धिक्कार त्या अब्धिला

गद्यार्थ —(पावसाळ्यानंतर प्रत्येक तलाव संकोचून जातो यावर उत्प्रेक्षा—) "उन्हाळ्यातल्या सूर्याच्या शेंकडों ज्वालांनीं लौकरच मी सुकून गेल्यावर, अरेरे! विचारे वाटसरू उन्हानें होरपळून कोणाकडे जातील?" या नित्य चिंतेनें ज्याच्या देहाला सतत क्षय लागला आहे, अशा मार्गस्थ तलावाचें जीवन धन्य! सागराच्या जिण्याला धिक्कार! (स्वतः संपूर्ण रिक्त होईपर्यंत देत राहावयाचें, पण, आपल्या पश्चात् सुद्धा, याचकाचें काय होईल याच्या चिंतेनें जिवनपणीं क्षय लावून घ्यायचा, याहून मोठें दातृत्व कोणतें?) ●●●

## सारसान्योक्ति

शार्दूलविक्रीडित

आपूर्येत पुनः स्फुरच्छफरिकासारोर्मिभिर्वारिभि—
र्भूयोऽपि प्रविजृम्भमाणनलिनं पश्येम तोयाशयम्॥
इत्याशाशततन्तुबद्धहृदयो नक्तं दिनं दीनधीः
शुष्यत्स्यातपशोषितस्य सरसरेस्ती जरत्सारसः ॥ २२२ ॥

शार्दूलविक्रीडित

"लाटा डोलति, मत्स्य खेळति, भरो पेशा जळानें तळें!
पद्में त्यांत पुन्हां फुलोत—बघण्या हें दृश्य केव्हां मिळे?"
सूर्यानें सुकल्या तळ्याजवळ, या आशा धरोनी मनीं
राहे सारस वृद्ध दीन झुरणी लागून रात्रंदिनीं ॥ २२२

गद्यार्थ— "ज्याच्यात लाटा हालत आहेत, मासे खेळत आहेत, ज्याच्यात पुन्हा कमलें फुलून आलीं आहेत असलें तळें केव्हां पाहायला मिळेल" अशा आशेच्या शेंकडों ततूंनीं गुरफटलेल्या हृदयानें, म्हातारा दीन सारस, उन्हानें सुकलेल्या सरोवराच्या काठाशीं रात्रदिवस झुरत आहे! (त्याला दिसायला हवें असलेलें दृश्य मोठें रम्य व सर्वजनानंदजनक असलें तरी मोठ्या लोककल्याणाच्या मंगल विचारानीं, तो थोडाच प्रेरित झाला आहे? त्याला, त्यातलें त्याचें साध्य तेवढें हवें आहे!) ●●●

## सिंहान्योक्ति

शिखरिणी

दिगन्ते श्रूयन्ते मदमलिनगण्डाः करटिनः
करिण्यः कारुण्यास्पदमसमशीलाः खलु मृगाः॥
इदानीं लोकेऽस्मिन्ननुपमशिखानां पुनरयं
नखानां पाण्डित्यं प्रकटयतु कस्मिन् मृगपतिः?॥

शिखरिणी

दिगन्तीं ऐकूं ये ध्वनि गज मदोन्मत्त करिती
दया तत्नारींची! समबल पशू नान्य दिसती॥
जगीं आतां कोणा, असुनि अतितीक्ष्णाग्रहि नखें
करावें सिंहानें प्रकट नखपांडित्यचि निकें? ॥ २२३ ॥

गद्यार्थ— (ही व पुढच्या २-३ सिंहान्योक्ति या जगन्नाथ पंडिताच्या आहेत. त्याला स्वतःच्या कवित्वाचा (बऱ्याच अर्थी सकारण) फार गर्व होता. प्रत्यक्ष कवित्व व काव्य या विषयाच्या श्लोकांतहि त्यानें इतर कवींना तुच्छ ठरविणारे पुष्कळच श्लोक अगदीं स्पष्टोक्तीनें केलेले आहेत. त्यापैकीं ७-८ श्लोक प्रकरण २ मध्यें दिलेले आहेत. आता इतर कवींना तुच्छ ठरविण्याचें काम, स्वतःला सिंह व इतरांना हत्ती वगैरे ठरवून तो अन्योक्तीनें करीत आहे, हें सूत्र ध्यानीं ठेवूनच, या अन्योक्ति वाचल्यास त्याचें योग्य रसग्रहण व मर्मज्ञान होईल.) (मला घाबरून पळालेल्या) मदोन्मत्त हत्तींचे चीत्कार आता दिगन्तात ऐकू येत आहेत. (इतके ते दूर पळाले; माझ्या समोर उभे राहून सामना करण्याची गोष्टच कशाला ?) त्यांच्या बायका हत्तिणी, (अद्याप इकडे तिकडे आहेत, पण स्त्री जात म्हणून) त्यांच्याविषयीं केवळ दया दाखविणेंच इष्ट. (स्त्रीवर शस्त्र कसें उगारणार ?) बरें, इतर पशूविषयी विचार केला, तर, माझ्याशीं समबल कोणीच नाहीं. (तुल्यबल प्रतिस्पर्ध्यांशिवाय इतरांशीं युद्ध हें भ्याडाचें काम.) तेव्हा आता, अत्यंत तीक्ष्ण अशा या नखाचे पांडित्य, या जगात सिंहानें कोणापुढे (कोणाच्या देहावर) प्रकट करावें ? (जिंकायला कुणी राहिलें नाहीं म्हणून हळहळणाऱ्या अलेक्झांडरच्या धर्तीवरच जगन्नाथाची ही हळहळ आहे. जगन्नाथाला 'पंडित कवि' म्हणत; तेव्हां या श्लोकांतल्या "नखाचें पांडित्य" या शब्दाला विशेष अर्थ उत्पन्न होतो. ●●●

शिखरिणी

न यत्र स्थेमानं दधुरतिभयभ्रान्तनयना
गलद्दानोद्रेकभ्रमदलिकदम्बाः करटिनः ॥
लुठन्मुक्ताहारे भवति परलोकं गतवतो
हरेरद्य द्वारे शिव शिव शिवानां कलकलः ॥ २२४

शिखरिणी

मदोद्रेका प्याया फिरति अलि, ऐसे गज जियें
भ्रमोनी भीतीनें नयन, नच राहू धजति ते ॥
हरीच्या त्या द्वारीं – जिथ अमित मोती विखुरले
अरेरे ! तो जातां तिथ भुंकति कोल्हे नि कुतरे ॥ २२४ ॥

गद्यार्थ—ज्याच्या वाहत्या मदाच्या पाण्यासाठीं, त्या भोंवतीं भुंगे फिरताहेत, असे मदमत्त हत्तीसुद्धा, अतिभयानें डोळे भ्रमून जाऊन, ज्या सिंहाच्या (गुहेच्या) दाराशीं, नुसते उभे राहू धजले नाहींत, व जेथें (सिंहानें मारलेल्या हत्तींच्या गण्डस्थ) मौक्तिकाचा सच पडलेला आहे, अशा त्या दाराशीं, सिंह परलोकीं गेल्यावर हर ! हर ! आज कोल्हीं कुत्रीं भुंकत आहेत ! (सर्वसाधारणपणें महापराक्रमी पुरुषाच्या पश्चात् क्षुद्रांनीहि मिरवावें, या घटनेस तर हा श्लोक लागू आहेच. पण "माझ्या जिवंतपणीं मोठे मोठे कविगज (मी या) कविसिंहापुढे नुसते उभे सुद्धा राहू शकले नाहीत. पण मी मेल्यावर वाटेल तो भिकार कविब्रुव सुद्धा कवि म्हणून मिरवू लागेल" याची हळहळ जगन्नाथानें व्यक्त केल्याची शक्यता दिसते.)

●●●

शिखरिणी

स्थितिं नो रे दध्याः क्षणमपि मदान्धेक्षण सखे !
गजश्रेणीनाथ ! त्वमिह जटिलायां वनभुवि ॥
असौ कुम्भिभ्रान्त्या खरनखरविद्रावितमहा—
गिरिग्रावग्रामः स्वपिति गिरिगर्भे हरिपतिः ॥ २२५

शिखरिणी

मदाच्या धुंदीनें भ्रमुनि गजराजा ! क्षणहि या—
नको राहूं येथें अतिगहन रानांत सखया ! ॥
नखांनीं फोडी जो, गज समजुनी, प्रस्तर महा
(किंवा, गजचि समजोनी खडक हा !)
गुहेमध्यें ऐसा प्रबल निजला सिंह वघ हा ॥ २२५ ॥

गद्यार्थ— (अंधुक प्रकाशात किंवा अर्धवट झोंपेत काळा खडक पाहून (स्वसादृश्यानें) तो हत्ती आहेसें वाटून सिंहानें त्यावर हल्ला चढवून, आपल्या तीक्ष्ण नखांनीं, त्याचा सुद्धा चक्काचूर करून टाकला, ही पार्श्वभूमि.) हे गजराजा ! मदाच्या धुंदीनें नेत्र अंध झाल्यामुळें, या घनदाट अरण्यात, क्षणभर सुद्धा उभा राहू नकोस; प्रचंड काळ्या खडकाला (स्वसादृश्यानें चुकून) हत्तीच समजून आपल्या तीक्ष्ण नखांनीं फोडून टाकणारा (असा महाप्रबल) सिंह, या येथें गुहेंत निजलेला आहे. (जगन्नाथानें इतर कविगजांना त्याच्या व जगन्नाथकविसिंहाच्या परस्पर सामर्थ्याची या अन्योक्तीनें जाणीव करून दिलेली आहे. परंतु गल्या साठ वर्षांतल्या प्रत्येक सुज्ञ मराठी वाचकाला हा श्लोक मुखोद्गत झाला होता... लोकमान्यांनीं आपल्या 'केसरी' पत्रावर हा श्लोक घातला, त्यात केसरी=सिंह या विषयीं ही अन्योक्ति इतकाच अर्थ नव्हता ! हिंदुस्थानच्या प्रजेला सिंह करून तिच्या सुप्त सामर्थ्याची खुद्द तिला व मदान्ध गजरूपी इंग्रजी साम्राज्यसत्तेला, जाणीव करून देऊन प्रजेला धीर देत, राज्यकर्त्यांना घाबरवून सोडण्याचा, लोक-

मान्याचा उद्देश स्पष्ट आहे,— हे इंग्रजरूपी मदान्ध गजराजा! या भयंकर अरण्यात (खंडप्राय हिंदु देशात) क्षणभर सुद्धा राहू नको. (साठ वर्षांच्यापूर्वीची चले जाव Quit India' ही घोषणा!) तू तर रक्तामासाचा प्राणी; पण हत्तीच समजून प्रत्यक्ष प्रचंड काळ्या खडकाचाहि (तुझ्याहून अधिक क्रूर कठोर पाषाणहृदयी असे काळे मुसलमानादि आक्रमक त्याचाहि) ज्यानें आपल्या तीक्ष्ण नखानीं चक्काचूर करून टाकला, असा महापराक्रमी हिंदुजनतारूपी सिंह, येथें गुहेत निजला आहे. जनतेला तिच्या सुप्त सामर्थ्याची आता जाणीव नाहीं, पण एकदा का ती जागृत झाली, व तिच्या इतिहासप्रसिद्ध सामर्थ्याची प्रतीति घडली, की, हे परकी राज्यकर्त्यांनों! तुम्हाला पळता भुई थोडी होईल. स्वातंत्र्यवीर सावरकरानीं आपल्या गोमांतक काव्यात याच ऐतिहासिक सामर्थ्याचें उद्गान केलें आहे —

"जो जो मार्गे, आला आसुर शक्तींच्या कीं भरावरी।
भारतीय यज्ञाश्व नाचला, त्याच्या त्याच्या उरावरी॥
× × ×
पठाण, मोंगल, तुर्क, इराणी, दाढी तितुकी सामोरी।
पुर्तुगिज वलंदाज फिरंगी टोपी तितुकी पाठिवरी॥
परि तितुक्यांही सहित मराठा वीर दुहेरी झुंज करी
पऱ्या हस्तें उपटित दाढी, टोपी उडवी दुज्या करीं"

३०० वर्षानंतर जगन्नाथाचा हा श्लोक लोकमान्याना उपयोगी पडावा, यावरून अन्योक्तींचें अमर सामर्थ्य दिसून येतें ●●●

अनुष्टुभ्

नाभिषेको न संस्कारः सिंहस्य क्रियते वने
विक्रमार्जितसत्त्वस्य स्वयमेव मृगेन्द्रता ॥ २२६ ॥

अनुष्टुभ्

सिंहा वनीं न संस्कार अभिषेक न लाभतो।
स्वबलें श्रेष्ठ जो होई स्वयेंचि मृगराज तो ॥२२६॥

गद्य— (मानवामध्यें, राजा होण्यास, नाना संस्कार व अभिषेकादि विधि, आवश्यक असतात; पण) सिंहाला रानामध्यें कोठले संस्कार आणि कोठला अभिषेक? पण स्वपराक्रमानें जो श्रेष्ठत्व मिळवितो, तो आपोआपच मृगराज होतो. (आणि मोठे सत्कारपूर्वक अभिषिक्त असे घोड्यावर बसलेले रडतराव काय थोडे आहेत? तेथें पाहिजे जातीचें!) ●●●

शिखरिणी

पिब स्तन्यं पोत! त्वमिह मददन्तावलधिया
दृगन्तानाधत्से किमिति हरिदन्तेषु परुषान्॥
त्रयाणां लोकानामपि हृदयतापं परिहर—
न्नयं धीरं धीरं ध्वनति नवनीलो जलधरः ॥२२७॥

शिखरिणी

सुखें पी दुग्धातें, हरिशिशु! महा निष्ठुर अशी
दिगन्तीं ते हत्ती समजुनिच कां दृष्टि करिशी?॥
जलें, त्रैलोक्याच्या हृदयपरितापास हरितो
असा तो हा येथें नवजलद गंभीर घुमतो ॥ २२७॥

गद्यार्थ— हे सिंहाच्या छाव्या! सुखानें आईचें स्तनपान कर दिगंतात ते मदोन्मत्त हत्ती समजून का उगाच उग्र दृष्टीनें तिकडे डोळे ताणून पहात आहेस? (रंग सादृश्यानें व ध्वनिसाम्यानें तू फसलास.) अरे! तो हत्ती नव्हे; तर तिन्ही लोकाचा, आपल्या जलवृष्टीनें, हृदयदाह शमविणारा, श्याम वर्णाचा, नवजलधर मेघ, आपल्या धीर गंभीर वाणीनें घुमत आहे! (मोठ्याचें सर्वच मोठें! त्याचे भ्रम, त्याचें वेड सुद्धा मोठें! उंदीर मारणाऱ्या क्षुद्राचीं पराक्रमस्थानें हीं नव्हत. अगदीं बालसिंहालसुद्धा मत्त हत्ती हाच 'खेळायला' लागतो!) याशिवाय प्रथम खंडांतील प्रकरण १४ मध्यें श्लोक ५ 'क्षुत्क्षामोऽपि जरा', तसेच प्रकरण १३ मधील श्लोक १ 'को वीरस्य', श्लोक ४ 'विनाप्ययैर्वीरः', श्लोक ११ 'सिंहः शिशुरपि', श्लोक ८ 'स्वल्प स्नायुवसा' हेहि सिंहान्योक्तिच आहेत. ●●●

शार्दूलविक्रीडित

एणः क्रीडति मूषकश्च खनति द्वीपी च गर्वायते
क्रोष्टा क्रन्दति वल्गते च शशको वेगाद्दुरुर्धावति ॥
निःशङ्कः करिपोतकस्तरुलतामुन्मोटते लीलया
हा हो सिंह! विना त्वयाऽद्य विपिने कीदृग् दशा वर्तते ॥

शार्दूलविक्रीडित

उंडारे मृग; भूमि उंदिर खणी; चित्ता मदें डोलतो
कोल्हा ओरडतो, ससा बडबडे, वेग रुरू धांवतो ॥
लीलेनें करिपोतही तरुलता निःशंक उन्मूलती
झाली हाय! वनांत काय दुदशा सिंहा! तुझ्या मागुतीं

गद्यार्थ— (सिंहाच्या नुसत्या वासानें वा दूरागत गर्जनेनें ज्याची पळापळ सुरू व्हायची ते—) हरिण (आनंदानें उडारून) खेळत आहेत, उंदीर (स्वस्थपणें) भूमि उकरीत आहे; चित्ता गर्वात

डुलत आहे ; कोल्हा ओरडत आहे, ससा बडबडत आहे, रुरू नामक हरिण वेगान इकडे तिकडे धावत आहे ; कसलीहि धास्ती न वाटता हत्तींचीं पिल्ले खुशाल तरल्ता उपटीत आहेत! हाय हाय रे सिंहा! तू नसल्यानें आज वनात काय ही दुर्दशा! ( ज्याची भीति, दरारा असावयाचा ते गेले आणि क्षुद्राचें प्राबल्य माजलें! )

●●●

आर्या

जठरज्वलनज्वलताऽप्यपगतशङ्कं समागताऽपि पुरः ।
करिणामरिणा हरिणा हरिणाली हन्यता नु कथम्? ॥

आर्या

जरि हरिणावलि आली चालत नि:शंकचित्त सामोरी।
जळतहि जठराग्नीनें; तरि करिरिपु हरि तिला कसा मारी? ॥ २२९ ॥

गद्यार्थ—जठराग्नीच्या ज्वालानीं ( भुकेच्या वेदनानीं ) जळत असलेल्या सिंहाच्या, अगदीं समोर नि:शंकपणें, हरिणाचा कळपचा कळप, आपण होऊन चालत आला, तरी 'हत्तीचा शत्रु' (अशा श्रेष्ठ पदवीचा) हा सिंह त्याला कसा मारील? (मानी पुरुष संकटकाळींसुद्धा, स्वतःच्या मोठेपणाला न शोभणारें काम करण्याइतक्या, खालच्या पातळीवर, उतरत नाहींत. यान अर्थाचा श्लोक ५ प्रकरण १४ पहा. )

●●●

आर्या

धीरध्वनिभिरलं ते नीरद! मे मात्रमासिको गर्भः ।
उन्मदवारणबुद्ध्या मध्ये जठरं समुच्छलति ॥ २३० ॥

आर्या

( सिंही म्हणे— )
"घना! तू गर्जु नको! गर्भ एक महिन्याचा।
ध्वनि भासुनि हत्तीचा, उदरीं उसळयाच मारितो साचा ॥ २३० ॥

गद्यार्थ—( सिंहीण मेघाला म्हणते, ) "अरे बाबा तुझें तें धीर गंभीर गर्जित तू बंद कर! माझ्या गर्भात एकच महिन्याचा जीव वाढत आहे, त्याला, तुझा ध्वनि हा उन्मत्त हत्तीची गर्जनाच वाटून ( त्याच्यावर हल्ला करण्यासाठीं ) तो गर्भस्थ बाल पोटात उसळ्या मारीत आहे. ( श्लोक २२७ मधील अगा यर पिण्याच्या सिंहशिशूच्या पुढे या गर्भस्थ शिशूचें पाऊल! दोन्ही श्लोकात, इतर प्रौढ कवींच्या काव्यरूपी ( मदमत्त ) हत्तीला जिंकण्यासाठीं जगन्नाथ कविसिंहाचें बालवयाचेंच काय पण गर्भस्थ काव्य सुद्धा उसळ्या मारीत आहे अशी गर्वोक्ति! )

●●●

अनुष्टुभ्

सूकर.—
"दश व्याघ्रा जिताः पूर्वं सप्त सिंहास्त्रयो गजाः ।
पश्यन्तु देवता: सर्वा अद्य युद्धं त्वया मम" ॥ २३१ ॥

सिंह—
"गच्छ सूकर! भद्रं ते! ब्रूहि "सिंहो जितो मया" ।
पण्डिता एव जानन्ति सिंहसूकरयोर्बलम्" ॥ २३१अ

अनुष्टुभ्

डुक्कर सिंहास म्हणतो—
"तीन हत्ती, सात सिंह, जिंकिले वाघ मी दहा!
यु[illegible]ज तुझें माझें देवांना, द्दणतों, पहा! ' ॥२३१॥

सिंह प्रत्युत्तर करतो—
"जा सूकरा! भलें होवो! सांग "मी सिंह जिंकिला."
जाणती सुज्ञ हे मान तुझ्या माझ्या बलाबला ॥२३१॥अ

गद्यार्थ— डुकर ( बढाई मारीत ) सिंहाला म्हणतो, "मी यापूर्वीच दहा वाघ, सात सिंह व तीन हत्ती जिंकले आहेत. आज आता, सिंहा! चल तुझं माझं युद्ध होऊंदे–देवाना म्हणावें, बघा तर खरे!" सिंह त्यास प्रत्युत्तर करतो— "हे सूकरा! जा तुझें कल्याण होवो! (खुशाल जगाला ओरडून) सांग, कीं मी सिंहाला जिंकलें" तुझं बल किती व माझें किती तें सुज्ञाना माहीत आहे!" ( नीच जन केव्हा केव्हा थोराना मुद्दाम खिजवून, चिडवून, डिवचून, "या आमच्याशीं सामना करायला" असे आव्हान देत असतात. उद्देश असा, कीं, त्याना आपल्या नीच व खालच्या पातळीवर आणावें पण खरे थोर असतात, ते या मोहाला बळी न पडता, आपली पातळी उच्चच राखतात )

●●●

शार्दूलविक्रीडित

निद्रामीलितलोचनो मृगपतिर्यावद् गुहां सेवते
तावत्स्वैरममी चरन्तु हरिणाः स्वच्छन्दसञ्चारिणः ॥
उन्निद्रस्य विधूतकेसरसटाभारस्य निर्गच्छतो
नादे श्रोत्रपथं गते गतधियः सन्त्वेव दीर्घायुषः ॥२३२॥

शार्दूलविक्रीडित

**निद्रामीलितनेत्र सिंहचि गुहेमध्यें पडे जोंवरी**
**स्वच्छन्दें हरिणें फिरोत अवघीं चोहींकडे तोंवरी ॥**
**जेव्हां झाडुनि केश, जागृत, निघे बाहेर तो सत्वर**
**ऐकूं ये धृतिनाशक ध्वनि तदा रक्षो तयां ईश्वर॥**

गद्यार्थ— झोंपेची झापड असल्यानें, डोळे मिटून, सिंह जोंवर आपल्या गुहेंत पडून आहे, तोंवर स्वच्छद फिरणारीं हरिणें खुशाल सर्वत्र वावरोत. पण एकदा का, तो जागा होऊन, आपली आयाळ झटकून बाहेर पडेल, व (ऐकणाराची बुद्धि, धैर्य, नष्ट करणारी आपली ती) गर्जना करील, तेव्हा, ती ऐकून गलितधैर्य, चलितबुद्धि झालेल्या हरिणाना बिचाऱ्याना परमेश्वर दीर्घायु करो! (थोर दिसले नाहींत तोंवर क्षुद्राची ऐट!)

०००

अनुष्टुभ्

जात. स्तन्य न जग्राह कण्ठीरव किशोरकः।
चक्षुर्व्यापारयामास कुञ्जे कुञ्जरशालिनि ॥ २३३ ॥

अनुष्टुभ्

**जन्मतां दूध घेईना शूर सिंहकिशोर तो।**
**हत्तींचा वास ज्या कुंजीं त्याकडे दृष्टि फेकतो॥ २३३॥**

गद्यार्थ—सिंहाचा बच्चा जन्मल्याबरोबर दूध सुद्धा घेईना. ज्या कुंजात हत्तीचा वास त्याला लागला त्याकडे दृष्टि फेकीत राहिला. (श्लोक २२७-२३१ प्रमाणेंच उद्दिष्ट.)

०००

उपजाति

गर्जन् हरिः साम्भसि शैलकुञ्जे
प्रतिध्वनीनात्मकृतान्निशम्य ॥
पद बबन्ध क्रमितु सरोषः
प्रतर्कयन्नन्यमृगेन्द्रनादम् ॥ २३४ ॥

वसंततिलका

**गर्जे गुहेंत जलसंनिध सिंह जेव्हां**
**त्याचा प्रतिध्वनि पडे निजकर्णिं तेव्हां ॥**
**भासून अन्यहरिगर्जित तें तयास**
**त्याच्या वधार्थ निघतो हरि हा सरोष ॥ २३४ ॥**

गद्यार्थ—जलानें युक्त अशा गुहेंत, जेव्हा सिंह गर्जना करतो, तेव्हा, त्याचा जो प्रतिध्वनि, त्याच्या कानीं येतो, त्याला जणुं दुसऱ्या सिंहाची गर्जनाच समजून, हा, त्या नवागताला मारण्यासाठीं बाहेर पाऊल टाकतो. (मानी पुरुषाला आपल्या क्षेत्रांत दुसऱ्याचें पाऊल पडलेलें कधीं सहन होत नाहीं—अगदीं कल्पनेंत सुद्धा नाहीं. काल्पनिक आक्रमणाच्या सुद्धा प्रतिकारार्थ तो सिद्ध असतो. प्रत्यक्ष आक्रमण होऊनहि, वाटाघाटींनींच सर्व प्रश्न सोडविण्याची मनीषा धरणाऱ्या, आत्मकाल निषेधपत्रें पाठवीत बसणाराची जातकुळी निराळी.)

०००

अनुष्टुभ्

मत्तेभकुम्भभेदी यः कठोरनखराशिभिः ।
मृगारिरिति नाम्नैव लघुर्भवति केसरी ॥ २३४ अ

अनुष्टुभ्

**फोडी तीक्ष्ण नखांनीं जो उन्मत्तगजकुंभ तो ।**
***'मृगशत्रु' अशा नांवें सिंह नीचत्व पावतो ॥२३४ अ***

गद्यार्थ— जो आपल्या तीक्ष्ण नखानीं मत्त गजाचीं मस्तकें फोडितो तो सिंह मृगाचा शत्रु (म्हणजे क्षुद्राचा शत्रु) असे म्हणणें हा त्याचा अपमान होय, त्याला हलकेपणा देणें होय.

०००

## सुवर्णान्योक्ति

भुजंगप्रयात

न वै ताडनात्तापनाद्वह्निमध्ये
न वै निक्रयात्क्लिश्यमानोऽहमस्मि ॥
सुवर्णस्य मे मुख्यदुःख तदेकं
यतो मा जना गुञ्जया तोलयन्ति ॥ २३५ ॥

भुजंगप्रयात

**मला ठोकुनी तापवा विस्तवांत**
**कुठेंही विका ! क्लेश होती न त्यांत ॥**
**महादुःख हें कीं सुवर्णास मातें**
**जन क्षुद्र गुंजेसवें तोलती तें ॥ २३५ ॥**

गद्यार्थ— सुवर्ण म्हणतें — मला हातोड्यानें ठोकतात, अग्नींत घालून तापवितात, शिवा, बाजारात नेऊन विकतात,

यापैकी कोणत्याहि गोष्टींचें, दुःख, वाटत नाहीं. माझें सर्वांत मोठ दुःख हें आहे, कीं लोक वजन करताना एक बाजूस गुंजा टाकतात व दुसऱ्या पारड्यात मला टाकतात व अशा रीतीनें माझी क्षुद्र गुंजेबरोबर 'तुलना' करतात. ( स्वत च्या शक्तीची, गुणाची, महत्त्वेची परीक्षा जगानें कोणतीहि उच्च कसोटी लावून केली तरी, त्याचे थोराना दुःख वाटत नाही. क्षुद्राच्या पातळी वर नेऊन त्याच्याबरोबर आपली तुलना केली जावी, हें मान ते सहन करणार नाहीत. )

०००

## सूर्यान्योक्ति

स्वागता

क्षालयन्तमभितो भुवनानि लालयन्तमभितः कमलानि ।।
पालयन्तमथ कोककुलानि ज्योतिषां पतिमहं
महयामि ।। २३६ ।।

स्वागता

जो समोंवतिं धुतो भुवनांस
भोंवतीं फुलवितो कमलांस ।।
पोषितो सकल चक्रवाकही
ज्योतिमुख्य सवित्या प्रणती ही ।। २३६ ।।

गद्यार्थ—तिन्ही भुवनाना, जो आपल्या किरणरूपी जलानं, धुऊन काढतो, सर्वत्र सभोवार जो कमलाचे लाड करून त्याचा विकास करतो, चक्रवाकाच्या कुलाचे पालनपोषण करतो, त्या, आकाशस्थ दिव्यज्योतीच्या प्रमुख अशा, सूर्याला मी नमन करतों.

०००

हरिणी

पततु नभसो गच्छत्वस्त निमज्जतु वारिधौ
व्रजतु वरुणागारद्वार प्रभाभिरनादृतः ।।
तदपि तरणिर्दत्वा पाद शिरस्सु महीभृता
दलिततिमिरव्रातः प्रात पुनः समुदेष्यति ।। २३७ ।।

हरिणी

जलधित बुडो, अस्ता जावो पडोनि नभांतुनी
वरुणगृहिंच्या द्वारीं जावो, प्रभाहि विलोपुनी ।।
तरिहि रवि तो ठेवोनीया पदां गिरिशेखरीं
उगवुनि पुन्हां प्रात:काळीं करील तमा दुरी ।। २३७ ।।

गद्यार्थ—आकाशासारख्या उच्च पदापासून पतन पावून सूर्य हा अस्ताला जावो, समुद्रात बुडो, प्रभेनें अनादर केला आहे अशा अवस्थेत वरुणाच्या घराच्या दाराशीं जावो; पण पुनश्च सकाळीं, अंधाराचा नाश करून, महीभृत् ( =डोंगर किंवा राजे ) यांच्या डोक्यावर पाद ( पाय; किरण; ) ठेवून, तो पुन्हा उदय पावणारच! ( हें बहुधा, अन्योक्तीनें, ऐखाद्या तात्पुरत्या पराजित, तेजोहत राजाच्या आश्वासनपर, उत्तेजनपर, गीत असावें; बहुतेक सर्व वर्णन सूर्य व राजा दोहींकडे लागू पडणारें द्व्यर्थी, आहे. )

०००

अनुष्टुभ्

तस्यैवाभ्युदयो भूयान्भानोर्यस्योदये सति ।
विकासभाजो जायन्ते गुणिन कमलाऽऽकराः ।। २३८ ।।

अनुष्टुभ्

सूर्योन्नतिच ती श्रेष्ठ-ज्याचा उदय होउनी ।
विकास पावती सारे कमलाकर ते गुणी ।। २३८ ।।

गद्यार्थ— सूर्याची उन्नति ( वर येणें ) हीच खरी श्रेष्ठ, की ज्याच्या उदयामुळ गुणी ( आत तंतु असलेले; दुसरा अर्थ सद्गुणी ) कमलाकर ( कमलाचे समुदाय दुसरा विद्याधनाचे साठे ) विकास पावतात. ( विद्वेला व गुणीजनाना उत्तेजन व आश्रय देणाऱ्या नृपतीची अन्योक्तीने स्तुति. उन्नत व्हावे, थोर पदाला चढावे ते असलेच राजे इतराचा काय उपयोग? )

०००

शार्दूलविक्रीडित

यत्पादाः शिरसा न केन विधृता पृथ्वीभृता मध्यत-
स्तस्मिन्भास्वति राहुणा कवलिते लोकत्रयीचक्षुषि ।।
खद्योतै स्फुरित तमोभिरुदित तारामिरुज्जृम्भित
घूकैरुदियतमा किमत्र करवै किं किं न वैधेष्टितम् ? २३९

शार्दूलविक्रीडित

ज्याचे पाद शिरीं सदैव धरिले पृथ्वीभृतांच्या गणें
तेजोराशि अशा त्रिलोकनयना त्या ग्रासितां राहुनें ।।
ये अधार, नि तारका चमकती, ते काजवेही तसे;
घू घू घूक करी—अशा कुचरिता वर्णू किती या कसें?

गद्यार्थ—ज्याचे पाद (किरण; दुसरा अर्थ पाय.) पृथ्वी-भृतांपैकीं; (पर्वतांपैकीं; दुसरा अर्थ राजांपैकीं) सर्वांनींच सदा आपल्या डोक्यावर धारण केले, अशा त्या त्रैलोक्याच्या नेत्रासमान, तेजस्वी सूर्याचा राहूनें ग्रास केल्यावरोबर, काजवे लुकलुकूं लागले, अंधारानें डोकें वर काढलें, तान्यांनीं डौल दाखवायला सुरुवात केली, घुबडें सुद्धा उडून घूत्कार करूं लागलीं! कुणी कुणी काय काय दुश्चरित दाखविलें तें काय वर्णूं! (कोण्या महापराक्रमी राजाच्या अतानंतर क्षुद्रांनीं उठावणी केली याविषयींचा शोक अन्योक्तीनें वर्णिला आहे. श्लोक २२४ व पुढें श्लोक२४२ दोन्ही याच अर्थाचे.) ●●●

अनुष्टुभ्

खद्योतो द्योतते तावद्यावन्नोदयते शशी।
उदिते तु सहस्रांशौ न खद्योतो न चन्द्रमा ॥२४०॥

अनुष्टुभ्

चंद्रोदय न जों होई तोंवरी काजवा स्फुरे।
सूर्योदयापुढें तेज त्या दोघांसहि काय रे? ॥२४०॥

गद्यार्थ— चंद्राचा उदय झाला नाहीं तोंवरच काजव्याची लुकलुक! पण सूर्याचा उदय झाला, की तो काजवाहि नाहीं व तो चंद्रहि नाहीं. (निकृष्ट कवींची पुशारकी मध्यमाच्या उदयापर्यंत; पण सर्वश्रेष्ठ कवि उदित झाले कीं त्या दोघानाहि निष्प्रभ करून टाकतात ही अन्योक्ति.) ●●●

वसंततिलका

देवो हरिर्वहतु वक्षसि कौस्तुभं त-
न्मन्ये च काचन पुनर्द्युमणेः प्रतिष्ठा ॥
यत्पादसंगतिसमर्पितसौरभाणि
धत्ते स एव शिरसा सरसीरुहाणि ॥ २४१ ॥

वसंततिलका

वक्षावरी हरि धरी जरि कौस्तुभास
त्याहून थोर रविचेंच सुतेज खास ॥
सौरभ्य ज्यांत भरिती पद त्या रवीचे
तें पद्म भूषण वने हरिमस्तकींचें ॥ २४१ ॥
(किंवा सौरभ्य ज्यात भरितो स्वपदें रवी तो
पद्मांस त्या निजशिरीं हरि तो धरीतो)

गद्यार्थ— अत्यंत तेजस्वी असा कौस्तुभ मणि, विष्णु, आपल्या हृदयावर खुशाल धारण करो; परंतु, दिवसमणि असा जो सूर्य त्याचीच महती मला विशेष वाटते. (कारण असें कीं)— त्या सूर्याच्या पादाच्या (पायाच्या किंवा किरणाच्या) संसर्गानें, ज्याच्यांत सुगंध भरला जातो, तीं कमलें, तो विष्णु आपल्या (हृदयाच्या कितीतरी वर अशा) मस्तकावर धारण करतो– (सूर्याचे पाय विष्णूच्या डोक्यावर! मग बोला श्रेष्ठ कोण?) ●●●

मन्दाक्रान्ता

पातः पूष्णो भवति महते नोपतापाय यस्मात्
काले नास्तं क इह न गता यान्ति यास्यन्ति चान्ये! ॥
एतावत्तु व्यथयति यदाऽऽ लोकबाह्यैस्तमोभि–
स्तस्मिन्नेव प्रकृतिमहति व्योम्नि लब्धोऽवकाशः ॥२४२॥

मन्दाक्रान्ता

सूर्याचें या पतन न मना दुःख दे फार; कां कीं—
गेला, जाई, कवण न, न वा अस्त पावेल लोकीं! ॥
पीडा हें दे परि हृदयिं कीं दृष्टिबाह्यांधकार
व्यापी आतां अहह! नभ हें–जें निसर्गेचि थोर २४२

गद्यार्थ— या सूर्याचें हें पतन (अस्त होणें) हृदयाला फारसे दुःखदायी वाटत नाहीं; कारण, (त्याची त्याची) वेळ आली कीं, इहलोकीं असा कोण आहे, कीं, जो अस्ताला गेला नाहीं, जात नाहीं किंवा जाणार नाहीं? परंतु हृदयाला व्यथा होते, ती, या गोष्टीची, कीं, जो कधीं दृष्टीला सुद्धा दिसत नाहीं, (इतका क्षुद्र) अंधकार, आतां निसर्गतः जें थोर अशा विशाळ आकाशात, खुशाल पाय पसरून, त्याला व्यापून बसला आहे! (श्लोक २२४ व २३९ यांतलाच अन्योक्ति प्रकार) ●●●

## सोनार–स्वर्णकार हेमकारान्योक्ति

वसंततिलका

हे हेमकार! परदुःखविचारमूढ!
किं मां मुहुः क्षिपसि वारशतानि वह्नौ! ॥
संदीप्यते मयि सुवर्णगुणातिरेको
लाभः परं तव मुखे खलु भस्मपातः! ॥२४३॥

वसंततिलका

हे स्वर्णकार ! न दिसे परदुःख तूतें !
अग्नींत फेकिसि कसाश तवार मातें ॥
तेणें सु-वर्ण उजळे मम शुद्ध भारी
तोंडामधें तव पडे परि राख सारी ! ॥२४३॥

गद्यार्थ— ( सुवर्ण म्हणतें ) हे सोनारा ! दुसऱ्याचें दुःख न कळण्याइतका तूं मूढ आहेस ! कां मला शंभर शमर वेळा अग्नींत टाकतोस ? पण ( या तुझ्या दुष्ट वृत्तीचें फळ इतकेंच, कीं ) माझी सुवर्ण–कांति मात्र अधिकाधिक उजळत जात आहे आणि तुझ्या तोंडात मात्र अधिकाधिक राख पडत आहे. ( सोनें वितळवतांना फुंकायच्या फुंकणीनें हळूंच दरवेळीं तें शोषून, थोडें थोडें सोनें सोनार चोरीत असतात, असा बोभाटा आहे. त्या शोषणाबरोबर थोडी थोडी राख सोनाराच्या तोंडात येते. ) ( थोराच्या निंदेनें त्यांची मात्र अग्निपरीक्षा होत जाऊन त्याचें कीर्ति—सुवर्ण अधिकाधिक शुद्धत्वानें झळकू लागतें व निंदकाच्या तोंडांत मात्र राख पडून तें आपोआपच गप्प होतें यास उद्देशून. )

●●●

## हत्ती ( गजान्योक्ति )

वसंततिलका

केलिं कुरुष्व परिभुङ्क्ष्व सरोरुहाणि
गाहस्व शैलतटनिर्झरिणीपयांसि ॥
भावानुरक्तकरिणीकरलालिताङ्ग
मातङ्ग ! मुञ्च मृगराजरणाभिलाषम् ॥ २४४ ॥

वसंततिलका

खा पंकजांस; कर खेळ गजा ! वनांत
डुंबूनि घेइ गिरिनिर्झरिणीजलांत ॥
गोंजारुंदे तुज करें करिणी जिवाची
तूं हौस सोड हरिशीं परि झुंजण्याची ॥ २४४॥

गद्यार्थ— हे गजा ! तूं आपला रानात खेळ कर; कमलें भक्षण कर; डोंगराच्या कड्यावरून कोसळणाऱ्या झऱ्याच्या पाण्यात, जलक्रीडा कर; तुझ्यावर प्रेम करणारी तुझी जिवलग हत्तीण, तुला आपल्या सोंडेनें कुरवाळील, तोहि आनंद उपभोग ! परंतु बाबारे मृगराजाशीं युद्धांत झुंज घेण्याची अभिलाषा मात्र धरूं नको ! ( सुखवस्तु, सुखलोलुप, आरामप्रिय परिमित पात्रतेच्या माणसांनीं आपल्या आवाक्याबाहेर झेंप घेण्याचा अविवेक करू नये असा इषारा ! )

●●●

शिखरिणी

निषेवन्तामेते वृषमहिषमेषाश्च हरिणा
गृहाणि क्षुद्राणां कतिपयतृणैरेव सुखिनः ॥
गजानामास्थानं मदसलिलजम्बालितभुवां
तदेवं विन्ध्याद्रेर्विपिनमथवा भूपसदनम् ॥ २४५ ॥

शिखरिणी

गृहीं क्षुद्रांच्या त्या वृष महिष, मेंढया,मृग निके
विचारे राहूं द्या मुठभर तणा खाउन सुखें ॥
परी या हत्तींना, मद गळुनिया कर्दम जिथें
रुचे राहाया तें नृपसदन वा विन्ध्यवन तें ॥ २४५॥

गद्यार्थ—बैल, टोणगे, मेंढे, हरिण इत्यादि क्षुद्र जनावरें, मूठभर गवत चघळीत, तेवढ्याने तृप्त होत, खुशाल क्षुद्रांच्या घरातून नांदोत ! पण मानधन हत्तींना, मात्र, मद गळून जेथें चिखल झालेला आहे, अशा, नृपतींच्या गजशाला, तरी, किंवा, विन्ध्यपर्वताचीं अरण्यें तरी, निवासास योग्य वाटतात. ( इतर स्थानें नव्हेत. ( हत्तीच्या मानी स्वभावाविषयीं ( कुत्र्याच्या तुलनेनें ) स्वभावोक्ति प्रकरण १४ मधील श्लोक ७ लाङ्गूलचालन हा श्लोक पहावा—जगन्नाथ पडिताचा श्लोक अशाच ऐटींत लिहिलेला आहे. )

●●●

शार्दूलविक्रीडित

नीवारप्रसवाग्रमुष्टिकवलैर्यो वर्धितः शैशवे
पीतं येन सरोजपत्रपुटके होमावशेषं पयः ॥
तं पश्चान्मदमन्थरालिवलयव्यालुप्तगण्ड गजं
सानन्दं सभयं च पश्यति मुहुर्दूरे
स्थितस्तापसः ॥ २४६ ॥

शार्दूलविक्रीडित

नीवारें भरुनी मुठी, शिशुपणीं खाऊं जया घातलें
ज्यातें दुग्धहि यज्ञशिष्ट नलिनीद्रोणांतुनी पाजिलें ॥
येता त्या मद, भृंगवृंद जमुनी गंडस्थळा झांकित
पाहे तापस त्या दुरुनचि गजा आनंद–भीती–
युत ॥ २४६ ॥

गद्यार्थ—बाळपणीं, ज्याला, नीवाराचे कोंब मुठी भर-भरून खाऊ घातले, व यज्ञातले उरलेले दूध कमलपत्राच्या द्रोणांतून ज्याला पाजले, (इतका जो मरीन माणसाळलेला होता)

त्या हत्तीला आता मद फुटल्यानें, तो खाण्यास जमलेल्या भृगांनीं ज्याचें गंडस्थळ पार झाकून गेलें आहे—अशा अवस्थेंत, त्याचा (पितृसमान) तो तापस—दुरूनच त्याकडे मोठ्या आनंदानें पण त्याचबरोबर भयानें पाहत आहे. (मूळच्या आडदांड मुलाला बापानें प्रेमानें वाढविलें व तो आता अधिकच आडदांड पण कर्तृत्वशाली झालेला पाहून, बापाच्या भावना, आनंदाबरोबरच भयानेंहि मिश्रित असतात. त्याच्या प्रेमाला स्मरून वागला, तर ठीक; पण स्खलनशील यौवनात उन्मत्त उच्छृंखल झाला तर?) 'रायगडाला जेव्हा जाग येते' चें साम्य. ●●●

अनुष्टुम्

मलोत्सर्गं गजेन्द्रस्य मूर्ध्नि काकः करोति चेत् ।
कुलानुरूपं तत्तस्य यो गजो गज एव सः ॥ २४७ ॥

अनुष्टुभ्

मलोत्सर्ग गजेन्द्राच्या शिरीं काकहि जें करी ।
कुलधर्मचि तो त्याचा हत्ती हत्तीच तो परी ॥ २४७ ॥

गद्यार्थ— गजेन्द्राच्या डोक्यावर कावळा जरूर मलोत्सर्ग करतो, तें त्याच्या कुलशीलाला अनुरूप असेच होय-(त्या कृत्यानें हत्तीच्या मोठेपणाला काय बाध येणार?) हत्ती तो हत्तीच असतो. (थोराचे निन्दक हे स्वताचे कुलशील मात्र जगाला व्यक्त करीत असतात. थोराच्या कीर्तीला ते धक्का लावूच शकत नाहींत) ●●●

शार्दूलविक्रीडित

त्यक्तो विन्ध्यगिरिः पिता, भगवती माता च रेवोज्झिता
त्यक्ताः स्नेहनिबद्धबन्धुरधियस्तुल्योदया दन्तिनः ।
त्वल्लोभान्ननु हस्तिनि ! प्रतिदिनं बन्धाय दत्तं वपुः—
त्वं दूरीकुरुषे—लुठन्ति च शिरःपीठे कठोराङ्कुशाः २४८

शार्दूलविक्रीडित

आलों विंध्यपित्या त्यजून, त्यजिली रेवाहि मातेपरी
स्नेहानें दृढबद्ध तुल्यबल ते सोडून आलों करी ॥
लोभानें तव हस्तिनि ! प्रतिदिनीं मी देह बांधूं दिला
जासी दूर—नि तीक्ष्ण अंकुश इथें माझ्या शिरीं टोंचला

गद्यार्थ— (रानटी हत्तींना पकडण्यासाठीं मोह पाडणाऱ्या हत्तिणीची योजना करतात; व तिच्या लोभानें हत्ती तिच्या मागून येऊन, बंधनात पडतात; पण ती त्या कोणालाच लाभत नाहीं—पुन्हा दुसऱ्या हत्तींना भुलविण्यासाठीं ती रानात नेली जाते असा फसलेला एक हत्ती म्हणतो—) माझ्या पित्या समान असलेला तो विन्ध्यपर्वत, व देवतातुल्य मातेसारखी ती नर्मदामाई, तसेंच, माझे प्रिय मित्र तुल्यबल हत्ती, या सर्वांना मी सोडून आलों! हे हस्तिनि! तुझ्या लोभानें, रोज मी देह सुद्धा बांधू दिला; आणि आता तू माझ्यापासून दूर गेलीस; व, इकडे तीक्ष्ण अंकुशाचे आघात मात्र माझ्या शिरावर होत आहेत! (लक्ष्मीतृष्णा, मदिरातृष्णा, परस्त्रीतृष्णा, कीर्तितृष्णा इत्यादि कसल्या तरी 'ती' च्या मोहानें कुलशील, मोठेपणा, मैत्री, याचा त्याग करून 'ती' च्या पायीं बंधनात पडून मनुष्य अधःपतित होतो—शेवटीं 'ती' तर लाभत नाहींच, पण अनेक दुःखें व आपत्ति त्याच्या डोक्यावर आदळतात, या सर्वांचें हें रूपक आहे. इंग्लंडच्या इतिहासात कार्डिनल वूल्से या महत्त्वाकांक्षी माणसानें पोप व राजा यांना (दोन विरुद्ध टोकांना) खूष करण्याच्या नादात—इतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः अशी स्थिति करून घेतली, तिचें शेक्सपियरकृत (हेन्री आठवा या नाटकातील) वर्णन तंतोतंत या श्लोकासारखें आहे.) ●●●

अनुष्टुम्

बन्धनस्थोऽपि मातङ्गः सहस्रभरणक्षमः ।
अपि स्वच्छन्दचारी श्वा स्वोदरेणापि दुःखितः ॥२४९॥

भुजंगप्रयात

असोनीहि हत्ती स्वयें बन्धनस्थ
सहस्रांस पोसावया तो समर्थ ॥
जरी श्वान हा नित्य स्वच्छंदचारी
परी स्वोदराचेंच त्या दुःख भारी ॥ २४९ ॥

गद्यार्थ—स्वतः बंधनात पडलेला हत्ती, हा अनेकांचें उदरभरण करण्यास समर्थ (त्याच्या सेवाशुश्रूषेसाठीं कितीतरी लोकांना काम मिळतें) असतो पण स्वतंत्र अनिर्बंधपणें फिरणारा कुत्रा, हा आपल्याच पोटाच्या चिंतेनें दुःखात असतो. लोकमान्यांसारखे महापुरुष तुरुंगात होते तरी त्यांच्यामुळें चार माणसांचें पोट भरत होतें. पण स्वतःच्या पोटाच्या विवंचनेत असलेले शेंकडों क्षुद्र प्राणी, पूर्ण स्वातंत्र्यांत बाहेर काय थोडे होते?) ●●●

आर्या

कौपे पयसि लघीयसि तापेन करः प्रसारितो करिणा ।
सोऽपि न पयसा लिप्तो लाघवमात्मा परं नीतः ॥२५०॥

आर्या

**कूपांत लव जलास्तव तत गजानें पुढें स्वकर केला।**
**तो न जलानें भिजला स्वतास हलकटपणाच परि आला**
**( पदरीं ) ( जडला )**

गद्यार्थ--उन्हानें तापलेल्या हत्तीनें, अत्यंत थोडें पाणी असलेल्या ( जवळ जवळ नसलेल्या ) विहिरींत, आपली सोंड लांबविली. पण ती सोंडसुद्धां पाण्यानें भिजली नाहीं! आणि ( याचना, ती सुद्धां अस्थानीं, केल्यानें ) हलकेपणा, मात्र पदरीं आला! ( संकटांत असला म्हणून काय झालें ? माणसानें आपला मोठेपणा सोडून, तारतम्य विसरून, हात पुढें पसरावा, हें अर्थात दुःखाला व पदरीं लघुता येण्यासच कारणीभूत होतें. ) ●●●

आर्या

यदि मत्तोऽसि मतङ्गज! किममीभिरसारसरलतरुदलनैः ?
हरिमनुसर खरनखरं व्यपनेष्यति ते स करटकण्डूतिम् २५१

आर्या

**असासि गजा! मस्त तरी उपटिसि दुर्बल तरूंस कां सरल?**
**जा खरनख सिंहाप्रत, तो तव करकंडु पूर्ण शमवील ॥**
**(जिरवील) २५१**

गद्यार्थ--हे गजा! तू फार माजला आहेस हें खरें, पण, हे दुबळे सरलवृक्ष ( देवदार ) उपटण्यांत काय मोठें भूषण आहे? तीक्ष्ण नखें असलेल्या त्या सिंहाकडे एकवार जा कीं, तो तुझ्या सोंडेची कड संपूर्ण जिरवील. ( बाहेर मापूनाई पण घरच्या म्हातारीचे काळ शूर वीर जगभर सर्वत्र आहेतच. उठल्या सुटल्या लढाईच्या गोष्टी बोलणारे, व दोवटच्या शीत मरेपर्यंत लढू, पण पाकिस्तान होऊं देणार नाहीं, असें बडबडणारे शीख, मुसल्मानाना भिऊन, कोकरासारखे पळत, हिंदूंच्या आश्रयाला आले. व आता हिंदूनाच दमदाटी करून स्वताचें राज्य स्थापू पहात आहेत, हें, या अन्योक्तीचें उत्तम उदाहरण आहे ) ●●●

शार्दूलविक्रीडित

पीतं यत्र हिमं पयः कवलिता यस्मिन्मृणालाङ्कुरा--
स्तापार्तेन निमज्ज्य यत्र सरसो मध्ये विमुक्तः श्रमः ॥
धिक् तस्यैव जलानि पङ्किलयतः पाथोजिनीं मथ्नतो
मूलान्युत्खनतः करीन्द्र भवतो लज्जाऽपि नो जायते? २५२

शार्दूलविक्रीडित

**जेथें शीत जला पिऊन, विसही खाऊनिया जेथले**
**होतां ताप, जलांत डुंबुनि तुवां जेथें श्रमां वारिलें ॥**
**धिक्! त्याच्याच जळा गढूळ करितां, उन्मूलतां पद्मिनी**
**मूलांतें खणितां तुला गजवरा! लज्जा न वाटे मनीं? २५२**

गद्यार्थ--ज्या तळ्यातलें शीतल जल तू प्यालास; जेथले बिसतन्तु तू भक्षिलेस; उन्हानें तापून जातां, ज्याच्या पाण्यात यथेष्ट डुबून तू आपला श्रमपरिहार केलास, त्याच सरोवराचें पाणी तूं आता गढूळ करीत आहेस, तेथल्या कमलवेली उपटीत आहेस, कंदमुळे खणून टाकीत आहेस, याची हे गजश्रेष्ठा! तुला काहाच खंत वाटत नाहीं? ( जगातल्या साऱ्या कृतघ्नांना उद्देशून ही अन्योक्ति आहे. एकच प्यालयातली सिंधु ही यांतलें सरोवर; व व्यसनाधीन सुधाकर हा यातला मत्तगज, कल्पिलें कीं सुरेख रूपक तयार होतें. ) ●●●

शार्दूलविक्रीडित

कौपं वारि विलोक्य वारणपते! किं विस्मितेनास्यते?
प्रायो भाजनमस्य संप्रति भवांस्तत्पीयतामादरात् ॥
उन्मज्जच्छफरीपुलिन्दललनापीनस्तनास्फालन--
स्फारीभूतमहोर्मिनिर्मलजला दूरेऽधुना नर्मदा! ॥ २५३ ॥

शार्दूलविक्रीडित

**वापीचें जल पाहुनी तुज गजा! आश्चर्य कां वाटलें?**
**पी तूं यासच आदरें! नित तुझ्या दैवास हें लागलें ॥**
**जेथें क्रीडति मत्स्य, निर्मलजलीं, त्या भिल्लकन्या यदा**
**न्हाती--आणि तरंग उच्च उठती--ती दूर रे नर्मदा २५३**

गद्यार्थ--(नर्मदेच्या परिसरांतून पकडून आणिलेल्या हत्तीच्या पुढें, विहिरीनें चार दोन बादल्या पाणी प्रथमच पिण्यासाठीं ठेवण्यात आलें, तेव्हां कसेंसेंच वाटून हत्ती तें पिईना; त्यावेळीं तो माहूत त्याला म्हणतो--) हे गजराजा! विहिरीचें हें पाणी पाहून तुला आश्चर्य का बरें वाटलें? ( वाटणें साहजिक आहे, परंतु-) आतां तुझ्या या बंधनावस्थेत हें तुझ्या कपाळीं लागलें आहे तरी हेंच आता गोड मानून घेऊन पी. जिच्यामध्यें मासे क्रीडा करीत आहेत व जिच्या निर्मल जळांत, शबरललना स्नान केल्यानें त्याच्या पुष्ट स्तनांमुळें लाटा उठत आहेत, अशी, ती, तुझी नर्मदा आता दूर राहिली! ( देशभक्त तुरुंगांत पडल्यावर त्यांच्यापुढें पहिल्या दिवशीं जेव्हां तो तेथला पेय, तो कटोरा,

तें अन्नपाणी, येतें तेव्हा त्याची काय अवस्था होत असेल त्याचें हें वर्णन आहे.)

●●●

शिखरिणी

गले पाशस्तीव्रश्चरणयुगले गाढनिगडो
दृढः स्कन्धे बन्धः शिरसि सृणिपातः खरतरः ॥
नरः स्कन्धारूढो बत मरणयोग्येऽपि विषये
न जानीमोऽस्यार्थं द्विरद वद कस्मात्तव मदः ! ॥ २५४ ॥

शार्दूलविक्रीडित

आहे पाश गळ्यांत तीव्र; जडशा वेड्याहि पायांवरी
स्कंधीं बंधन घट्ट; अंकुश डसे तो तीक्ष्ण, माथ्यावरी ॥
स्कंधीं माहुत; हाय ! दुःस्थिति तुला ही मृत्युयोग्या जरी
सांगे हे गज ! थोर हा मद तुला आला कशाच्या तरी ? ॥ २५४ ॥

*गद्यार्थ*—हे गजा ! तुझ्या गळ्यात तीव्रपाश अडकवलेला आहे, पायात जड वेड्या आहेत, खांद्यावरून घट्ट दावें बांधलेलें आहे, डोक्यावर तीक्ष्ण अंकुश भोसकले जात आहेत, खांद्यावर माहूत बसलेला आहे अशी ही सर्व (अत्यंत अपमानास्पद) मरण बरें वाटावयास लावणारी तुझी दुःस्थिति असता, आम्हाला कळत नाहीं, कीं, हा एवढा मोठा उन्मत्तपणा तू कशाचा दाखवीत आहेस ? (गुलामगिरीतच भूषण मानणाऱ्या व स्वजनानाच ऐट दाखविणाराना उद्देशून.)

●●●

शार्दूलविक्रीडित

ऊर्णां नैष बिभर्ति नैष विषयो दोहस्य वाहस्य वा
तृप्तिर्नास्य महोदरस्य बहुभिर्घासैः पलालैरपि ॥
हा कष्टं कथमस्य पृष्ठशिखरे गोणी समारोप्यते ?
को गृह्णाति कपर्दिकैरमुमिति ग्राम्यैर्गजो हास्यते ॥२५५॥

शार्दूलविक्रीडित

"नाहीं लोंकर यास, दूधहि न दे; होणें न हा वाहन
मोठें पोट, न तृप्ति यास कितिही कोंडा तृणें खाउन ॥
पृष्ठीं उंचचि याचिया चढविणें कैशी कुणी गोण ती ?
घेई कोण कपर्दिकेसहि ?" गजा हे ग्राम्य हो हांसती ॥ २५५ ॥

*गद्यार्थ*—"याला (मेंढ्यासारखी) लोंकर नाहीं; हा दूध देत नाहीं; वाहन म्हणून हा उपयोगी नाहीं ! याचें एवढें हें मोठें पोट कितीहि चारा दाणा घालून थोडेंच भरणार आहे ! याची पाठ म्हणजे डोंगराचें शिखरच; इतक्या उंचावर गोणी चढवावयाच्या म्हणजे केवढे कष्टाचें ! याला एक कपर्दिकेला तरी कोण विकत घेणार ?" असें म्हणून गावंढळ माणसे हत्तीला हसत सुटलीं ! (अरसिकेषु कवित्वनिवेदनम् ! याच प्रकरणातील ११६ व्या श्लोकात वगळे जसे हंसाला हसले तसाच हा प्रकार ! गावंढळांना आपल्या मेंढ्या गाढवें हींच बरीं ! हत्ती त्यांच्या दृष्टीनें कुचकामाचा !)

●●●

आर्या

करिवर ! सञ्चर धीरं मा मर्दय मर्मराणि पत्राणि ।
अस्मिन् गह्वरकुहरे धूतसटः केसरी वसति ॥ २५६ ॥

आर्या

गजवर ! चाल हळूं तूं
पाला तुडवुनि मुळीं न नाद करी ।
झटकुनि आयाळ इथें
राहे मृगपति सुसज्ज गिरिकुहरीं ॥ २५६ ॥

*गद्यार्थ*—हे गजवरा ! या रानांतून तूं हळूहळू चाल. (वाळलेला) पालापाचोळा तुडविल्यास, त्याचा आवाज होईल, तो सुद्धा करू नको; कारण, नाहींतर त्यामुळें तुझी चाहूल या गुहेंत जवळच आयाळ झटकून (हल्ला करण्यास सिद्ध) असलेल्या सिंहाला लागेल !

●●●

आर्या

आपातालगभीरे मज्जति नीरे निदाघसंतप्तः ।
न स्पृशति पल्वलाम्भः पञ्जरशेषोऽपि कुञ्जरः क्वापि ॥ २५७ ॥

आर्या

तत उन्हेंही डुंबे पातालासमचि खोल डोहांत ।
उरला पंजर तरि गज
कुठेंहि डबक्यास लाविना हात ॥ २५७ ॥

*गद्यार्थ*—उन्हानें तापला तरी हत्ती पाताळाइतक्या खोल पाण्यातच डुंबेल ! रोडावून सापळा झाला, तरी, तो कुठल्या तरी क्षुद्र डबक्याला स्पर्शसुद्धा करणार नाहीं. (मानी म्हणतात तो असा.)

●●●

अनुष्टुभ्

अन्तर्विशति मार्जारी शुनी वा राजवेश्मनि ।
बहिष्ठस्य गजेन्द्रस्य किमर्थः परिहीयते ? ॥ २५८ ॥

अनुष्टुभ्

**कुत्री वा मांजरी दोघी जाती राजगृहान्तरीं ।**
**बाहेरचि उभा हत्ती त्यास काय कमी परी ? ॥ २५८ ॥**

गद्यार्थ— मांजरी किंवा कुत्री दोघी थेट राजाच्या गृहात शिरतात आणि हत्ती बाहेरच उभा असतो म्हणून हत्तीचें काही कमी पडतें काय ? ( मोठेपणा, अमुक स्थळीं पोंचला, एवढ्यानें येत नसतो. तो अंगभूतच हवा )

आर्या

कलभ ! तवान्तिकमागतमलिमेन मा कदाप्यवज्ञासी ।
अपि दानसुन्दराणां द्विपधुर्याणामयं शिरोधार्यः ॥ २५९ ॥

आर्या

**धर न अवज्ञा कलभा ! ये जवळीं त्या अलीसि केव्हांही**
**होइ शिरोधार्यचि हा दानी सुंदर महागजांनाही २५९**

गद्यार्थ— हे बालगजा ! तुझ्या जवळ आलेल्या या भुंग्याचा तू अपमान करू नको. कारण दानसुंदर ( दान=हत्तीचा मद किंवा दातृत्वानें शोभणाऱ्या ) अशा महागजांनाहि हा शिरोधार्य (दान) (मद) हा डोक्यातून वाहतो त्यामुळें भुंगे डोक्यावरच असणार, दुसरा अर्थ–आदरणीय ) आहे आपल्याकडे आलेला याचक काय दर्जाचा आहे हें माहीत नसल्यानें आपल्याकडून त्याचा नकळत अपमान होणें शक्य असतें म्हणून सावध ! )

आर्या

सूते सूकरगृहिणी सुतशतमपि निःयदुर्भगं झटिति ।
करिणी चिराय सूते कमपि महीपाललालित
कलभम् ॥२६०॥

आर्या

**सुत शंभरहि करते भराभरा यीत जाइ डुक्करिणी**
**राजप्रिय सुत एकचि भाग्यें केव्हांतरी विते करिणी।**

गद्यार्थ— डुकरीण ही शभर शभर दुर्दैवी पिले भराभर विऊन मोकळी होते. पण राजानीं सुद्धा ज्याचे लाड करावे, अशा पात्रतेचे बालक हत्तीण ही कधींकाळीं प्रसवत असते ! ( महत्त्वा असलेल्या वस्तु अशा दुर्मिळच असावयाच्या. त्या सुकाळाच्या झाल्या, की, कवडीमोल. )

वसंततिलका

दानार्थिनो मधुकरा यदि कर्णतालै-
र्दूरीकृता करिवरेण मदान्धबुद्ध्या ॥
तस्यैव गण्डयुगमण्डनहानिरेषा
भृङ्गाः पुनर्विकचपद्मवने चरन्ति ॥ २६१ ॥

वसंततिलका

**दानार्थि त्या मधुकरा निजकर्णतालें**
**दूरी मदान्धचि गजें जरि हाकलीलें ॥**
**त्याचेच गाल दिसती मग शोभुनी न**
**भुंगा रमे विकचपद्मवनीं फिरून ॥ २६१ ॥**

गद्यार्थ— दानार्थी (मद चाखण्यासाठीं किंवा दान मागण्यासाठीं ) भुंग्याला, मदान्ध हत्तीनें आपल्या कानाच्या पल्यानीं झडपून दूर हाकरून लावलें, तर, त्यामुळें त्याच्याच गालाची शोभा कमी होते. भुंग्याला काय ? तो आपला पुनश्च उमलत्या कमलाच्या वनात रमून जाईल ( दानासाठीं प्रसिद्ध असलेल्या दात्यानें उन्मत्तपणें याचक घालवून लावले तरी याचकांना दुसरीकडे दाते भेटतीलच पण या दानी माणसाचीच कीर्ति कमी होणार ! )

वसंततिलका

गण्डस्थले हि मदभूरिजलौघलुब्ध—
मत्तभ्रमद्भ्रमरपादतलाऽऽहतोऽपि ॥
कोपं न गच्छति नितान्तबलोऽपि नाग—
स्तुल्ये बले हि बलवान्परिकोपमेति ॥ २६२ ॥

वसंततिलका

**गंडस्थळास, मदलुब्धचि भुंग मत्त**
**पादें जरी तुडवुनी बहु पीडितात ॥**
**कोपे तरी न गज तो बलवान् नितांत**
**तुल्यांसि मात्र नित कोपति शक्तिमंत ॥ २६२ ॥**

गद्यार्थ— मदप्राशनार्थ लुब्ध अशा मत्त भृगांनी गंडस्थळा भोंवतीं फिरून, त्यावर पायांनीं तुडवून जरी हत्तीला फार पीडा दिली, तरी, हत्ती प्रबळ बलिष्ठ असून त्यांच्यावर रागवत नाहीं. शक्तिमंत हे, आपल्याशीं तुल्यबळ असतील, त्यांच्यावरच कोपतात. ●●●

वसंततिलका

*न स्वां करेणुमपि नापि निजान्किशोरा—*
*न्नात्मानमेष परिशोचति वारणेन्द्रः ॥*
*दानाग्निमग्नमनुरत्र यथोपसन्ना—*
*न्दानार्थिनो मधुकरानधिरूढभावान् ॥ २६३ ॥*

*वसंततिलका*

**दानार्थि भावरत भृंग समीपवर्ती**
**जो शोक त्याप्रति गजास गमे स्वचित्तीं ॥**
**दावाग्निनें जळतही तितका न वाटे**
**पिलें, स्वता नि करणीस्तवही तयातें ॥ २६३ ॥**

गद्यार्थ— अरण्यात वणव्यात सांपडून पोळत असलेल्या गजराजाला, स्वताच्या लाडक्या पत्नीची, आपल्या बालकाची, *किंवा स्वताची सुद्धा जेवढी काळजी वाटत नाहीं तेवढी,* दानार्थी, भावरत, अशा जवळ आलेल्या भृंगाच्या विषयीं वाटते. ( थोर माणसाचें हें लक्षणच आहे, कीं, दानार्थी, स्वत वर भक्तिभाव धरणारे व शरणार्थी, जवळ केलेले, अशाच्या कल्याणाची काळजी, त्यांना, स्वत च्या प्रत्यक्ष कुटुंबीयांपेक्षाच काय, पण स्वतापेक्षासुद्धा अधिक वाटते ) दानार्थी, उपसन्न हे शब्द द्व्यर्थी. ●●●

शिखरिणी

*न गृह्णाति ग्रासं नवकमलकिञ्जल्किनि जले*
*न पङ्कैराह्लादं व्रजति बिसभङ्गावेशकलैः ॥*
*ललन्तीं प्रेमार्द्रामपि निपहते नान्यकरिणीं*
*स्मरन्दावैर्भ्रष्टां हृदयदयितां वारणपतिः ॥ २६४ ॥*

*शिखरिणी*

**न घेई घासातें गज कमलरेणूयुत जलीं**
**भरे ना आनंदें बिस उधळुनी, वा न चिखलीं ॥**
**न साहे गोंजारी प्रणयित जरी अन्य करिणी**
**जधीं दावें दग्धा हृदयदयिता येइ स्मरणीं ॥ २६४ ॥**

गद्यार्थ— ( रानात वणवा लागला त्या धावपळींत हत्ती तेवढा सुटला ) आणि त्याची प्रिया हत्तीण वणव्यात सांपडून जळून गेली त्या आठवणीनें *कमलतंतूंनीं भरलेल्या पाण्यात,* त्याचा घास घेण्याची हत्तीला इच्छा होईना. बिसतंतू उधळून किंवा चिखल तुडवून ( नेहमींप्रमाणें ) *त्याला* आनंद होईना दुसरी एक हत्तीण प्रमार्द्र होऊन सोंडेनें त्याला कुरवाळू लागली तेंहि त्याला सहन होइना. ●●●

पृथ्वी

*जहीहि गुरुगर्जितं त्यजहि शुण्डया सीत्कृतं*
*परिभ्रम शनैर्वने, किमु गजेन्द्र गर्वायसे ? ॥*
*यथा न किल केसरी गिरिदरीषु निद्रां त्यजन्*
*विमूर्च्छयति जृम्भया सुभग तावकीनं मनः ॥ २६५ ॥*

पृथ्वी

**त्यजी विकट गर्जना, न कर तूं करें सीत्कृत**
**हळू भ्रम असा वनीं न वनता गजा गर्वित ॥—**
**जयें, त्यजुनि झोंप सिंह गिरिकंदरीं जृंभणा**
**करोनि तुझिया मनास घडवील ना मूर्च्छना ॥२६५**

*गद्यार्थ—हे गजेन्द्रा गर्वानें का उगाच उन्मत्त झाला आहेस ?* ( तो सोडून दे. ) विक्राळ गर्जना करू नकोस, सोंडेनें सीत्कारहि काढू नकोस, आणि रानातून जाताना असा जपून, ( आवाज होऊ न देता ) चाल, *कीं जेणेंकरून गिरिकंदरीं निजलेल्या* सिंहाची झोंपमोड होऊन, तो जांभई देऊन, तुझ्या मनाला भीतीनें मूर्च्छित करणार नाहीं ●●●

शार्दूलविक्रीडित

कर्णे चामरचारुकम्बुकलिका कण्ठे मणीनां गणाः
सिन्दूरप्रकरः शिरःपरिसरे पार्श्वान्तिके किंकिणी ॥
लब्धश्चैन्नृपवाहनेन करिणा बद्धेन भूपानिधि—
स्तत्किं भूधरधूलिधूसरतनुर्मान्यो न वन्यः करी ? ॥ २६६ ॥

शार्दूलविक्रीडित

**कर्णीं चामरशुभ्र शंखकलिका, कित्येक कंठीं मणि**
**सिंदूरें शिर सर्व भूषित, असे, मागें पुढें किंकिणी ॥**
**लाभे हें नृपवाहका जरि गजा बध्दासही भूषण**
**तेणें तो गिरिधूलिधूसर करी कां वन्यही धन्य न? २६६**

गद्यार्थ—कानामध्यें चवरीच्या केसाप्रमाणें शुभ्र बारीक बारीक शसाचा शृंगार; गळ्यात रत्नांच्या माळा, डोक्यावर शेंदूर चर्चून पत्रावली वगैरे काढलेली, मागे पुढ किणकिण करणाऱ्या लहान घटा किंवा घुंगरें, अशा तऱ्हेचा हा सर्व साज शृंगार, राजाचें वाहन बनलेल्या गुलाम झालेल्या हत्तीला लाभला, म्हणून काय डोक्यानें डोंगराला धडक देऊन त्याच्या धुळीनें माखून भुरकट झालेल्या रानटी ( पण पूर्ण स्वतंत्र व पराक्रमी ) हत्तीची थोरवी कमी होणार आहे ? ( केवळ पारतंत्र्यात राष्ट्र असले, म्हणजेच, कवि स्वातंत्र्याची महती गाऊ लागतात असें नव्हे. संस्कृत कवि, या दृष्टीनें पाहाता, सार्वकालीन काव्य करतात असें दिसत—गुलाम होऊन राजसेवा करून नृपदत्त पदव्यानीं भूषित झालेल्या व त्यातच भूषण मानणाऱ्याची एक पिढी नुकतीच पन्नास वर्षांपूर्वी या देशात होऊन गली. पण, त्यामुळे, पारतंत्र्याच्या डोंगराला धडक देऊन स्वतःच्या जीवनाची व संसाराची धूळधाण करून घेणाऱ्या, 'जंगली' म्हणून संबोधल्या जाणाऱ्या देशभक्ताची महत्ता थोडीच कमी होणार आहे ? )

●●●

शार्दूलविक्रीडित

पादाघातविचूर्णिता वसुमती त्रासाकुला पक्षिण
पङ्काङ्कानि सरांसि गण्डकषणक्षोभक्षता शाखिन ॥
प्राप्येद करिपोतकैर्विधिवशाच्छार्दूलशून्य वन
तत्तन्नाम कृत विश्रृंखलतया वक्तु न यत्पार्यते ॥२६७॥

शार्दूलविक्रीडित

**पादें भूमिस पीडिलें, भिवविलें पक्ष्यांस, वृक्षां क्षत-**
**केलें घासुनि गाल त्यांवर, तळीं केलींच पंकावृत ॥**
**लाभोनी गजबालक विधिवशें सिंहाविना हें वन**
**केलें काय किती विशृंखलपणें—तें सांगणें शक्य**
**न ॥ २६७ ॥**

गद्यार्थ—पायानीं तुडवून तुडवून भूमीला पीडा दिली; पक्ष्यांना घाबरवून सोडलें, गंडस्थळ घांसून झाडांना जखमा केल्या, धिंगाणा घालून तळ्याचें पाणी गढूळ करून सोडलें सिंह अनुपस्थित आहे असें 'मोकळें रान' हत्तीच्या पिल्लाला दैववशात् सांपडलें, मग काय विचारता ! त्यानें जो काय धुमाकूळ घातला त्याचें वर्णन करून सांगणें सुद्धां शक्य नाहीं ! ( कर्ता पुरुष गेल्यावर विचारता पुसता कोणी नाहीं, अशा अवस्थेंत, उच्छृंखळ पोरें, किंवा पराक्रमी राजा मेल्यावर, समाजकंटक, जो धुडगूस घालतात, त्याला उद्देशून )

●●●

शार्दूलविक्रीडित

नो मन्ये दृढबन्धनाक्षतमिद नैवाङ्कुशाघातज
स्कन्धारोहणताडनात्परिभव नैवान्यदेशागमम् ॥
चिंता मे जनयन्ति चेतसि यथा स्मृत्वा स्वयूथ्यान्वने
सिंहत्रासितभीतभीरुकलभा यास्यन्ति कस्याश्रयम् ? २६८

शार्दूलविक्रीडित

**बंधाचे क्षत मी गणी न तितुके, घा अंकुशाघात न**
**स्कंधारोहणमानहानि न गणी, देशांतरीं वास न ॥**
**संधींयां स्मरतां जशी उपजते चिंता स्वचित्तांत या-**
**की बाळें मम सिंहभीत कवणा जातील तीं आश्रया ?**

गद्यार्थ— ( बंधनात पडलेला हत्ती, आपल्या मागे रानात राहिलेल्या आपल्या बालकाची चिंता वाहतो— ) दोरखंडानीं, शृंखळानीं, घट्ट आवळल्यामुळें, पडलेल्या घट्ट्यांची तितकी मला काळजी वाटत नाहीं;—अंकुशाच्या माराचेंहि तितकें दुःख वाटत नाहीं, क्षुद्र मनुष्य माझ्या खांद्यावर चढून मला मारतो, ही मानहानि, मी, तितकी मनाला लावून घेत नाहीं; माझ्या देशापासून मी दुरावलों, याचेंहि मला तितकें वाईट वाटत नाहीं, इतकी चिंता माझ्या टोळींतल्या त्या इतरांविषयीं मला वाटते, कीं, सिंहाच्या भीतीनें घाबरून जाता, माझीं तीं बाळें कुणाच्या आश्रयाला जातील ? ( देशभक्त तुरुंगात पडल्यावर, स्वतःवर आलेले सर्व प्रसंग ते धैर्यानें सोसतात, पण, आपल्या टोळींतले मागे राहिलेले कच्चेबच्चे होतकरू देशभक्त सरकारच्या तडाख्यात सापडल्यास, आपण स्वतंत्र असता त्यांना जसे सभाळून घेत होतों, तसे, आता त्यांना कोण आश्रय देईल या चिंतेनें अधिक व्याकुळ होतात. )

●●●

शार्दूलविक्रीडित

सान्द्रामोदवती स्वकीयवसती पङ्केरुहाणा—तती—
स्त्यक्त्वाऽय भ्रमर करीन्द्र भवनाभ्याशमभ्यागत ॥
एतच्चेतसि सप्रधार्य जगतीविख्यातदानैस्त्वया
युष्माभि क्रियता यथोचितमिहातिथ्याय नात्यागत ॥२६९॥

शार्दूलविक्रीडित

**सौरभ्यें भरली त्यजून वसती ती पद्मसंघांतली**
**आला हा जवळीं तुझ्या गजवरा आतिथ्य घेण्या अलि**
**ध्यानीं ठेवुनि हें, स्वदान, जगतीं प्रख्यात, दे त्या मद**
**कीं, औचित्य घडून आगमन तें होई न हास्यास्पद २६९**

गद्यार्थ—हे गजवरा! स्वतःचें तें कमलवनातलें, सुगंधानें परिपूर्ण, असें, वसतिस्थान सोडून हा भ्रमर तुझ्या जवळ पाहुणा म्हणून आला आहे; हें ध्यानी घेऊन, तू आपलें जगविख्यात दान (= मद) त्याला देऊन (आखडून न धरता) अशी उचित कृति कर, की, त्याचें तुझ्याकडे येणें हें हास्यास्पद होणार नाहीं! (दानशूराना सुद्धा, अतिथींचें युक्त 'स्थान' माहीत नसल्यानें केव्हा केव्हा ते आपलें 'दान' त्यापासून *आखडून धरतात तसें होऊ नये!*) श्लोक २५९ याच अर्थाचा.

●●●

शार्दूलविक्रीडित

पत्युर्यत्पनिताग्रशेषमबलग्रासेन वृत्तिः कृता
पीतं यच्च करावगाहकलुषं तत्पीतशेषं पयः ॥
प्राणान्पूर्वतरं विहाय तदिदं प्राप्तं करिण्या फलं
यद् बन्धव्रणकातरस्य करिणः क्लिष्टं न दृष्टं मुखम् २७०

शार्दूलविक्रीडित

**खावोनी पतिनें, गळे तृण, तया शेषा तिनें भक्षिलें**
**तो पीतां, उरलें करें गढुळलें, पाणी तिनें प्राशिलें ॥**
**त्यापूर्वीच मरून, भाग्यफल हें त्या हत्तिणीला मिळे—**
**कीं बन्धें व्रणखिन्न त्या पति (गज) मुखा नाहीं तिनें**
**पाहिलें ॥ २७० ॥**

गद्यार्थ—(रानात हत्ती पकडला गेला आणि हत्तीण मागें राहिली तेव्हा)— आपल्या पतीनें खाऊन गळलेलें उरलेलें, गवत खाऊनच तिनें दिवस काढले. पतीनें प्राशन करून उरलेलें, *त्याच्या सोंडेनें ढवळल्याने गढूळ झालेलें* पाणी पिऊनच तिनें तृषा वारिली (मारली). (अशा रीतीनें देहाला उपास घालून) पतीच्या आधीं प्राण सोडण्यात हत्तिणीनें भाग्यफळ हें *मिळविलें कीं बन्धनाच्या व्रणानीं दुःखित असे पतिमुख पहाणें* तिच्या कपाळीं आलें नाहीं. (पारतंत्र्यात पडलेल्या पतीचें मुख पहावें न लागावें म्हणून जाळून घेणाऱ्या, जोहार करणाऱ्या, रजपूत स्त्रियांच्या तेजस्वी उग्र स्वातंत्र्यप्रीतीचेंच हें हत्तिणीचें चित्र आहे.)

●●●

शार्दूलविक्रीडित

क्रीडाऽकारि तडागवारिणि गतातङ्कं न पङ्केरुहे—
र्वल्ली काचन शल्लकीतरुगता नाकर्षिता हर्षतः ॥
नाश्लिष्टा करिणी करेण करिणा कामातुरेणामुना
दंष्ट्राभिर्विकटाननः शिव शिव व्यालोकि पञ्चाननः
॥ २७१ ॥

शार्दूलविक्रीडित

**केला खेळ न पल्वलस्थ कमलीं भीति त्यजोनी मनीं**
***वृक्षालिंगित वल्लरी न कुठली वा ओढिली हर्षुनी ॥***
**हत्तीनें रतिनें प्रियाहि न करें आलिंगिली, कारण—**
**हा! हा! भीषणदंत त्यास दिसला विकाळ**
**पंचानन ॥ २७१ ॥**

गद्यार्थ—हत्तीनें निर्भय मनानें, सरोवराच्या कमलांमध्यें क्रीडा केली नाहीं; किंवा, सहर्ष मनानें एखाद्या वृक्षावर चढलेली वेली ओढून काढली नाहीं; किंवा, कामातुर मनानें, आपल्या सोंडेनें, आपल्या प्रियेला आलिंगन दिलें नाहीं; कारण—उघड्या तोंडानल्या दातानीं अकाळविकाळ, असा सिंह, त्याच्या दृष्टीस पडला! (मरणाच्या भीतीनें इतर सर्व विकार विसरले जातात. महापुरात झाडावर आश्रय घेतलेला मानव व सर्प, परस्पर न भिता निलगून बसल्याचें एक उदाहरण आहे. १८५७ च्या समरात एका गावीं इंग्रज शिपाई (कत्तल) करीत होते, त्या *भयानं पेवासारख्या भिंतीच्या पोकळींत (बळदात)* एक तरुण व अपरिचित तरुणी जवळ जवळ विवस्त्रावस्थेंत दडून बसलीं असता, कामविकार दोघांच्याहि मनाला शिवला नाहीं.)●●●

शार्दूलविक्रीडित

*आरामोऽयमनिर्गलेन बलिना भग्नः समग्रो मयाऽ—*
त्यन्तं सम्भृतहर्षगर्विनमदोदग्रः किमुन्माद्यसि ? ॥
मातङ्ग! प्रतिवर्षमेव भवतो भावी निदाघज्वर—
स्तस्यैव प्रतिकारमर्हसि सखे सम्यक् समालोचितुम् ॥२७२॥

शार्दूलविक्रीडित

**"हें उद्यान उभें विशाळ बळें मी टाकिलें भंगुनी"**
**ऐसा हर्ष भरून काय फुगुनी उन्मत्त होसी मनीं ? ॥**
**मातङ्गा! प्रतिवर्षे ह्याच तुजला होणें उन्हाळीं ज्वर**
**मूळाचा प्रतिकार नीट सखया सम्यग्विचारें कर! २७२**

गद्यार्थ—"हें सारें उद्यान मीं माझ्या बेफाट बेलगाम शक्तीनें उध्वस्त करून टाकलें" या हर्षानें फुगून हे गजा! तू एवढा उन्मत्त का झाला आहेस? अरे हा उन्हाळ्याचा ताप तुला प्रतिवर्षी होणार आहे; तेव्हा त्याचें मूळ जें ऊन, त्याचा प्रतिकार करण्याचा नीट विचार करून शोध, (म्हणजे तुला दिसेल, कीं, उन्हाचा राग या उद्यानावर काढण्याऐवजी, तापशमनार्थ हें उद्यान राखणें हें तुझें कर्तव्य आहे.) (घराबाहेरून अपमानित होऊन, वैफल्य पदरीं घेऊन, येणारे, कित्येक तिरशिंगराव, घरीं येऊन, तो राग आपल्या पत्नीमुलांवर काढतात! हा अपमान तर वारवार होणार! पण त्याचें शमन करणाऱ्या सत्तार सुखाचाच हे विध्वंस करीत असतात! मूळ कारणाचा नाश करण्याचें याना सामर्थ्यच नसतें! (प्रकरण ७ मधील श्लोक ८ पहा) बाणविद्ध कुत्रा बाणालाच डसतो पण सिंह बाण सोडणारावर हल्ला करतो!)

●●●

हरिणान्योक्ति (मृग. कस्तूरी मृग)

अनुष्टुभ्

दूर्वाङ्कुरतृणाहारा धन्यास्तात वने मृगा।
विभवोन्मत्तचित्ताना न पश्यन्ति मुखानि यत्॥ २७३॥

अनुष्टुभ्

**खाती गवत दूर्वा जे सुधन्य मृग ते वनीं।**
**वित्तोन्मत्तमुखें ज्यांच्या येतीं न अवलोकनीं॥ २७३॥**

किंवा हेंच आर्येंत—

**दूर्वांकुरतृण खाउनि जगती जे धन्य धन्य ते हरिण।**
**कारण धनमत्तांचें मुख वघणें त्याचिया कपाळीं न २७३**

गद्यार्थ—कोवळ्या दूर्वा, गवत, खाऊन जगणारे हरिण हे खरोखर धन्य म्हटले पाहिजेत; कारण, सपत्तीन उन्मत्त झालेल्या श्रीमन्तांचीं तोंडें (याचकवृत्तीन) त्याना पाहावीं लागत नाहींत. (यात हरिणान्योक्तीपेक्षा याचकनिंदाच आहे.)

●●●

द्रुतविलम्बित

अयि कुरङ्ग तपोवन विभ्रमादुपगतासि किरातपुरीमिमाम्
इह न पश्यसि "दारय मारय ग्रस पिवेति" शुकानपि जल्पतः?॥ २७४॥

द्रुतविलंबित

**तुज तपोवन वाटुन हें, मृगे!**
**चुकुनि येसि किरातपुरींत गे॥**
**शुक न कां इथ बोलति तें दिसे**
**"धरुनि मारुनि फाडुनि खा" असें?॥ २७४॥**

गद्यार्थ—हे मृगे! हें तपोवनच, असें वाटून, भ्रमान, तूं शिकाऱ्यांच्या वस्तींत चुकून आली आहेस. 'धरा, मारा, फाडा, चावा, प्या" असे इथले पोपट सुद्धा बोलताहेत, हें तुझ्या पाहण्यात आलें नाहीं का? (तें आल असतें तर त्यावरून इथें कसलीं माणसे राहतात हें तुला कळल असतें.) (आश्रयदाता आश्रम आहे असे समजून चार चुकलेली विचारी स्त्री, ज्या ठिकाणीं गेली, तो वेश्यांचा अड्डा आहे, हें, तिथल्या पोपटाच्या बोलण्यावरून तिला कळल असतें, पण तें तिच्या लक्ष्यात आलें नाहीं, आणि विचारी फसली.)

●●●

वसततिलका

एणीगणेषु गुरुगर्वनिमीलिताक्षः
किं कृष्णसार खलु खेलसि काननेऽस्मिन्?॥
सीमामिमा कलय भिन्नकरीन्द्रकुम्भ—
मुक्तामयीं हरिविहार वसुन्धरायाः॥ २७५॥

वसततिलका

**गर्वें मिटून नयना हरिणीगणांत**
**कां कृष्णसार! इथ खेळसि या वनांत?॥**
**गंडस्थ मोति करिचे पसरून साची**
**सीमाच ही समज सिंह फिरावयाची॥ २७५॥**

गद्यार्थ—हे कृष्णसारगा! मोठ्या गवान नेत्र मिटून, हरिणींच्या कळपात (निर्भयपणे) या रानात कसा खेळत बसला आहेस! जवळ पहा, हत्तींच्या गंडस्थळातले मोती जमिनीवर पसरून, मृगराज सिंह, याचा विहार कोठवर चालतो, याची सीमारेषाच जणू आखून ठेवली आहे. (तेव्हा तुझ्या बायकात तुला खेळ-वयाचे तें दूर दुसरीकडे खेळ. नाहितर तू बायकात नरडं-णाऱ्या उत्तरानी! सावधान.)

●●●

मन्दाक्रान्ता

रे सारङ्ग! वनवसनयस्तत्त्वगाख्यान यूय
कुत्रावीत त्रिभुवनमनोहारि चाचल्यमक्ष्णो?॥
क्षां जानीमो गमनसमये हन्त कान्तारसीम—
न्येकाक्षिन्या कुवलयदृशो दृष्टिना यौवनश्रीः॥ २७६॥

मंदाक्रान्ता

सारंगांनों! वनिं वसुनिही, मोहवी विश्व ऐसें
सांगा पाहूं कुठुनि शिकलां नेत्रचांचल्य खासें? ॥
आलें ध्यानीं; कुणितरि फिरे एकली जी वनान्तीं
एणाक्षी ती लुटुनिच तुम्ही मेळवीली कला ती ॥२७६॥

गद्यार्थ—हे सारंगानो! रानात राहणारे तुम्ही! तेव्हा खरें सांगा पाहू, हें नेत्रचांचल्य तुम्ही कुठें शिकलात? आलें माझ्या ध्यानात, एकटी कुणीतरी हरिणाक्षी रानावनातून जात असता तिला लुटूनच ही यौवनाला अलंकाररूपी कला तुम्ही मिळविलीत हें खास.(चोरीच्या पैशावर श्रीमंत झालेल्यांना उद्देशून, यात चांचल्य व श्री हे शब्द विशेषार्थी, एकमेकांस पूरक आहेत.)

●●●

शार्दूलविक्रीडित

यद् वक्त्रं मुहुरीक्षसे न धनिनां, ब्रूषे न चाटून्मृषा
नैषां गर्वगिरः शृणोषि न च तान्प्रत्याशया धावसि॥
काले बालतृणानि खादसि परं निद्रासि निद्रागमे
तन्मे ब्रूहि कुरङ्ग! कुत्र भवता किं नाम तप्तं तपः? २७७

शार्दूलविक्रीडित

न श्रीमंतमुखांस पाहसि, न वा खोटी स्तुती बोलसी!
त्यांच्या गर्ववचां न ऐकसि, न त्यां आसावुनी धांवसी ॥
वेळीं खासि तृणांकुरांस, निजसी निद्रा जधीं ये तुला
केलें काय कुठें कसें तप तुवां सांगे कुरंगा! मला. ॥२७७॥

हृद्य–आर्येत

वघसि न धनिकमुखा तू खोटी चाटूक्तिही न वा वदसी
उद्धत तद्वच नैकसि,—आशा धरुनी न मागुती पळसी
खासी तृणचि भुकेला—येतां निद्रा सुखांत तू निजसी
तर तू तप केविं कुठें हरिणा! केलेंस सांग तें मजसी
॥ २७७ ॥

गद्यार्थ—हे हरिणा! वारवार श्रीमंतांचें तोंड तू पहात नाहींस; खोटी चाटूक्ति करीत नाहींस, त्यांचे गर्वोद्धत शब्द ऐकत नाहींस, आशेला लागून त्यांच्या पाठीं तू धावत जात नाहींस; भुकेच्या वेळीं कोवळे गवत खातोस, झोंप आली कीं सुखानें निजतोस—ही एवढी पुण्याई तू कोठं व कसलें तप करून मिळविलीस तें तरी मला सांग. (हरिणाच्या स्तुतीनें याचकाची निंदा.)

●●●

उपजाति

वसन्त्यरण्येषु चरन्ति दूर्वां पिबन्ति तोयान्यपरिग्रहाणि॥
तथापि वध्या हरिणा नराणां को लोकमाराधयितुं
समर्थः? ॥ २७८ ॥

उपजाति

खातात दूर्वा वसतात रानीं
मिळे स्वयें तेंच पितात पाणी ॥
तरी मृगां मारिति लोक तें कां?
हा! तोषवूं कोण शकेल लोकां? ॥ २७८ ॥

गद्यार्थ—रानात राहतात; दूर्वा खातात; सहजीं मिळेल तें पाणी पितात, इतकी निरुपद्रवी वृत्ति हरिणांची असूनसुद्धा, मानवप्राणी त्यांना मारतात . . . . मानवाचें समाधान करणें कोणाला शक्य आहे? (प्रकरण ५ श्लोक २७ पहा (मृग-मीनसज्जनाना) निरुपद्रवाचे सुद्धा अकारण वैरी जगात आहेत. दैवसुद्धा दुर्बलघातक आहेच.)

●●●

आर्या

इह किं कुरङ्गशावक केदारे कलममंजरीं त्यजसि?।
तृणधन्वा तृणबाणस्तृणघटित कपटपुरुषोऽयम्। २७९

आर्या

शेतांत (कुरणांत) पाडसा! कां
लोंब्या भाताचिया त्यजिसि भिउन?
तृणकृत धनु, शर, तृणकृत
भिववाया कपटपुरुष हा जाण ॥ २७९॥

गद्यार्थ—हे हरिणशावका! शेतात चांगल्या लुसलुशीत भाताच्या लोंब्या मिळाल्या, त्या (भिऊन,) टाकून कां जातोस? अरे हा जो पुरुष तुला दिसत आहे (बुजगावणें), तो खोटा, गवताचा केलेला आहे. त्याच्या हातातलें धनुष्यहि गवताचें, व बाणहि गवताचाच, आहे. (काल्पनिक भयानें हातांतलें फळ सोडून पळणाऱ्या हरिणहृदय बहादराना उद्देशून.) ●●●

आर्या

तृणमुखमपि न खलु त्वां
त्यजन्ति हे हरिण वैरिणः शबराः ।
यशसैव जीवितमिदं त्यज योजितशृङ्गसङ्ग्रामः ।।। २८० ।।

आर्या

**दातीं तव, तृण असुनिहि**
**त्यजिति न तुज हे मृगा ! शवर वैरी।**
**त्यज तर जीव यशोन्वित—**
**योजुनि तव शृङ्ग झुंज त्यांसि करी ! ॥ २८०॥**

गद्यार्थ—हे मृगा ! तुझ्या तोंडात गवताचा घास आहे, ( तूं अगदीं "दातीं तृण धरलेलें" आहेस, तरीहि, ) हे वैरी शिकारी तुला काहीं सोडणार नाहींत, हें निश्चित. मग, निदान मरायचें तें, कीर्ति संभाळून, सरक्षून तरी मर; म्हणजे असें की आपल्या शिंगाचा उपयोग करून त्यांच्याशीं चांगली झुंज देऊन वीराचें मरण पत्कर ! ( आत्मक्लेशानें शत्रूची दयाबुद्धि, सद्बुद्धि, न्यायवृत्ति, जागृत करून त्याला जिंकायचें, हें तत्त्व या कवीला मान्य दिसत नाहीं. कारण अशी जागृति होण्याच्या पलीकडे गेलेले दुष्ट असतात, हें कवीनें ओळखलें आहे. आणि अशा शत्रूशीं आत्मबळाचा प्रयोग करण्याऐवजीं, शस्त्रीचाच उपयोग करावा, हें इतिहाससिद्ध महान् तत्त्व, हरिणाचें निमित्त करून, कवि जगाला सांगत आहे. ) ●●●

उपजाति

विध्दा मृगी व्याधशिलीमुखेन मृगस्तु तत्कातरवीक्षितेन ॥
विहाय देहं विगतव्यथैका परस्य जीवावधिराधिरासीत्
।। २८१ ।।

वसंततिलका

**व्याधाचिया जरि शरें हरिणी सुविद्ध**
**नेत्रें भयाकुल तिच्या मृग होय विद्ध !**
**प्राणां त्यजून विगतव्यथ ती जहाली**
**आजन्म आधि परि तीच मृगास झाली ॥ २८१ ॥**

गद्यार्थ—शिकाऱ्याच्या बाणानें हरिणी विद्ध झाली, पण इकडे हरिण हा तिच्या भयाकुल दृष्टिपातानें विद्ध झाला ! प्राण सोडून ती हरिणी आपल्या दुःखांतून मुक्त झाली, पण, इकडे हरिणाला मात्र हाच मरेपर्यंतचा हृद्रोग होऊन बसला ! ( अत्यंत हळव्या व भेदरट लोकांना, कांहींना कांहीं तरी कारणानीं, चिंतारोग कायमचा लागलेलाच असतो. ज्याला प्रत्यक्ष दुःख झालें, त्यानें विव्हळावें, हें ठीकच; पण दुसरा विव्हळतो म्हणून हे विव्हळतात. दुसऱ्यांनीं स्वदुःखाचा अंत केला, तरी यांना तोच चिंतेचा विषय. नेपोलियनच्या विरुद्ध इंग्लंड व जर्मनी एकवटून लढत होते. जर्मन कां पळत होते तर नेपोलियन त्यांच्या प्रत्यक्ष पाठीस लागला म्हणून; पण इंग्रज कां पळत होते तर म्हणे नेपोलियन पाठीस लागेल म्हणून ! असे इतिहासच सांगतो. ) ●●●

वसंततिलका

सेयं स्थली वनतृणाङ्कुरजालमेत-
त्सेयं मृगीति हृदि जातमुदः कुरङ्गः ।।
नैवं तु वेत्ति यदिहान्तरितो लताभि—
रायाति सज्जितकठोरशरः किरात. ।। २८२ ।।

वसंततिलका

**तें हें तृणांकुरयुत स्थळ सांपडून**
**ती ही मृगी बघुनि हो मृग सुप्रसन्न ॥**
**जाणे न तो परि इथें लपुनी लतांत**
**येतो सुसज्जशर निर्घृण तो किरात ॥ २८२ ॥**

गद्यार्थ—तेंच हें (पूर्व परिचित) भरपूर गवत वाढलेलें कुरण; ती ही *हरिणी*—असें सर्व पाहून *हरिण* आनंदित झाला. परतु त्याला हें काहीं माहीत नव्हतें, कीं, येथेंच, वेलींमध्यें लपून, कठोर बाण सज्ज करून, शिकारी येत आहे. (धी देखा लेकिन् बड्या नहीं देखा. "तिसरें तें सावधपण। सर्व विषयीं ॥" ही रामदासोक्ति कधींहि विसरून चालत नाहीं. ) ●●●

वसंततिलका

रोमन्थमाचरय मन्थरमेत्य निद्रां
मुञ्च श्रमं तदनु सञ्चर रे यथेष्टम् ।।
दूरे स पामरजनो मुनयः निलैते
निष्कारणं हरिणपोत बिभेषि कस्माद् ?।।२८३ ।।

वसंततिलका

**तूं संथ रे कर रवंथ नि झोंप घेईं**
**जाऊनि शीण, मग संचर तूं कुठेंही ।**
**दूरी किरात खल ते; मुनि हेच लोक**
**कां रे अकारण भिशी मृगपोत रंक ।। २८३ ।**

गद्यार्थ—( व्याधानें पाठलाग केला असता, पळतपळत जीव घेऊन, पाडस मुनींच्या आश्रमात शिरलें. तों दाढीवाले मुनि पाहून, त्याना शिकारी समजून, पाडसाची भीति कांहीं गेली नाहीं. म्हणून कवि म्हणतो )— हे पाडसा! इथें स्वस्थपणें स्वस्थ कर; झोंप घे; शीण गल्यावर यथेच्छ भ्रमण कर. ते दुष्ट शिकारी आता दूर राहिले. हे दिसतात ते मुनि आहेत— आता उगाच का भितोस?

●●●

हरिणी

द्रुततरमितो गच्छ प्राणैः कुरङ्ग नियुज्यसे
किमिति वलितग्रीव स्थित्वा मुहुर्मुहुरीक्षसे? ॥
विदधति हतव्याधानां ते मनागपि नार्द्रतां
कठिनमनसामेषामेते विलोचनविभ्रमा ॥ २८४ ॥

हरिणी

**त्वरित इथुनी जाईं प्राणां गमाविसि तूं मृगा**
**फिरफिरुनि कां माना वेळावुनी बघसी उगा? ॥**
**कठिणहृदयी व्याधांच्या या कधींहि दया मुळीं—**
**उपजविल ना चित्तीं, लीला तुझ्या नयनांतली २८४**

गद्यार्थ—हा मृगा! तू इथून लौकर निघून जा, नाहींतर, आपले प्राण गमावून बसशील! का उगाच, पुन्हा पुन्हा, उभा राहून, मान वळवून वेळावून *बघत आहेस? अरे! तुझ्या नेत्राची ही मोहक लीला, या दुष्ट व्याधाच्या कठिण हृदयामध्यें,* दयार्द्रता, यत्किंचित्सुद्धा उत्पन्न करू शकणार नाहीं (दया उत्पन्न होण्याला सुद्धा) थोडीतरी सहृदयता मूळात असावी लागते. म्हणून दगडाचें हृदय असणाराच्या पुढें, दया उत्पन्न करण्याचे प्रयोग चालणार नाहींत. म्हणून हें तत्र निरपवाद नव्हे.)

●●●

शिखरिणी

स्थलीनां दग्धानामुपरि मृगतृष्णामनुसरन्
तृषार्तः सारङ्गो विरमति न खिन्नोऽपि मनसि ॥
अजानानस्तत्त्वं न स मृगयतेऽन्यत्र सरसी—
मभूमौ प्रत्याशा न च फलति विघ्नं च कुरुते ॥२८५॥

शिखरिणी

*जळाल्या भूभागावर मृगजळातें अनुसरी*
**न थांबे तान्हेला हरिण, हृदयीं खिन्नहि तरी ॥**
**तळ्या नान्या शोधी, मनिं न कळतां तत्त्व परी तें**
**दुराशा अस्थानीं, मुळिं न फळतां विघ्न करिते २८५**

गद्यार्थ—जळलेल्या (उष्ण) वैराण प्रदेशावर (पाण्याचा भ्रम उत्पन्न करणारा जो देखावा दिसतो, तिकडे, पाण्याच्या आशेनें मृग धावतात, त्यालाच मृगजळ म्हणतात. अशा त्या) मृगजळामागें *धावणारा हरिण, तान्हेला, मनानें शिणला तरी धावायचा थांबत* नाहीं. कारण या देखाव्याचें *सत्य स्वरूप त्याला कळत* नाहीं, यामुळें दुसरीकडे, खरोखरीचें तळें, शोधायलाहि तो जात नाहीं. अस्थानीं ठेवलेली आशा, सफल तर, होत नाहींच, पण उलट विघ्न उत्पन्न करते. (कधींहि न 'द्रवणाऱ्या' दुष्टाच्या गळ्यात, "भाई भाई" म्हणून मिठ्या मारायला जाण्याचे, व त्यामुळें होरपळून निघण्याचे, प्रकार जगभर चालूच आहेत. पण त्यात भेदाभेद इतकाच कीं हरिणाला बिचाऱ्याला तें तत्त्व *समजण्याची बुद्धिच नसते, पण या मानवी मृगाना ती बुद्धि असूनहि, केवळ तें तत्त्व शिकवणाऱ्या गुरूला, तें श्रेय मिळू* नये, एवढ्याच साठीं ते अशा मृगजळामागें जातात पण हट्टानें, तत्त्वज्ञानाचें दुसरें तळें शोधीत नाहींत.)

●●●

शार्दूलविक्रीडित

नात्र व्याधशराः पतन्ति परितो नैवात्र दावानलो
नाप्युच्चावचभीतिरस्ति कुहकृन् नो वागुराबन्धनम् ॥
पर्यालोच्य कुरङ्गकेण निहितो नक्षत्रनाथाश्रयो
नो जानाति यदत्र दास्यति विधिः स्वर्भानुदन्तव्रणम् ॥२८६॥

शार्दूलविक्रीडित

***" येथें ना पडती किरातशर; ना दावाग्नि वा भोंवतीं***
***ना खालींवर भूहि—दुष्ट मज या जाळ्यांत ना बांधती"***
**हें पाहून तिथें, वसे मृग जरी चन्द्राश्रया जाउन**
**जाणे ना परि त्या तिथेंहि विधि दे स्वर्भानुदन्तव्रण २८६**

गद्यार्थ—(चंद्रावरचा शुकशुकाट पाहून) हरिणानें मनात विचार केला कीं, येथें शिकाऱ्याचे बाण पडावयाचे नाहींत, समोवतीं वणवे लागणार नाहींत, श्रमविणारे खाचखळगे इथ नाहींत, दुष्टानीं लावून ठेवलेल्या जाळींहि नसल्यानें पकडले जाण्याचें *भय नाहीं, या विचारानीं त्यानें नक्षत्राचा मुख्य जो चंद्र त्यावर* आश्रय घेतला. (चंद्रावर जो डाग आहे, तो, काहींच्या मतें सशाचा आकाराचा, कोणाच्या मतें हरिणाच्या आकाराचा आहे म्हणून चंद्राला 'शशांक' 'मृगांक' अशीं नावें आहेत.) परंतु त्या मृगाला हें माहीत नव्हतें कीं येथेंहि ब्रह्मदेव, आकाशस्थ *दुर्वोच्या (किंवा राहूच्या) दातानीं त्याला चांगला चावा घेणार* आहे. (चंद्रावर वातावरण नसल्यानें व शीतलत्व देणारे पाणी किंवा हवाशीरा हे नसल्यानें, तेथें सूर्याचीं किरणें, दातानीं फाडून

खावें, तरीं तीक्ष्ण व अक्षरशः खायला उठल्यासारखीं असणार हें शास्त्रीय सत्य आहे. ) ( म्हणाऱ्या वेळीं चंद्राला ग्रासणाऱ्या राहूचे दात हरिणालाहि लागणारच. ) ●●●

पुष्पिताग्रा

कति कति न मदोद्धताश्चरन्ति
प्रतिशिखरं प्रतिकाननं कुरङ्गाः ? ॥
क्वचिदपि पुनरुत्तमा मृगास्ते
मदयति यन्मद एव मेदिनीशान् ॥ २८७ ॥

पुष्पिताग्रा

फिरति न किति कां मदोद्धताङ्ग
प्रतिशिखरीं प्रतिकाननीं कुरंग ॥
विरलचि मृग थोर तेच खास
मदचि जयांतिल मोहवी नृपांस ॥ २८७ ॥

गद्यार्थ—डोंगराच्या प्रत्येक शिखरावर, प्रत्येक रानात मोठ्या मदोन्मत्तपणें फिरणारे मृग काय थोडे कां आहेत ? परंतु ज्याच्या मदानेंच नृपतींना सुद्धां मोहित करतां येतें, असा मद (कस्तूरि) प्रसवणारे श्रेष्ठ मृग फारच थोडे. ●●●

वसंततिलका

कस्तूरिकां हरिण ! मुञ्च वनोपकण्ठे
मा सौरभेण ककुभः सुरभीकुरुष्व ॥
आस्तां यशो ननु किरातशराभिघातात्
त्राताऽपि हन्त भविता भवतो दुरापः ॥ २८८ ॥

वसंततिलका

बाहेर ठेव वनिंच्या, मृग ! कस्तुरीस
तेणें सुगंधमय तूं न करीं दिशांस ॥
जेव्हां किरातशर हे तव जीव घेती
त्राताहि दुर्मिळ तुला; कुठली सुकीर्ति ? ॥ २८८॥

गद्यार्थ—हे मृगा ! ही तुझी कस्तुरी तू या रानाबाहेर ठेव, तिनें, सर्व दिशाना सुगंधित करून सोडूं नकोस. हे व्याध जेव्हा तुझ्यावर शराघात करतील, तेव्हां, तुला, तुझी ती सौरभ्यकीर्ति तर राहोच पण त्या शराघातापासून तुझें रक्षण करणारा सुद्धां दुर्मिळ होऊन बसेल. ( जेव्हा गुण हे वैरी होतात, तेव्हां, ते लपवून ठेवणेंच श्रेयस्कर. ) ●●●

मन्दाक्रान्ता

सौरभ्येण त्रिभुवनमनोहारिणा काननेऽस्मिन्
यत्कस्तूरीहरिण ! भवता वासितो दिग्विभागः ॥
तस्यैतत्ते फलमुपनतं पत्रिभिर्लुब्धकानां
विद्धः प्राणांस्त्यजसि; न गुणः श्रेयसे निर्गुणेषु ॥ २८९ ॥

मन्दाक्रान्ता

सौरभ्यानें त्रिभुवनमनोहारि, येथें वनास
हे कस्तूरीमृग ! भरुनि तूं टाकिलें या दिशेस ॥
त्याचेंची हें फळ तुज; शरें विद्ध तूं लुब्धकांच्या
देशीं प्राणां; गुण न फल दे सन्निधीं निर्गुणांच्या ॥ २८९

गद्यार्थ— ( मागच्या श्लोकातला, कस्तूरी रानाबाहेर ठेवण्याचा उपदेश कस्तूरीमृगानें कांहीं ऐकला नाहीं. भोग म्हणावे त्याचीं फळें ! ) हे कस्तूरीमृगा ! त्रैलोक्याचें मन हरण करणाऱ्या तुझ्या त्या सुगंधानें, तू रानाची ही सर्व दिशाच भरून टाकलीस आणि त्याचेंच फळ, म्हणजे व्याधाच्या बाणानीं, विद्ध होऊन प्राण सोडण्याची पाळी तुझ्यावर आली आहे ! निर्गुणी माणसांपाशीं गुणाचें चीज कसें होणार ? ●●●

## हंसान्योक्ति

अनुष्टुभ्

हंसः श्वेतो बकः श्वेतः को भेदो बकहंसयोः ? ।
नीरक्षीरविभागे तु हंसो हंसो बको बकः ॥ २९० ॥

आर्या

बक शुभ्र, हंस शुभ्रचि, भेद कुठें उभयतांमधें खास ? ।
पाणी दूध निराळें करतां बक बकचि, हंस तो हंस ॥ २९०

गद्यार्थ— हंस पांढरा असतो. बगळाहि पांढरा असतो. ( तेव्हा वरवर पाहतां ) त्या दोघामध्यें काय भेद आहे ? परंतु ( जलमिश्रित दुधांतून, ) दूध व पाणी निराळें करण्याची परीक्षा पाहिली, कीं, हंस तो हंस आणि बगळा तो बगळा. ●●●

वसंततिलका

रे राजहंस ! किमिति त्वमिहागतोऽसि ?
योऽसौ बकः स इह हंस इति प्रतीतः ॥
तद्गम्यतामनुपदेन पुनः स्वभूमौ
यावद्वदन्ति न बकं खलु मूढलोकाः ॥ २९१ ॥

वसंततिलका

**आलास आज इथ कां वद राजहंस ?**
**जातो इथें समजला बक हाच हंस ॥**
**या पावलींच निजभूमिस जाइ; जों न**
**हे मूर्ख तूस वदती बगळा म्हणून ॥ २९१ ॥**

गद्यार्थ— हे राजहंसा ! तू येथें कशाला आलास ! येथें हा जो बगळा आहे, तोच हंस समजला जातो ! ( इतके पंडित व रसिक येथले लोक आहेत. ) तेव्हा हे मूर्ख, जोंवर, तुला बगळा म्हणूनच संबोधीत नाहींत तोंवर ( त्या प्रसंगाच्या आंतच ) तू आलास तसाच आपल्या मायभूमीस जा ! ( जेथे गुणाची पारख नाहीं तेथें गुणी जनानीं जाऊं नये. तेथें जाणें म्हणजे स्वतःची किंमत कमी करून घेणेंच होय ) ●●●

आर्या

नीरक्षीरविवेके हंसालस्यं त्वमेव कुरुषे चेत् ।
विश्वेऽस्मिन्नधुनाऽन्यः कुलव्रतं पालयिष्यति कः ? ॥ २९२

आर्या

**पाणी दूध निराळें करण्या आळस तुलाच हंस जरी ।**
**विश्वीं आतां दुसरे कुलव्रता पाळतील कोण तरी ? ॥**

गद्यार्थ— हे हंसा ! दूध आणि पाणी निरनिराळे करून दाखविण्याच्या कामात तूच जर आळस करत असशील, तर, या विश्वात, आता दुसरे कोण कुलव्रत पाळणार ? ( जगभर अशीं अनेक गुणी माणसे आहेत, कीं, आपल्या अगम्या गुणाचा उपयोग करून दाखविण्याच्या कामीं, त्याना मनस्वी कंटाळा असतो ! त्याना उद्देशून अशा विश्वासपात्र माणसानींच आपलें कुलव्रत सोडलें तर जगानें दुसऱ्या कोणाकडे पहावें ? ) ●●●

वसंततिलका

अम्भोजिनीवननिवासविलासमेव
हंसस्य हन्ति नितरां कुपितोऽपि धाता ॥
न त्वस्य दुग्धजलभेदविधौ प्रसिद्धां
वैदग्ध्यकीर्तिमपहर्तुमसौ समर्थः ॥ २९३ ॥

वसंततिलका

**हंसावरी कुपितही विधि फार झाला**
**खेळूं न फार तर दे कमलांत त्याला ॥**
**प्रख्यात दुग्धजलभेदकबुद्धिकीर्ति**
**त्याची हरूं न शकतो विधिही परी ती ॥२९३॥**

गद्यार्थ— ब्रह्मदेव, समजा, कीं हंसावर फार रागावला, तर तो येऊनजाऊन, हंसाचा कमलवनातला निवास, व विलास नष्ट करूं शकेल. परंतु, पाणी व दुग्ध निरनिराळें करून दाखविण्याच्या अद्‌भुत कौशल्यानें हंसाला प्राप्त झालेली ती सुप्रसिद्ध कीर्ति काहीं, तोहि हरण करू शकत नाहीं. ( सत्तामदानें धुंद झालेले राजे, अधिकारी, हे गुणीजनाचा अन्य सर्व तऱ्हेनें छळ करू शकतील, परंतु त्याच्यातले गुण, ते थोडेच हरण करू शकतील ? सावरकराची पदवी अडकावून ठेवल्यानें सावरकराचे गुण नाहींसे करता आले ? ) ●●●

रथोद्धता

गाङ्गमम्बु सितमम्बु यामुनं कज्जलाभमुभयत्र मज्जत. ॥
राजहंस! तव सैव शुभ्रता चीयते न च, न चापचीयते २९४

रथोद्धता

**शुभ्र गांगजल, आणि यामुन**
**श्याम, या उभयतांत न्हाउन ॥**
**राजहंस ! तव तीच शुभ्रता**
**वाढते न, घटते न तत्त्वता ॥ २९४ ॥**

किंवा हेंच ( *गौरवनु जानकी या चालीवर* )—

**शुभ्र गंगाजळीं । श्याम यमुनाजळीं ।**
**उभय तीर्थामधें ( न्हाणुनीही ) ॥**
**राजहंसा ! तुझी । शुभ्रता मूळ जी ।**
**अधिक वा, वा उणी होत नाहीं ॥ २९४ ॥**

गद्यार्थ— शुभ्रवर्णाच्या गंगाजलात तुला स्नान घडो किंवा काजळासारख्या ( ही अतिशयोक्ति ) काळया यमुनाजळात घडो, हे राजहंसा ! तुझी ती मूळची शुभ्रता तशीच राहते ! अधिकहि होत नाहीं, किंवा कमीहि होत नाहीं. ( खरे थोर पुरुष असेच असतात. कोणत्याहि परिस्थितींत ते आपलें मूलस्वरूप सोडीत नाहींत. ) ●●●

आर्या

यदि नाम दैवगत्या जगदसरोजं कदाचिदपि जातम् ।
अवकरनिकरं विकिरति तत्किं कृकवाकुरिव हंसः ? ॥ २९५ ॥

आर्या

**जर कां दैवगतीनें कमलहीन जग बनेल हें साचें ।**
**तरि कोंबडयापरी का**
**उकरी हा हंस ढीग कचऱ्याचे ? ॥ २९५ ॥**

गद्यार्थ— दैवाची गति फिरल्यानें, सर्व जग जरी कदाचित् कमलविरहित झालें, तरी, हा हंस कोंबड्याप्रमाणें काय कचऱ्याचे ढीग उकरील ? ( आपद्ग्रस्त झाले तरी थोर पुरुष

आपल्या मोठेपणाला न शोभणारें हलकें काम करण्याइतक्या नीच पदवीला उतरत नाहींत. सिंहान्योक्तींत व गजान्योक्तींत या तऱ्हेचे मानीपणाचे दर्शक श्लोक आहेतच. )

●●●

वसंततिलका

मुक्ता मृणालपटली भवता निपीता
न्यम्बूनि यत्र नलिनानि निषेवितानि ॥
रे राजहंस! वद तस्य सरोवरस्य
कृत्येन केन भवितासि कृतोपकारः ? ॥ २९६ ॥

वसंततिलका

खाल्लेस तूं बिस जिथें; जल प्यायलास
केलास तूं कमलिनींत जिथें निवास ॥
रे राजहंस ! वद त्याच सरोवरासी
देणार तूं परतफेड कधीं नि कैशी ? ॥ २९६ ॥

गद्यार्थ— हे राजहंसा ! ज्या सरोवरामध्ये तूं यथेच्छ कमलतंतु भक्षण केलेस, पाणी प्यालास आणि जेथल्या कमलिनीमध्ये राहिलास, त्या सरोवराच्या उपकाराची परतफेड कोणत्या कृत्यानें ( व कधीं ) करणार आहेस ? ( स्वतःवर झालेल्या उपकाराची परतफेड करणें, अनृणी होणें हें हिंदुधर्माचें एक विशिष्ट तत्त्व आहे. कित्येक लोक असे आहेत कीं, उभ्या जन्मात ते हें कर्तव्य पार पाडीत नाहींत. अशाना, अशा अन्योक्तींनीं, टोंचीत रहाणें हें कवि आपलें कर्तव्य समजतात.)

●●●

पृथ्वी

पुरा सरसि मानसे विकचसारसालिस्खलत्—
परागसुरभीकृते पयसि यस्य यातं वयः ॥
स पल्वलजलेऽधुना मिलदनेकभेकाकुले
मरालकुलनायकः कथय रे कथं वर्तताम् ? ॥ २९७ ॥

शार्दूलविक्रीडित

पद्में जेथ फुलून रेणु गळतां झालें सुगंधी पय
पूर्वी यापरि मानसांत अवघें गेलें जयाचें वय ॥
आतां या डबक्यांत, बेडुक जिथें कित्येक ते डुंयती
होई सांग किती कठीण जगणें त्या राजहंसाप्रति
॥ २९७ ॥

गद्यार्थ— कमलें उमलून, त्यांतील रेणु गळल्यामुळें, ज्याचें पाणी सुगंधित झालें आहे, अशा मानस सरोवरात, पूर्वी ज्याचें आयुष्य गेलें, अशा त्या हंसश्रेष्ठानें, आतां, अनेक बेडकानीं ज्याचें पाणी ढवळून सोडलें आहे, अशा एखाद्या डबक्यांत कसे जगावें ? सांगा; ( फुले वेंचली तेथें गोवऱ्या वेचावयाची दैवगतीनें पाळी आलेल्या थोराच्या सहानुभूतीनें कवि तळमळत आहे ! )

●●●

अनुष्टुभ्

एकेन राजहंसेन या शोभा सरसो भवेत् ।
न सा बकसहस्रेण परितस्तीरवासिना ॥ २९८ ॥

आर्या

जी ये तळ्यास शोभा एक तिथें राजहंस असण्यानें ।
तीरीं सभोंवतीं बक सहस्र असुनी न ती कधीं येणें
॥ २९८ ॥

गद्यार्थ— एक राजहंस असण्यामुळें सरोवराला जी शोभा येते, ती, तीरावर भोंवतीं सहस्र बगळे असूनहि येत नाहीं !

●●●

अनुष्टुभ्

अस्ति यद्यपि सर्वत्र नीरं नीरजमण्डितम् ।
रमते न मरालस्य मानसं मानसं विना ॥ २९९ ॥

अनुष्टुभ्

नीरजालंकृत जरी नीर सर्वत्र सापडे ।
अन्यत्र मानसावीण हंस-मानस ना जडे ॥ २९९ ॥

गद्यार्थ— कमलानीं सुशोभित असें पाणी ( एकट्या मानस सरोवरातच आहे असे नाहीं ) सगळीकडे आढळून येतें, परंतु हंस-मानस मानसाविना इतरत्र रमत नाहीं. ( मानसाची इतर वैशिष्ट्यें इतरत्र कोठें आहेत ! )

●●●

रथोद्धता

कश्चिदेव समयं समागतं त्वां न विस्मरति शश्वदम्बुजम् ॥
मानसे विहर हंस ! मानसे मा विमुञ्च पुनरस्य सौहृदम्
॥ ३०० ॥

रथोद्धता

**येसि हंस ! जरि तू कधींतरी**
**पद्म नित्य तुजला स्मरे परी ॥**
**मानसीं विहर हंस ! मानसीं–**
**याचिया न परि सोड मैत्रिसी ॥ ३०० ॥**

गद्यार्थ—हे हंसा ! तू कधीं काळीं येतोस, (व या पद्माचा उपभोग घेतोस, पण,) तरी हें पद्म सतत तुझें स्मरण करीत असतें; कधींच तुला विस्मरत नाहीं. तेव्हा तूहि (त्याच्या भावनेला योग्य प्रतिसाद देण्याचें कर्तव्य हें कर कीं) मानसांत विहार कर परतु तो तसा करीत असता, मानसातून (मनातून) याच्या विषयींच्या प्रेमाला दूर करू नकोस. (दुष्यंताला शकुन्तलेच्या एखाद्या सखीनें बजावावें इतकी ततोतत त्या परिस्थितील जुळणारी, ही *अन्योक्ति आहे. मानससारख्या* उच्चपदस्थानें म्हणजे राजानें सहज रानात गेल्यावेळीं एका वनकन्येचा उपभोग घेतला तेंव्हापासून ती त्याचें सतत स्मरण करीत बसली. इकडे हा परत मानससरोवरात गेल्यावर त्या *वनकन्येला त्यानें विसरून जाऊ नये इतकीच विचारांची अपेक्षा.*)

●●●

वसंततिलका

स्थित्वा क्षणं विततपक्षतिनाऽन्तरिक्षे
मातङ्गसङ्ग–कलुषा नलिनीं विलोक्य ।
उत्पन्नमन्युपरिघर्घरनि.स्वनेन
**हंसेन साश्रु परिवृत्य गत नलिन्याः ॥३०१॥**

वसततिलका

**फैलावुनी क्षण, नभीं स्थित, पख, हंस**
**पाहे गजें कलुपिता जधि पद्मिनीस ॥**
**संतापुनी करित घर्घर निःस्वनातें**
**सोडी वळून मग साश्रुच हंस तीर्तें ॥ ३०१ ॥**

गद्यार्थ— हंसानें पंख फैलावून, क्षणभर आकाशातच थांबून खालीं पाहिलें, तो काळ्या हत्तीनें कुस्करून टाकलेली नलिनी, त्यास दिसली. तें दृश्य पाहून त्याला क्रोध येऊन तो गुरगुरला पण (आपल्या दौर्बल्याची जाणीव होऊन) बिचारा डोळ्यात पाणी आणून, वळून, त्या नलिनीला सोडून परत फिरला ! (फाळणीच्या वेळीं जीव बचावून पळून आलेल्या सहस्रों निर्वासितांवर, स्थिरस्थावर झाल्यावर घरीं परत जाऊन पाहता, बलात्कारित गृहलक्ष्मी पाहण्याची पाळी आली. सूड घेण्याची शक्तिहि नाहीं,—तितका पाणीदारपणाहि नाहीं; अशा जाणिवेनें केवळ रडत रडत, त्या लक्ष्मीला सोडून त्याना परत वळावें लागलें असतानाच्या, त्या परिस्थितीचें, ततोतत चित्र, *या अन्योक्तिरूपानें, कवीनें, या प्रसगाची काहीं कल्पनाहि* नसता शेंकडों वर्षांपूर्वी काढून ठेवावें हें केवढें आश्चर्य ! ●●●

भृङ्गाङ्गनाजनमनोहरहारिगीतां
राजीवरेणुकणकीर्णपिशङ्गतोयाम् ॥
रम्यां हिमाचलनदीं प्रविहाय हंस !
हे हे हताश वद का दिशमुत्सुकोऽसि ? ॥ ३०२ ॥

वसंततिलका

**भृंगी मनोहर जिथें मधु गाति गीत**
**पद्मस्थ रेणु गळुनी जल पिंग जींत ॥**
**रम्या हिमाचलनदीस त्यजून हस**
**हा हा हताश वद जासि कुण्या दिशेस ? ॥ ३०२ ॥**

गद्यार्थ—भृंगाङ्गना जेथें मनोहर गुंजारवाचें गायन करीत आहेत, कमलातला रेणु गळून जिच्यातलें पाणी पिंगट रगाचें झालें आहे, अशी हिमालयातून वाहणारी ही सुदर नदी सोडून हे हसा ! असा हताश होऊन दुसऱ्या कोणत्या दिशेकडे जाण्यास उत्सुक झाला आहेस ? (काय बरें या हसाची व्यथा असेल ? त्याची प्रिया मानससरोवरात राहून गेली म्हणून असे असेल काय ? का मागील ३०१ च्या श्लोकातल्या प्रमाणें याची नेहमींची पद्मिनी दुसऱ्या कोणी काबीज केली असेल काय ? व त्यामुळें कै. शि. म. परांजपे याच्या एका गोष्टींतल्या, बारा *वर्षांनीं घरीं परत फिरलेल्या, माणसाप्रमाणें,—"माझी शेती* आता दुसऱ्याची झाली आहे. माझें घर आता दुसऱ्याचें झालें आहे. माझ्या शेतात *आता दुसऱ्याचीं गुरें चरत आहेत.* माझ्या घरात आता दुसऱ्याचीं पोरें फिरत आहेत" इत्यादि *या दृश्यानें उद्विग्न होऊन तर तो हस दुसरीकडे निघाला नसेल?*)

●●●

शिखरिणी

तरौ तीरोद्भूते क्वचिदपि दलाच्छादिततनु.
पतद्धारासार गमय विषमा प्रावृषमिमाम् ॥
निवृत्तायां तस्यां सरसि सरसोत्फुल्लनलिने
स एव त्वं हंसः पुनरपि विलासास्त इह ते ३०३

शिखरिणी

**दलें झांकोनी तू निजतनुस, तीरीं तरुवरी**
**महावृष्टीचे हे कठिण दिन कंठी कुठतरी ॥**
**सरोनी ते, पद्मीं सरसिं जार्धि येतील फुलुनी**
**पुन्हां तो तू हंस प्रचुर तव लीला कर झणीं ॥२०३॥**

गद्यार्थ— हे हंसा, तीरावर उगवलेल्या कुठल्या तरी झाडावर, पानानीं आपलें अंग झाकून घेऊन, भयंकर धो धो वृष्टीचे पावसाळ्याचे, हे कठीण दिवस, कसे तरी काढ; हे दिवस एकदा संपून गेले, व पुन्हा सरोवर उमललेल्या सरस कमलानीं भरून गेलें, कीं, पुनरपि तोच तू हंस पुन्हा तेच आपले विलास खुशाल कर. ( सर्वांवरच केव्हाना केव्हा तरी आपत्ति येतात व पाडवाच्या प्रमाणें अज्ञातवासात सुद्धा दिवस काढावे लागतात. म्हणून सर्वांनीं त्या प्रसंगाना तोंड देण्याची तयारी ठेवावी; पण, भविष्याच्या विषयीं आशावाद सोडू नये. )

शार्दूलविक्रीडित

य सन्तापमपाकरोति जगतो यश्चोपकारक्षमः
सर्वेषाममृतात्मकेन वपुषा प्रीणाति नेत्राणि यः ॥
तस्याप्युन्नतिमम्बुदस्य सहसे यन्न त्वमेतावता
वर्णैनैव परं मरालधवलः कृष्णश्चरित्रैरसि ! ॥ २०४ ॥

शार्दूलविक्रीडित

**पृथ्वीला उपकारकारक, सदा, संताप जो घालवी**
**सर्वांच्या, अमृतासम स्वतनुनें नेत्रांस जो तोषवी ॥**
**साहे उन्नति ना मुळीं तुज, अशा त्याही घनाची जर**
**वर्णें केवळ शुभ्र, हंस ! असती; काळा कृतीनें तर २०४**

गद्यार्थ—( पावसाळ्याचे दिवस व त्यामुळें मेघ वर आकाशात येणें या गोष्टी हंसाला अप्रिय असतात, कारण पावसाबादळानीं, तळ्यातल्या कमळाचा सत्यानाश होऊन, हंसाचें विलासस्थळच नाहींसें होतें ही पार्श्वभूमि. ) जो मेघ जगताचा ताप नष्ट करून मोठे उपकार करतो व अमृतमय आपल्या देहाच्या दर्शनानें सर्वांच्या नेत्राचें पारणें फेडतो, अशा मेघाची सुद्धा उन्नति ( वर आकाशात येणें ) जर तुला सहन होत नसेल, तर हे हंसा ! तू केवळ वर्णानें तेवढा शुभ्र, व प्रत्यक्ष कृतीनें मात्र काळा आहेस, असेंच म्हणणें प्राप्त आहे. ( जगाचें हित होत असता त्याच घटनेंत क्वचित् कुण्या व्यक्तीचें अहित होण्याचा संभव असतो; अशा वेळीं "पुष्कळाचें पुष्कळ हित" या तत्त्वाला धरून त्या व्यक्तीनें त्या घटनेचा व्यक्तिगत दृष्ट्या द्वेष न करता, उलट स्वागतच करावें, हें सांगण्याचा हेतु. )

## हिमाचलान्योक्ति

आर्या

तरुकुलसुषमापहरा जनयन्तीं जगति जीवजातार्तिम् ॥
केन गुणेन भवानीतात ! हिमानीमिमां वहसि ? ॥ २०५ ॥

आर्या

**नाशी जो तरुशोभा, अतिपीडा देइ सर्व जीवांसी ॥**
**तो हिमपुंज हिमाद्रे ! कुण्या गुणास्तव शिरीं सदा धरिसी ? ॥ २०५ ॥**

गद्यार्थ— हे हिमालया ! जो सर्व तरुसमुदायाचें सौंदर्य हरण करतो, आणि, अखिल जीवसृष्टीला अत्यंत पीडादायक असतो, असा तो हिमसंचय, त्याच्यातल्या कोणत्या गुणाला भाळून, तू आपल्या शिरावर सतत धारण केला आहेस ? ( चमत्कारिक तर खरेंच, पण पुष्कळ मोठे लोक, एखाद्या दुर्जनाशीं घनिष्ठ संबंध ठेवताना आढळतात. त्याचें गूढ कारण काय तेंच ??? ??? आहे )

# प्रकरण ४८ वें

## शोक, विलाप, आर्तोद्गार

( १ ) अजविलाप ( २ ) परित्यक्त सीतेचे उद्गार ( ३ ) परित्यक्त अयोध्या नगरीचे उद्गार ( ४ ) जगन्नाथाचा भामिनीस्तव विलाप ( ५ ) रतिविलाप.

---

श्लोक १ ते ३७ पर्यंत रघुवंशातल्या आठव्या सर्गातील अजाचा विलाप व त्याचें सांत्वन यांचें भाषांतर आहे. अज हा रघुराजाचा मुलगा. स्वयंवरपद्धतीनें त्याचें इंदुमतीशीं लग्न झालें व अत्यंत प्रेममय संसार होऊन त्यांना एक पुत्र झाला, तोच दशरथ तो लहान असतांना, अचानक एक दिवस, हे पति पत्नी विहारमग्न असतां, आकाशातून चाललेल्या नारदाच्या वीणेवरील पुष्पमाला तिच्या अंगावर पडताक्षणीं, तिचे प्राण तिला सोडून गेले. इंदुमति ही मूळची स्वर्गीय अप्सरा तृणबिंदूची तपश्चर्या भग्न करण्याचा तिनें प्रयत्न केला म्हणून, त्यानं, तू मानवी स्त्री होशील असा तिला शाप दिला, पण मग तिनें क्षमायाचना केल्यावर उःशाप दिला कीं, स्वर्गीय पुष्पें तुझ्या अंगावर पडताच तू मानवदेहांतून मुक्त होऊन पुन्हा स्वर्गांत जाशील. अजाला हें माहीत नव्हतें. तें आपल्या त्रिकालदर्शी बुद्धीनें जाणून, वसिष्ठमुनींनीं आपल्या शिष्याकरवीं अजाला तें सव सांगून त्याचें सांत्वन केलें. अजानें पत्नीबरोबरच प्राणत्याग करण्याचा विचार सोडून, मुलाचं यथायोग्य संवर्धन करून, प्रायोपवेशन करून, मग तोहि स्वर्गांत गेला व पुन्हा इंदुमतीशीं त्याचें मीलन झालें. )

●●●

*वैतालीय*

विललाप स बाष्पगद्गदं सहजामप्यपहाय धीरताम् ॥
अभितप्तमयोऽपि मार्दवं भजते कैव कथा शरीरिषु ? ॥१॥

*वसंततिलका*

**सोडोनिया सहज धैर्यहि, अंतरांत**
**होऊनि गद्गद रडे अज तो नितान्त ॥**
**संतप्त लोहहि भजे मृदुताच साची**
**यांता कथा करणें मग मानवाची ? ॥**

गद्यार्थ— अंगींचें जन्मजात धैर्यहि सोडून, अंतरूनीं गद्गद अशा अंतःकरणानें, अजानें विलाप केला तापलें म्हणजे (लोखंडासारखें) लोखंड सुद्धां मऊ होतें, मग, मानवाची कथा काय ?

●●●

*वैतालीय*

कुसुमान्यपि गात्रसङ्गमात्प्रभवन्त्यायुरपोहितुं यदि ॥
न भविष्यति हन्त साधनं किमिवान्यत्प्रहरिष्यतो विधेः ? ॥२॥

*वसंततिलका*

**पुष्पें मृदूहि,ठरतीं तनुसंगतींत**
**प्राणापहार करण्या जर हो समर्थ ॥**
**होई न काय दुसरें मग त्या विधीला**
**संहारसाधन नरा प्रहरावयाला ? ॥ २ ॥**

गद्यार्थ—देहाचा स्पर्श झाल्याकारणानें, फुलेंहि जर प्राण हरण करण्यास समर्थ ठरलीं तर, (माणसावर) आघात करण्याच्या कामीं, विधीला, आणखी दुसरें काय काय, साधन म्हणून वापरण्यास उपयोगी होणार नाहीं ? (हें कोण सांगू शकेल ? संहारक साधन कोणतें व्हावें याला अंतच राहिला नाहीं.)

●●●

*वैतालीय*

अथ वा मृदु वस्तु हिंसितुं
मृदुनैवारभते प्रजान्तकः ।
हिमसेकविपत्तिरत्र मे
नलिनी पूर्वनिदर्शनं मता ॥ ३ ॥

वसंततिलका

**किंवा, विनष्ट करण्या, यम हा, मृदूस**
**योजून अन्य मृदुवस्तु, करी प्रयास ॥**
**आधीं उदाहरण जाणित मीहि यास**
**पावे हिमें मृदुहि, कीं नलिनी विनाश ॥ ३ ॥**

गद्यार्थ—अथवा ( या उदाहरणावरून असेंच म्हणणें भाग पडतें कीं, ) एखाद्या मृदु वस्तूचा विनाश करण्यास, यम, हा दुसरी मृदु वस्तु, हेंच शस्त्र वापरून, प्रयत्न करतो; या प्रकाराला एक उदाहरण सुद्धा मला आधींच ठाऊक आहे; तें हें, कीं हिमासारख्या अत्यंत मृदु वस्तून ( तितक्याच मृदु ) कमलवेलीचा नाश केला जातो

●●●

वैतालीय

स्रगियं यदि जीवितापहा
हृदये किं निहिता न हन्ति माम् ? ॥
विषमप्यमृतं क्वचिद्भवे—
दमृतं वा विषमीश्वरेच्छया ॥ ४ ॥

वसंततिलका

**हा हार जीव हरण्या जर का समर्थ**
**वक्षीं धरूनहि मला न वधी किमर्थ ? ॥**
**होई कधीं विषहि तें अमृतासमान**
**ईशेच्छया अमृत हेंहि विषासमान ॥ ४ ॥**

गद्यार्थ—हा पुष्पहार जर ( खरोखरच, व निरपवादपणें ) प्राणघातक म्हणावा, तर मी तोच माझ्या छातीवर ठेवला तरी मला को ठार मारीत नाहीं ? ( यावरून इतकच ठरतें कीं— ) *परमेश्वराचीच तशी इच्छा असली तर केव्हा केव्हा विषाचें सुद्धा अमृत होऊन जातें व अमृताचेंहि विष होऊन जातें*

●●●

वैतालीय

*अथ वा मम भाग्यविप्लवादशनिः कल्पित एष वेधसा ॥*
यदनेन तरुर्न पातितः क्षपिता तद्विटपाश्रिता लता ॥ ५ ॥

वसंततिलका

**हारास याच, अथवा, मम दग्धदैवें**
**हा ! वज्ररूप विधिनें दिधलें असावें ॥**
**यानें समाश्रयतरू मज पाडिलें न**
**शाखाश्रिता परि लता घधिली म्हणून ॥ ५ ॥**

गद्यार्थ—किंवा ( असें म्हणावें लागतें कीं— ) माझेंच दैव फुटकें, त्यामुळें ब्रह्मदेवानें या हाराला वज्राचें रूप दिलें असावें, कारण यानें ( हुबेहूब वज्रानें करावें तसें ) आश्रयतरु जो मी त्याला न पाडता, त्या वृक्षाच्या शाखावर आश्रय घेतलेल्या वेलीलाच तेवढें मारलें !

●●●

वैतालीय

कृतवत्यसि नावधीरणामपराध्देऽपि यदा चिरं मयि ।
कथमेकपदे निरागसं जनमाभाष्यमिमं न मन्यसे ? ॥ ६ ॥

वसंततिलका

**केले सदैव अपराधचि मी तरीही**
**सावज्ञ तूं मज कधीं रुसलीस नाहीं ! ॥**
**आतां अचानक, निरागसशाहि मातें**
**गे सांग, ना गणिसि भाषणपात्र कां तें ? ॥**

गद्यार्थ—मी तुझे नेहमीच अपराध करीत आलों, तेव्हांहि जर तू माझी अवज्ञा करून, कधीं रुसून, अबोला धरला नाहींस, तर आतां एकाएकीं, निरपराध अशा या मला, संभाषणपात्र *समजत नाहींशी कशी झालीस ? ( काय कारण असावें ? )*

●●●

वैतालीय

ध्रुवमस्मि शठः शुचिस्मिते ! *विदितः कैतववत्सलस्तव ॥*
परलोकमसंनिवृत्तये यदनापृच्छ्य गताऽसिमामितः ॥ ७ ॥

वसंततिलका

**स्वर्गांत जासि पुनरागमनाविहीन**
***शब्दें न एक पुसतां मज, यावरून ॥***
**शुद्धस्मिते ! मज गमे जणुं काय तूंतें**
**खोटाच मत्प्रणय, मी शठ खास वाटे ॥ ७ ॥**

गद्यार्थ—हे शुद्धस्मिते ! मला एका शब्दानें सुद्धा न *विचारता, न पुसतां, इथून स्वर्गांत गेलीस — आणि गेलीस* तीहि कायमची, ( परत न येण्यासाठीं, ) यावरून मला वाटतें कीं, मी खरोखर ढोंगी आहे व माझें प्रेमहि खोटें आहे असेंच तुला वाटत असलें पाहिजे.

●●●

वैतालीय

दयितां यदि तावदन्वगाद्विनिवृत्तं किमिदं तया विना ! ॥
सहतां हतजीवितं मम प्रबलामात्मकृतेन वेदनाम् ! ॥ ८ ॥

वसंततिलका

**होता तिला अनुसरूनचि नीट गेला**
**ऐसा कसा परतुनी तिजवीण आला ? ॥**
**चांडाळ जीव मम ! मी वदतों तयातें-**
**" घे सोस आत्मकृत घोरचि वेदनांतें " ॥ ८ ॥**

*गद्यार्थ*—हे माझे प्राण, त्या माझ्या प्राणप्रिय दयितेच्या पाठोपाठच ( क्षणभर नीट ) गेले होते; पण का, कसे, कोण जाणे, तिला न घेताच परत आले ? असल्या या चांडाळ माझ्या जीवाला आपल्याच कृत्यांनीं ओढवून घेतलेल्या घोर यातना, बैस म्हणावें सोशीत ●●●

वैतालीय

सुरतश्रमसंभृतो मुखे
ध्रियते स्वेदलवोद्गमोऽपि ते ॥
अथ चास्तमिता त्वमात्मना
धिगिमां देहभृतामसारताम् ॥ ९ ॥

वसंततिलका

**जे स्वेदबिंदु थकुनी सुरतांत, आले**
**अद्यापि ते तव मुखीं दिसतात बाले ! ॥**
**गेलीस तूंच परि घेउनिया स्वतातें**
**धिक्कार चंचल अशा नरजीवनातें ! ॥ ९ ॥**

*गद्यार्थ*—सुरतक्रीडेच्या थकव्यामुळें जमलेले थोडेसे स्वेद बिंदु सुद्धा अद्यापि तुझ्या मुखावर दिसत आहेत आणि इकडे बघतों तों तू स्वताला घेऊन दृप्त झालीस ! धिक्कार असो या नरदेहाच्या चांचल्याला ! ●●●

वैतालीय

मनसाऽपि न विप्रियं मया
कृतपूर्वं तव किं जहासि माम् ? ॥
ननु शब्दपतिः क्षितेरहं
त्वयि मे भावनिबन्धना रतिः ॥ १० ॥

वसंततिलका

**केलें कधीं न तव अप्रिय मीं मनेंही**
**जाशी कशी त्यजुनि तूं मज गे तरीही ? ॥**
**मी शब्दमात्र पति या क्षितिचा, परंतु**
**मत्प्रेमभावदृढबंधन एकली तू ॥ १० ॥**

*गद्यार्थ*—मीं, यापूर्वी, कधींहि तुझं अप्रिय, मनानेंहि केलें नाहीं, तरी तू मला कशी सोडून चाललीस ? (मी पृथ्वीचा पति आहें म्हणून तिला सवत समजून, आपल्या प्रेमात वाटे-करीण आली, असे मानून, तू रागावली असशील, असें वाटतें, म्हणून तुला सांगतों तें नीट समजून घे कीं--) मी पृथ्वीचा पति आहे असे म्हणणें हें केवळ शब्दमात्र आहे (तो एक मापेचा अलंकार आहे ) पण भावनेनें दृढबद्ध असे माझें प्रेम काय तें एकल्या तुझ्यावर आहे. ●●●

वैतालीय

कुसुमोत्खचितान्वलीभृतश्चलयन्भृङ्गरुचस्तवालकान् ।
करभोरु करोति मारुतस्त्वदुपावर्तनशङ्कि मे मनः ॥ ११ ॥

वसंततिलका

**हे भृंगनील, कुरळे, सुम गुंफिलेले**
**वायू जधीं हलवितो तव केश बाले ! ॥**
**तो आणितो पुनरपी मम या मनास—**
**" येणार तूं परतुनी " असलीच आस ॥ ११ ॥**

*गद्यार्थ*—या तुझ्या, फुलांनीं गुंफलेल्या, कुरळ्या, भ्रमरा सारख्या रंगाच्या, केसांना हलवणारा हा वारा, तू पुन्हा परत येणार, अशी आशा मनाला लावीत आहे. ●●●

वैतालीय

तदपोहितुमर्हसि प्रिये प्रतिबोधेन विषादमाशु मे ॥
ज्वलितेन गुहागतं तमस्तुहिनाद्रेरिव नक्तमोषधिः ॥ १२ ॥

वसंततिलका

**तेव्हां प्रिये ! उठुनि जागृत होइ तूर्ण**
**नेई हरून मम चित्तविषाद पूर्ण ॥**
**जैशा हिमालयगिरीवरच्या गुहांत**
**नक्तौषधी झळकुनी तम नाशितात ॥ १२ ॥**

*गद्यार्थ*—तेव्हा प्रिये ! लौकर जागी हो आणि तू आपल्या जागृतीनें ( उघडलेल्या नेत्रांच्या तेजानें ) माझ्या मनाची विषण्णता नाहींशी करावीस हेंच युक्त— ज्याप्रमाणें हिमालय पर्वतावरील गुहांतला अंधार, नक्तौषधि, आपल्या तेजानें नष्ट करतात. (तद्वत् ) ●●●

वैतालीय

इदमुच्छ्वसितालकं मुखं तव विश्रान्तकथं दुनोति माम् ॥
निशि सुप्तमिवैकपङ्कजं विरताभ्यन्तरषट्पदस्वनम् ॥ १३ ॥

वसततिलका

**ज्या आननीं रुळति चंचल दीर्घ केश**
**बोले न तें तरिहि मला दुखवी मनास ॥**
**ज्यातील भृंग बनले निशीं शब्दहीन**
**पेक्ष्या अपूर्व मिटल्या कमलासमान ॥१३॥**

गद्यार्थ—एखादें अपूर्व (सुदर) कमल असावें, रात्रीं तें मिटलेलें असावें व त्याच्या आतल्या (अडकलेल्या) भृगाचे गुजारव थाबलेले असावेत—त्याप्रमाणें ज्या तुझ्या या मुखावर तुझे केश हलत रुळत आहेत, असे, तें, बोलेनासे झाल्यामुळे, माझ्या मनाला चरका लावीत आहे. ●●●

वैतालीय

शशिन पुनरेति शर्वरी दयिता द्वन्द्वचर पतत्रिणम् ।
इति तौ विरहान्तरक्षमौ कथमत्यन्तगता न मा दहे ? ॥१४॥

वसततिलका

**भेटे पुनश्च रजनी अपुल्या शशीस**
**पक्षीण त्या सहचरा अपुल्या नरास ॥**
**दोघास होइ विरहावधि सह्य तेणें**
**जाळी कसें न तव कायमचेंच जाणें ? ॥१४॥**
**किंवा (हें चिरकाल,)**

गद्यार्थ—रजनी, आपला नाथ जो चद्र त्याला पुन (एक दिवसाच्या विरहानतर) जाऊन भेटते, चक्रवाकी, (रात्रीमुळें वियुक्त झालेल्या) आपल्या सहचर चक्रवाकाशीं (एक रात्रीच्या विरहानतर) पुन समीलित होते (त्याचा विरहकाळ अल्प व पुन पुन मीलन होण्याची निश्चिति या दोन कारणा मुळे) त्या दोघाना (चद्र व चक्रवाक याना) तो विरहाचा कालावधि सहन करणें शक्य होते पण, येथें तू गेलीस ती पुन्हा येणारी नसल्यानें, हा तुझा चिरकालीन विरह, मला दाहक कसा वाटणार नाहीं ? ●●●

वैतालीय

नवपल्लवसस्तरेऽपि ते मृदु दूयेत यदङ्गमर्पितम् ।
तदिद विषहिष्यते कथ वद वामोरु चिताधिरोहणम् ? ॥ १५॥

वसततिलका

**घालून पल्लव नवे, रचिताहि शय्या**
**अगास ज्या मृदु तुझ्या खुपली सदा या ॥**
**वामोरु, त्या सदन होइल केंवि साची**
**शय्या चितेवरिल शुष्कचि लाकडाची ? ॥१५॥**

गद्यार्थ—कोंवळी कावळी पालवी अथरून केलेल्या शय्ये वर सुद्धा तूं अग टाकलेंस तर तुझी कोमल काया दुखत असे, तिला आता हे वामोरु ! चितेवर चढणें कसे सहन होईल ? ●●●

वैतालीय

इयमप्रतिबोधशायिनीं रशना त्वा प्रथमा रहःसखी ।
गतविभ्रमसादनीरवा न शुचा नानुमृतेव लक्ष्यते ॥१६॥

वसततिलका

**जी तूं पुन्हा न उठण्या निजसी सदाची**
**एकांतिची प्रथम ही तव मित्र काची ॥**
**संपून साथ गतनाद अशी जहाली**
**शोकें तुझ्याच जणु मागुति हीहि मेली ॥ १६ ॥**

गद्यार्थ—तू पुन न उठण्याजोगी चिरकालाची निजलीस आणि एकांतातली तुझी जी मेखला—सखी (तुझ्या विलासी हालचालींच्या तालावर नाचणारी) आता मूक झाल्यानें, जणू काय, तुझ्या शोकानें तुझ्या मागोमाग (सती गेल्यासारखी) मरून पडली आहे (दोन नकार = एक होकार. शब्दश " मेली नाहीं असें नाहीं) ●●●

वैतालीय

कलमन्यभृतासु भाषित कलहसीषु मदालस गतम् ।
पृषतीषु विलोलमीक्षित पवनाधूतलतासु विभ्रमा ॥
त्रिदिवोत्सुकयाऽप्यवेक्ष्य मा निहिता सत्यममी गुणास्त्वया ।
विरहे तव मे गुरुव्यथ हृदय न त्ववलम्बितु क्षमा ॥१७॥

वसततिलका

**देवोनिया मधुर भाषण कोकिलास**
**हसींमधें गति मदालस ठेविलीस ॥**
**दृष्टी विलोल दिधलीस मृगागनास**
**लालित्य हेंहि पवनें हलल्या लतास ॥**
**स्वर्गोत्सुका असुनि तू मम काळजीनें**
**हे ठेविलेस गुण निश्चित दक्षतेनें ॥**
**अत्यत घोर परि या विरहव्यथेंत ।**
**आश्वासण्यास हृदया मम हे न शक्त ॥ १७ ॥**

गद्यार्थ—तू आपली, मधुर वाणी कोकिळांत मदानें आळ सावलेली गति, कलहसींत चचल दृष्टि हरिणींमध्यें, आणि लालित्य, हें वाऱ्यान हालणाऱ्या वेलींत, अशा तऱ्हेनें हे तुझे विविध गुण, स्वर्गात जाण्याची तुला घाई झालेली असूनसुद्धा,

माझ्या काळजीनें (तुझ्या पश्चात् तुझी आठवण करून मन रमविण्यास मला साधन असावें, या विचारानें) तू त्या त्या वस्तू ठेवून गेलीस, (अशीच माझी खरोखर भावना आहे.) (तुझें कार्य तू केलस खरें) पण तुझ्या विरहानें अत्यंत व्यथित झालेल्या या माझ्या हृदयाला आश्वासन देण्यास ते समर्थ नाहींत. ●●●

वैतालीय

मिथुन परिकल्पित त्वया
सहकारः फलिनी च नन्विमौ ।
अविधाय विवाहसत्क्रिया
मनयोर्गम्यत इत्यसाम्प्रतम् ॥ १८ ॥

वसततिलका

**आम्र, प्रियंगु लतिका, उभयास या तूं
गे कल्पिलेंस मिथुनासमची, परंतु ॥
त्यांचा तुवां न करताच विवाह कातें !
किंवा (त्यांच्या, स्वयें न करतां शुभमंगलातें)
गेलीस तूंच निघुनी, वद योग्य का तें ? ॥ १८ ॥**

गद्यार्थ—हा आम्रवृक्ष व ही प्रियंगु लता, या दोघांना, तू स्वता वर वधू असे जोडपे ठरविलेस, आणि आता यांचें शुभमंगल न उरकता तूच इथून निघून जावेंस हें काहीं युक्त नव्हे. ●●●

वैतालीय

कुसुम कृतदोहदस्त्वया
यदशोकोऽयमुदीरयिष्यति ॥
अलकाभरण कथ नु त—
त्तव नेष्यामि निवापमाल्यताम् ? ॥ १९ ॥

वसततिलका

**केलेंस दोहद जया निज तूं पदानीं
येईं अशोक जधिं तो फुलुनी फुलानीं ॥
त्याचीं फुलें अलकभूषणयोग्य पेशीं !
अर्पू तयें तुज मृताजलि मीच कैशी ? ॥ १९ ॥**

गद्यार्थ—तू स्वता (स्वताच्या लत्ताप्रहारानें) ज्याचे डोहाळे पुरविलेस (अशोकाला तरुण सुन्दरीनें डाव्या पायानें लत्ताप्रहार केल्यानें फुलें येण्याचे मोठे मान्मथ डोहाळे लागतात, अशी संस्कृत कविकल्पना आहे!) तो अशोक वृक्ष आता जेव्हा (तुझ्या पश्चात्) फुलून बहराला येईल, तेव्हा त्याचीं जीं फुलें, तुझ्या केसाना अलंकृत करण्याच्याच योग्यतेचीं, त्याच फुलानीं तुझ्या मृतोत्तर निर्यंतली अंजलि मी कशी देऊ? (ज्याला तू लत्ताप्रहार केलस त्याचीं फुलें तुझ्या डोक्यावर! असा विरोधाभास यात नसेल ना?) ●●●

वैतालीय

स्मरतेव सशब्दनूपुर चरणानुग्रहमन्यदुर्लभम् ॥
अमुना कुसुमाश्रुवर्षिणा त्वमशोकेन सुगात्रि ! शोच्यसे ॥२०

वसततिलका

**अन्यास दुर्लभ नि नूपुरशब्दसंगें
लत्ताकृपाच तव ती स्मरुनी जणूं गे ॥
पुष्पाश्रु वर्षित,तुझ्यास्तव हा अशोक
हा ! हाय ! आज करितो जणुं काय शोक॥२०**

गद्यार्थ—दुसऱ्या कोणाला दुर्लभ, पैंजणाच्या तालावर तूं त्याच्यावर केलेली चरणकृपा (लत्ताप्रहार) जणू काय आठवून (कृतज्ञबुद्धीनें कीं काय!) हे सुंदरि! अशोक, फुलाचे अश्रु ढाळीत तुझ्यासाठीं शोक करीत आहे (अशोक शोक करतो हा विरोधाभास.) ●●●

वैतालीय

तव निःश्वसितानुकारिभिर्बकुलैरर्धचिता सम मया ॥
असमाप्य विलासमेखला किमिद किन्नरकण्ठि सुप्यते ? ॥२१

वसततिलका

**त्वच्छ्वासतुल्य सुरभी बकुळी फुलानीं
व
तूं मीहि अर्ध तिजला रचिली असोनी ॥
गे त्या पुरी न करता रतिमेखलेसी
का झोंपलीस वद किन्नरकण्ठि पेशी ? ॥ २१ ॥**

गद्यार्थ—तुझ्या उच्छ्वासाचें अनुकरण करणाऱ्या (तितक्या सुगंधी असणाऱ्या) बकुळीच्या फुलानीं, तू व मी दोघे मिळून गुफताना अर्धी राहिली, ती तुझी विलास मेखला, पुरी न करताच, हे किन्नरकंठि ! अशी कशी झोंपी गलीस ? ●●●

वैतालीय

समदुःखसुख सखीजन प्रतिपच्चन्द्रनिभोऽयमात्मज
अहमेकरसस्तथाऽपि ते व्यवसाय प्रतिपत्तिनिष्ठुर ॥२२॥

वसंततिलका

**दुःखीं सुखीं सम, सख्या तुजला असून**
**अन् पुत्र हा प्रतिपदा शशिच्या समान ॥**
**मी एकनिष्ठ पति येथ असून, सांगे**
**त्वद्वृत्ति हेकट कठोर अशीच कां गे? ॥२२॥**

गद्यार्थ—दुःखाचा प्रसंग असो, सुखाचा असो, दोन्ही परिस्थितींत सम वृत्ति ठेवणाऱ्या ( दोन्ही स्थितींत प्रेम कायम ठेवणाऱ्या ) अशा सख्या ( तुला लाभल्या आहेत, ) आणि प्रतिपदेच्या चंद्राप्रमाणें ( उत्तरोत्तर कलाकलानीं वाढत जाणारा) असा पुत्र ( तुला देवानें दिलेला आहे, ) मी हा तुझा पति एकनिष्ठ, ( केवळ तुझ्यावरच प्रेम करणारा, ) असे सर्व असताना तुझी वृत्ति ( परत न येण्याची ) हट्टी निष्ठुर का बरें? ●●●

वैतालीय

धृतिरस्तमिता रतिश्च्युता विरतं गेयमृतुर्निरुत्सवः ॥
गतमाभरणप्रयोजनं परिशून्यं शयनीयमद्य मे ॥२३॥

वसंततिलका

**गेली गळून धृति, तें रतिसौख्य गेलें**
**थांबोनि गान, ऋतु उत्सवहीन झाले ॥**
**आभूषणास मुळिं हेतु नुरेच कांहीं**
**शय्याहि शून्य बनली मम आजला ही ॥२३॥**

गद्यार्थ—माझे धैर्य गळून गेलें रतिसुख सरलें, गायन थांबलें, त्या त्या ऋतूला योग्य ते उत्सव आता कसचे करणार? अलंकारांचें आता प्रयोजनच उरलें नाहीं. माझी शय्या आज शून्य झाली आहे. ●●●

वैतालीय

गृहिणी सचिवः सखी मिथः
प्रियशिष्या ललिते कलाविधौ ॥
करुणाविमुखेन मृत्युना
हरता त्वां वद किं न मे हृतम् ॥२४॥

वसंततिलका

**एकांतिंची सहचरी, गृहिणी, सुमंत्री**
**जी लाडकी ललित सर्व कलांत छात्री ॥**
**तूतें अशा, हरुनिया अतिनिष्ठुरानें**
**नेलें न काय मम, सांग सखे यमानें? ॥२४॥**

गद्यार्थ—माझी गृहस्वामिनी, मंत्री, एकांतातली सहचरी, ललित कलांत माझी आवडती शिष्या, अशा तुला ओढून नेण्यात, मृत्यूनें माझें काय नेलं नाहीं, तें सांग ( सर्वच नेलं. ) ●●●

वैतालीय

मदिराक्षि मदाननार्पितं मधु पीत्वा रसवत्कथं नु मे ॥
अनुपास्यसि बाष्पदूषितं परलोकोपनतं जलाञ्जलिम् ॥२५॥

वसंततिलका

**मी सन्मुखें मधुर मद्य तुला दिलें तें**
**प्राशून हाय! परलोकगताच कां तें ॥**
**अश्रूमुळें मम, मलीन, इथून देतां**
**कैसा जलाञ्जलि पिशील दुरून आतां? ॥२५॥**

गद्यार्थ—हे मदिराक्षि! मी माझ्या मुखानें तुझ्या मुखात घातलेलें मधुर मद्य पिऊन, ( त्याची चव ताजात असतां ) आता मागून, माझ्या अश्रूंनीं गढूळ व क्षार झालेला, व इथून परलोकात तुझ्याकडे पाठविलेला जलांजलि तू कसा पिशील? ( ती रुचि आणि तें सांनिध्य, आणि आता ही अरुचि व हें अंतर! ) ●●●

वैतालीय

विभवेऽपि सति त्वया विना
सुखमेतावदजस्य गण्यताम् ॥
अहृतस्य विलोभनान्तरैः
मम सर्वे विषयास्त्वदाश्रयाः ॥२६॥

वसंततिलका

**मातें सुवैभव असून तुझ्या विना तें**
**मत्सौख्य हें चच सखे! इतुकेंच होतें ॥**
**अन्यामिषें नित अलुब्ध अशा अजातें**
**सारे जगीं विषय गे त्वदधीन होते ॥२६॥**

गद्यार्थ—मला पुष्कळ वैभव असलें तरी तुझ्यावाचून माझें या अजाचें, सुख इतकेंच होतें. दुसऱ्या कोणत्याहि आमिषाला कधी न पडलेल्या, आइष्ट न झालेल्या अशा, माझे, सर्व विषय, हे इंदुमति! केवळ तुझ्या स्वाधीन होते. ( प्रत्येक विषयसुख तुझ्यासंगतीतच मी घेऊं शकत असें. तुझ्यावांचून त्या सुखांतलें सुखच नष्ट झालें आहे ) ●●●

वैतालीय

विलपन्निति कोशलाधिपः
करुणार्थग्रथितं प्रियां प्रति ॥
अकरोत्पृथिवीरुहानपि
स्रुतशाखारसबाष्पदूषितान् ॥ २७ ॥

वसंततिलका

जेव्हां असेंच करुणार्तरवें प्रियार्थ
तो कोशलाधिप विलाप वसे करीत ॥
टाकी स्वपार्श्वगत सर्व तरू करून
शाखारसाश्रु गळुनी जणु कीं, मलीन ॥ २७ ॥

गद्यार्थ—कोशलाचा राजा तो अज, आपल्या प्रियेस्तव अशा तऱ्हेनें अत्यंत करुण अर्थानें गुंफलेले विलाप करीत असता, त्यानें, त्याच्या आजूबाजूच्या झाडांना सुद्धां रडवून, त्यांचे टपटप गळणारे शाखारस हे जणू जे अश्रु, त्यांनीं मलीन करून सोडलें ! ●●●

वैतालीय

अथ तस्य कथंचिदङ्कतः
स्वजनस्तामपनीय सुन्दरीम् ॥
विससर्ज तदन्त्यमण्डना—
मनलायागुरुचन्दनैधसे ॥ २८ ॥

वसंततिलका

अंकावरून पतिच्या, मग सुंदरी ती
कैशीतरी स्वजन हे उचलून नेती ॥
तो अन्त्यमंडनचि हार तिच्या गळ्यात
अग्नी दिला अगुरुचंदन सर्पणांत ॥ २८ ॥

गद्यार्थ—मग, मोठ्या कष्टानें, आप्तबांधवांनीं त्या सुंदरीला त्याच्या मांडीवरून उचलून नेलें व (ज्या पुष्पहारानें तिला मरण आलें) तोच हार प्रेतशृंगार म्हणून, तसाच तिच्या गळ्यात ठेवून, अगुरु, चंदन, असें सर्पण असलेल्या अग्नींत तिचें विसर्जन केलें. ●●●

वैतालीय

प्रमदामनुसंस्थितः शुचा
नृपतिः सन्निति वाच्यदर्शनात् ॥
न चकार शरीरमग्निसा—
त्सह देव्या, न तु जीविताशया ॥ २९ ॥

वसंततिलका

" शोकें मरे नृप असूनहि पत्निमागें "
निंदेस या भिउनि केवळ, पत्निसंगें ॥—
देहास अग्निस दिलें न अजें स्वताच्या
लोभें मुळीं न परि तें निजजीविताच्या ॥ २९ ॥

गद्यार्थ—" राजासारखा राजा असून बायकोच्या शोकानें तिच्या मागोमाग मेला " अशी आपली निंदा घडू नये, याच केवळ हेतूनें अजानें आपला देह आपल्या त्या राणीसह अग्नीस अर्पण केला नाहीं ; जगण्याच्या इच्छेनें नव्हे.

× × × ×

( मूळ रघुवंशातील पुढील १० श्लोकात वसिष्ठ मुनींनीं अंतर्ज्ञानानें इंदुमतीची पूर्ण कथा जाणली, ती आपल्या शिष्याला अजाकडे पाठवून त्याचेकडून सांगितली. व त्याचे शेवटीं आश्वासनार्थ जो उपदेश थोडक्यात ( लघुसंदेशपदा सरस्वती ) केला तो तेवढा पुढें भाषांतरित केला आहे- )
वसिष्ठशिष्य अजास म्हणतो— ●●●

वैतालीय

तदलं तदपायचिन्तया विपदुत्पत्तिमतामुपस्थिता ॥
वसुधेयमवेक्ष्यतां त्वया वसुमत्या हि नृपाः कलत्रिणः ३०

वसंततिलका

चिंता पुरे ' मरण ' या विषयांत चित्तीं
जन्मे तया अटळ होत जगीं विपत्ति ॥
आतां विचार कर तूं क्षितिचा मनांत
पृथ्वीमुळेंच नृप होति कलत्रवत ॥ ३० ॥

गद्यार्थ—तेव्हां आतां तिच्या मरणाविषयींची चिंता पुरे कर. जो जो जन्माला आला त्याला त्याला संकट, मरण हें अपरिहार्यच आहे. आतां तू ( त्या मानवी पत्नीचा विचार सोडून ) (पार्थिव पत्नी) पृथ्वी हिचा विचार कर, कारण राजे हे पृथ्वीमुळेंच खरे कलत्रवत असतात. ( त्याच्या भूपति, पृथ्वीपति, क्षितिपति इत्यादि नावांतच तो अर्थ आहे. ) ●●●

वैतालीय

उदये मदवाच्यमुज्झता श्रुतमाविष्कृतमात्मवत्तया ॥
मनसस्तदुपस्थिते ज्वरे पुनरक्लीबतया प्रकाश्यताम् ॥३१

वसंततिलका

तूं स्वोदयीं न मदनिंदित जाहलास
संस्कार संयत असा नित दाविलास ॥
आतां जधीं ज्वर तुझ्या हृदयास भाजे
होवो पुन्हां प्रकट पौरुष पूर्ण तेजें ॥ ३१ ॥

गद्यार्थ—तू उदयोन्मुख असताना (वैभवास चढत असताना) तू गर्विष्ठ आहेस अशी निंदा जगाकडून स्वतावर ओढवून घेतली नाहींस (उलट) अतिशय संयमानें स्वताचें शिक्षण, संस्कार, प्रकट केलेस. आता तुझ्या मनाला हा (पत्नीमरणाचा) ताप जाळीत असता, पुन्हा तू आपल्या पौरुषानें उजळून ऊठ. ●●●

वैतालीय

रुदता कुत एव सा पुनर्भवता नानुमृताऽपि लभ्यते ॥
परलोकजुषां स्वकर्मभिर्गतयो भिन्नपथा हि देहिनाम् ॥३२॥

वसंततिलका

लाभे कुठून तुज ती रडसी तरीही ?
मेलास मागुति, तरी मिळणार नाहीं ॥
लोकांतरास रिघतां, अवघ्या नरांतें
कर्मानुसार गति भिन्नपथेंच नेते ॥ ३२ ॥

गद्यार्थ—अरे, ती तुला रडून तर कुठून मिळणार म्हणा, पण अगदीं तिच्या मागोमाग प्राणार्पण केलेस तरी ती तुला प्राप्त होणें शक्य नाहीं. कारण परलोकीं जाणाऱ्या प्राण्यांची गति त्याच्या त्याच्या कर्मांनी, निरनिराळे मार्ग धरितात. ●●●

वैतालीय

अपशोकमनाः कुटुम्बिनीमनुगृह्णीष्व निवापदत्तिभिः ॥
स्वजनाश्रु किलातिसंततं दहति प्रेतमिति प्रचक्षते ॥ ३३ ॥

वसंततिलका

पत्नीवरी कर अनुग्रह, तूं त्यजून
चित्तस्थ शोक, तिज अन्त्यविधी करून ॥
अश्रु प्रदीर्घ अति ढाळिति बंधु जे, ते
होतात दाहक, असें म्हणती, मृतातें ॥ ३३ ॥

गद्यार्थ—मनातला शोक काढून टाकून, पत्नीचा अन्त्यविधी करण्यानें तिच्यावर अनुग्रह कर. मृताचे आसेष्ट, जर, अति दीर्घ कालपर्यंत त्याचेसाठीं अश्रु ढाळतील, तर, ते अश्रु त्या मृताला दाहक होतात असे मुज्ञ सांगतात. ●●●

वैतालीय

मरणं प्रकृतिः शरीरिणां विकृतिर्जीवितमुच्यते बुधैः ॥
क्षणमप्यवतिष्ठते श्वसन्यदि जन्तुर्ननु लाभवानसौ ॥३४॥

वाटे बुधां " प्रकृति मृत्युच मानवाची
देहास या विकृति जीवन हीच साची ॥
राहे कुणी क्षणहि यामधुनी जगून
तोही तयास बहुलाभ असेंच जाण " ॥ ३४ ॥

गद्यार्थ—ज्ञाते म्हणतात कीं, " मृत्यु हाच प्राण्याचा मूलस्वभाव आहे व जीवन हीच खरोखर विकृति आहे. तेव्हां अशा स्थितींत कोणी क्षणभर जरी जगून राहिला तरी त्याला खरोखर भला झाला असे त्यानें मानावें. " ●●●

वैतालीय

अवगच्छति मूढचेतनः प्रियनाशं हृदि शल्यमर्पितम् ॥
स्थिरधीस्तु तदेव मन्यते कुशलद्वारतया समुद्धृतम् ॥३५

वसंततिलका

मूढास संतत निजप्रियनाश वाटे
कीं एक शल्य हृदयीं नव खोचलें तें ॥
नाशोच तें उपटिलें स्थिरधीस वाटे
उद्घाटलें कुशल द्वार म्हणे तयातें ॥३५॥

गद्यार्थ—आपल्या प्रिय व्यक्तीचा मृत्यु, हें आपल्या हृदयात नवेंच शल्य खोचलें असे मूर्ख मानतो. तर उलट स्थिरबुद्धीचा पुरुष, त्या मृत्यूमुळेंच, शोककारण असे एक शल्य उपटलें जाऊन, कल्याणाचें दारच उघडलें गेलें असे समजतो. (पुढें श्लोक ३९ पहा) ●●●

वैतालीय

स्वशरीरशरीरिणावपि
श्रुतसंयोगविपर्ययौ यदा ॥
विरहः किमिवानुतापयेद्—
वद बाह्यैर्विषयैर्विपश्चितम् ॥ ३६ ॥

वसंततिलका

स्वामी स्वदेहगत, देह, वियुक्त युक्त,—
होणार हें जर असे सकलां प्रतीत ॥
सुज्ञास बाह्यगतवस्तुवियोग होतां
होई कसा मग वदे अनुताप चित्ता ? ॥ ३६ ॥

गद्यार्थ—जर प्रत्यक्ष हें स्वतार्चे शरीर व त्याचा ( शरीरी ) स्वामी ( आत्मा ) याचा सुद्धा संयोग होतो, व, वियोग होतो, ही गोष्ट प्रत्येकाला माहीत आहे; तर मग, बाह्य वस्तूच्या विरहानें सुज्ञाला कुढून हळहळ वाटेल, सांग. ●●●

वैतालीय

न पृथग्जनवच्छुचो वशं
वशिनामुत्तम ! गन्तुमर्हसि ॥
द्रुमसानुमतां किमन्तरं
यदि वायौ द्वितयेऽपि ते चलाः ॥ ३७ ॥

वसंततिलका

**साधारणासमचि होउन शोकचित्त**
**हे श्रेष्ठसंयम ! तुला रडणें न युक्त ॥**
**झाडें गिरी उभयही सुटतांच वात**
**रे हालतील तर अंतर काय त्यांत ? ॥ ३७ ॥**

गद्यार्थ—हे संयमी पुरुषांतील श्रेष्ठा ! दुसऱ्या, सामान्य, इतरे जनांप्रमाणें, शोकाच्या अधीन होणें तुला शोभत नाहीं. जर वाऱ्यामुळें, झाडें व पर्वत दोन्ही हलू लागले, तर त्यांच्यात अंतर तें काय ? ●●●

अजविलाप समाप्त.

अनुष्टुभ्

पूरोत्पीडे प्रवाहस्य परीवाहः प्रतिक्रिया ।
शोकक्षोभे च हृदयं प्रलापैरेव धार्यते ॥ ३८ ॥

आर्या

**जातां प्रवाह तुंबुनि, निचरा करणें उपाय हा त्याला ।**
**अश्रुविमोचन करुनी शोक तसा सह्य होइ हृदयाला ३८**

गद्यार्थ—प्रवाह अडल्यानें, तुंबारा झाला असतां, त्याचा पाट फोडून देऊन, निचरा करणें, हाच त्यावर उपाय, त्याच प्रमाणें शोकानें प्रक्षुब्ध झालेल्या हृदयाला, अश्रुमोचन करण्यानेंच, तो सहन करतां येतो. ●●●

अनुष्टुभ्

यावत कुरुते जन्तुः सम्बन्धान्मनसः प्रियान् ।
तावन्तोऽपि निखन्यन्ते हृदये शोकशङ्कवः ॥ ३९ ॥

अनुष्टुभ्

**मनाला प्रिय संबंध करावे जितुके नरें ।**
**तद्हृदीं खोदिलीं जातीं शोकाचीं तितुकीं घरें ॥ ३९ ॥**

गद्यार्थ– मनुष्य, आपल्या हृदयाला प्रिय वाटणारे, जितके जितके, संबंध जोडीत असतो, तितकीं तितकीं, शोकाचीं घरें त्याच्या हृदयांत खोदिलीं जातात ●●●

उपजाति

शीलानि ते चन्दनशीतलानि
श्रुतानि भूमीतलविश्रुतानि ॥
तथाऽपि जीर्णौ पितरावकस्मा-
द्विहाय हा वत्स ! कथं गतोऽसि ॥ ४० ॥

उपजाति

**त्वच्छील हें चंदनशीत होतें**
**विख्यात लोकीं श्रुतही तुझें तें ॥**
**तरी अकस्मात् पितरास जीर्ण**
**हा ! वत्स ! गेलास कसा त्यजून ? ॥ ४० ॥**

गद्यार्थ—( कोणी वृद्ध आईबाप आपल्या मृत पुत्राबद्दल शोक करीत आहेत—) तुझें शील हें चंदनासारखें शीतल होतें, तुझी विद्या सर्व जगांत प्रसिद्ध होती अशा स्थितींत हे वत्सा ! या तुझ्या वृद्ध मातापित्यास अचानक सोडून कसा रे गेलास ? ●●●

वसंततिलका

*आदाय मांसमखिलं स्तनवर्जमङ्गा-*
न्मां मुञ्च वागुरिक यामि कुरु प्रसादम् ॥
*सीदन्ति शष्पकवलग्रहणानभिज्ञा*
मन्मार्गवीक्षणपराः शिशवो मदीयाः ॥ ४१ ॥

वसंततिलका

**घे हें स्तनाविण उभ्या तनुतील मांस**
**हे व्याध, सोड, कर या इतुक्या कृपेस ॥**
**खाण्यास घास शिकले न शिशू अजून**
**पाहात वाट मम, जातिल रे गळून ॥ ४१ ॥**

गद्यार्थ—( फासेपारध्याच्या जाळ्यांत सापडलेली हरिणी त्याला विनवीत आहे—) हे फासेपारध्या ! (तुला येऊन जाळून माझें मांसच हवें तर) माझ्या या स्तनाशिवाय इतर सर्व अवयवांतलें मांस घे आणि मला सोड, इतकी कृपा कर, मी जातें, माझीं बाळें अजून गवताचा घास घ्यायला शिकलीं नाहींत, (मी त्यांना

दूध पाजायला लौकरच येईन अशी) माझी वाट पहात तीं बिचारीं *गळून जातील !* (*मातेच्या वात्सल्यप्रेमाला मर्यादा नाहीं, व* त्यासाठीं ती करते त्या त्यागाला अंत नाहीं ! पण किती मुलांना याची जाणीव असेल ? व, *कितीजण याबद्दल योग्य कृतज्ञता* दाखवीत असतील ? ) ●●●

वसंततिलका

सद्य पुरीपरिसरेऽपि शिरीषमृद्वी
गत्वा जवात्त्रिचतुराणि पदानि सीता ॥
गन्तव्यमस्ति कियदित्यसकृद् ब्रुवाणा
रामाश्रुणः कृतवती प्रथमावतारम् ॥ ४२ ॥

साकी

**असुनी अजुनी नगरीजवळचि, शिरीषसुमसृदुदेही ।**
**तीनचार पद चालुनि वेगें, थकोनिया वैदेही ॥**
**पुन्हां पुन्हां जाधें पुसूं लागली "जाणें कितिसें अजुनी?"॥**
**रामाश्रुप्रथमावतार ती करती झाली नयनीं ॥ ४२ ॥**

गद्यार्थ—( रामाबरोबर, मोठ्या उत्साहानें, सीता वनात *जाण्यास निघाली खरी, पण राजकन्याच ती, तिला चालण्याची* संवय कुठली ? ) अयोध्यानगरीच्या परिसरातच अजून असता, शिरीष फुलासारखी कोमलांगी सीता, वेगानें ३-४ पावलें चालून जाऊन ( थकून ) जेव्हां वारवार विचारूं लागली कीं "अजून कितीसें दूर जायचें आहे ?" तेव्हां तिनें रामाच्या डोळ्यांत ( तीनचार पावलांतच थकली, आतां पुढें अरण्यात हिचें कसे होणार या चिंतेनें ) पहिले वहिले अश्रु उत्पन्न केले. ●●●

वैतालीय

विपिने क्व जटानिबन्धनं तव चेदं क्व मनोहरं वपुः ॥
अनयोर्घटना ! विधेः स्फुटं ननु खड्गेन शिरीषकर्तनम् ॥ ४३ ॥

वसंततिलका

**हें बांधणें तव जटांस, वनात कोठें ?**
**देसा मनोहर तुझा मृदु देह कोठें ? ॥**
**हा योग जो घडवितो विधि या प्रमाणें**
**कापी शिरीष मृदु तो जणुं कीं कृपाणें ॥ ४३ ॥**

गद्यार्थ—( जटा बांधलेल्या वनवासी सीतेला पाहून कोणाचेंसे हृदय कळवळून आलें— ) रानात येऊन हें तुझें जटाबंधन ( करून तापसाच्या रुक्ष कठोर वृत्तीनें राहणें ) कोठें आणि तुझी ही मनोहर तनु कोठें ! या दोहींचा योग ज्यानें घडवून आणला तो ब्रह्मदेव खरोखर शिरीष पुष्पाला खड्गानें कापीत आहे ( असेच म्हणावें लागेल. ) ●●●

( याच्यापुढील ८-९ श्लोक, हे, रामाज्ञेनें, लक्ष्मणानें सीतेचा वनात त्याग केल्यावर सीता त्याला, रामाला सांगण्यासाठीं जो निरोप देते त्याचे आर्तोद्गार आहेत. रघुवंश सर्ग १४ श्लोक ६० ते ६७, शेवटचा श्लोक कोठला तें माहीत नाहीं. ) ●●●

उपजाति

श्वश्रूजनं सर्वमनुक्रमेण विज्ञापय प्रापितमत्प्रणामः ॥
"प्रजानिषेकं मयि वर्तमानं सूनोरनुध्यायत चेतसेति" ॥ ४४ ॥

वसंततिलका

**श्वश्रूंस सर्व कथ मत्प्रणति क्रमानें**
**त्यांतें पुढें विनविणें मम तूं वतीनें ॥—**
**" मातें कुलांकुर दिला तुमच्या सुतानें**
**चिंता सुमंगल तया अपुल्या मनानें " ॥ ४४ ॥**

गद्यार्थ—लक्ष्मणा ! माझ्या सर्व सासूबाईंना ( प्रथम मोठ्यास व नंतर लहानास अशा ) क्रमानें, माझे नमस्कार सांगून, नंतर, माझ्या वतीनें त्यांना विनंति कर कीं, " तुमच्या पुत्रानें माझ्यामध्यें तुमचा जो कुलांकुर लावला आहे, त्याचें तुम्ही आपल्या मनानें मंगल चिंतन करा " ●●●

उपजाति

वाच्यस्त्वया मद्वचनात्स राजा
" वह्नौ विशुद्धामपि यत्समक्षम् ॥
मां लोकवादश्रवणादहासीः
श्रुतस्य किं तत्सदृशं कुलस्य ? " ॥ ४५ ॥

वसंततिलका

**मी सांगतें, म्हणुनि त्या वद कीं " क्षितींद्रा !**
**अग्नींत शुद्ध ठरलें असुनी समक्ष ॥**
**लोकापवाद, मज, ऐकुनि सोडलेंस**
**तें शोभलें वद तुझ्या श्रुत या कुलास ? ॥ ४५ ॥**

गद्यार्थ—मी सांगतें म्हणून त्या रामराजास विचार कीं " सर्वांसमक्ष मी अग्नींत शुद्ध ठरलें असता, केवळ लोकापवाद ऐकून तूं माझा त्याग केलास तें तुझ्या शिक्षणाला किंवा कुलरीतीला शोभलें काय ? ●●●

उपजाति

कल्याणबुद्धेरथ वा तवाय
न कामचारो मयि शङ्कनीयः ॥
ममैव जन्मान्तरपातकाना
विपाकविस्फूर्जथुरप्रसह्यः ॥ ४६ ॥

वसततिलका

[१] कल्याणबुद्धि असती म्हणुनीच मातें
अन्याय तूं करिसि, संभव हा न वाटे ॥
माझेंच खास जनमान्तरपातकांचें
आलें असें फलित घोर असह्य साचें ॥ ४६ ॥

गद्यार्थ—अथवा, तू माझा हितचिंतकच असल्यानें, तू मजवर असा अन्याय करात आहेस असा मी संशय घेणें योग्य नाहीं. हे जें दु ख मजवर कोसळलें आहे, तें माझ्याच मागच्या जन्मींच्या पापांचे घोर असह्य फलित असलें पाहिजे. ( तेव्हा मी तुला कसा दोष द्यावा ? )

●●●

उपजाति

उपस्थिता पूर्वमपास्य लक्ष्मीं
वन मया सार्धमसि प्रपन्न : ॥
तदास्पद प्राप्य तयाऽतिरोषा—
त्सोढाऽस्मि न त्वद्भवने वसन्ती ॥ ४७ ॥

वसततिलका

लक्ष्मी गृहागत असून तिला त्यजोनी
आलास घेउनि मला इथ घोर रानीं ॥
स्थानीं तिच्याच वसलें, तुझिया गृहांत
झालें असह्य तिज कोपुनि, हें मनांत ॥ ४७ ॥

गद्यार्थ (अथवा या दु खाचें कारण म्हणून दुसरीच एक गोष्ट मनात येते ती अशी की—) लक्ष्मी ( राज्यलक्ष्मी ) तुझ्या घरीं (चालत) आली तिला लाथाडून तू मला घेऊन रानांत आलास. आता (पुन्हा रानातून परतून) मी तिच्या जागवर ( राणीपदावर ) येऊन ( तिच्या नाकावर टिच्चून ) बसलें व तेंहि अगदीं तुझ्या घरात ! म्हणून, मला वाटतें, संतापून, मी तुझ्या घरात राहतें हें तिला सहन झालें नाहीं. ( म्हणून तिनें सवतीमत्सरानें, मला, तुझ्याकरवीं घराबाहेर काढून लावलें असावें )

●●●

उपजाति

निशाचरोपप्लुतभर्तृकाणा तपस्विनीना भवत. प्रसादात् ॥
भूत्वा शरण्या शरणार्थमन्य कथ प्रपत्स्ये त्वयि
दीप्यमाने ? ॥ ४८ ॥

वसततिलका

ज्यांच्या पतींस वधिलें कुणि राक्षसांनीं
त्या तापसींस तुझियाच कृपेंकरोनी ॥
झालें शरण्य, मग तूं असतां सतेज
जाऊं कशी शरण मी दुसऱ्यास आज ? ॥ ४८ ॥

गद्यार्थ—( पूर्वी वनवासात असता ) ज्यांचे पति राक्षसानीं वधिले, अशा तपस्विनींना, तुझ्या बळावर जी मी आश्रयभूत ठरलें, तीच मी, (आज, तू पृथ्वीवर पूर्ण) तेजानें झळकत असता, दुसऱ्या कोणाच्या आश्रयाला कशी जाऊ ?

●●●

किं वा तवात्यन्तवियोगमोघे
कुर्यामुपेक्षा हतजीवितेऽस्मिन् ॥
स्याद्रक्षणीय यदि मे न तेज—
स्त्वदीयमन्तर्गतमन्तराय· ॥ ४९ ॥

वसततिलका

जें व्यर्थ होइ तव या विरहें नितान्त
आस्था अशा न धरतें हतजीवनांत ॥
त्वद्दत्त तेज नसतें जर रक्षणीय
गर्भस्थ, जें मम ठरे मरणान्तराय ॥ ४९ ॥

गद्यार्थ—तू माझ्या गर्भात ठेवलेलें तेजस्वी (कुलांकुर) बीज (प्राणपणानें) रक्षणीय नसतें, व, त्यामुळें, तें मला (आत्महत्येच्या मार्गात) अडथळा झालें नसत, तर तुझ्या कायमच्या या विरहामुळें व्यर्थ ठरलेल्या या माझ्या दुर्भाग्य जीवनात ( आस्था न धरता ) उपेक्षा करूनच मी मेले असतें.

●●●

उपजाति

साऽहं तपः सूर्यनिविष्टदृष्टिरूर्ध्वं प्रसूतेश्चरितुं यतिष्ये ॥
भूयो यथा मे जननान्तरेऽपि त्वमेव भर्ता न च
विप्रयोग ॥ ५० ॥

वसंततिलका

तीं मी प्रसूति घडुनी, पुढतीं करीन
सूर्यावरी धरुनि दृष्टि तपार्थ यत्न ॥
जेणें पुनश्च मजला जननांतरींही
तूं लाभशील पति आणि वियोग नाहीं ॥ ५० ॥

गद्यार्थ—ती मी, ही एकदा प्रसूति उरकली, कीं, सूर्यावर दृष्टि खिळवून तप करण्याचा प्रयत्न करीन; अशासाठीं, कीं, तूच मला पुढच्या जन्मींसुद्धा पति लाभावास आणि वियोग कधीं घडू नये.

●●●

उपजाति

नृपस्य वर्णाश्रमपालनं यत्स एव धर्मो मनुना प्रणीतः ॥
निर्वासिताऽप्येवमतस्त्वयाऽहं तपस्विसामान्य-
मवेक्षणीया " ॥ ५१ ॥

वसंततिलका

वर्णाश्रमा नृपतिनें प्रतिपाळणें हें
कर्तव्य नेमुनि दिलें मनुनेंच आहे ॥
निर्वासिता जरि असेन तुवां परंतु
मातें तपस्विसम मानुनि वर्तणें तूं " ॥ ५१ ॥

गद्यार्थ—राजानीं वर्ण, आश्रम, यांचा प्रतिपाळ करावा हें मनूनेंच धर्मकर्तव्य त्यांना नेमून दिलें आहे. तेव्हां आतां मी तू निर्वासित केलेली ( भूतपूर्व राणी ) जरी असलें तरी केवळ मी सामान्य तापसी आहे, असें समजूनच, तू माझ्याशीं वाग. ( मला म्हणून कांहीं विशेष वागणूक देऊं नये. ) "

●●●

स्वागता

वत्स ! गच्छ मम वाचिकमेतद्रामचन्द्रचरणे कथयेशः ॥
" आवयोरिव भवेदनुरागो नावयोरिव विधिः प्रतिकूल " ५२

स्वागता

वत्स ! जाउनि असें क्षणिं सांग
रामचंद्रचरणीं मम बोल ॥
" आपुल्यासम असो अनुराग
यापरी विधि नसो प्रतिकूल " ॥ ५२ ॥

गद्यार्थ—वत्सा लक्ष्मणा ! जा आणि श्रीरामचंद्राच्या पायाशीं हे माझे शब्द सांग कीं, " ( जगांतल्या सर्व प्रेमी दंपतींना ) तुझ्या माझ्यासारखें ( अपूर्व ) प्रेम लाभो, पण तुझ्यामाझ्यासारखें दैव मात्र प्रतिकूल नसो. "

●●●

शिखरिणी

अथेदं रक्षोभिः कनकहरिणच्छद्मविधिना
तथा वृत्तं पापैर्व्यथयति यथा क्षालितमपि ॥
जनस्थाने शून्ये करुणकरुणैरार्यचरितै—
रपि ग्रावा रोदित्यपि दलति वज्रस्य हृदयम् ॥५३॥

स्रग्धरा

केलीं जीं राक्षसांनीं ' कनकहरिण ' या वंचनेतें करून—
पापें, तीं नष्ट केलीं, तरि जनहृदया जाळिती हो अजून ॥
एकान्तीं त्या अरण्यीं अतिकरुण अशा राघवाच्या कृतींनीं
अश्रू ढाळी शिलाही—कठिनहृदयही वज्र जाई
फुटोनी ॥ ५३ ॥

गद्यार्थ—सोन्याचा हरिण इत्यादि नाना फसवणुकीचे प्रकार योजून, पापी राक्षसानीं जीं घोर कृत्यें केलीं, तीं नंतर धुऊन टाकलीं गेलीं, तरी, अजून, तीं ( जनहृदयाला ) दाहक होत राहिलीं आहेत. ह्या शून्य जनस्थानामध्यें, सीतेच्या शोधांत असतां, अत्यंत करुण असे जे विलाप श्रीरामानें केले, त्यांनीं, ( अद्यापि सुद्धां ) दगडसुद्धां पाझर फुटून रडत आहेत, आणि अत्यंत कठीण समजलें जाणारें वज्राचें हृदयसुद्धां फुटत आहे.

●●●

( श्री रामचंद्र, अयोध्येच्या सर्व नागरिकांसह स्वर्गाला गेले व, त्यामुळें, सूर्यवंशाची वंशपरंपरेची राजधानी अयोध्या ओस पडली, व, भरदिवसां ती भयाण दिसूं लागली. रामाचा पुत्र कुश यानें, नवीन कुशावती नगरी वसविली होती. तेव्हां अयोध्येची अधिष्ठात्री देवता कुशाकडे गेली, व, तिनें, कुशानें पुन्हा अयोध्येसच आपली राजधानी करावी, अशी, [illegible] केली. त्यावेळीं तिनें त्यावेळची अयोध्येची [illegible] वर्णन केली ती अत्यंत हृदयद्रावक अशी आहे [illegible] रघुवंश, सर्ग १६. )

वसततिलका

**" नांदे सुराज्य, नित उत्सव, वैभवें या**
**मी टाकिलेंच अलकेप्रति जिंकुनीया ॥**
**तूं सर्वशक्ति रविचंद्र्य असून आतां**
**आली पहा मज अशी करुणा अवस्था ॥ ५४ ॥**

गद्यार्थ—( श्री रामचद्राच्या वेळीं ) सुराज्य नादत असल्यामुळें व सतत मगल उत्सव चालत असल्यामुळें, या सर्व वैभवानें, मीं (अयोध्या नगरीन) कुबेराची राजधानी जी *अलका तिला सुद्धा मागे टाकलें! पण हाय! हाय! त्याच* सूर्यवंशातला सर्वशक्तिमान असा तू ( कुश ) जिवत असताहि, मी ( ही अयोध्यानगरी ) अत्यत शोचनीय दशेला येऊन ठेपलें आहे.

●●●

उपजाति

विशीर्णतल्पाट्टशतो निवेश
पर्यस्तशालः प्रभुणा विना मे ॥
विडम्बयत्यस्तनिमग्नसूर्यं
दिनान्तमुग्रानिलभिन्नमेघम् ॥ ५५ ॥

वसततिलका

**स्वामीविना कितिक हर्म्यें तथा मनोरे**
**दारें घरें पडुनि हा मम वास्तु वा रे ॥**
**संध्यानभासम दिसे रवि अस्त होतां**
**झंझानिलें विसकटूनचि मेघ जातां ॥ ५५ ॥**

*गद्यार्थ*—राजाविना, शेंकडों प्रासाद, सौध, मनोरे, घरें दारें, कोसळून सर्वत्र पडझड झालेला माझा (अयोध्या नगरीचा) वास्तु आता सूर्यास्त झाल्यावर, प्रचड वादळ उठून, त्यान, मेघाचे तुकडे तुकडे करून, *आकाशात सर्वत्र इतस्ततः ते खड फेकून द्यावे,* अशा सध्यानभाप्रमाणें दिसत आहे.

●●●

उपजाति

निशासु भास्वत्कलनूपुराणा यः सचरोऽभूदभिसारिकाणाम् ॥
नदन्मुखोल्काविचितामिषाभिः स वाह्यते राजपथ. शिवाभिः ॥ ५६ ॥

वसततिलका

**रात्रीं सत्तेज मधुरस्वन नूपुरांनीं**
**केलें निनादित जया अभिसारिकांनीं ॥**
**शोधीत मांस, भुकतां, स्वमुखप्रकाशीं**
**तो राजमार्ग अजि आश्रय त्या शिवांसी ॥ ५६ ॥**

गद्यार्थ—पूर्वी ( रामराज्याच्या वेळीं ) ज्या माझ्या राजमार्गा-वरून रात्रीं, तेजस्वी, झळकणाऱ्या, व रुमझुम वाजणाऱ्या, अभिसारिकाच्या पायातल्या पैंजणाच्या नादानीं गजबजणारी, ये जा, *असायची, त्याच राजमार्गावरून, आता (कोल्ह्याच्या उघड्या* तोंडातून अधारात एक प्रकारचा प्रकाश बाहेर पडतो असें म्हणतात ) भुकण्यामुळें उघडलेल्या तोंडातून बाहेर पडणाऱ्या *प्रकाशाच्या साह्यानें मास शोधणाऱ्या, अशा, कोल्ह्याची वर्दळ* वाहतूक सुरू झाली आहे.

●●●

उपजाति

आस्फालितं यत्प्रमदाकराग्रै—
र्मृदङ्गधीरध्वनिमन्वगच्छत् ॥
*वन्यैरिदानीं महिषैस्तदम्भः*
शृङ्गाहतं क्रोशति दीर्घिकाणाम् ॥ ५७ ॥

वसंततिलका

**होत्या स्त्रिया करित पुष्करिणीजलांत**
**ताडोनिया मृदुकरेंच मृदंगनाद ॥**
**शृंगें अरण्यमहिषें जल ताडण्यानें**
**आतां गमे रडतसे करुणस्वनानें ॥ ५७ ॥**

गद्यार्थ—ज्या नगरींतल्या पुष्करिणींच्या पाण्यात सुदर तरुणी आपल्या हातानीं, क्रीडासमयीं, पाणी उसळवून मृदगा-सारखा ध्वनि काढीत असत, त्यात आता रानटोणगे शिंगानीं डवकत असल्यानें, तें पाणी, जणू करुण आक्रोश करीत आहे.

●●●

उपजाति

वृक्षेशया यष्टिनिवासभङ्गा—
न्मृदङ्गशब्दापगमादलास्याः ॥
प्राप्ता दवोल्काहतशेषबर्हाः
क्रीडामयूरा वनबर्हिणत्वम् ॥ ५८ ॥

वसंततिलका

**लोपून यष्टिगृह जे निजती तरुंत**
**ना नाचती, न मिळतां पखवाज साथ ॥**
**लोपून शेपहि पिसें, दवदग्ध होतां**
**क्रीडामयूर बनले वनमोर आतां ॥ ५८ ॥**

गद्यार्थ—क्रीडामयूरासाठीं उंच काठीवर घरें बांधलेली असत, तीं आता लोपल्याने, ते झाडावर जाऊन निजत असतात. गृहस्वामिनी, त्याना नाचायला लावण्यासाठीं मृदंगाची साथ करीत; तीच आता बंद पडल्याने ते नाचेनासे झाले आहेत; ( झाडात निजावें लागल्याने फांद्यातून जा ये करण्यामुळें, त्यांचीं बरींच पिसें गळून गेलीं आहेत व त्यातून ) उरलेलीं, वणव्याच्या ठिणग्यानीं जळून गेल्याने, ते क्रीडामयूर, आता, ( पिसाऱ्याचा खराटा झालेल्या ) रानटी मोराच्या अवस्थेला जाऊन पोंचले आहेत. ●●●

इन्द्रवज्रा

सोपानमार्गेषु च येषु रामा निक्षिप्तवत्यश्चरणान्सरागान् ॥
सद्यो हतन्यङ्कुभिरस्रदिग्धं व्याघ्रैः पदं तेषु निधीयते मे ॥ ५९ ॥

वसंततिलका

**ज्या पायऱ्यांवरुनि रंगित पावलांनीं**
**गेल्या सुरम्य रमणी जपुनी जपूनी ॥**
**मारोनि वाघ हरिणां, पद रक्तवर्ण**
**आतां खुशाल वघ टाकिति त्यांवरून ॥ ५९ ॥**

गद्यार्थ—ज्या पायऱ्यावरून ( घाटाच्या म्हणा, घरांघरच्या जिन्यातल्या म्हणा ) सुंदर रमणी ( अळित्यानें लाल ) रंगविलेल्या पावलानीं, ( जपून ) चालत गेल्या, त्याच पायऱ्यावरून, हरिण मारून, त्याच्या रक्तानें लडबडलेल्या पायांनीं, वाघ, आता चालत जात आहेत. ●●●

उपजाति

चित्रद्विपाः पद्मवनावतीर्णाः करेणुभिर्दत्तमृणालभङ्गाः ॥
नखाङ्कुशाघातविभिन्नकुम्भाः संरब्धसिंहप्रहृतं वहन्ति ॥ ६० ॥

वसंततिलका

**चित्रांत रेखितहि पद्मवनस्थ हत्ती**
**ज्या हत्तिणी निजकरें बिसखंड देती ॥**
**होतां प्रभिन्नघट सिंहनखांकुशांनीं**
**कोपप्रहारकृत चिन्ह धरी बजोनी ॥ ६० ॥**

गद्यार्थ—( मोठमोठ्या हर्म्यांतून, मंदिरांतून ) कमळाच्या वनात हत्ती शिरलेला आहे व त्याला हत्तिणी आपल्या सोंडेनें बिसतंतु भरवीत आहेत, अशा, भिंतीवरील शिल्पातल्या हत्तीवर, तो खराच समजून, सिंह आपल्या नखरूपी अंकुशाचे आघात करून, त्याचे कुंभ फोडीत आहे, व, अशातऱ्हेनें सिंहाच्या क्रोधाच्या आघाताची चिन्हें तो हत्ती धारण करीत आहे ! ●●●

उपजाति

स्तम्भेषु योषित्प्रतियातनाना-
मुत्क्रान्तवर्णक्रमधूसराणाम् ॥
स्तनोत्तरीयाणि भवन्ति सङ्गा—
न्निर्मोकपट्टाः फणिभिर्विमुक्ताः ॥ ६१ ॥

वसंततिलका

**स्तंभांत ज्या युवति आकृति कोरलेल्या**
**रंगच्छटा विटुनि धूसर जाहलेल्या ॥**
**त्यांच्या स्तनीं पदररूपचि पावतात**
**कातीच; सर्प तिथ ज्या कधिं टाकतात ॥ ६१ ॥**

गद्यार्थ—खांबावरून ज्या, तरुण स्त्रियांच्या मूर्ति कोरलेल्या होत्या, पण रंग विटून ज्या आता भुरकट दिसत आहेत, त्या मूर्तीवरून, आता सर्प वावरत आहेत; आणि, त्यांनीं टाकलेल्या कातीं, त्या मूर्तीच्या ( अनावृत ) स्तनांवरून जणूं काय पदर घेतल्याचा भास उत्पन्न करीत आहेत ! ●●●

उपजाति

कालान्तरश्यामसुधेषु नक्त—
मितस्ततो रूढतृणाङ्कुरेषु ॥
त एव मुक्तागुणशुद्धयोऽपि
हर्म्येषु मूर्च्छन्ति न चन्द्रपादाः ॥ ६२ ॥

वसंततिलका

**कालान्तरें धवलरंग उडून काळे**
**येथें तिथें गवत ज्यांतुनि वाढलेले ॥**
**हर्म्यांत त्याच, निशिं आज न शोभताती**
**ते तेच चंद्रकर मौक्तिकहारकांति ॥ ६२ ॥**

गद्यार्थ—ज्यांचे शुभ्र धवल रंग उडून जाऊन, जे, आता काळे पडले आहेत; ज्यांत आता इकडे तिकडे गवत वाढलें आहे; त्या प्रासादांतून, मोत्यांच्या हाराप्रमाणें शुद्ध अशीं पूर्वीचीं तींच चंद्राचीं किरणें, आता खुलून दिसत नाहींशी झालीं आहेत. ●●●

इन्द्रवज्रा

आवर्ज्य शाखाःसदयं च यासां
पुष्पाण्युपात्तानि विलासिनीभिः ॥
वन्य : पुलिन्दैरिव वानरैस्ताः
क्लिश्यन्त उद्यानलता मदीयाः ॥ ६३

वसंततिलका

**शाखा हळूं सदय ज्यांतिल वांकवोनी**
**ज्यांचीं फुलें खुडियलीं सुविलासिनींनीं ॥**
**आतां पुलिंदसम वन्यचि वानरें तीं**
**उद्यानिं त्या मम लतांप्रति गांजिताती ॥ ६३ ॥**

गद्यार्थ—माझ्या उद्यानातल्या ज्या वेलींचीं फुलें, विलासी स्त्रियानीं, त्यांच्या फांद्या हलक्या हातानीं वाकवून तोडिलीं, त्याच वेली, आता, रानटी पुलिंदाप्रमाणें, (धुडगूस घालून) (काळतोंड्या) वानराकडून गांजिल्या जात आहेत. ●●●

उपजाति

रात्रावनाविष्कृतदीपभासः
कान्तामुखश्रीवियुता दिवाऽपि ॥
तिरस्क्रियन्ते कृमितन्तुजालै—
र्विच्छिन्नधूमप्रसरा गवाक्षाः ॥ ६४ ॥

वसंततिलका

**जेथें दिसे न दिवसां रमणीमुखश्री**
**किंवा दिवे झळकतीच न ज्यांत रात्रीं ॥**
**ये जा न धूर करितो; रचितात जाळीं**
**हा ! हाय ! त्याच खिडक्यांतुनि आज कोळी**
**॥ ६४ ॥**

गद्यार्थ—ज्या खिडक्यातून आता रात्रीं कधीं दिव्याचा लखलखाट दिसत नाहीं; आणि, दिवसासुद्धा ज्यातून सुंदर स्त्रियांच्या मुखाचें दर्शन घडत नाहीं; (स्वयंपाक किंवा होम हवन होत नसल्यानें) ज्यांच्यातून धूर ये जा करीत नाहीं, अशा खिडक्या, आता, कोळ्यानीं बांधलेल्या जाळ्यानीं पार झाकून गेल्या आहेत. ●●●

उपजाति

बलिक्रियावर्जितसैकतानि
स्नानीयसंसर्गमनाप्नुवन्ति ॥
उपान्तवानीरगृहाणि दृष्ट्वा
शून्यानि दूये सरयूजलानि ॥ ६५

वसंततिलका

**धर्मक्रिया न घडती पुलिनांत जेथें**
**स्नानीय गंध मिसळे न जळांत जेथें ॥**
**तीरास वेतसगृहें,–सरयूजळें तीं**
**दोन्हीहि शून्य बघुनी खुपतेंच चित्तीं ॥ ६५ ॥**

गद्यार्थ—जिच्या वाळवंटात आता काहींहि धर्मक्रिया घडत नाहींत, जिच्या पाण्यात आता स्नानार्थ योजलेले सुगंधी पदार्थ मिसळत नाहींत; अशी ती सरयूनदी, व तिच्या काठावरचीं तीं वेतसगृहें, सर्वच शून्य पाहून, मनाला, आता, चरका बसल्याशिवाय राहात नाहीं. ●●●

उपजाति

तदर्हसीमां वसतिं विसृज्य
मामभ्युपैतुं कुलराजधानीम् ॥
हित्वा तनुं कारणमानुषीं तां
यथा गुरुस्ते परमात्ममूर्तिम् " ॥ ६६

वसंततिलका

**तेव्हां कुशा ! तव नवी वसती त्यजोनी**
**स्वीकार ही मम तुझी कुलराजधानी ॥**
**जैसा निमित्ततनु सोडुनि मानवी ती**
**घेई पिता तव पुन्हां परमात्ममूर्ती " ॥ ६६ ॥**

गद्यार्थ—तेव्हा हे कुशा ! तुझी ही वसति सोडून, मी जी तुझी वंशपरंपरेची कुलराजधानी, तिचाच स्वीकार करणें तुला युक्त होय. ज्याप्रमाणें, कारणपरत्वें, निमित्तमात्र, तात्पुरता, आलेला मनुष्य देह सोडून, तुझा पिता श्रीरामचंद्र पुन्हां मूळ परमात्ममूर्तीत विलीन झाला, त्यास धरूनच तुझें हें कर्म होईल. " ●●●

## जगन्नाथकृत भामिनीसाठीं विलाप

अजविलाप, रतिविलाप इत्यादि कालिदासकृत विलापा-प्रमाणेंच जगन्नाथ पंडिताच्या भामिनीविलासांतर्गत करुण प्रकरणांतील स्वपत्नी भामिनी (अकबरकन्या लवङ्गीच्या आधींची लहानवयांतच दिवंगत झालेली) हिच्यासाठीं केलेला विलापहि फार प्रसिद्ध आहे त्यांतील काहीं श्लोक (क्रमवार नव्हे) पुढें भाषांतरित केले आहेत— ●●●

(६७ ते ७८)

वसंततिलका

दैवे पराग्वदनशालिनि हन्त जाते
याते च सम्प्रति दिवं प्रति बन्धुरत्ने ॥
कस्मै मनः कथयितासि निजामवस्थां ?
कः शीतलैः शमयिता वचनैस्तवाधिम् ? ॥ ६७ ॥

वसंततिलका

**माझें मला विमुख दैवचि हाय ! होतां**
**पत्नीहि रत्नसम ही परलोकिं जातां ॥**
**चित्ता ! निजस्थिति कुणाप्रति सांगशील ?**
**अन् कोण मंजुवचनें तुज शांतवील ? ॥ ६७**

गद्यार्थ—हाय हाय ! आज माझें दैवच मजकडे पराङ्मुख झालें आहे व सर्व नाऱ्याच्या माणसांतील श्रेष्ठ (अशी माझी प्रियपत्नी) आज स्वर्गास गेली आहे. अशा स्थितींत हे माझ्या मना ! तुझी ही दीन अवस्था तू कोणाला सांगणार व शीतल शब्दांनीं तुझा शोकपरिहार तरी कोण करणार ? ●●●

वसंततिलका

सर्वेऽपि विस्मृतिपथं विषयाः प्रयाता
विद्याऽपि खेदगलिता विमुखीबभूव ॥
सा केवलं हरिणशावकलोचना मे
नैवापयाति हृदयादधिदेवतेव ॥ ६८ ॥

पृथ्वी

**पहा विषय सर्व विस्मृतिपथास गेले अतां**
**मुखा फिरविते थकून जणु काय विद्या स्वतां ॥**
**त्यजी न हृदयास तीच हरिणाक्षि हो एकली**
**जणू हृदयशासिकाच अधिदेवता ती भली ॥ ६८ ॥**

गद्यार्थ—(अशी गुणशाली पत्नी गेल्यामुळें विषयसुख बेचव झाल्यानें) सर्व विषय आता विस्मृतीच्या मार्गाला गेले आहेत. (विद्यासेवनातहि गोडी न उरल्यानें) विद्या स्वतःच जणू थकून गेल्यानें, माझ्याशीं आज पराङ्मुख झाली आहे परंतु एखादी अधिदेवता, (जशी आपलें वास्तु, कोणत्याहि परिस्थितींत सोडीत नाहीं,) तद्वत् हरिणाच्या पाडसासारख्या नेत्रांची ती (माझी भामिनी) एकटीच काय ती माझ्या हृदयापासून दूर जात नाहीं. ●●●

वसंततिलका

निर्वाणमङ्गलपदं त्वरया व्रजन्त्या
मुक्ता दयावति ! दयाऽपि किल त्वयेयम् ॥
यन्मां न भामिनि निभालयसि प्रभात-
नीलारविन्दमदभङ्गकरैः कटाक्षैः ॥ ६९ ॥

शार्दूलविक्रीडित

**जातां स्वर्गसमान मंगलपदा मोठ्या त्वरेनें प्रिये !**
**सोडीसीच दया, दयामय अशी तूची असोनी स्वयें ॥**
**प्रातःकालिं फुलोत नीलकमलें-तद्गर्वहारी असे**
**देशी तू न कटाक्ष आज म्हणुनी वाटे मनाला तसें**
**॥ ६९॥**

गद्यार्थ—हे भामिनि ! प्रातःकालीन नीलकमलाचा गर्व हरण करणारे तुझे कटाक्ष टाकून, आज, तू मला पहात नाहींस, यावरून, स्वर्गासारख्या मंगलपदाला जाण्याच्या त्वरेपायीं, मूळची तू दयामयी असता, नेमकी (मजविषयीं) ती दयाच तू सोडलीस असं म्हणावें लागतें. ●●●

वसंततिलका

धृत्वा पदस्खलनभीतिवशात्करं मे
या रूढवत्यसि शिलाशकलं विवाहे ॥
सा मां विहाय कथमद्य विलासिनि ! द्या-
मारोहसीति शतधा हृदयं प्रयाति ॥ ७० ॥

पृथ्वी

**सरेल तव पाय यास्तव धरून माझा कर**
**विवाहिं चढलीस जी जपुनि तूं सहाणेवर ॥**
**त्यजून मज आज येवि चढलीस स्वर्गावरी**
**फुटे हृदय पूर्ण हें मम, अशा विचारें परी ॥७०॥**

गद्यार्थ — हे विलासिनि ! आपल्या विवाहप्रसंगीं ( सप्तपदीच्या वेळीं ) पाय घसरून पडशील या भयानें, सहाणेवर, माझा हात धरूनच जी तूं चढलीस, तीच तू, आज मला टाकून, एकटीच, ( दोन अंगुळ उंच सहाणेवर नव्हे, तर ) स्वर्गाइतक्या उंचीवर, कशी चढली असशील, या नुसत्या कल्पनेनेंच, माझें हृदय, शतधा विदीर्ण होत आहे. ●●●

वसंततिलका

सौदामिनीविलसितप्रतिमानकाण्डे
दत्त्वा कियन्त्यपि दिनानि महेन्द्रभोगान् ॥
मन्त्रोज्झितस्य नृपतेरिव राज्यलक्ष्मी-
र्भाग्यच्युतस्य करतो मम निर्गताऽसि ॥ ७१ ॥

शार्दूलविक्रीडित

**तेजस्वी दिसुनी अचानक वसे विद्युत् जशी लोपुन**
**इंद्राचे मज भोग देउनि तसे, थोडेच तूंही दिन—**
**सोडी मंत्र जया, अशा नृपतिला, ती राज्यलक्ष्मी जशी**
**भाग्यभ्रष्ट अशा मलाहि सखि तूं सोडून जाशी तशी ॥ ७१ ॥**

गद्यार्थ—वीज जशी तेजस्वी दिसता दिसता अचानक नष्ट होते, तसे (अल्पजीवी) पण देवेन्द्रालाच लभ्य, असे भोग, कांहीं थोडे दिवस मला देऊन, राजनीतिमंत्राने सोडलेल्या राजाला, राज्यलक्ष्मी, जशी सोडून जाते, तशी, भाग्यभ्रष्ट अशा माझ्या हातातून तूंहि अगदीं अचानकपणें, निसटून चालली आहेस. ●●●

वसंततिलका

चिन्ता शशाम सकलाऽपि सरोरुहाणा—
मिन्दोश्च बिम्बमसमां सुषमामयासीत् ॥
अभ्युद्गतं कलकलं किल कोकिलानां
प्राणप्रिये यदवधि त्वमितो गताऽसि ॥ ७२ ॥

वसंततिलका

**चिंता समग्र कमलांमधली निमाली**
**चंद्रासही अतुलनीयचि कांति आली ॥**
**आलें विशेष बल कोकिलकूजितास**
**जाशी प्रिये ! इथुनि ज्या क्षणिं, त्या क्षणास ॥ ७२ ॥**

गद्यार्थ—हे प्राणप्रिये ! तू इहलोकातून निघून जाण्याचाच अवकाश--कीं लगेच, क्षणभरातच ( "भामिनीच्या मुखकमलाच्या सौंदर्यापुढें आमचें सौंदर्य कोण पहाणार ?" ही ) कमलाच्या पोटातली सर्व चिंता शांत झाली ! ( भामिनीच्या मुखचंद्राच्या तेजापुढें म्लान झालेल्या ) चंद्राच्या बिंबाला कधीं नव्हतें असें तेज प्राप्त झाले ! ( भामिनीच्या मधुरकण्ठापुढे लज्जित होऊन मूक झालेल्या ) कोकिलांनी एकदमच कुहू कुहूची एकच धुमाळी उडवून दिली ! ●●●

वसंततिलका

*काव्यात्मना मनसि पर्यगमन्पुरा मे*
*पीयूषसारसरसास्तव ये विलासाः ॥*
*तानन्तरेण रमणीरमणीयशीले*
*चेतोहरा सुकविता भविता कथं नु ? ॥ ७३ ॥*

वसंततिलका

**काव्यात्म होउनि पुरा गमले मनास**
**पीयूषसारसम गोड तुझे विलास ॥**
**येणार त्यांविण सुशील सखे ! कसें गे**
**चेतोहरत्व अमुच्या कवितेस सांगे ॥ ७३ ॥**

गद्यार्थ—स्त्रीचें सौंदर्य वाढविणारें शील धारण करणाऱ्या हे भामिनि ! पूर्वी ( अर्थात् तू जिवंत असता ) जे तुझे विलास त्यातल्या काव्यात्मतेमुळे माझ्या हृदयाला अमृताच्या अर्कासारखे जाणवले, (ते आता तुझ्याबरोबर निघून गेले ) त्याच्यावाचून आता आमची कविता ( रसिकाच्या ) हृदयाला हरण करण्याजोगी ( आकर्षक ) कशी होणार ? ●●●

वसंततिलका

या तावकीनमधुरस्मितकान्तिहीना
भूमण्डले विफलतां वत्रिपु व्यतानीत् ॥
सा कातराक्षि ! विलयं त्वयि यातवत्यां
राकाऽधुना वहति वैभवमिन्दिराया ॥ ७४ ॥

वसंततिलका

**पाहून शुभ्रतर कान्ति तुझ्या स्मिताची**
**लोकीं जिला कविहि मानिति फोल साची ॥**
**तूं लोपतांक्षणिं अता बघ पूर्णिमा ती**
**घेऊनिया मिरविते जणुं लक्ष्मिकान्ति ॥ ७४ ॥**

गद्यार्थ—ज्या पौर्णिमेचें तेज, तुझ्या मधुर स्मिताच्या कांतीपेक्षां हीन असल्यानें, जगातल्या सर्व कवींना, त्याचें वर्णन (तुझ्या मुखचंद्राच्या तुलनेनें ) करणें व्यर्थ वाटत आलें, तीच पूर्णिमा, हे कांतराक्षि! तुझें अस्तित्व या जगातून लोपताच आतां, जणूं साक्षात् लक्ष्मीचें वैभव घेऊन मिरवीत आहे. ●●●

वसंततिलका

भूमौ स्थिता " रमण ! नाथ ! मनोहरेति "
संबोधनैर्यमधिरोपितवत्यसि धाम् ॥
स्वर्गं गता कथमिव क्षिपसि त्वमेण—
शावाक्षि ! तं धरणिधूलिषु मामिदानीम् ? ॥ ७५ ॥

शार्दूलविक्रीडीत

" हे नाथा ! रमणा ! मनोहर ! " अशा
शब्दांत संबोधुनी
तूं होतीस जगीं तदा बसविलें
स्वर्गी मला नेउनी ॥
हे एणाक्षि ! अतां घडे उलट, कीं
स्वर्गात तूं बैससी
अन् पृथ्वीवर कां धुळींत मजला
लोळवीशी अशी ? ॥ ७५ ॥

गद्यार्थ—हे हरिणबालकनयने ! तू या पृथ्वीवर होतीस तेव्हां तू मला, " हे रमणा ! हे नाथा ! हे मनोहरा ! " अशा (लाडक्या) नावांनी संबोधीत होतीस, आणि, तीं ऐकून मी स्वर्गात चढल्याचा आनंद भोगीत असे आता ( सर्व उलटें होऊन ) तूं स्वर्गात जाऊन बसलीस आणि ( पूर्वीसारखे मलाहि स्वर्गात चढवावयाचें सोडून, तुझी वाणी बंद झाल्यानें, ) त्याच मला या पृथ्वीवरच्या धुळींत अशी कशी लोळवीत आहेस ! ●●●

वसंततिलका

लावण्यमुज्ज्वलमपास्ततुलं च शील
लोकोत्तरं विनयमर्थमयं नयं च ॥
एतान्गुणानशरणानथ मां च हित्वा
हा हन्त सुन्दरि ! कथं त्रिदिवं गताऽसि ! ॥ ७६ ॥

वसंततिलका

तेजस्वि रूप, तव, शील तुलाविहीन
संस्कार थोर नि सुशिक्षण अर्थपूर्ण ॥
निस्त्राण सोडुनि मला, नि अशा गुणांसी
स्वर्गात हाय ! अजि सुंदरि ! केवि जासी ? ॥ ७६ ॥

गद्यार्थ—तेजस्वी असे तुझें सौन्दर्य, ज्याला तुलनाच नाहीं असे तुझें शील, लोकोत्तर संस्कार, आणि, अर्थपूर्ण असे तुझें शिक्षण, ( यांनी ज्याचा आधार घ्यावा अशा योग्यतेची दुसरी स्त्री जगात नसल्याने ) हे सर्व, तुझ्याविना निराधार झालेले सद्गुण आणि मी या सर्वांनाच सोडून, हे सुंदरि ! तूं स्वर्गात कशी चालती झालीस ? ●●●

वसंततिलका

स्वप्नान्तरेऽपि खलु भामिनि ! पत्युरन्यं
या दृष्टवत्यसि न कञ्चन साभिलाषम् ॥
हा ! सम्प्रति प्रचलिताऽसि गुणैर्विहीनं
प्राप्तुं कथं कथय हन्त परं पुमांसम् ? ॥ ७७ ॥

वसंततिलका

स्वप्नांतही पतिहुनी दुसऱ्या कुणास
तूं भामिनी ! बघितलेंस न साभिलाष ॥
ती आज केंवि घघसी मिळवावयास
हा हाय ! निर्गुण अशा पर पूरुषास ? ॥ ७७ ॥

गद्यार्थ— हे भामिनि ! ज्या तू, स्वप्नात सुद्धां, स्वतांच्या पतीवाचून अन्य कोणाहि पुरुषाकडे अभिलाषेच्या दृष्टीनें पाहिलें नाहींस, तीच तूं आज निर्गुण अशा पर पुरुषाला ( परमेश्वराला ) प्राप्त करून घेण्यासाठीं हाय ! हाय ! कशी चालती झालीस ! ●●●

वसंततिलका

कान्त्या सुवर्णवरया परया च शुद्ध्या
नित्यं स्विकाः खलु शिखाः परितः क्षिपन्तीम् ॥
चेतोहरामपि कुशेशयलोचने ! त्वां
जानामि कोपकलुषो दहनो ददाह ॥ ७८ ॥

शार्दूलविक्रीडित

सोन्याहून विशेष कान्ति, [illegible]
लोकीं [illegible]
तेजोज्योति तुझ्या, [illegible]
तूं [illegible] ॥
कान्ते ! तूं [illegible] नि असनी
तूं [illegible]
कोपें या तुज [illegible],
[illegible] सत्वर ॥ ७८ ॥

गद्यार्थ—हे भामिनि! तुझी कान्ति सुवर्णाहून उज्ज्वल व तुझे पावित्र्यहि तसेंच सर्वश्रेष्ठ होतें, व जेथें जायचीस तेथें तेथें सभोंवतीं तू आपल्या तेजोज्योनि जणू फैंकीतच जात होतीस. (सुवर्णासारखी कांति व आत्यंतिक पावित्र्य हेच नेमके गुण अग्नीचे! व तेच तू विशेषत्वानें प्रकट करीत होतीस) या गोष्टीचा (मात्सर्ययुक्त) राग मनात धरून, मला वाटतें, (सूडबुद्धीनें) तू एवढी (सुंदर कोमल) कमलनयना व (विश्वाचें) चित्तहरण करणारी असतांहि, तुला, अग्नीनें जाळून टाकिलें असलें पाहिजे ●●●

करुणाविलासांतला उतारा संपला. पण पुढील श्लोक याच्या शेवटीं शोभण्याजोगा सुवृत्ततिलकांतला आहे—

शार्दूलविक्रीडित

यत्त्वन्नेत्रसमानकान्ति सलिले मग्नं तदिन्दीवरं
मेघैरन्तरितः प्रिये तव मुखच्छायानुकारी शशी ॥
येऽपि त्वद्गमनानुकारिगतयस्ते राजहंसा गता—
स्त्वत्सादृश्यविनोदमात्रमपि मे दैवेन न क्षम्यते ॥ ७९ ॥

शार्दूलविक्रीडित

**नेत्रांची तव कान्ति ज्या, कुमुद तें गेलें बुडोनी जलीं**
**दावी त्वन्मुखसाम्य तो विधु लपे मेघांचिया अंतरीं ॥**
**ज्या हंसांत तुझ्याच साम्य गतिचें, तेही उडाले कसे!**
**त्वत्साम्यें बघुनी जिवा रमविणें हें सह्य दैवा नसे!**
**॥ ७९ ॥**

गद्यार्थ—हे दिवंगत कांते, तुझ्या नेत्रासारखी ज्याची कांति, तें नीलकमल पाण्यांत बुडून गेलें, तुझ्या मुखासारखें तेज असलेला चंद्र, मेघामागे दडून बसला, ज्या राजहंसाची गति तुझ्यासारखी, तेहि उडून गेले, अशा रीतीनें (तुझ्या पश्चात्, नीलकमलें पाहून तुझे नेत्र पाहिल्याचें, चंद्र पाहून तुझे मुख पाहिल्याचें, किंवा, राजहंसाची चाल पाहून, तुझी चाल पाहिल्याचें, समाधान मानून) तुझ्या नुसत्या साम्य दर्शनानें मी मनोविनोदन करून घ्यावें, हें सुद्धा दुष्ट दैवाला सहन होत नाहीं, असें दिसतें. ●●●

कुमारसंभव या कालिदासकृत काव्यामध्यें, शंकरानें मदनाचें दहन केल्यानंतर मदनपत्नी रतीनें केलेला विलाप चौथ्या सर्गांत आहे. त्यांतले ३२ श्लोक यापुढें भाषांतरित केले आहेत—

वैतालीय

अथ सा पुनरेव विह्वला वसुधाऽऽलिङ्गनधूसरस्तनी ॥
विललाप विकीर्णमूर्धजा समदुःखामिव कुर्वती स्थलीम् ८०

वसंततिलका

**होऊन विह्वल पुनश्च तदा रतीनें**
**वक्ष स्थलीं मलिन, भूवर लोळण्यानें ॥**
**केला विलाप शिरिं कुंतल विस्कटीत**
**साऱ्या स्थलास समदु ख जणू करीत ॥ ८० ॥**

गद्यार्थ— (मूर्च्छेतून उठल्यावर) भूमीवर लोळण्यानें वक्षस्थळीं मलीन झालेली, व डोक्यावरचे केस विस्कटलेले आहेत, अशी रति, दु खानें पुन्हा विव्हल होऊन, साऱ्या भोंवतालच्या प्रदेशाला जणू समदु खी करीत, विलाप करती झाली. ●●

वैतालीय

"उपमानमभूद्विलासिनां करणं यत्तव कान्तिमत्तया ॥
तदिदं गतमीदृशीं दशां, न विदीर्ये, कठिनाः खलु स्त्रियः ८१

वसंततिलका

**"जी जाहली तनु तुझी बहुकांतिमंत**
**साऱ्या विलासि पुरुषां उपमानभूत ॥**
**ती या दशेंत बघुनि हृदिं मी फुटे न**
**स्त्रीजात यावरुनि खास ठरे कठीण ॥ ८१ ॥**

गद्यार्थ—हे मदना! जो तुझा अत्यंत कांतिमान् असा हा देह, जगभरच्या सर्व विलासी पुरुषांना उपमानभूत ठरला, (सुंदर पुरुषाला उपमा म्हणजे "तो अगदीं मदनाचा पुतळाच!") त्या देहाला आता (चिमूटभर राखेची) ही दशा आलेली (प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहूनसुद्धा,) माझं हृदय फुटून जात नाहीं, यावरून, स्त्रीजात हीच खरोखर अत्यंत कठिन-हृदयी म्हणणें भाग आहे. ●●●

वैतालीय

क्व नु मां त्वदधीनजीवितां विनिकीर्य क्षणभिन्नसौहृदः ॥
नलिनीं क्षतसेतुबन्धनो जलसंघात इवासि विद्रुतः ॥८२॥

वसंततिलका

**माझें त्वदाश्रितचि जीवन; त्याच मातें**
**सोडून सौहृद क्षणीं पळलास कोठें ? ॥**
**फोडून बांध आपुला, नलिनी त्यजून**
**जावा जलाशयचि वाहुनि त्यासमान ॥ ८२ ॥**

गद्यार्थ—तळयाच्या पाण्याच्या आश्रयानें कमलवेली वाढलेली असावी—पण त्या पाण्यानें बंधारा फोडून त्या वेलीला सोडून दूर वाहून जावें, त्याप्रमाणें, केवळ तुझ्यावर अवलंबून जीवन असलेल्या मला टाकून इतक्या वर्षांचा स्नेहपूर्ण बाध, क्षणभरात फोडून तू कसा कोठें पळून गेलास ? ●●●

वैतालीय

कृतवानसि विप्रियं न मे प्रतिकूलं च न ते मया कृतम् ॥
किमकारणमेव दर्शनं विलपन्त्यै रतये न दीयते ? ॥ ८३॥

वसंततिलका

**केलें न अप्रिय असें मम तूं कधींहि**
**केलें न मींहि तुजला प्रतिकूल कांहीं ॥**
**कां रे अकारणचि तूं निजदर्शनासी**
**ऐशा विलाप करत्या रतिला न देसी ? ॥८३ ॥**

गद्यार्थ—मला अप्रिय असे तू कधीं केलें नाहींस, तसेच तुला प्रतिकूल असे मींहि काही केलें नाहीं. तेव्हा तुझ्यासाठीं विलाप करणाऱ्या या रतीला, काहीं कारण नसता, तू दर्शन का बरें देत नाहींस ? ●●●

स्मरसि स्मर ! मेखलागुणैरुत गोत्रस्खलितेषु बन्धनम् ॥
च्युतकेसरदूषितेक्षणान्यवतंसोत्पलताडनानि वा ॥ ८४ ॥

वसंततिलका

**वाणींत गोत्र चुकतां तुज बांधियेलें**
**कांचीगुणें, स्मर तुला वद कां स्मरे रे ? ॥**
**भूषोत्पलेंच अथवा तुज ताडिलेलें**
**यद्रेणु पीडक तुझ्या नयनांत झाले ? ॥ ८४ ॥**

गद्यार्थ—रतिप्रसंगीं माझ्या ऐवजीं चुकून दुसऱ्या कुण्या स्त्रीचें नाव तुझ्या तोंडून आलें, यावरून, रतिकोपानें मी तुला माझ्या मेखलेच्या दोरीनें, बांधून घातलें, तें, हे स्मरा ! तुला आठवतें का ? किंवा अलंकारातल्या कमळानें मी तुला झोडपलें व त्यातले रेणू तुझ्या डोळ्यात खुपत राहिले, त्याची तुला आठवण आहे का ? ●●●

वैतालीय

'हृदये वससी'ति मत्प्रियं यदवोचस्तदवैमि कैतवम् ॥
उपचारपदं न चेदिदं त्वमनङ्गः कथमक्षता रतिः ? ॥८५॥

वसंततिलका

**" तूं मद्हृदींच वससी " प्रिय शब्द मातें**
**जे बोललास मज ते गमतात खोटे ॥**
**ते औपचारिक; तसें नसतें अनंग—**
**होतास कां, तर, कशी रति मी अभंग ? ॥ ८५ ॥**

गद्यार्थ—" हे प्रिये रति ! तू नित्य माझ्या हृदयात राहतेस " असे मला अतिप्रिय जे शब्द तू बोलत आलास ते खोटे होते, असें मला वाटते. ते शब्द केवळ औपचारिकच असावेत. तसे नसतें तर तू अनङ्ग, ( देहहीन ) कसा झाला असतास ? आणि (तुझा देह नष्ट झाला, तरी, तुझ्या हृदयात राहणारी,) मी, रति मात्र अक्षत, अभग, कशी राहिलें असतें ? ●●●

वैतालीय

परलोकनवप्रवासिनः प्रतिपत्स्ये पदवीमहं तव ॥
विधिना जन एष वञ्चितस्त्वदधीनं खलु देहिनां सुखम् ॥८६॥

वसंततिलका

**तू जाहलास परलोकनवप्रवासी**
**येतें क्षणांत मिळण्या तुझिया पथासी ॥**
**आहे मला फसविलें विधिनें; जनाचें**
**सारेंच सौख्य असतें त्वदधीन साचें ॥ ८६ ॥**

गद्यार्थ—तू परलोकाच्या प्रवासास नुकताच निघाला आहेस; ही पहा मी लगोलग येऊन तुझा मार्ग धरण्यास येत आहें. मला विधीनें चांगलच फसविलें आहे. ( माझेंच काय, पण ) प्रत्येक मानवाचं सुख तुझ्याच स्वाधीन आहे. ●●●

याच्या पुढचा " रजनीतिमिरावगुण्ठिते " श्लोक अभिसारिका सदरात (प्रकरण ४४ पहा) येऊन गेला आहे.

वैतालीय

नयनान्यरुणानि घूर्णयन्वचनानि स्खलयन्पदे पदे ॥
असति त्वयि वारुणीमदः प्रमदानामधुना विडम्बना ॥८७॥

वसततिलका

नेत्रांस लाल करुनी भ्रमवी तयांस
वाणी करी स्खलनयुक्त पदांपदांस ॥
तो वारुणीमद तुझ्याविण कामिनींतें
आतां वने अहह ! हेतु विडम्बनातें ॥८७॥

गद्यार्थ—(रतिप्रसंगीं) मद्यप्राशनानें येणारी जी धुंदी, नेत्राना लाल करून भ्रमविते, व, वाणीला पदापदाला अडखळ विते, (मल्लेंच बोलविते) ती आता, हे मदना ! तिच्यात तुझच अस्तित्व नसल्यानें कामिनींची निव्वळ फजीती करण्यासच कारणीभूत होऊ लागली आहे. ●●●

वैतालीय

अवगम्य कथीकृत वपु प्रियबन्धोस्तव निष्फलोदयः ॥
बहुलेऽपि गते निशाकरस्तनुतां दुःखमनङ्ग ! मोक्ष्यति ॥

वसततिलका

जाणून कीं तव उरे तनु शब्दमात्र
तो निष्फलोदय वने प्रियमित्र चंद्र ॥
हा कृष्णपक्ष सरुनीहि निसर्गमार्गें
सोडी हळू स्वकृशता जडशा मनानें ॥८८॥

गद्यार्थ—हे अनगा ! तुझ्या प्रियमित्र चद्राला आता कळून चुकलें आहे, कीं, तुझा देह आता केवळ कथेंतच (नाममात्र) शिल्लक उरला आहे; व त्यामुळें, त्याला आकाशात उगवणेंच व्यर्थ वाटू लागलें आहे; बघ आता हा कृष्णपक्ष सपला, व (त्यानें खरें म्हणजे कलाकलानीं झपाट्यानें वर्धित व्हावें) पण, तो आता, आपली कृशता, मोठ्या कष्टानेंच सोडीत आहे. (स्वत पूर्ण होऊन, मदनाच्या अस्तित्वावाचून, उपयोग काय असेच त्याल वाटतें.) ●●●

वैतालीय

हरितारुणचारुबन्धन कलपुंस्कोकिलशब्दसूचित ॥
वद सम्प्रति कस्य बाणता नवचूतप्रसवो गमिष्यति ? ॥

वसततिलका

आताम्र अन् हरित सुंदर बंध ज्याचे
ज्या सूचिरूप ठरती कल कोकिलांचे ॥
मोहोर हा नवनवा, वद आम्र याचा
होईल काय शर यापुढतीं कुणाचा ? ॥८९॥

गद्यार्थ—हिरवे तांबुस असे ज्याचे देठ (बाणाकडे-पख पिसे) व ज्याच्या अस्तित्वाचें सूचन, कोकिलांचे रव करितात (बाणाकडे-कोकिल रव हेच ज्याला सूचीरूप, टोक,) असा हा आम्र्याचा नवा ताजा मोहोर हे मदना ! तुझ्या पश्चात्, स्वत.चा बाण (करून कामीजनांचा चित्तभेद) करण्यास कोण समर्थ ठरणार आहे ? सांग बरें ! ●●●

वैतालीय

प्रतिपद्य मनोहर वपु पुनरप्यादिश तावदुत्थित ॥
रतिदूतिपदेषु कोकिलान्मधुरालापनिसर्ग-पण्डितान् ॥९०॥

वसततिलका

होऊनि जागृत पुनश्च उठून येई
तो पूर्विंचा तव मनोहर देह घेई ॥
आलापितां मधुर, पंडित जे निसर्गें
त्या कोकिलांस बनण्या रतिदूत सांगे ॥९०॥

गद्यार्थ—पूर्वीचा तुझा तो सुदर देह धारण करून जागा होऊन पुनश्च ऊठ आणि मधुर आलाप (भाषण) करण्यात निसर्गेन च पटु असलेल्या कोकिलाना, रतीचे दूत होण्यास पुन्हा आज्ञा दे ●●●

वैतालीय

अलिपङ्क्तिरनेकशस्त्वया गुणकृत्ये धनुषो नियोजिता ॥
विरुतै करुणस्वनैरिय गुरुशोकामनुरोदतीव माम् ॥९१॥

वसंततिलका

चापास तूं कितिकदां तव योजिली ती
सोडावया शर, गुणासम भृंगपंक्ति ॥
आतां करीत करुणस्वर रोदनें ही
शोकांत थोर मम, या, जणुं साथ देई ॥९१॥

गद्यार्थ—हे मदना (बाण सोडण्यासाठीं) धनुष्याला जी दोरी असते, तिच्या जागीं ज्या भ्रमरमालिकेची तू अनेकप्रसंगीं योजना केलीस, ती भ्रमरमालिका आता, करुणस्वरानें, आक्रोश करीत माझ्या या महान् शोकाचे प्रसंगीं (जणु काय समदु ख होऊन) मला साथ देत आहे ●●●

वैतालीय

शिरसा प्रणिपत्य याचितान्युपगूढानि सवेपथूनि च ॥
सुरतानि च तानि ते रहः स्मर सस्मृत्य न शान्तिरस्ति मे ॥

वसंततिलका

**तूं याचिलीस शिर टेकुनि मत्पदांसी**
**आलिंगनें चलितगात्र सकंप येशीं ॥**
**एकांतिंची विविध तीं सुरतें स्मरून**
**अद्यापि शांति मम या हृदया मिळे न ॥ ९२ ॥**

गद्यार्थ—माझ्या पायावर डोकें टेकून, सर्वांग कंपित करणारीं आलिंगनें तू याचिलीस तीं, व नंतर तू एकांतात ज्या नाना सुरतक्रीडा केल्यास त्या, आठवून, मला अद्यापि शांति लाभत नाहीं (तृप्ति होत नाहीं—पुन्हा तीं तीं सुखें भोगण्याची ओढ थांबत नाहीं.)

●●●

वैतालीय

रचित रतिपण्डित ! त्वया स्वयमङ्गेषु ममेदमार्तवम् ।।
ध्रियते कुसुमप्रसाधनं तव तच्चारु वपुर्न दृश्यते ।। ९३ ।।

वसंततिलका

**केलेंस तूंच रतिपंडित ! मत्तनूतें**
**येत्या वसंतऋतुयोग्यचि मंडनातें ॥**
**शृंगार पुष्पकृत तो धरितें अजून**
**तें मात्र सुंदर तुझीच तनू दिसे न ॥ ९३ ॥**

गद्यार्थ—हे रतिपंडिता ! तूच आपल्या हातानें, या माझ्या देहावर, (येत्या) वसंतऋतूला साजेसा, जो पुष्पाचा शृंगार केलास, तो, माझ्या देहावर, मी, अद्यापि धारण करून आहें; पण, हाय ! हाय ! तुझा तो सुंदर देह मात्र दिसेनासा झाला आहे !

वैतालीय

*विबुधैरसि यस्य दारुणैरसमाप्ते परिकर्मणि स्मृतः ।।*
तमिमं कुरु दक्षिणेतरं चरणं निर्मितरागमेहि मे ।। ९४ ।।

वसंततिलका

**ज्याचें न मंडन पुरें घडलें, तशांत**
**ते दुष्ट देव तुजला स्मरले मनांत ॥**
**डाव्या पदास मम त्या करण्या, अनंग !**
**ये ये झणीं सरस रंगवुनी सुरंग ॥ ९४ ॥**

गद्यार्थ—तू माझ्या ज्या डाव्या पायाला, रंग लावून, त्याचें मंडन करीत होतास, तें पुरें होण्याच्या आतच, त्या दुष्ट देवांनीं, तुझी (शंकराला प्रेमप्रवण करण्याच्या कामीं योजना करण्यासाठीं) आठवण केली, (आणि परिणामीं त्यात तुझा अंत झाला,) त्या माझ्या डाव्या पायाचें, रंगमंडन पुरें करण्यासाठीं, आता लौकर ये !

●●●

वैतालीय

अहमेत्य पतङ्गवर्त्मना पुनरङ्काश्रयिणी भवामि ते ।।
चतुरैः सुरकामिनीजनैः प्रिय ! यावन्न विलोभ्यसे दिवि ।। ९५ ।।

वसंततिलका

**येवोनिया झणिं पतंगपथें इथून**
**अंकीं पुनश्च तुझिया, पद मेळवीन ॥**
**स्वर्गांत जों चतुर त्या सुरकामिनींनीं**
**ना घातली भुरळ रे तुज लोभयोनी ॥ ९५ ॥**

गद्यार्थ—पतंग हा ज्योतीवर झेप घेऊन, स्वतःला जाळून घेतो (व तें ज्योतीच्या आत्यंतिक प्रेमानें तो करतो असें कवि मानतात.) त्याच्याच मार्गानें मीहि तुझ्याकडे येऊन पुन तुझी मांडी परक्यावगार आहे स्वर्गातल्या चतुर सुरकामिनी तुला मोहारूढ करून (ती मांडी त्या केव्हा परक्यावतील, याचा नेम नाहीं, म्हणून, त्या तसें करून,) माझी हक्काची जागा हुबाड व्याच्या आतच मी येतें. (त्वरित प्राणार्पण व उड्डाणाची त्वरा दोन्ही पतंगाच्या उपमेंत साधतात)

●●●

वैतालीय

"मदनेन विनाकृता रतिः क्षणमात्रं किल जीविते"ति मे ।।
वचनीयमिदं व्यवस्थितं रमण ! त्वामनुयामि यद्यपि ।। ९६ ।।

वसंततिलका

**"गेला पुढें मदन त्याविण हाय कैशी**
**राहे रति क्षणहि एक, जगून" ऐशी ॥**
**निंदा चिरंतन मला जडणार वेहीं**
**आलें क्षणांत तुजमागुनि मी तरीही ॥ ९६ ॥**

गद्यार्थ—"मदनापासून वियुक्त होऊनहि क्षणभर कां होईना, पण रति जिवंत राहिलीच" ही निंदा, हे रमणा ! मला आता चिरकालची चिकटलीच, आता मी तुझ्या मागून कितीहि त्वरेनें अनुगमन केलें तरी (या निंदेचें निराकरण कांहीं होऊं शकणार नाहीं)

●●●

वैतालीय

क्रियतां कथमन्त्यमण्डनं परलोकान्तरितस्य ते मया ? ॥
सममेव गतोऽस्यतर्किता गतिमङ्गेन च जीवितेन च ॥९७॥

वसंततिलका

लोकान्तरांत दडुनी वसलास हाय !
मी अत्यमंडन तुझें करणार काय ? ॥
एका क्षणातचि अतर्कित त्या गतीस
गेलास घेउनि सवें तनु जीवनास ! ॥ ९७ ॥

गद्यार्थ—परलोकांत दडलेल्या तुझा अंत्यविधीच्या वेळचा प्रेतशृंगार मी कसा करूं ? (इतराच्या मृत्यूच्या वेळीं केवळ जीव जातो, पण देह राहतो पण इथें) तूं जीवनासह देहालाहि घेउन, अतर्क्य अशा गतीस जाऊन बसलास, (इथें इलाज काय ?) ●●●

वैतालीय

ऋजुतां नयतः स्मरामि ते शरमुत्सङ्गनिषण्णधन्वनः ॥
मधुना सह सस्मितां कथां नयनोपान्तविलोकितं च यत् ॥

वसंततिलका

स्वांकीं स्वचाप धरुनी, सरलत्व देत
बाणास, नेत्र तिरपे करुनी पहात ॥
वार्ता सहास करितां प्रियमाधवासी
मी पाहिलें तुजसि, तें स्मरतें मनासी ॥ ९८ ॥

गद्यार्थ—मांडीवर आपलें धनुष्य टेकून (पूर्वी कोठल्यातरी मोहिमेंत एखाद्या पाषाणहृदयावर हल्ला केल्यानें) वाकडा झालेला आपला बाण, तूं, एकीकडे, सरळ करीत बसला होतास, व (मजकडे) तिरप्या दृष्टीनें पहात, तूं आपला मित्र वसंत, याच्याशीं सस्मित वार्तालाप (थाला, आता, नुकताच) करीत होतास, तें मला आठवत आहे ●●●

वैतालीय

क्व नु ते हृदयंगमः सखा कुसुमायोजितकार्मुको मधुः ॥
न खलूग्ररुषा पिनाकिना गमितः सोऽपि सुहृद्गतां गतिम् ९९

वसंततिलका

केलें फुलातुनि जयें तव कार्मुकातें
तो मित्र सुंदर तुझा मधु आज कोठें ? ॥
नेलें नसेल न तयासहि शंकरानें
रागावुनी स्मरसुहृद्गत त्या गतीनें ॥ ९९ ॥

गद्यार्थ— ज्यानें फुलांनून तुझ धनुष्य निर्माण केलें, तो तुझा सुंदर मित्र वसंत, कोठें बरें आहे ? शंकरानें, रागावून (मदनाचा साह्यकर्ता, त्याच्या कटांत सामील असलेला म्हणून) त्यालाहि, त्याचा मित्र मदन ज्या गतीला गला त्याच गतीला तर नेलें नसेल ना ? (अशी शंका येते.) ●●●

वैतालीय

अथ तैः परिदेविताक्षरैर्हृदये दिग्धशरैरिवाहतः ॥
रतिमभ्युपपत्तुमातुरां मधुरात्मानमदर्शयत्पुरः ॥ १०० ॥

वसंततिलका

ऐकूया तिच्या करुणदीनचि शोकगानें
होतां व्रणांकित जणूं विषदिग्ध बाणें ॥
आश्वासण्यास झणिं, आतुर त्या रतीतें
ये होउनी प्रकटदेह, वसंत तेथें ॥ १०० ॥

गद्यार्थ— रतीच्या अशा या अत्यंत करुण शोकामुळें, जणु काय हृदयांत विषानें माखलेला बाण भोंसकला जावा, अशा वेदना होऊन, त्या दुःखार्त रतीला आश्वासन देण्यासाठीं, तिच्या समोर (सदेह) वसंत प्रकट झाला ●●●

वैतालीय

तमवेक्ष्य रुरोद सा भृशं स्तनसंबाधमुरो जघान च ॥
स्वजनस्य हि दुःखमग्रतो विवृतद्वारमिवोपजायते ॥१०१॥

वसंततिलका

पाहून त्यास, रडली रति फार, हातें
छाती पिटून दुखवीत निजस्तनातें ॥
दुःखें पुन्हा निजजनापुढतीं हृदिस्थ
दारें जणू उघडल्यापरि वाहतात ॥१०१॥

गद्यार्थ—त्या, स्वतःच्या वसंतसख्याला पाहून, रति अतोनात रडली, व (हातांना) तिनें छाती इतकी पिटून घेतली, कीं, त्यामुळें तिचे स्तन दुखूं लागले कारण, दुःख हें, आपलें माणूस दिसलें, कीं, त्याच्यासमोर, जणू (धरणाचें) दार उघडून दिल्याप्रमाणें वाहूं लागतें. ●●●

वैतालीय

इति चैनमुवाच दुःखिता "सुहृदः पश्य वसन्त ! किं स्थितम् ।
तदिदं कणशो विकीर्यते पवनैर्भस्म कपोतकर्बुरम् ॥१०२॥

वसततिलका

दु खी वदे, " इथ उरे बघ रे वसंता
मित्राचिया प्रिय तुझ्या तनुतून आतां ॥
तें पारव्यापरि भुरें लव भस्म, वारा
पिस्कारितो कणकणें जगतीं भरारा ॥१०२॥

गद्यार्थ—दु खी रति त्याला पुढीलप्रमाणें म्हणाली, "—हे वसता ! हें बघ तुझ्या प्रिय मित्राच्या देहाचें ( देहातून ) आता काय अवशिष्ट राहिलें आहे तें ! आणि तेंहि, पारव्याच्या रगाचें भुरकट भस्म, आता वाऱ्यानें, कणाकणानें, भुरुभुरु उड वून नेऊन पिस्कारलें जात आहे. ●●●

वैतालीय

अयि सम्प्रति देहि दर्शन स्मर ! पर्युत्सुक एष माधव ॥
दयितास्वनवस्थित नृणा न खलु प्रेम चल सुहृज्जने "॥

वसंततिलका

देई स्मरा ! झडकरी तव दर्शनातें
त्वद्दर्शनोत्सुक तुझ्या प्रिय माधवातें ॥
पत्नीप्रतीहि जरि चचल जें नराचें
तें प्रेम अस्थिर नसे सुहृदासि साचें " ॥१०३॥

गद्यार्थ– हे मदना ! तुझा मित्र हा वसत, तुझ्या दर्शनास फार फार उत्सुक झाला आहे, त्याला ( तरी ) तू लौकर दर्शन दे. ( माझ्या हाकेला इतका वेळ ओ दिली नाहींस तर निदान मित्रासाठीं तरी ये ) पुरुषाचें प्रेम जें स्वपत्नीच्या बाबतीतहि अस्थिर वार्ते, तें मित्राच्या बाबतींत, काहीं तसें, चचल नसतें. —( पुष्कळच अधिक स्थिर असतें. ) " ●●●

[ इतका आक्रोश केला, तोहि व्यर्थ गेल्यावर, रति अखेरचें म्हणून वसंताला म्हणते — ]

वैतालीय

"गत एव न ते निवर्तते स सखा दीप इवानिलाहत ॥
अहमस्य दशेव पश्य मामविषह्यव्यसनेन धूमिताम् ॥१४०

वसततिलका

"गेलाच मित्र तव तो; परते न तैसा
वाऱ्यांत दीप विझता उजळे न, जैसा ॥
ही मी पहा जणुं दिव्यातिल त्याच वात
दु खें असह्य करिती मज धूमयुक्त ॥१०४॥

गद्यार्थ—वाऱ्या नें विझलेला दिवा, ज्सा, पुन्हा उजळ नाहीं, तसा, तुझा तो सखा मदन, जो गला तो गेलाच ! तो काहीं आता पुन्हा परत येत नाहीं. आणि ही मी पहा त्याच दिव्यातली जणू काय वात ! — भयकर दु खानीं मला ( ज्योतिहीन करून ) धूमयुक्त कोळिष्टकाच्या पदाला नेलं आहे. ●●●

वैतालीय

विधिना कृतमर्धवैशस ननु मा कामवधे विमुञ्चता ॥
अनपायिनि सश्रयद्रुमे गजभग्ने पतनाय वल्लरी ॥१०५॥

वसततिलका

केलाच अर्धवध हा मम त्या विधीनें
एक्या स्मरास वधुनी, मज सोडण्यानें ॥
सुस्थाणु आश्रयतरू उपटील हत्ती
तेव्हा गळून पडतेच न कां लता ती ? ॥१०५॥

गद्यार्थ—विधीनें, एकट्या मदनाला वधून, मला तशीच सोडण्यात, खरें पाहता, माझा अर्धा वधच केलेला आहे. बळकट अशा ज्या वृक्षाचा वेलीन आश्रय घेतला, त्या वृक्षाला हत्तीन उपटिलें, कीं, ती वेली आपोआप गळून पडणारच ! ●●●

वैतालीय

तदिद क्रियतामनन्तर भवता बन्धुजनप्रयोजनम् ॥
विधुरां ज्वलनातिसर्जनान्ननु मा प्रापय पत्युरन्तिकम् ॥

वसततिलका

याच्यापुढील, म्हणुनी कर तूं स्वहस्तें
मित्राचिया तव मृतोत्तर या क्रियेतें ॥
देवोनिया विवश या मज तूंच अग्नि
नेऊन पोंचव क्षणीं पतिसन्निधानीं ॥१०६॥

गद्यार्थ—म्हणून आता, हे वसंता, याच्यापुढील तुझ्या मित्राचें हें मृतोत्तर क्रियाकर्म तूच ( आपल्या हातानें ) उरक, आणि निराधार अशा मला, अग्नीत अर्पण करून, त्या मार्गानें माझ्या पतीच्या सन्निध नेऊन पोंचव. ●●●

[ याच्या पुढील श्लोक " शशिना सह याति कौमुदी " हा प्रकरण ४६ ( कुंडुंबीय नातीं ) पत्नीचें सहगमन या अनुसधानात आला आहे. ]

वैतालीय

अमुनैव कषायितस्तनी सुभगेन प्रियगात्रभस्मना ।।
नवपल्लवसंस्तरे यथा रचयिष्यामि तनुं विभावसौ ।।१०७।।

वसंततिलका

**सौभाग्यदायि पतिदेहविभूति पेशी**
**चर्चोनिया उटि म्हणूनच मी स्तनांसी ।।**
**मानोनि हीस नवपल्लवयुक्त शय्या**
**ठेवीन मी तनु सहर्ष चितेवरी या ।।१०७।।**

गद्यार्थ—माझ्या प्रिय पतीच्या देहाचें, हें सौभाग्यकारक भस्मच उटी म्हणून, मी स्तनास चर्चीन, आणि चितेवर, तिला नव्या नव्या कोवळ्या पाल्वीची शय्याच मानून, मी आपला देह ( आनदानें ) पसरीन. ●●●

वैतालीय

कुसुमास्तरणे सहायता बहुशः सौम्य गतस्त्वमावयोः ।।
कुरु सम्प्रति तावदाशु मे प्रणिपाताञ्जलियाचितश्चिताम् ।।

वसंततिलका

**झालास तूं कुसुम अंथरितां सहाय**
**आम्हा, वसंत! कितिदां; परि आज हाय ।।**
**पायां पडून करितें तुज मी विनंति**
**कीं तोच तूं रच क्षणीं मजला चिता ती ।।१०८।।**

गद्यार्थ—मित्रा वसता, आम्हा दोघासाठीं, रतिशय्येवर फुलें पसरण्याचे कामीं, तू, आम्हास अनेकदा सहायकर्ता झाला आहेस; आणि, हाय! आज त्याच तुला पाया पडून मी विनंति करीत आहें, कीं, ( पुष्पशय्येऐवजीं ) तूं माझ्यासाठीं आता लौकर चिता तयार कर. ●●●

वैतालीय

तदनु ज्वलनं मदर्पितं त्वरयेर्दक्षिणवातवीजनैः ।।
विदितं खलु ते यथा स्मरः क्षणमप्युत्सहते न मां विना ।।

वसंततिलका

**देशील अग्नि मज, त्या फुलवी क्षणांत**
**तूं दक्षिणानिलमुखांतुनि फुंकरीत ।।**
**ठाऊक रे तुज खरोखर खास आहे**
**कीं मद्विना क्षणहि ना स्मर हर्षतो हें ।।१०९।।**

गद्यार्थ—अशा रीतीनें माझ्या चितेला जो अग्नि तू देशील, तो तू, आपल्या दक्षिणवायुरूपी ( मुखानें फुंकर घालून ) ( पल्यानें झडपून ) खूप प्रज्वलित कर. ( उगाच तो धुमसत राहिला, तर माझे भस्म होऊन, मी मदनाकडे पोंचायला, फार विलंब लागेल. तसें होऊ नये. अग्नि लौकर भडकून मला मदनाकडे शक्य तितक्या त्वरेनें गेलेंच पाहिजे ) कारण तुला खरोखर हें माहीतच आहे, कीं, माझ्यावाचून, मदनाला एक क्षणभर सुद्धा करमत नाहीं (— जीवनात उल्हास वाटत नाहीं.) ●●●

वैतालीय

इति चापि विधाय दीयतां सलिलस्याञ्जलिरेक एव नौ ।।
अविभज्य परत्र तं मया सहितः पास्यति ते स बान्धवः ।।

वसंततिलका

**मित्रा ! अशा सकल योग्य करून कर्मा**
**दोघांस एकच जलांजलि देइ आम्हां ।।**
**प्राशील त्यास न विभागुनिया परत्र**
**घेवोनिया मज सवें, तव तो सुमित्र ।।११०।।**

गद्यार्थ—अशा तऱ्हेनें सगळी उत्तरक्रिया करून जो पाण्याचा अंजलि तू देशील तो आम्हा उभयताना मिळून एकच दे ( दोन निरनिराळे देऊ नकोस.) तुझा मित्र तो मदन, परलोकात, मला सगतीं घेऊन, तो अंजलि, न विभागता, एकत्रच, प्राशन करील. ●●●

वैतालीय

परलोकविधौ च माधव! स्मरमुद्दिश्य विलोलपल्लवाः ।।
निवपेः सहकारमञ्जरीः प्रियचूतप्रसवो हि ते सखा" ।।

वसंततिलका

**उद्देशुनी स्मरसख्यास तुझ्या वसंत**
**दे आठवून मरणोत्तर त्या विधींत ।।**
**आम्रावरील चल पल्लव मंजरी ती**
**मित्रास त्या तव अतिप्रिय तीच होती " ।।१११।।**

गद्यार्थ—हे वसता ! तुझ्या स्मर सख्याला (आठवून, त्याला) उद्देशून ताज्या डुलत्या पाल्वीसह आम्रमंजरी (तिलांजलीऐवजीं) त्या मृतोत्तर क्रियाकर्मामध्यें तू अर्पण कर; कारण मदनाला, आम्रमंजरी ही अतिशय प्रिय असते ( होती. )" ●●●

# प्रकरण ४९ वें

## संकीर्ण सुभाषितें—

शार्दूलविक्रीडित

राज्यं येन पटान्तलग्नतृणवत्त्यक्तं गुरोराज्ञया
पाथेयं परिगृह्य कार्मुकवरं घोरं वनं प्रस्थितः ॥
स्वाधीनः शशिमौलिचापविषये प्राप्तो न वै विक्रिया
पायाद्वः स विभीषणाग्रजनिहा रामाभिधानो हरिः ॥१॥

सुमदारमाला

जयें टाकिलें राज्य, आज्ञे पित्याच्या
पदीं लागलेल्या तृणाचे परी,
निघाला वनीं घोर जाण्या, घरोनी,
स्वचापास पक्या, शिदोरीपरी ॥
शिवाच्या धनुष्यासही वाकवीतां
न भ्याला, उभा धैर्यमेरूपरी
वधी राक्षसा रावणालाहि, रक्षो,
असा तो तुम्हां रामनामा हरि ॥१॥

गद्यार्थ—वस्त्राला अडकलेल्या गवताच्या काडीइतक्या (तुच्छतेनें व सहजतेनें,) पित्याच्या आज्ञेमुळे ज्यानें राज्य सोडलें, (झुगारून टाकलें;) आपलें उत्तम धनुष्य, हीन काय ती, शिदोरी बांधून, जो भयंकर अरण्यात जाण्यास निघाला, शिवधनुष्य (वांकविण्याच्या महाशक्तीच्या) प्रसंगींसुद्धा, जो, यत्किंचित्‌हि चलितचित्त न होता, धैर्याच्या मेरूप्रमाणें ठाकला; आणि ज्यानें बिभीषणाच्या थोरल्या भावाचा (महापराक्रमी रावणाचा) वध केला, तो 'राम' नांवाचा हरि, तुमचें रक्षण करो ●●●

मालिनी

कनकनिकषभासा सीतयाऽऽलिङ्गिताङ्गो
नवकुवलयदामश्यामवर्णाभिरामः ॥
अभिनव इव विद्युन्मण्डितो मेघखण्डः
शमयतु मम तापं सर्वतो रामचन्द्रः ॥ २ ॥

आर्या

आलिंगित सीतेनें—निकषीं रेखा जणू सुवर्णाची।
नवकुमुदमालिकेसम श्याममनोहर सुकांति ज्या तनुची ॥
अभिनव विद्युन्मंडित सान घनासमचि शोभुनी दिसतो
श्रीरामचंद्र माझे सारे भवताप पूर्ण शमवो तो ॥ २ ॥

गद्यार्थ— सीता गौरवर्ण, राम घननील, त्यामुळें, सीतेनें त्याला आलिंगितां, कसोटीच्या दगडावर सोन्याची रेखा उमटावी अशी सुंदर शोभा दिसत आहे; ज्याच्या तनूची कांति, ताज्या नीलकमलाच्या हारासारखी श्याममनोहर आहे; विजेच्या चमचमाटामुळे शोभणाऱ्या लहानग्या नव मेघाप्रमाणें जो अलंकृत आहे, असा तो, श्रीरामचंद्र, माझे सर्व ताप शमवो. ●●●

आर्या

प्रथमं चुम्बितचरणा जङ्घाजानूरुनाभिचक्राणि ॥
आलिङ्ग्य भावना मे खेलतु विष्णोर्मुखाब्जशोभायाम् ॥३॥

आर्या

आधीं चुम्बुनि चरणां,
गुडघे, मांड्या, नि नाभिचक्रासीं।—
आलिंगुनि मन माझें
खेळो हरिच्या मुखाब्जशोभेशीं ॥ ३ ॥

गद्यार्थ— प्रथम श्री विष्णूच्या चरणांचें चुंबन घेऊन, नंतर क्रमानें गुडघे, मांड्या, नाभिचक्र यांना आलिंगून, शेवटीं, माझें मन त्याच्या मुखकमलाच्या सौंदर्याशीं खेळत राहो ●●●

शार्दूलविक्रीडित

वाचा निर्मलया सुधामधुरया या नाथ ! शिक्षामदा—
स्तां स्वप्नेऽपि न संस्मराम्यहमहं भावावृतो निस्त्रप. ॥
इत्थं शान्तशालिनं पुनरपि स्वीयेषु मां बिभ्रत—
स्त्वत्तो नास्ति दयानिधिर्यदुपते ! मत्तो न मत्तोऽपरः ॥४॥

शार्दूलविक्रीडित

कृष्णा ! निर्मल गोड बोलुनि, मला,
तूं जें दिलें शिक्षण
स्वप्नींहि स्मरतों अहंकृतिमुळें
निर्लज्ज मी त्यास न ॥
पापिष्ठास अशाहि घेसि सदया !
तूं आपुला मानुनी !
कोणी नान्य दयानिधी तुजहुनी;
वा मत्त माझ्याहुनी ॥ ४ ॥

गद्यार्थ—हे यदुपते, हे नाथा, तूं मला अत्यंत, निर्मल व अमृतमधुर शब्दांनीं, जें काय शिक्षण दिलेंस, त्याचें स्मरण, मी निर्लज्ज, अहंकारी माणूस, स्वप्नात सुद्धा करीत नाहीं. अशा, शेंकडो पापांनीं भरलेल्या मला सुद्धा, तूं आपला म्हणून जवळ करतोस तेव्हा, तुझ्याहून मोठा दयासागर कोणी नाहीं—आणि माझ्याहून अधिक मदोन्मत्त दुसरा कोणी नाहीं असेच म्हटलें पाहिजे. ●●●

शार्दूलविक्रीडित

मृद्वीका रसिता, सिता समशिता, स्फीतं निपीतं पयः
स्वर्यातेन सुधाऽप्यधायि कतिधा रम्भाधरः खण्डितः ।।
सत्यं ब्रूहि मदीय जीव ! भवता भूयो भवे भ्राम्यता
कृष्णेत्यक्षरयोरयं मधुरिमोद्गारः क्वचिल्लक्षितः ? ।।५

शार्दूलविक्रीडित

खाल्ले द्राक्ष, नि शर्करा; कितितरी
तूं दूधहि प्राशिलें
स्वर्गी चाखियली सुधा, नि कितिदां
रंभाधरा खंडिलें ! ॥
मज्जीवा ! वद सत्य, कीं भटकतां
तूं सर्व विश्वांतरीं
गोडी सांपडली तुला कधि कुठें—
जी 'कृष्ण' या व्यक्षरीं ? ॥ ५

गद्यार्थ—हे माझ्या जिवा ! तूं द्राक्ष खाल्लेंस, साखर खाल्लीस, पुष्कळ दूध प्राशन केलेंस, (अगदीं) स्वर्गी जाऊन अमृत चाखलेंस, आणि, प्रत्यक्ष रंभेचा अधर खंडिलास; (अशा तऱ्हेनें नाना तऱ्हेची गोडी चाखीत,) सान्या सृष्टींत, तूं भटकलास; पण, खरें सांग, कीं, या सर्व भ्रमणामध्यें, 'कृष्ण' या दोन अक्षरात जी अपूर्व मधुरता आहे, ती, तुला इतरत्र कोठें सापडली कां ? ●●●

शिखरिणी

कृतक्रोधे यस्मिन्नमरनगरी मङ्गलरवा
नवातङ्का लङ्का समजनि वनं वृश्चति सति ॥
सदा सीताकान्तप्रणतिमतिविख्यातमहिमा
हनूमानव्याद्वः कपिकुलशिरोमण्डनमणिः ॥ ६ ॥

शिखरिणी

धरी जो कोपा, तें ध्वनि सुरपुरी मंगल करी
भयें कांपे लंका, जधिं वनिं तरूत्पाटन करी ॥
सदा ज्याचा रामप्रणतचि असा ख्यात महिमा
हनूमान् रक्षो तो कपिकुल शिरोभूषण तुम्हां ॥६॥

गद्यार्थ—ज्याला क्रोध आला कीं, (आतां हा राक्षसांचा नायनाट करणार या अपेक्षेनें) स्वर्गांत मंगलध्वनि सुरू होतात; जेव्हां हा रानात झाडांची मोडतोड करतो, तेव्हां लंकानगरी भयभीत होते; श्रीरामाच्या पायाशीं नित्य प्रणत असा ज्याचा महिमा विख्यात आहे, असा कपिकुलात शिरोरत्नाप्रमाणे शोभणारा, हनूमान् तुमचें रक्षण करो. ●●●

शार्दूलविक्रीडित

किं ब्रूमो हरिमस्य विश्वमुदरे किं वा फणान् भोगिनः
शेते यत्र हरिः स्वयं जलनिधेः सोऽप्येकदेशे स्थितः ॥
आश्चर्यं कलशोद्भवो मुनिरसौ यस्यैकहस्तेऽम्बुधि—
र्गण्डूषीयति, पङ्कजीयति, फणी, भृङ्गीयति श्रीपतिः ॥ ७ ॥

सुमंदारमाला

वदों काय विष्णूस विश्वोदरा; वा
फणांनाहि शेषाचिया; ज्यांवरीं
स्वयें विष्णु झोंपे; धरी अब्धि दोघां
स्वपृष्ठाचिया एक अंशावरी ? ॥
चमत्कार दावी अगस्तीच ! प्याया
जधीं अब्धिला तो स्वहस्तीं धरी—
वने अब्धि घोटापरी ! शेष पद्मा—
परी ! विष्णुही सान भृंगापरी ! ॥ ७ ॥

गद्यार्थ—ज्याच्या उदरांत विश्व सामावलें त्या श्रीविष्णूची, किंवा ज्यावर स्वयें तो विष्णूच निद्रा घेतो, त्या शेषाच्या फणाची तरी महति किती वर्णन करावी ? किंवा या दोघानाहि जो आपल्या पृष्ठाच्या एका लहानशा भागावर धारण करतो

त्या सागराचा तरी महिमा काय वर्णावा ? परंतु खरा अद्भुत, आश्चर्यकारक चमत्कार दाखविला अगस्ति मुनींनेच, कीं, ज्यानें आचमन करण्यासाठीं हातावर घेतल्यावेळीं, तो सागर एका घोटाइतका लहान झाला, तो शेष कमलासारखा, आणि ( श्यामवर्ण ) विष्णु एखाद्या भृंगासारखा झाला !

●●●

शार्दूलविक्रीडित

एके सत्पुरुषा परार्थघटका स्वार्थान्परित्यज्य ये
सामान्यास्तु परार्थमुद्यमभृत स्वार्थाविरोधेन ये ॥
तेऽमी मानवराक्षसा परहितं स्वार्थाय निघ्नन्ति ये
ये तु घ्नन्ति निरर्थकं परहितं ते के न जानीमहे ॥ ८ ॥

शार्दूलविक्रीडित

**तेची थोर, परोपकार करिती जे स्वार्थही सोडुनी**
**ते सामान्यचि, जे परार्थ करिती स्वार्थास संभाळुनी ॥**
**जाणा राक्षस मानवी, परहिता, स्वार्थार्थ जे नाशिती**
**जे स्वार्थाविण नाशिती परहिता, आम्हां न ते माहिती ! ॥ ८ ॥**

गद्यार्थ—स्वार्थ सोडूनसुद्धा जे परहित करतात, ते थोर पुरुष, स्वार्थाला विरोध येत नसेल, अशा स्थितींत, जे परहिताचा उद्योग करतात, ते सामान्य, जे, स्वार्थासाठीं परहिताचा नाश करतात, ते मनुष्यरूपातले राक्षसच, परंतु जे स्वार्थ नसताहि परहिताचा नाश करतात ते कोण हें आम्हास माहीत नाहीं ( त्याना किती नीच नाव द्यावें तें आम्हास सुचत नाहीं )

●●●

वसंततिलका

प्रारभ्यते न खलु विघ्नभयेन नीचैः
प्रारभ्य विघ्नविहता विरमन्ति मध्याः ॥
विघ्नैः पुनः पुनरपि प्रतिहन्यमानाः
प्रारब्धमुत्तमजना न परित्यजन्ति ॥ ९ ॥

वसंततिलका

**घे कार्य नीच कधि विघ्नभयें न हातीं**
**विघ्नात मध्यमहि स्वीकृत टाकिताती ॥**
**विघ्नें पुनः पुनरपी जरि त्यां छळीती**
**प्रारब्धकार्य न च उत्तम हे त्यजीती ॥ ९ ॥**

गद्यार्थ—अगदीं नीच जे आहेत, ते, विघ्नें येतील या ( भविष्यकालीन ) भीतीनेंच कोणत्याहि कार्याला प्रारंभ करीत नाहींत, मध्यम ( आहेत ते अशा भयाने कार्यारंभ करीत नाहींत असं नाहीं, ) प्रारंभ तर करतात, पण प्रत्यक्ष विघ्न येऊं लागलीं कीं ( त्यापुढे टिकाव न धरता ) आरंभ केलेलें कार्य सोडून देतात, परंतु जे उत्तम आहेत ते मात्र विघ्नांनीं पुनः पुन्हा अडथळे आणले तरी, एकदा हातीं घेतलेलं कार्य कधींच टाकीत नाहींत.

●●●

मन्दाक्रान्ता

आविर्भूते शशिनि तमसा मुच्यमानेव रात्रि—
नैशस्यार्चिर्हुतभुज इव च्छिन्नभूयिष्ठधूमा ॥
मोहेनान्तर्वरतनुरियं दृश्यते मुच्यमाना
गङ्गा रोधःपतनकलुषा गृह्णतीव प्रसादम् ॥ १० ॥

मन्दाक्रान्ता

**रात्री जैशी विधु उगवता होइ अंधारमुक्ता**
**नैशाग्नीची उजळत शिखा, धूम नो अल्प होता ॥**
**अन्तर्मोहातुनि सखि हिस या, वाटतें येइ मुक्ति**
**गंगा—माती पडुनि गढुळे-स्वच्छ जैशी पुन्हा ती**

किंवा हेंच ( केशवकरणींत )

**रात्र जशी ती, चंद्र उगवतां, तमोमुक्त होतसे**
**हिच्याही मोह तसा पळतसे ॥**
**धूम कमी होउनी निशानलशिखा जशी झळकते**
**सखीची स्थिति तैशी वाटते ॥**
**तटिंची माती पडुन गढुळही गंगा निवळे जशी**
**सखीची कांति उजळते तशी ॥ १० ॥**

गद्यार्थ—( कालिदासाचें उपमासौंदर्य, राक्षसाच्या भीतीनें बेशुद्ध पडलेली उर्वशी पुन्हा शुद्धीवर येऊंना कशी दिसली त्याचें वर्णन. ) चंद्र उगवल्यावरोबर अंधारापासून मुक्त होत चाललेली जशी रात्र, किंवा धूम कमी झाल्यावरोबर नैशाग्नीची पुन्हा उजळत चाललेली ज्योति, किंवा, किनाऱ्यावरील माती पडून गढूळ झालेली, पण, आता, हळूहळू निवळत चाललेली गंगा, तशी बेशुद्धींतून हळूहळू शुद्धीवर येत चाललेली ही सुंदर दिसत आहे.

●●●

द्रुतविलंबित

उदयगूढशशाङ्कमरीचिभिस्तमसि दूरतरं प्रतिसारिते ॥
अलकसंयमनादिव लोचने हरति मे हरिवाहनदिङ्मुखम् ॥

द्रुतविलंबित

उदयिं गूढ शशीकिरणीं अतां,
इथुनि दूर तमाप्रति सारितां ॥
अलक आवरितां नयनांस, तें
उदयदिग्वधुचे मुख मोहितें ॥ ११

किंवा हाच अर्थ शार्दूलविक्रीडितात—

पूर्वेच्या गिरिआडुनी वर सरे चंद्रप्रभा, तीमुळे
अंधाराप्रति येथुनी पळवुनी आतां दुरी लावि‍ले ॥
केसां आवरितां मुखावरुनि, जें शुभ्रा मुखा दावितें
पूर्वा दिग्वधुचें तसें मुख अहा! नेत्रांस आकर्षितें ॥

गद्यार्थ—(सुंदर उपमेनें चंद्रोदयाचें वर्णन.) उदयगिरीच्या मागें लपलेल्या चंद्राच्या किरणांनीं, येथून, आता अंधाराला दूर सारल्यामुळें, एखाद्या सुंदरीच्या तोंडावर आलेले केस आवरल्यामुळे, जशी तिची शुभ्र मुखकांति दिसून पडावी, तसें पूर्वदिग्वधूचें, मुख आता माझ्या नेत्रांना आकर्षीत आहे. ●●●
( अगदीं असाच 'अङ्गुलीमि.' प्र. २३ श्लोक २१ पहा )

उपजाति

यथा गजो नेति समक्षरूपे तस्मिन्नपक्रामति संशयः स्यात्
पदानि दृष्ट्वा तु भवेत्प्रतीतिस्तथाविधो मे मनसो विकार ॥

उपजाति

समक्ष पाहूनहि "हा न हत्ती ॥
जाताच तो संशय येइ चित्तीं ॥
पदांस पाहून घडे प्रतीति
मनोव्यथेची मम तीच रीति ॥ १२

गद्यार्थ—(दुष्यन्तानें प्रत्यक्ष पाहून ओळख पटली नाहीं, परंतु मग तुसत्या आठांनें ती पत्नी, या चमत्कारिक मनोव्यापाराचें दुष्यंत वर्णन करतो—) प्रत्यक्ष समोर हत्ती दिसूनहि, तो हत्ती, हें समजू नये, मग तो निघून गेल्यावर तो हत्ती असावा अशी अंधुक शंका मनात डोकावू लागावी, आणि, त्याच्या पावलांचे ठसे पाहून मात्र, संशयनिवृत्ति होऊन, हा हत्तीच, ही खात्री पटावी, तशाच प्रकारचा माझ्या मनाचा हा विकार म्हटला पाहिजे. ●●●

वसंततिलका

किं कोकिलस्य विरुतेन गते वसन्ते ?
किं कातरस्य बहुशस्त्रपरिग्रहेण ? ॥
मित्रेण किं व्यसनकालपराङ्मुखेन ? ॥
किं जीवितेन पुरुषस्य निरक्षरेण ? ॥ १३

वसंततिलका

जातां वसंत, रुचि कोकिलगानिं काय?
शस्त्रें बहु धरुनि भीत लढेल काय? ॥
जे संकटीं विमुख, मित्र असे कशास?
लाभे जगून फल काय निरक्षरास? ॥ १३ ॥

गद्यार्थ—वसंतऋतु निघून गेल्यावर, कोकिलाच्या गायनात गोडी ती काय? पुष्कळ शस्त्रें धारण केलीं, तरी, भित्रा लढणार काय? संकटकालीं जो तोंड फिरवतो, त्या मित्राचा उपयोग काय? किंवा माणसानें विद्याविहीन अवस्थेंत जगण्याचे फल काय? ●●●

शार्दूलविक्रीडित

सन्तः क्वापि न सन्ति, सन्ति यदि वा दुःखेन जीवन्ति ते
राजानोऽपि न सन्ति, सन्ति यदि वा लाभाद्धनग्राहिणः ॥
विद्वांसोऽपि न सन्ति, सन्ति यदि वा मात्सर्ययुक्ताश्च ते
दातारोऽपि न सन्ति, सन्ति यदि वा सेवानुकूला कलौ १४

शार्दूलविक्रीडित

नोहे संत कुठें! असे तर जगे दुःखांत कैसा तरी
राजाही न कुठें! असेच जर कां, तो अर्थलोभी परी ॥
नाहीं मत्सर अंतरात असला विद्वान नाहीं कुणी
दाताही न फलींत, ज्यास न रुचे सेवा स्वतांची
मनीं ॥ १४ ॥

गद्यार्थ— या कलियुगात, सज्जन कुठेच नाहीं; असलाच तर तो दुःखात जगत असेल; राजा कुठें दिसणार नाहीं; असलाच तर लोभानें (प्रजेकडून) धन (पिळून) घेणाराच असेल; विद्वानहि सापडणार नाहीं; असलाच तर तो मत्सरीच असेल; दाताहि कुठें आढळणार नाहीं—असलाच तर सेवेला वश होणारा (स्तुतिप्रियच) असेल. ●●●

शिखरिणी

न संध्या संधत्ते नियमितनमाजं न कुरुते
न वा मौंजीबंधं कलयति न वा सुन्नतविधिम् ॥
न रोजा जानीते व्रतमपि हरेर्नैव कुरुते
न काशी मक्का वा शिव शिव न हिंदूर्न यवन ॥१५॥

शिखरिणी

करीना संध्या वा नियमित नमाजा न पढतो
तसें मौंजीबंधा करित न च, सुंता न करतो ॥
न जाणे रोजातें—करीत हरिपूजाव्रतहि न
न काशी मक्का वा शिव शिव हिंदू न यवन ॥१५॥

गद्यार्थ— ( कलियुगातल्या धर्मभ्रष्टतेचें वर्णन. )माणूस आता धड संध्याहि करीत नाहीं, किंवा, नियमितपणें निमाजहि पढत नाहीं, धड मुजहि करीत नाहीं, किंवा, सुताहि करीत नाहीं. रोजाचे उपवास करीत नाहीं, किंवा, विष्णूचें व्रतहि ( आषाढी कार्तिकी ! ) करीत नाहीं, धड काशीयात्रा नाहीं, कीं मक्केची हाज नाहीं. शिव, शिव, आता माणूस धड हिंदु राहिला नाहीं, धड यवनहि नाही ! ●●●

वसततिलका

दोषाकरोऽपि कुटिलोऽपि कलङ्कितोऽपि
मित्रावसानसमये विहितोदयोऽपि ॥
चन्द्रस्तथाऽपि हरवल्लभतामुपैति
नैवाश्रितेषु गुणदोषविचारणा स्यात् ॥ १६ ॥

वसंततिलका

**दोषांत मग्न, अतिवक्र, मलीन देहीं**
**मित्रावसानसमयीं उदयास येई ॥**
**ऐसें असूनहि शिवा प्रिय, चंद्र होत**
**पाहू नयेत गुणदोष निजाश्रितांत ॥ १६ ॥**

गद्यार्थ—चंद्र हा, दोषाकर, ( रात्र करणारा, दुसरा अर्थ दोषाची खाण. ) कुटिल, ( चंद्रकोर वाकडी असते म्हणून वक्र, दुसरा अर्थ वक्र स्वभावाचा ) कलंकित, ( वर डाग असलेला, दुसरा अर्थ डागाळलेल्या चरित्राचा. ) व मित्राच्या ( सूर्याच्या, दुसरा अर्थ स्नेह्याच्या ) अवसानसमयीं ( अस्ताचे वेळीं दुसरा अर्थ मृत्यूच्या वेळीं किंवा पडत्या काळात ) उदय पावणारा, असूनहि, शंकराला तो प्रिय असतो कारण थोर लोक हे, एकदा ज्याचा आश्रित म्हणून स्वीकार केला, त्याचे गुणदोष पहात बसत नाहींत. ●●●

वैतालीय

सहसा विदधीत न क्रियामविवेकः परमापदां पदम् ॥
वृणते हि विमृश्यकारिणं गुणलुब्धाः स्वयमेव संपदः ॥ १७॥

उपजाति

**घाईंत कार्यें करणें न कोणी**
**आपत्ति मोठ्या, अविवेक आणी ॥**
**करी समीक्षूनचि कार्य नामी**
**स्वयें वरी त्या गुणलुब्ध लक्ष्मी॥ १७ ॥**

गद्यार्थ—कोणीहि, कार्य करोधर्यापि,[illegible] घाईंत, अविचारानें, करू नये कारण अविवेक हें नाना आपत्तींना आमंत्रणच होय. नीट विचार करून कार्य करणाराला, गुणावर लुब्ध होणारी भाग्यलक्ष्मी स्वयेंच वरते. ●●●

वसततिलका

रम्याणि वीक्ष्य, मधुरांश्च निशम्य शब्दान्—
पर्युत्सुकी भवति यत्सुखितोऽपि जन्तुः ॥
तच्चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वं
भावस्थिराणि जननान्तरसौहृदानि ॥ १८ ॥

वसततिलका

**पाहून रम्यघन, ऐकुनि गोड वाणी**
**हुर्हूर लागत जिवास सुखी असोनी ॥**
**तें नेणता, मनिं खरोखर आठवीते**
**जन्मांतरातिल हृदिं स्थिर स्नेहनातें ॥ १८॥**

किंवा

**तें नेणतां, मनिं खरोखर आठवीतें**
**जन्मांतरामधिल सुखचि भावगीतें ॥**

गद्यार्थ—( मनाच्या गूढ व्यापाराविषयीं शाकुंतलातील श्लोक. ) माणसाला, तो सुखी असूनसुद्धा, (केव्हां केव्हां,) रम्य वस्तु पाहून, किंवा, गोड शब्द ऐकून, एक ( अनामिक ) हुरहुर हृदयाला लागते ( ती तशी का लागते, याविषयीं कालिदासाला असें वाटतें कीं, ) त्यावेळीं माणूस नकळत आपल्या मनात, दुसऱ्या जन्मातली, ( प्रत्यक्षात अनाकलनीय पण ) भावात स्थिर अशी प्रेमाची आठवण काढीत असतो. ( सर्व बाजूंनीं सुखी परिस्थिति असता, असे खिन्न विचार मनात येतात हा अनुभव पुष्कळच सहृदय माणसांना आलेला आहे व येत राहील. *"In that sweet mood, when pleasant thoughts, bring sad thoughts to the mind"* हे वर्डस्वर्थचे उद्गार, (पहा इंग्रजी काव्यसूक्तींची पाणपोई खंड १ पान २१०–२११ ) किंवा हेन्री कर्कव्हाइटची I am pleased and yet I am sad ! ही कविता ( पहा इंग्रजी काव्यसूक्तींची पाणपोई खंड २ पान ३१८–३२१ ) वाचल्यास, या गूढ व्यापाराचा अनुभव सार्वदेशीय आहे, हें ध्यानीं येईल. या अनुभवाचें कारण मात्र कर्कव्हाइटला सापडलें नाहीं. तो म्हणतो—

Then, whence it is, I cannot tell
But there is some mysterious spell
That holds me when I am glad;
And so the tear drop fills my eye
When yet, in truth, I know not why
Or wherefore I am sad?

कालिदासानें जन्मांतराचा हवाला दिला आहे! पण कोण जाणे खरें काय?

●●●

रथोद्धता

यः परस्य विषमं विचिन्तयेत्प्राप्नुयात्स कुमतिः स्वयं हि तत् ॥
पूतना हरिवधार्थमाययौ प्राप सैव वधमात्मनस्ततः ॥ १९ ॥

रथोद्धता

दुःख जो खल, दुज्यास इच्छितो
मेळवी कुमति तें स्वयेंच तो ॥
पूतना हरिवधार्थ येउनी
मेळवी स्ववध त्याचपासुनी ॥ १९ ॥

गद्यार्थ—दुसऱ्याला दुःख, आपत्ति यावी, अशी जो इच्छा धरितो, त्या दुर्मति दुष्टाला, तें दुःख स्वतांलाच प्राप्त होतें. पूतना, ही आली होती, कृष्णाला मारण्यासाठीं, पण, ती स्वतांच, त्याच्या हातून, स्वतांचा मृत्यु ओढवती झाली. ●●●

अनुष्टुभ्

बहूनामप्यसाराणां संहतिः कार्यसाधिका ।
तृणैर्विधीयते रज्जुर्यया नागोऽपिबध्यते ॥ २० ॥

अनुष्टुभ्

बहुतां दुर्बलांचीही एकी कार्य करी महा ।
दोरी बने तृणांची ती बांधी हत्तीसही पहा ॥२०॥

गद्यार्थ—दुर्बल असले, तरी, ते जर पुष्कळ असून, एकी करतील, तर, ते सुद्धा महत्कार्य करूं शकतील. यःकश्चित् गवताची (वळून) जी दोरी करतात तिनें मग हत्तीला सुद्धां बांधता येतें.

●●●

अनुष्टुभ्

वनानि दहतो वह्नेः सखा भवति मारुतः ।
स एव दीपनाशाय; कृशे कस्यास्ति सौहृदम् ? ॥ २१ ॥

अनुष्टुभ्

लागतां वणवा, वारा साह्य त्यातें करी वनीं ।
मालवी तोच दीपाला; दुर्बला मित्र कां कुणी ? ॥ २१

गद्यार्थ—रानेंच्या रानें जाळणाऱ्या वणव्याला, वारा, हा साह्यकारी होतो. परंतु तोच वारा बिचाऱ्या लहानग्या दिव्याला विझवून टाकतो; (सगळे सबलांचे स्नेही.) दुर्बलाशीं मित्रता कोण ठेवायला बसलें आहे?

●●●

अनुष्टुभ्

अश्वं नैव गजं नैव व्याघ्रं नैव च नैव च ।
अजापुत्रं बलिं दद्याद्देवो दुर्बलघातकः ॥ २२

अनुष्टुभ्

अश्वाला न गजाला न। व्याघ्रा तर कधींच न।
बळी धावें बोकडाला। देव घातक दुर्बलां ॥ २२

गद्यार्थ—घोड्याला कोणी बळी देत नाहींत; हत्तीलाहि देत नाहींत; वाघाला तर कधींच नव्हे—बळी (द्यावयाचा तर म्हणे दुबळ्या) बोकडाचा द्यावा (असे यज्ञशास्त्र सांगतें!) एकूण काय, देव सुद्धा दुर्बलांनाच मारक आहे! ●●●

अनुष्टुभ्

द्वाविमौ पुरुषौ लोके सुखिनौ न कदाचन।
यश्चाधनः कामयते यश्च कुप्यत्यनीश्वरः ॥ २३

इन्द्रवज्रा

इच्छा धराव्या मनिं निर्धनानें
रागावणें दुर्बल मानवानें ॥
दोन्ही तऱ्हेचे नर या जगांत
हे राहती ना कधिंही सुखांत ॥ २३

गद्यार्थ—पुढील दोन तऱ्हेचे मानव या जगीं कधींच सुखी होत नाहींत—एक मनोरथ करणारा निर्धन, व दुसरा रागावणारा दुर्बल! (एका ओळीच्या फरकानें हाच श्लोक पुढील-प्रमाणें सापडतो—)

●●●

अनुष्टुभ्

द्वाविमौ कण्टकौ लोके शरीरपरिशोषणौ ।
यश्चाधनः कामयते यश्च कुप्यत्यनीश्वरः ॥ २३ अ

आर्या

**हे दोन कंटक जगीं, संतत देहांत राहती खुपत। निर्धन करी मनोरथ! दुर्बल नर होतसे म्हणे कुपित ॥ २३ ॥**

गद्यार्थ—या जगात पुढील दोन घटना, काट्यासारख्या, शरीरात खुपत राहतात—एक निर्धनानें मनोरथ करावें ही; व दुसरी दुर्बलानें रागावावें ही.

●●●

अनुष्टुभ्

मुख्यमेकं पुरस्कृत्य शून्यात्मानोऽपि साधका ।
भवन्ति त विना नैव यथा सख्याङ्कबिन्दव: ॥२४॥

अनुष्टुभ्

**पुढें करून मुख्यैका क्षुद्रही कार्य साधिती।**
**त्यावीण परि ते शून्य शून्यें संख्येंत जेविं तीं ॥२४॥**

गद्यार्थ—मुख्य अशा एकाला, पुढें करून (एकाला पुढारी करून व, त्याला आपल्या सर्व शक्तीचा पाठिंबा देऊन) शून्या-सारखे पोकळ ( क्षुद्र ) हि, कार्य साधू शकतात. त्या एकावाचून मात्र हे शून्य निमतीचेच ठरतात.—उदाहरणार्थ, आकड्याच्या संख्येंतलीं शून्यें. ( नुसत्या शून्याना कांहींच किंमत नाहीं. पण १ ते ९ पैकीं एखाद्याला पुढें करून त्याच्या पाठीशीं शून्यें उभीं राहिलीं तर प्रत्येक शून्य त्या मुख्याची किंमत दसपटीनें वाढवीत असतात. )

●●●

अनुष्टुभ्

क्षमा शस्त्र करे यस्य दुर्जनः किं करिष्यति ? ।
अतृणे पतितो वह्निस्स्वयमेवोपशाम्यति ॥ २५ ॥

अनुष्टुभ्

**क्षमा शस्त्र करीं ज्याच्या, करी त्या काय दुर्जन ? ॥**
**स्वयेंच विझतो अग्नि जाळाया जेथ ना तृण ॥ २५ ॥**

गद्यार्थ—ज्याच्या हातीं क्षमा हें शस्त्र आहे, त्याला दुर्जन काय करू शकेल ? (पराभूत दुर्जनाला शिक्षा केली, तर त्याच्याल सूडबुद्धि व द्वेष उत्पन्न होईल; पण क्षमा केल्यानें तो आपोआपच वैर विसरेल ) जाळण्याला जेथें तृण सुद्धा नाहीं, ( किंवा, जेथे जळण्याजोगेंच काहीं नाहीं,) तेथे पडलेला अग्नि हा, आपोआपच विझून जातो ) पण या नीतिवचनाच्या बारह्याला जेवलेले पुष्कळ दुर्जन असतात. पृथ्वीराज चव्हाणास त्याचा पुरेपूर अनुभव आला, हा इतिहास आहे. )

●●●

अनुष्टुभ्

नरस्याभरणं रूपं रूपस्याभरणं गुणः ।
गुणस्याभरणं ज्ञानं ज्ञानस्याभरणं क्षमा ॥२६॥

अनुष्टुभ्

**नरा भूषण सौंदर्य—रूपा भूषण सद्गुण ।**
**गुणांची ज्ञान ही भूषा क्षमा ज्ञानास भूषण ॥ २६ ॥**

*गद्यार्थ—सौंदर्य हें माणसाला अलकारासारखें आहे. पण त्या सौंदर्याला, गुण हा अलकार, आहे. गुणाचा अलकार ज्ञान हें असून, ज्ञानाचा अलकार क्षमा हें आहे. ( ज्ञानी माणसानें शिष्याचें किंवा अज्ञानाचे अपराध पोटात घालवे; त्याच्यावर चिडू नये )*

●●●

अनुष्टुभ्

क्षमा बलमशक्तानां शक्तानां भूषणं क्षमा ।
क्षमा वशीकृतिर्लोके क्षमया किं न सिद्ध्यति ? ॥२७॥

अनुष्टुभ्

**क्षमा बळ अशक्तांचें—क्षमा शक्तांस भूषण ।**
**क्षमा वश करी लोकां-क्षमेला साध्य काय न ? ॥२७॥**

गद्यार्थ— अशक्ताना क्षमा ( स्वकृत कीं परकृत ? ) हें बळ आहे. पण शक्ताना क्षमा हें भूषण आहे. सर्व जगाला वश करण्याची शक्ति क्षमेत आहे क्षमेनें काय साध्य होत नाहीं।

●●●

अनुष्टुभ्

क्षत्रियाणां बलं तेजो ब्राह्मणानां क्षमा बलम् ।
क्षमा गुणोऽह्यशक्तानां शक्तानां भूषणं क्षमा ॥२८॥

अनुष्टुभ्

**क्षत्रियां बळ तेजाचें; ब्राह्मणाचें बल क्षमा।**
**क्षमा गुण अशक्तांना—शक्तांना भूषण क्षमा ॥ २८ ॥**

गद्यार्थ—क्षत्रियाचें बळ तेजस्वीपणात आहे. ब्राह्मणाचें बळ क्षमेत आहे. दुर्बलांना क्षमा हा गुण आहे तर सबलांना क्षमा हें भूषण आहे.

●●

अनुष्टुभ्

कृतं न प्रतिकुर्याद्यः पुरुषाणां स दूषणः।
कृते च प्रतिकर्तव्यमेष धर्मः सनातनः॥ २९॥

अनुष्टुभ्

प्रतिक्रिया न, केल्याची करी, दूष्यचि तो जन।
केल्या प्रतिक्रिया देणें हाच धर्म सनातन॥ २९॥

गद्यार्थ—आपलें ज्यानें (वाईट) केलें, त्याशीं (ज्यास तसें वागून) परतफेड न करणारा माणूस, दूषणीयच आहे. केल्याची परतफेड करावी, हाच सनातन धर्म होय. (अर्थात हें जसे वाईटाविषयीं, तसेच, भल्याशीं भलें वागून मोबदला द्यावा असाहि अर्थ यात आहे.) (एकूण जशास तसें वागावें हें सांगण्याचा हेतु!) ●●●

अनुष्टुभ्

न श्रेयः सततं तेजो; न नित्यं श्रेयसी क्षमा।
तस्मान्नित्यं क्षमा तात! पण्डितैरपवादिता॥ ३०॥

अनुष्टुभ्

बरें न तेज नित्याचें; सदाची न क्षमा बरी।
म्हणून सुज्ञ नित्याची सापवाद क्षमा करी॥ ३०॥

गद्यार्थ—नेहमींच तेजस्वी, कडक स्वभावानें वागणें बरें नव्हे, किंवा, नेहमींच क्षमा करीत राहणेंहि ठीक नव्हे. म्हणूनच बाबारे, सुज्ञ मनुष्य हा नित्यक्षमेला सापवाद समजतो. (कसल्याहि प्रसगीं क्षमाच, असें न करता, प्रतिकारहि, योग्य प्रसग पाहून सुज्ञ मानतो. कधीं कधीं जशास तसेंहि वागतो.) ●●●

अनुष्टुभ्

आत्मनो मुखदोषेण बध्यन्ते शुकसारिकाः।
बकास्तत्र न बध्यन्ते मौनं सर्वार्थसाधकम्॥ ३१॥

अनुष्टुभ्

बंध स्वमुखदोषानें पावती सारिकाशुक।
पकडी बगळ्यां कोण? मौन सर्वार्थसाधक॥ ३१॥

गद्यार्थ—मंजुळ वाणीनें बोलण्याच्या स्वतःच्या मुखदोषानें साळुंक्या आणि पोपट हे पिंजऱ्यात घातले जातात. पण बगळ्यांना कोणी पकडीत नाहीं. मौनानें सर्व कार्ये साधतात. ●●●

शिखरिणी

वरं मौनं कार्यं न च वचनमुक्तं यदनृतं
वरं क्लैब्यं पुंसां न च परकलत्राभिगमनम्॥
वरं प्राणत्यागो न च पिशुनवाक्येष्वभिरुचि—
र्वरं भिक्षाशित्वं न च परधनास्वादनसुखम्॥ ३२॥

शिखरिणी

असत्योक्तीपेक्षां कितीतरि बरें मौन भजणें
परस्त्रीसंबंधाहुनिहि बरवें; क्लीव असणें॥
त्यजावे प्राणातें, परि चुगलिची आवड नसो
जगावें भिक्षेनें, न परधन खाण्या रुचि असो॥ ३२॥

गद्यार्थ—मौन धारण करणें बरें, पण, खोटें बोलणें नको; नपुंसक असणें बरें, पण, परस्त्रीशीं संबंध ठेवणें नको; प्राण देणें बरें, पण, चुगली करण्याची आवड नको; भिक्षान्न खाऊन जगणें बरें, पण, परधन चाखण्याचा आनंद नको. ●●●

अनुष्टुभ्

राजा कुलवधूर्विप्रा मन्त्रिणश्च पयोधराः।
स्थानभ्रष्टा न शोभन्ते दन्ताः केशा नखा नराः॥ ३३॥

अनुष्टुभ्

राजा, कुलवधू, विप्र, मंत्री, स्तन, नखें, नर।
केंस, दांतहि विद्रूप, स्वस्थानभ्रष्ट हे जर॥ ३३॥

गद्यार्थ—(प्रत्येक वस्तु तिच्या योग्य जागींच पाहिजे. तेथेंच ती शोभते. स्थानमाहात्म्य फार मोठें आहे.) राजा, कुलस्त्री, ब्राह्मण, मंत्री, स्त्रीचे स्तन, दात, केंस, नखें आणि मनुष्य हे सर्व त्यांच्या (योग्य) स्थानापासून भ्रष्ट झाले, कीं, विद्रूप दिसतात.

अनुष्टुभ्

नक्रः स्वस्थानमासाद्य गजेन्द्रमपि कर्षति।
स एव प्रच्युतः स्थानाच्छुनाऽपि परिभूयते॥ ३४॥

अनुष्टुभ्

स्वस्थान लाभतां, नक्र, गजेंद्रासहि ओढितो।
स्थान तें सुटतां, त्यातें कुत्राहि अवमानितो॥ ३४॥

गद्यार्थ—स्वताच्या (योग्य) स्थानीं (पाण्यात) असता, मगर, ही, महान् हत्तीलाहि ओढू शकते. पण, आपल्या स्थाना पासून भ्रष्ट झाल्यास (पाण्याबाहेर आल्यास) तिलाच कुत्री सुद्धां हरवू शकतो. ●●●

**शिखरिणी**

शिरः शार्वं स्वर्गात्पशुपतिशिरस्तः क्षितिधरं
महीध्रादुत्तुङ्गादवनिमवनेश्चापि जलधिम् ॥
अधोऽधो गङ्गेयं पदमुपगता स्तोकमथवा
स्वर्गेहभ्रष्टानां भवति विनिपातः शतमुखः ॥ ३५॥

**शिखरिणी**

**पडे स्वर्गातूनी शिवशिरिं, तिथूनीं गिरिवरीं**
**घरेला शैलाग्रावरुनि, तिथुनीं सागरतळीं ॥**
**अध पातें गंगा पद मिळविते नीच किति तें !**
**स्वर्गेहभ्रष्टांचें पतन शतमार्गींच घडतें ॥३५॥**

गद्यार्थ—( हा श्लोक भर्तृहरीचा. चौथ्या ओळींत पहिला शब्द ' विवेकभ्रष्टानां ' असा मूळांत आहे. परंतु विवेकभ्रष्टता ही गंगेला कशी लागू पडते हें समजत नाहीं. म्हणून त्या ऐवजीं स्वर्गेहभ्रष्टानां किंवा स्वधामभ्रष्टानां असा शब्द घालून स्थानभ्रष्टतेमुळें, पतित, पराभूत होण्याच्या, वरील ३३ व ३४ श्लोकांतील कल्पनेशीं अर्थ जुळता करता येतो, व गंगेला अविवेकी म्हणावें लागत नाहीं. ) गंगा ही स्वर्गांतून पडली, ती शंकराचे डोक्यावर; तेथून पर्वतावर; उंच पर्वतशिखरावरून पृथ्वीवर, व तेथून समुद्रात, अशा रीतीने खाली खाली उतरत, गंगा, ही आतां अत्यंत खालच्या पातळीवर जाऊन बसली आहे मनुष्य (विशेषत स्त्री) एकदां आपल्या स्थानावरून भ्रष्ट झाला, की, त्याचा अधःपात शंभर मुखानीं ( गंगेचीं समुद्राला मिळतानाचीं मुखें ) होतो.

या श्लोकाविषयीं अनेक विद्वानोंशीं चर्चा केली. शेवटच्या ओळींतला ' विवेकभ्रष्टानां ' हा शब्द गंगकडे न लावतां, विवेक भ्रष्टांच्या केवळ पतनापुरताच दाखला पहिल्या तीन ओळींत आहे असे समजावें, असा पर्याय कांहींनीं सुचविला, पण सर्व तीन ओळींची परिणति, नीटपणें, चौथ्या ओळींत व्हावयाची, तर स्वर्गेहभ्रष्ट हाच शब्द योग्य ठरतो. मूळ आधारस्थानापासून मनुष्य एकदां भ्रष्ट झाला कीं, ( हें स्त्रीच्याबाबतं विशेषत खरें आहे, हें, अनेक महिलाश्रमांतील अभयार्थी स्त्रियांचा इतिहास जाणणारांना माहीत आहे. ) तो कोठें भरकटत जाईल याचा नियम नाहीं. हाच अर्थ अधिक सुसंगत असे बहुतेक विद्वानांचें मत पडलें.

हें सर्व लिहून झाल्यावर मूळ वाल्मीकिरामायण वाच ण्यात आलें. त्यात बालकांडात गंगावतरणाची कथा आली आहे. त्यात, स्वर्गातून, गंगा, शिवमस्तकीं पडेपर्यंत तरी, तिचा हेतु, सगर पुत्रांचा उद्धार करण्याचा, म्हणजे, पवित्रच होता. पण शंकराच्या मस्तकावर पडल्यावर, तिला असा गर्व झाला, कीं, "मीं माझ्या सामर्थ्यानें, शंकरासकट सर्व जगाला पाताळात वाहवीत नेईन !" हा तिचा गर्व ध्यानीं येताच, शंकरानें, तिला, आपल्या जटांच्या चक्रव्यूहात गुरफटवून असे बांधुन टाकलें, कीं, तिची धार खालीं पडेचना. त्यामुळें भगीरथाचा मूळ हेतु, सगर पुत्रांचा उद्धार, हा विफल होण्याची पाळी आली. तेव्हा भगीरथानें पुन्हां शंकरांनी प्रार्थना केली, त्यामुळें शंकरानें गंगच्या गर्विष्ठ उद्दट हेतूबद्दल तिला क्षमा केली, व, जटांतून तिची सुटका केली; मग ती पुढें भगीरथामागून समुद्राकडे चालू झाली पण वाटेंत पुन्हां तिला गर्व झाला, व जह्नु ऋषीची तिनें आगळीक केली, तेव्हां, त्या ऋषीनें तिचा समग्र प्रवाहच प्राशन केला; व पुन्हां ती वाहण्याची थांबली पुन्हा भगीरथानं तिच्यासाठीं क्षमायाचना केली, व, नंतर जह्नूनें तिला ओकून टाकली व म्हणून तिला जह्नु-कन्या हें नाव पडलें, अशी कथा आहे. या प्रसंगाना उद्देशून भर्तृहरीनें गंगेला ' विवेकभ्रष्ट ' म्हटलें असल्यास नकळे. पण इतकें असूनहि, गंगेचें स्वर्गांतून शिवमस्तकापर्यंतचें पतन हें कांहीं विवेकभ्रष्टाचें पतन नव्हतें, हा, दृष्टांत पूर्ण होण्यात, एक दोष राहून जातोच. ●●●

**अनुष्टुभ्**

पक्षिणां बलमाकाशं मत्स्यानामुदकं बलम् ।
मारुतस्य बलं वेगस्तरणेरातपो बलम् ॥ ३६ ॥

**अनुष्टुभ्**

**नभांत बळ पक्ष्यांना मत्स्यां बळ जळामधें।**
**वेगात बळ वायूचें सूर्या बळ उन्हामधें ॥ ३६ ॥**

गद्यार्थ—पक्ष्यांचें आकाश हेंच बळ, म्हणजे, ते आपलें बळ आकाशातच दाखवू शकतात, मत्स्यांचें बळ पाण्यात चालतें, वाऱ्याचें बळ त्याच्या वेगात आहे, व सूर्याचें बळ उन्हात ( ऊन हेंचे ) असतें. ●●●

अनुष्टुभ्

को न याति वशं लोके मुखे पिण्डेन पूरितः ? ।
मृदङ्गो मुखलेपेन करोति मधुरध्वनिम् ॥३७॥

अनुष्टुभ्

**वश कोण न ये लोकीं पिंड तोंडांत घालुनी ? ।**
**मृदंग मुखलेपानें काढतो मधुर ध्वनि ॥ ३७ ॥**

गद्यार्थ—(सर्व राज्ययंत्रणा लाचखाऊंनीं भरली असता) असा कोण आहे, कीं ज्याच्या तोंडांत खायला भरपूर घातलें असता तो वश होत नाहीं ? (मनुष्य तर वश होईलच; पण निर्जीव असा) मृदग सुद्धां मुखलेप केला असतां (कणकेचा गोळा तोंडावर थापला असता) गोड आवाज काढतो. ●●●

उपेन्द्रवज्रा

सुखस्य दुःखस्य न कोऽपि दाता
परो ददातीति कुबुद्धिरेषा ॥
अहं करोमीति वृथाभिमानः
स्वकर्मसूत्रग्रथितो हि लोकः ॥ ३८ ॥

इंद्रवज्रा

**दुःखें सुखें अन्य कुणी न देत**
**देई दुजा हा भ्रम माणसांत ॥**
**'मी हें करीं' हा अभिमान फोल**
**बांधी जगातें निजकर्मसूत्र ॥ ३८ ॥**

गद्यार्थ—मनुष्याला सुख किंवा दुःख देणारा असा (अन्य कोणी) दाता नाहीं. तीं आपल्याला, दुसरा कोणी देतो हा भ्रम आहे. (सुख दुःख दोन्ही, मनुष्य स्वकर्मानींच उत्पन्न करीत आहे.) (एखादें महान कृत्य केलें तर) 'हें मी करतों' असा अभिमान माणसानें धरणें हेंहि व्यर्थ आहे—कारण सर्व जग हें आपल्या कर्मांच्या (कर्मफलाच्या) सूत्रानीं बांधलें गेलेलें आहे. ●●●

अनुष्टुभ्

न हि दैवेन सिध्यन्ति कार्याण्येकेन सत्तम ! ।
न चापि कर्मणैकेन; द्वाभ्यां सिद्धिस्तु योगतः ॥३९॥

अनुष्टुभ्

**एक्या दैवसहाय्यानें कार्यें कोणा न साधतीं ।**
**न कर्मे एकट्या, या ये, सिद्धि दोन्ही मिळून तीं ॥ ३९ ॥**

गद्यार्थ—हे सज्जनश्रेष्ठा ! एकट्या दैवाच्या साह्यानें कार्यें सिद्धीस जात नाहींत; तसेच एकट्या कर्मानेंहि जात नाहींत. परंतु दोघांच्या संयोगामुळें तीं सिद्धीस जातात. ●●●

अनुष्टुभ्

विषदिग्धस्य बाणस्य दन्तस्य चलितस्य च ।
अमात्यस्य च दुष्टस्य मूलादुद्धरणं सुखम् ॥ ४० ॥

अनुष्टुभ्

**विषारी बाण, अन् दुष्ट मंत्री; दांत हले, तयां ।**
**मिळे सुखचि, यां सर्वां समूळ उपट्टूनिया ॥४०॥**

गद्यार्थ—(शरीरात घुसलेला) विषानें माखलेला बाण, दुष्ट असा मंत्री, हलणारा दात हीं तिन्ही समूळ उपटलीं तरच सुखाचें होतें (नाहींतर तीं पुन्हा पुन्हा तापदायक होतात.) ●●●

वंशस्थ

निमित्तमुद्दिश्य हि यः प्रकुप्यति
नूनं स तस्यापगमे प्रसीदति ॥
अकारणद्वेषि मनस्तु यस्य वै
कथं जनस्तं परितोषयिष्यति ? ॥ ४१ ॥

उपजाति

***जो कारणें क्रुद्ध मनांत होई प्रसन्न तो, तें सरतांच होई ॥***
**द्वेषी परी जो अनिमित्त, त्यातें संतोषवावें सुजनें कसें तें ? ॥ ४१ ॥**

गद्यार्थ—जो मनुष्य काहीं एका विशिष्ट कारणानें रागावतो, तो, अर्थातच, तें कारण सपताच पुन्हां प्रसन्न होतो; पण, ज्याचें, मन कारणावांचून द्वेष करणारें असतें, त्याचें समाधान माणसानें कसें करावें ? ●●●

अनुष्टुभ्

यो ध्रुवाणि परित्यज्य ह्यध्रुवं परिषेवते ।
ध्रुवाणि तस्य नश्यन्ति ह्यध्रुवं नष्टमेव च ॥४२॥

अनुष्टुभ्

**हातचें सोडुनी धांवे पळत्यामागुनी जर्यी।**
**हातचेंहि पळे त्याचें, पळतें न मिळे कधीं ॥४२॥**

गद्यार्थ—जो कोणी स्थिर वस्तु सोडून अस्थिराच्या मागें धावतो, त्याचें तें स्थिरहि नष्ट होतें; व अस्थिर तर नष्टच असतें.

●●●

आर्या

दधि मधुरं, मधु मधुरं,
द्राक्षा मधुरा सुधाऽपि मधुरैव।
तस्य तदेव हि मधुरं
यस्य मनो यत्र संलग्नम् ॥ ४३ ॥

आर्या

**मधुर दहीं, मध मधुर,**
**द्राक्ष मधुर, मधुरची असे अमृत।**
**ज्याचें ज्यांत जडे मन,**
**मधुर तया तेंच सर्वदा होत ॥ ४३ ॥**

गद्यार्थ—दहीं रुचकर असतें, मध, द्राक्ष, अमृत हीं सर्व आपापल्या परीनें मधुरच असतात; ( ती सर्वांनाच सारखीं गोड वाटतील असे नाहीं. रुचिवैचित्र्यानें कोणाला हें तर कोणाला तें, मधुर वाटेल; तेव्हा साधारणपणें हेंच खरें कीं– ) ज्याचें मन जिथें जडेल, त्याला तेंच मधुर वाटतें. (त्या वस्तूपेक्षां, मनावरच मधुरत्व अवलंबून आहे. )

●●●

अनुष्टुभ्

मौखर्यं लाघवकरं मौनमुन्नतिकारकम्।
मुखरं नूपुरं पादे; कण्ठे हारो विराजते ॥ ४४ ॥

अनुष्टुभ्

**वाचाळता करी हीन; मौन उन्नति देतसे।**
**बोलका चाळ पायांत; मूक हार गळां वसे ॥ ४४ ॥**

गद्यार्थ—वाचाळपणा हा 'नीच'पदाला नेतो व मौन हें 'उन्नति'दायक असतें; उदाहरणार्थ– बोलका चाळ हा पायांत घालतात व मूक हार हा गळ्यात धारण केला जातो!

●●●

आर्या

ग्रन्थिलतया किमिक्षोः
किमपभ्रंशेन भवति गीतस्य?।
किमनार्जवेन शशिनः
किं दारिद्र्येण दयितस्य? ॥ ४५ ॥

आर्या

**गांठाळ ऊंस, गायन**
**अशुद्ध असलें तरी कुठें बिघडे?।**
**वक्रचि चंद्र नि वल्लभ**
**निर्धन असुनीहि काय हानि घडे? ॥ ४५ ॥**

गद्यार्थ—(मधुर रस असलेला) ऊंस, (पेन्यापेन्याचे ठिकाणीं) (कठीण) गाठाळ असला, किंवा (सुमधुर सरस) गायनातले कांहीं शब्द अशुद्ध पडलेले असले, तरी, तेवढ्यानें (त्याच्या माधुर्यांत) कमतरता पडते का? तद्वतच चंद्राची कला ही वक्र असली, किंवा, प्रियेचा प्रियकर निर्धन असला, तरी, त्यांच्या प्रियत्वांत अंतर पडेल काय?

●●●

आर्या

अपराधादधिकं मा
व्यथयति तव बहुतकपटरचनेयम्।
शस्त्राघातो न तथा
सूचीक्षतवेदना यादृक् ॥ ४६ ॥

आर्या

**अपराधाहुनि कपटचि**
**तव हें, मज देतसे व्यथा फार।**
**शस्त्राघाताहुनही**
**सुईच टोंचून वेदना थोर ॥४६॥**

गद्यार्थ—( विश्वासू मित्रानें फसवणूक केल्यावेळीं मित्र म्हणतो ) तूं माझा प्रत्यक्ष ( उघड ) [illegible] करून माझी हानि केली असतीस तर मला तें [illegible] वाटलें [illegible]— पण कपट रचून तूं माझी हानि [illegible] [illegible] माझ्या हृदयाला जास्त तीव्र टोंचणी [illegible] [illegible]. त्या प्रमाणें, प्रत्यक्ष शस्त्राघातानें [illegible] [illegible] [illegible] टोंचून होणारी वेदना अधिक तीव्र वाटते [illegible].

●●●

अनुष्टुभ्

योऽत्ति यस्य यदा मांसमुभयोः पश्यतान्तरम् ।
एकस्य क्षणिका प्रीतिरन्यः प्राणैर्वियुज्यते ॥ ४७ ॥

वसंततिलका

खाईल एक जधिं मांस दुज्या कुणाचें
दोघांत अतर पहा किति घोर साचें ॥
एका घडे क्षणिक तृप्ति जरी तनूस
अन्या वियोग घडतो तनु जीव यांस ॥ ४७ ॥

गद्यार्थ—एक जण दुसऱ्याचें जेव्हा मांस खातो, तेव्हा त्या दोघात केवढें अतर पडतें, तें पहा.— एकाला क्षणभराचा आनंद होतो, पण दुसऱ्याच्या देह व प्राण याचा वियोग घडतो !

आर्या

यद्यपि बहु नाधीषे तथाऽपि पठ पुत्र व्याकरणम् ।
'स्व'जन. 'श्व'जनो मा भूत्; 'स'कल 'श'कल,
'स'कृत् 'श'कृत् ॥ ४८ ॥

आर्या

जरि बहु शिकशि न तरि कर
व्याकरणाचा विशेष अभ्यास ।
न वद 'स्व'जना 'श्व'जन, न
'स'कला'श'कल न; 'श'कृत्हि'स' कृतास ॥ ४८ ॥

गद्यार्थ—मुला ! ज़री तू इतर काहीं फारसें शिकला नाहींस, तरी ( फारसें बिघडत नाहीं ) पण निदान व्याकरणाचा अभ्यास अवश्य कर ! ( म्हणजे निदान उच्चार शुद्ध होतील, व ) 'स्व'जन ( आप्त ) या ऐवजीं तुझ्या तोंडून 'श्व'जन ( कुत्रा ); 'स'कल ( पूर्ण ) या ऐवजीं 'श'कल ( तुकडा ); व, 'स'कृत् ( एकदा ) या ऐवजीं 'श'कृत् ( शेण विष्ठा ) असें भयंकर, अर्थाचे अनर्थ करणारे शब्द निघणार नाहींत. ( नुसता 'स' ऐवजीं 'श' उच्चार करण्यानें होणाऱ्या अनर्थाचीं हीं तीन उदाहरणें दिलीं. इतर अनेन अनर्थ होणारच. युद्धाला 'श'रण जाण्याऐवजीं युद्धभक्त 'स'रणात आपल्याच तोंडानें कसे जावात हें आजहि पहाण्यास मिळतेंच. )

उपजाति

ताते सुतानां, सुरतेऽङ्गनानां,
स्तुतौ कवीनां, समरे भटानाम् ॥
'त्वं' कारयुक्ता हि गिरः प्रयुक्ता
रसाधिकाश्चारुतरा भवन्ति ॥ ४९ ॥

शार्दूलविक्रीडित

बापाशीं सुत लाडका; नि सुरतीं स्त्री वल्लभा बोलतां
कोणाही स्तवितां कवीजन, तसे योद्धे रणीं गर्जतां ॥
संबोधार्थक त्या 'तुम्ही' हुनि जधीं 'तूं' शब्द ते योजिती
होती गोड विशेष रम्य वच ते त्या त्या क्षणीं त्यांप्रति ॥

गद्यार्थ—( ४८ व्या श्लोकात व्याकरण शिकून शुद्ध बोलण्याचे महत्त्व दर्शविलें. पण, आदरार्थी बहुवचनी 'तुम्ही' ऐवजीं केव्हा केव्हा 'तू' हा एकवचनी शब्द शिष्टसमतच नव्हे, तर, अधिक गोड समजला जातो. त्याचीं काहीं उदाहरणें— ) (लाडक्या,) मुलग्याने आपल्या बापाला (संबोधताना;) रतिक्रीडेचे *समयीं स्त्रीने आपल्या प्रियकराशीं (बोलताना;) स्तुति करताना,* कवीन (स्तुतिविषयाला उद्देशून बोलताना;) युद्धात, एका योद्ध्यानें दुसऱ्याला (आह्वान देताना;) ( ए बाबा !, हे जिवलगा !, हे राजा !, हे भीष्मा !, इत्यादि ) बहुमानार्थी 'तुम्ही' च्या ऐवजीं 'तू' हा एकवचनी योजलेला शब्दच अधिक रसपूर्ण व कानाला गोड लागतो.

आर्या

अव्याकरणमधीत भिन्नद्रोण्या तरङ्गिणीतरणम् ।
भेषजमपथ्यसहित त्रयमिदमकृत वर; न कृतम् ॥५०॥

आर्या

व्याकरणाविण शिक्षण, नद तरणें भग्न नाव घेऊन ।
पथ्या वांचुनि औषध; अकृत वरीं हीं तिन्ही कृताहून ॥

गद्यार्थ—व्याकरणावाचून शिक्षण घेणें; फुटकी नौका घेऊन *नदी ओलाडणें; पथ्य न पाळतां औषधोपचार करणें; या तिन्ही* गोष्टी केल्यापेक्षा न केलेल्याच बऱ्या.

उपजाति

तुष्टोऽपि राजा यदि सेवकेभ्यो भाग्यात्परं नैव ददाति किंचित् ।
अहर्निशं वर्षति वारिवाहस्तथाऽपि पत्रत्रितयः पलाशः ॥५१॥

उपजाति

**राजा स्वभृत्या जरि तुष्ट होई**
**भाग्याहुनी जास्त न अल्प देई ॥**
**वर्षील रात्रंदिन मेघ थोर**
**पानें पलाशा तरि तीन मात्र ॥** किंवा
**( तरी न पानें पळसास चार ) ॥५१॥**

गद्यार्थ—आपल्या नोकरावर, समजा, अगदीं प्रत्यक्ष राजा प्रसन्न झाला, तरी, तो सुद्धा, त्या नोकराच्या भाग्यात काय असेल, त्यापेक्षा, यत्किंचितहि अधिक कांहीं, त्याना देत नाहीं. मोठा मेघ, अगदीं दिवसरात्र पाऊस पाडीत राहिला, तरी, पळसाला पानें तीन तीं तीन. ( एवढ्या महावृष्टीमुळें तीं तिनाचीं कांहीं चार होणार नाहींत. त्याचें भाग्यच तेवढें. ) ००७

अनुष्टुभ्

यदशक्य न तच्छक्य यच्छक्य शक्यमेव तत् ।
नोदके शकट याति न च नौर्गच्छति स्थले ॥ ५२ ॥

अनुष्टुभ्

**जे अशक्य, न तें शक्य शक्य तें शक्यची असे ।**
**जळीं न चालते गाडी, स्थळीं नौका न जातसे ॥५२॥**

गद्यार्थ—जें अशक्य, तें ( कांहीं केल्या ) शक्य होत नाहीं, व जें शक्य आहे, तें शक्यच राहतें( —तें कांहीं अशक्य होत नाहीं. ) गाडी पाण्यात चालत नाहीं व नौका जमिनीवर चालत नाहीं (पण या दैववादापेक्षा माणसाचा प्रयत्नवादच श्रेष्ठ ठरत आहे. कारण, हल्लीं पुष्पाधर पाण्यात चालणाऱ्या गाड्या व चाकें लावून जमिनीवर चालणाऱ्या नौका दोन्ही ( विशेषत युद्धात ) प्रत्यक्ष वापरण्यात येत आहेत. ) ००७

शार्दूलविक्रीडित

दैवेन प्रभुणा स्वय जगति यद्यस्य प्रमाणीकृत
तत्तस्योपनमेन्मनागपि महान्नैवाश्रयः कारणम् ॥
सर्वाशापरिपूरके जलधरे वर्षत्यपि प्रत्यह
सूक्ष्मा एव पतन्ति चातकमुखे द्वित्रा पयोबिन्दव. ॥५३

शार्दूलविक्रीडित

**दैवानें बलवान, स्वयेंच जगतीं नेमून जें ज्या दिलें,**
**कांहीं ना महदाश्रयें फळ, सदा तें नेमकें त्या मिळे ॥**
**सर्वाशा पुरवी असा घन जरी तो प्रत्यहीं वर्षील**
**पाण्याचे लवबिंदु चातकमुखीं दो-तीनची जातिल ५३**

गद्यार्थ—महासमर्थ अशा दैवानें, स्वयें जेवढें, ज्याच्यासाठीं योजून, नेमून, दिलें असेल, तें तेवढेंच त्याला मिळणार; (मोठ्याचा ) आश्रय घेतला तरी त्यामुळें यात कांहीं फरक पडणार नाहीं सर्वांच्या आशा तृप्त करणारा मेघ, रोज जरी वृष्टि करीत राहिला, तरी, ( वृक्षावरील ) चातकाच्या मुखामध्यें केवळ दोन तीन पाण्याचे सूक्ष्म बिंदूच काय ते पडतात. ००७

अनुष्टुभ्

कार्यार्थी भजते लोक यावत्कार्यं न सिध्यति ।
उत्तीर्णे च परे पारे नौकाया. किं प्रयोजनम् ? ॥ ५४ ॥

अनुष्टुभ्

**कार्यार्थ सेविती लोकां, साधतें जों न कार्य तें ।**
**पोंचला पैलतीरा त्या नौकेची जरुरी कुठें ? ॥ ५४**

गद्यार्थ—कोणी झालें तरी, आपलें काम जोंवर साधलें नाहीं, तावत्पर्यंतच, दुसऱ्याची सेवा करतें (त्याच्या कलानें वागतें, त्याची मैत्री सभाळून राहतें इत्यादि ) जो पैलतीराला जाऊन पोंचला त्याला ( त्यापुढें ) नौकेची आवश्यकता काय ? ( कामापुरते मामा हाच जगाचा नियम ! ) ००७

अनुष्टुभ्

उपाध्यायश्च वैद्यश्च ऋतुकाले वराङ्गना ।
दूतिका सूतिका चैव कार्यान्ते तृणवत्समाः ॥५५॥

अनुष्टुभ्

**वैद्य, दूती, उपाध्याय, सुंदरी ऋतुकाळिं ती ।**
**सुईण; कार्य संपे तें सर्व हीं तृण वाटतीं ॥ ५५ ॥**

किंवा आर्येंत

**ऋतुकाळीं प्रमदा ही, वैद्य, उपाध्याय, सूतिका, दूती ।**
**घेतां काम उरकुनी, तृणापरी तुच्छ हीं जना गमतीं**

गद्यार्थ—उपाध्याय, वैद्य, ऋतुकाळीं सुंदर स्त्री, दूती, सुईण हीं सर्व ( त्याचें काम अरोपर्यंत हवींहवींशीं असतात, ) त्यांचें काम सपलें कीं, सर्व समानतेनें तृणवत् निरुपयोगी वाटतात.

०००

अनुष्टुभ्

त्यजेदेकं कुलस्यार्थे ग्रामस्यार्थे कुलं त्यजेत् ।
ग्रामं जनपदस्यार्थे ह्यात्मार्थे पृथिवीं त्यजेत् ॥ ५६ ॥

अनुष्टुभ्

**त्यजी एका कुलासाठीं, ग्रामार्थ कुल सोडणें ।**
**त्यजी ग्रामहि देशार्थ—आत्मार्थ जग सोडणें ॥ ५६ ॥**

*गद्यार्थ*—(*लोकयत्नेतलें मूलभूत तत्त्व जें 'पुष्कळाचें पुष्कळ हित' त्याचें तपशीलवार विवरण.*) कुलाच्या हितासाठीं, (*आवश्यक पडल्यास,*) एका व्यक्तीचा त्याग करावा, गावाच्या हितासाठीं (आवश्यक ठरलें, तर,) एका कुलाचा त्याग करावा, सर्व देशाच्या हितासाठीं (आवश्यक असल्यास,) एका गावाचा त्याग करावा, आणि आत्मप्राप्तीसाठीं ( आत्मार्थे याचा अर्थ 'स्व' या एका व्यक्तीसाठीं नव्हे. ) (आवश्यक असेल तर) सर्व जगाचा त्याग करावा. ●●●

उपजाति

भार्यावियोगः स्वजनापवादः ऋणस्य शेषः कृपणस्य सेवा ।
दारिद्र्यकाले प्रियदर्शनं च विनाऽग्निना पञ्च दहन्ति कायम् ॥

शार्दूलविक्रीडित

**पत्नीचा घडणें वियोग, मिळणें आप्तात निंदाहि ती**
**देणें शेष ऋणातलें, नि कृपणा सेवाहि केली किती ॥**
**दारिद्र्यांतचि नेमकें प्रियजनें येवोनिया भेटणें**
**होती दाहक वस्तु पांचहि अशा, देहास अग्नीविणें ५७**

गद्यार्थ—पत्नीचा वियोग घडणें, आपल्या आप्ताकडूनच निंदा प्राप्त होणें, (*घेतलेल्या वा दिलेल्या*) ऋणापैकीं थोडेंसे शिल्लक राहणें, (आणि तें कधीं न फिटणें, ) कृपणाची सेवा करणें, (*व अर्थातच त्याचें चीज न होणें,*) आपल्याला अत्यंत दारिद्र्य आलें असता, नेमकं, आपल्या प्रियजनांनीं येऊन भेटणें ( ती अवस्था त्याच्या दृष्टीस पडणें, ) या पांच घटना, अग्नीवाचून, देहाला दाहक ठरतात. ●●●

अनुष्टुभ्

*अनिष्टादिष्टलाभेऽपि न गतिर्जायते शुभा ।*
यत्रास्ति विषसंसर्गोऽमृतं तदपि मृत्यवे ॥ ५८ ॥

अनुष्टुभ्

**अनिष्टांतुनि इष्टाची प्राप्ति ना शुभदायक ।**
**सुधाहि विषसंपर्के होतसे मृत्युकारक ॥ ५८ ॥**

*गद्यार्थ*—(*अनिष्ट,*) *वाईट वस्तूंतून (सुद्धा क्वचित् इष्ट) चांगली* वस्तु निघते, (पण एकदरींत) ती घटना शुभकारक होत नाहीं. जेथें विषाचा संपर्क घडतो, तेथें अमृतहि मृत्युकारकच होतें. ●●●

अनुष्टुभ्

येन प्राप्तेन लोकेऽस्मिन् न प्राप्यमवशिष्यते ।
तत्कृतं सुकृतं मन्ये शेषं कर्म विषूचिका ॥ ५९ ॥

उपजाति

**जें प्राप्त होतां जगतात कांहीं**
**प्राप्तव्य येथें उरणार नाहीं ॥**
**त्याची कृती ही सुकृती म्हणावी**
**दुजी कृती ही पटकी गणावी ॥ ५९ ॥**

*गद्यार्थ*—*जें प्राप्त झालें असता, मिळवावयाचें, असें कांहीं* जगात रहात नाहीं, तें, (किंवा त्यासाठीं केलेलें कार्य,) हेंच काय तें *सुकार्य समजावें, बाकी सर्व इतर कृति, ही पटकीच्या रोगा* प्रमाणें ( घाणेरडी व प्राणघातक ) समजावी. ●●●

अनुष्टुभ्

विषस्य विषयाणां च दृश्यते महदन्तरम् ।
उपभुक्तं विषं हन्ति विषयाः स्मरणादपि ॥ ६० ॥

रथोद्धता

**हो विषांत विषयात नित्यसें**
**थोर अंतर कितीतरी वसे ॥**
**मारितें विष नरास सेवनें**
**मारिती विषय, मात्र चिन्तनें ॥ ६० ॥**

गद्यार्थ—विष, आणि, विषय, यांच्यात ( *या शब्दात जरी* एक 'य' चाच केवळ भेद असला तरी ) फार मोठें अंतर आहे. विष हें, *तें प्रत्यक्ष कुणी खाल्लें, तरच त्याला मारतें, पण,* विषय हे, नुसतें त्यांचें चिंतन केल्यानें सुद्धा मारतात. ●●●

अनुष्टुभ

पुराणान्ते श्मशानान्ते मैथुनान्ते च या मति ।
सा मति सर्वदा चेत्स्यात्को न मुच्येत बन्धनात् ? ॥६१॥

अनुष्टुभ्

**पुराणान्तीं स्मशानान्तीं, मैथुनान्तीं जसें मन ।**
**नित्य तें टिकतां कोण न सुटे बंधनांतुन ? ॥ ६१ ॥**

( किंवा ) उपजाति

**होई नरा, ऐकुनिया पुराण**
**विरक्ति जी, पाहुनिया स्मशान ॥**
**वा मैथुनान्तीं, जर ती टिकेल**
**बंधातुनी कोण न हो सुटेल ? ॥ ६१ ॥**

गद्यार्थ— पुराणश्रवण केल्यानतर, स्मशानातले मृत्यु सत्कार पाहिल्यानतर, किंवा मैथुन सपल्यानतर, (जगातल्या इतर गोष्टींविषयीं ) जी एक विरक्तिमय वृत्ति, मनात उत्पन्न होते,-ती वृत्ति जर कायमची टिकेल, तर या ससाराच्या सर्व बधनांतून कोण मुक्त होणार नाहीं ?

उपजाति

वने रणे शत्रुजनाग्निमध्ये
महार्णवे पर्वतमस्तके वा ॥
सुप्तं प्रमत्तं विषमस्थितं वा
रक्षन्ति पुण्यानि पुराकृतानि ॥ ६२ ॥

उपजाति

**वनीं रणीं, शत्रु नि अग्नि यांत**
**महार्णवीं दुर्गम पर्वतात ॥**
**निद्रिस्त, मोहान्ध, नि संकटस्थ**
**यां पूर्वपुण्ये जगिं रक्षितात ॥ ६२॥**

गद्यार्थ—अरण्यात, रणांगणात, शत्रुसमुदायात, अग्नीत, महासागरात, किंवा दुर्गम पर्वतात, झोपलेल्याला, मोहान्धाला, सकटग्रस्ताला पूर्वपुण्य रक्षितात

शार्दूलविक्रीडित

को लाभो ? गुणिसङ्गमः ; किमसुखं ? प्राज्ञेतरैः सङ्गतिः ,
का हानिः ? समये च्युतिर्निपुणता का ? धर्मतत्त्वे रतिः ॥
कः शूरो ? विजितेन्द्रियः , प्रियतमा का ? ऽनुव्रता; किं धनं ?
विद्या ; किं सुखमप्रवासगमनं राज्यं किमाज्ञाफलम् ॥६३॥

आर्या

**लाभ खरा ? गुणिसंगमः**
**दुःख खरें ? अज्ञ-मूढ-सह-वसति ।**
**हानि खरी ? समयीं च्युति,**
**नैपुण्य खरेंच ? धर्मतत्त्वरति ॥**
**शूर ? जितेन्द्रिय, पत्नी ?**
**पतिव्रता ; धन खरें ? सुविद्या ही,**
**सुख ? अप्रवास, राज्यहि ?**
**आज्ञा जिथ पाळतात लोक महीं ॥ ६३ ॥**

गद्यार्थ—[ खरा ] लाभ कोणता ? गुणी माणसाची भेट, दुःख कोणतें ? मूर्खांची सगत, हानि कोणती ? नेमक्या वेळीं हातून चूक घडणं [ खरी ] निपुणता कोणती ? धर्मतत्त्वाची आवड असणें ही [ खरा ] शूर कोण ? ज्यानें स्वतःच्या इंद्रियावर विजय मिळविला आहे तो. [ खरी ] प्रिया कशी असावी ? पतिव्रता [ खरी ] संपत्ति कोणती ? विद्या, [ खरें ] सुख काय ? प्रवासाला न जाणें हें ! राजसत्ता [ खरी ] केव्हा म्हणता येईल ? जेव्हा प्रजा आपली आज्ञा पाळतात तेव्हा !

शार्दूलविक्रीडित

अग्राह्यं हृदयं यथैव वदनं यद्दर्पणान्तर्गतं
भावः पर्वतसूक्ष्ममार्गविषमः स्त्रीणां न विज्ञायते ॥
चित्तं पुष्करपत्रतोयतरलं विद्वद्भिराशंसितं
नारी नाम विषाङ्कुरैरिव लता दोषैः समं वर्धिता ॥ ६४ ॥

स्रग्धरा

**लाभेना दर्पणींचें मुख, हृदय तसें सापडेना स्त्रियांचें**
**अद्रींच्या वक्र मार्गांसमचि न कळती भाव कोणा तयांचे ॥**
**पाणी जें पद्मपत्रीं, तरल मन तिचें तेंवि, हें विज्ञदुक्त**
**वल्ली जैशी विषाची, तदि नित रमणी वाढते दोषयुक्त**

गद्यार्थ—आरशांत पडलेलें मुखाचें प्रतिबिंब, जितकें, हातीं लागणें कठीण, तितकेंच स्त्रियांचें हृदयहि सापडणें कठीण. डोंगरावरचे मार्ग जसे आकुंचित, वाकडेतिकडे, व गुंतागुंतीचे तद्वतच स्त्रीच्या भावना पुरुषाला अगम्य दुर्बोध, विद्वानांनीच सांगून टाकलें आहे, कीं, स्त्रीचें मन हें कमळपत्रावरच्या

पाण्याइतकें चचल असतें! थोडक्यात म्हणजे विषवल्लीच्या अकुराप्रमाणें स्त्रीहि अधिकाधिक दोषयुक्तच वाढत जाते. ●●●

आर्या

कमठकुलाचलदिग्गजफणिपतिविधृतापि
चलति वसुधेयम्।
प्रतिपन्नममलमनसा न चलति पुंसां युगान्तेऽपि ॥६५॥

आर्या

कूर्म, कुलाचल, दिग्गज,
शेष धरिति त्या, तरीहि जग हलतें।
स्वीकृत कार्य युगांतींहि
शुद्ध जनांचें कधींच ना चळते॥

गद्यार्थ—कूर्म, कुलपर्वत, दिग्गज व शेष इतक्यानी धरून ठेवली असतानाहि, पृथ्वी हलतच आहे. परंतु विशुद्धचरित थोरानीं, हातीं घेतलेलें कार्य, (व त्याविषयीं स्थिरनिश्चय असें त्याचें मन) हें, युगांतींसुद्धा चळत नाहीं—डगमगत नाहीं. ●●●

मन्दाक्रान्ता

दूरादर्थं घटयति नवं दूरतश्चापशब्द
त्यक्त्वा भूयो भवति निरत सत्सभारञ्जनेषु ॥
मन्द मन्द रचयति पद लोकचित्तानुवृत्त्या
काम मन्त्री कविरिव सदा खेदभारैरमुक्तः ॥६६॥

मन्दाक्रान्ता

साधी अर्था दुरूनिच नव्या; दुर्वचातें त्यजीतें
दूरी, जाई पुढति गढुनी सत्सभारजनांत॥
ठेवी सारीं हळुहळु पदें लोकचित्तानुसारें
राहे मंत्री कविसम सदा मुक्त ना खेदभारें ॥६६

गद्यार्थ—[राज्याचा मत्री आणि कवि याच्या कृतींतलें साम्य द्व्यर्थी शब्दानीं वर्णिलें आहे अशाच तऱ्हेचें चोर आणि कवि याच्या कृतींतलें साम्य "मद निक्षिपते पदानि" या प्रकरणीं दोन, श्लोक २८ मध्यें, आलें आहे.] मत्री हा दुरूनच [आपण नावानिराळा राहून] नवे नवे अर्थ [राज्यकार्यें, संज्यालें अर्थोत्पादक घटना] साधीन असतो, कवीहि नवे नवे अर्थ दूरदूरचे शब्द आणून साधीन असतो, मत्री व कवि दोघेहि अपशब्द दूर ठेवीत असतात. [संस्कृतमध्यें आणखी एक कोटि '–दूरत. चापशब्द–' म्हणजे मत्री टणत्कार दूर ठेवीत असतो, म्हणजे शक्य तों, लढाईचा प्रसग न आणता, शाततेनें कार्य साधतो.] दोघाचाहि विशेष प्रयत्न असतो तो सज्जनाच्या सभेचें रजन करण्यात, दोघेहि लोकाना रुचेल, खुपणार नाहीं अशा तऱ्हेनें हळूहळू पदें [मत्री—पावलें, कवि – शब्दयोजना] टाकीत असतात. शिरोपर मत्री, हा कवीप्रमाणेंच, केव्हाहि पहा कष्टभारापासून मुक्त कधींच नसतो इग्रजींत म्हटलें आहे कीं Genious is 10 per cent inspiration and 90 per cent perspiration यातलें ९०% घाम गाळणें हे या श्लोकातले कवीचे खेदभार होत.) ●●●

शार्दूलविक्रीडित

एको रागिषु राजते प्रियतमादेहार्धधारी हरो
नीरागेषु जनो विमुक्तललनासङ्गो न यस्मात्परः ॥
दुर्वारस्मरबाणपन्नगविषव्याविद्धमुग्धो जन
शेष कामविडम्बितान्न विषयान् भोक्तु न मोक्तु क्षम
॥ ६७ ॥

शार्दूलविक्रीडित

प्रेमी एकच शोभतो प्रियतमादेहार्धधारी हर
स्त्रीसंगातुनि मुक्त त्याहुनि कुणी नाहीं
विरागी नर॥
लोकीं या स्मरबाणसर्पसुविषें संमूढ बाकी जन
कामें वंचित यां शकेच विषयां भोगू न, सोडूंहि न ॥६७॥

गद्यार्थ—अत्यत (उत्कट,—आदर्श) प्रेमी, म्हणून, कोणी शोभत असेल, तर, तो एकच,—[अर्धनारीनटेश्वर स्वरूपात] स्वत चा अर्धा देहच पार्वतीरूप करून टाकलेला शकर हाच होय, याउलट, स्त्रीसगापासून अत्यत विमुक्त, असा, विरागीहि, त्याच्याहून अधिक कोणी सापडणार नाहीं. बाकीचे या जगातले सारे क्षुद्र लोक, मदनाच्या बाणरूपी सर्पाच्या विषानें समूढ झालेले, कामानें कपटासारखे उभे केलेले विषय, धड भोगूहि शकत नाहींत. व धड सोडूहि शकत नाहीं [आत्यतिक प्रेम काय किंवा आत्यंतिक त्याग काय, हीं दोन्हीं क्षुद्रांचीं कामें नव्हत. लोकोत्तर पुरुषच तीं करूं जाणे.] ●●●

स्रग्धरा

भक्ष्यं भुक्तं ततः किं ? कदशित मथवा
वासरान्ते ततः किं ?
कौपीनं वा ततः किं ? किमथ सितमह-
च्चाम्बरं वा ततः किम् ? ॥
एका भार्या ततः किं ? शतगुण गुणिता
कोटिरेका ततः किं ?
त्वेको भ्रान्तस्ततः किं करितुरगशतै—
र्वेष्टितो वा ततः किम् ? ॥ ६८ ॥

सुमंदारमाला

सुपक्वान्न खाल्लें तरी काय ? रात्रीं
शिळें खादले वा तरी काय तें ?
जरी एक कौपीन नेसूं तरी काय ?
शुभ्राम्बरें वा तरी काय तें ? ॥
करूं एक भार्या तरी काय ? किंवा
दहा अब्ज केल्या तरी काय तें ?
भ्रमूं एकटेही तरी काय ? लाखों
गजाश्वांसवें वा तरी काय ते ? ॥ ६८ ॥

गद्यार्थ—मोठीं पक्वान्नें खाल्लीं तरी काय, किंवा रात्रीं काहीं तरी शिळेंपाकें खाल्लें तरी काय ? लंगोटी नेसू तरी काय, किंवा मोठें शुभ्र वस्त्र धारण केलें तरी काय ? एक बायको केली तरी काय किंवा अनेक कोटि केल्या तरी काय ? एकट्यानें भटकलें तरी काय, किंवा भोंवतीं शेंकडों हत्ती घोडे घेऊन मोठे मिरवीत गेलें तरी काय ? (या सर्वच गोष्टी, वास्तविकपणें, इतक्या क्षुद्र आहेत कीं, यात तर आणि तम मानणें हें क्षुद्रांचेंच काम आहे. या दोन्हींना तुच्छ मानण्याइतकें किंवा समभावें पाहण्याइतकें मन निःसंग केलें पाहिजे व या सर्वांच्या पुढें काय (ततः किम् ?) याचा माणसानें विचार केला पाहिजे. तो मात्र कोणीच करीत नाहीं.) •••

वसंततिलका

वर्णं सितं शिरसि वीक्ष्य शिरोरुहाणां
स्थानं जरापरिभवस्य यदेव पुंसाम् ॥
आरोपितास्थिशकलं परिहृत्य यान्ति
चण्डालकूपमिव दूरतरं तरुण्यः ॥ ६९ ॥

वसंततिलका

पाहून वर्ण शिरिं शुभ्र शिरोरुहांचा
जेथें पराभव जरा करिते नरांचा ॥
टाकून जाइ दुरि त्या तरुणी; न थांबे
चांडालकूपसम; जीवर अस्थि लोंबे ६९

गद्यार्थ—माणसाच्या डोक्यावरील ( पिकलेल्या ) केसांचा पांढरा रंग पाहून —, कीं, जें ( धवल मस्तक ) हें वार्धक्यानें माणसाच्या केलेल्या पराभवाचें स्थानच जणूं—(ही अस्पृश्यांची विहीर असे दर्शविण्यासाठीं प्राचीन काळीं, त्या विहिरीच्या वर एक हाडूक टांगीत असत असे दिसतें.) वर हाडूक टांगलेल्या चांडालाच्या विहिरीला, टाळून, ( त्रैवर्णिक जसे दूर जातात, ) तद्वत्, तरुणी त्या पुरुषाला टाळून दूर जातात. •••

वसंततिलका

सिंहो बली द्विरदसूकरमांसभोजी
संवत्सरेण रतिमेति किलैकवारम् ॥
पारावतः खरशिलाकणमात्रभोजी
कामी भवत्यनुदिनं वद कोऽत्र हेतुः ? ॥ ७० ॥

वसंततिलका

मोठा बलिष्ठ हरि, जो गजमांस खातो
वर्षांतुनी रति करी कधि एकदां तो ॥
हा पारवा जरि शिलाकण खात राहे
कामीच नित्य तरिही, वद कां असें हें ? ॥ ७०

गद्यार्थ—बलवान् सिंह हा (नित्य) हत्ती डुक्कर वगैरे प्राण्यांचे मांस खातो, तरी, कामवश होऊन रतिक्रीडा तो, वर्षांतून ( क्वचित् एखादे वेळींच, करीत असेल नसेल. पण पारवा पहावा, तर बारीक बारीक दगडाचे खडे खात असूनहि प्रत्यहीं कामी असतो हें असें का असावें सांगा ! ( कामविकाराला केवळ अन्न हेंच एकमेव उत्तेजक कारण नसावें इतकें निश्चित.) •••

उपजाति

" किं वाससा ? " तत्र विचारणीयं—
" वासः प्रधानं खलु योग्यतायाः " ॥
पीताम्बरं वीक्ष्य ददौ स्वकन्यां
दिगम्बरं वीक्ष्य विषं समुद्रः ॥ ७१ ॥

शार्दूलविक्रीडित

"वस्त्रांशीं मनुजास काय करणें ?"
हा प्रश्न जो कानिं ये
त्याचें उत्तर कीं, "महत्त्व मनुजा
दे वस्त्रची निश्चयें" ॥
विष्णूचें बघुनी सुवस्त्रचि, तया
कन्या दिली सागरें ।
पाहोनीच दिगंबरत्व, विष हो
त्या शंकराला दिलें ! ॥ ७१ ॥

गद्यार्थ—"माणसाच्या वस्त्राना काय महत्त्व आहे ?" (असा केव्हा केव्हा, प्रश्न उपस्थित केला जातो,) त्याला उत्तर हेंच, कीं, (पुष्कळदा) वस्त्र हेंच माणसाची योग्यता ठरविण्यात मुख्य साधन असतें (एक नूर आदमी...दसनूर कपडा; Apparel oft proclaims the man (शेक्सपीयर,) उदाहरणार्थ—विष्णूचें सुदर पीतांबर पाहून, समुद्रानें, आपली कन्या, (लक्ष्मी) त्याला दिली, आणि, शंकराचा दिगंबर (अवतार) पाहून (त्याच समुद्रानें,) त्याला विष (हालाहल) दिलें. [समुद्रमथनाच्या प्रसंगीं.] ●●●

उपजाति

निर्वाणदीपे किमु तैलदानं ?
चौरे गते वा किमु सावधानम् ? ॥
वयोगते किं वनिताविलासः ?
पयोगते किं खलु सेतुबन्धः ? ॥ ७२ ॥

शार्दूलविक्रीडित

जाता दीप विझून, तेल भरणें
होई न कां व्यर्थ तें ?
चोरीमागुनची न काय विफला
ती दक्षता वाटते ? ॥
स्त्रीचे निष्फळ ते विलास न च का
तारुण्य गेल्यावर ?
जाता पूरहि, पूल फोल न च का
त्या शुष्क पात्रावर ? ॥ ७२ ॥

गद्यार्थ—दिवा विझून गेल्यावर मग, त्यात तेल भरणें, व्यर्थ नव्हे कां ? चोरी होऊन गेल्यावर, मग, सावधगिरी बाळगण्याचा, काय उपयोग ? तारुण्य निघून गल्यावर, स्त्रीचे विलास काय कामाचे ? पूर ओसरून गेल्यावर (त्या रोडावलेल्या पात्रावर) पूल बांधणें सयुक्तिक आहे काय ? (योग्य ती गोष्ट योग्य त्या वेळींच झाली पाहिजे. "बैल गेला नि झोपा केला," असें होणें, केव्हाहि इष्ट नव्हे.) ●●●

वसंततिलका

वार्ता च कौतुकवती विमला च विद्या
लोकोत्तरः परिमलश्च कुरङ्गनाभेः ॥
तैलस्य बिन्दुरिव वारिणि दुर्निवार—
मेतत्त्रयं प्रसरति स्वयमेव लोके ॥ ७३ ॥

वसंततिलका

वार्ताहि अद्भुत, तसेंच विशुद्ध ज्ञान
सौरभ्य दुर्मिळ निघे मृगनाभितून ॥
जें तैलबिंदु अनिवार, जलांत एक
हीं तीनही पसरिती जगिं आपसूक ॥ ७३ ॥

गद्यार्थ—लोकाना (काहीं विशेष) कौतुक वाटावयाला लावील, अशी वार्ता, विशुद्ध ज्ञान, आणि, मृगाच्या नाभींतला कस्तूरीचा अपूर्व सुगंध, हीं तिन्ही, पाण्यावर टाकलेला तेलाचा थेंब जसा अनिवार पसरतो, तशीं आपोआपच प्रसार पावतात. ●●●

अनुष्टुभ्

व्याघ्रे च महदालस्यं सर्पे चैव महद्भयम् ।
पिशुने चैव दारिद्र्यं तेन तिष्ठन्ति जन्तवः ॥ ७४ ॥

इन्द्रवज्रा

वाघामधें आळस होइ फार
सर्पास वाटे नरभीति थोर ॥
दुष्टांत दारिद्र्य वसे म्हणून—
प्राणी जगीं राहति हे टिकून ॥ ७४ ॥

गद्यार्थ—वाघात फार आळस असतो, सर्प फार भितरा असतो, आणि चुगलीखोर दुष्ट माणसे (प्राय) दरिद्री असतात, (हेंच बरें आहे.) त्यामुळेंच जगात प्राणिमात्र टिकून आहेत. (वाघ अत्यंत उद्योगी असता, सर्प अत्यंत धीट असता, व दुष्ट माणसें आर्थिक दृष्ट्या सर्वसमर्थ असतीं, तर काय अनर्थ झाला असता, त्याची कल्पना करून पहावी.) ●●●

अनुष्टुभ्

वचस्तत्रैव वक्तव्य यत्रोक्त सफल भवेत् ।
स्थायीभवति चात्यन्त रङ्गो धूतपटे यथा ॥ ७५ ॥

अनुष्टुभ

तेथेंच शब्द टाकावा होईं सफल तो जिथें ।
रग पक्का वसे जेन्हां वस्त्र धूत असेल ते ॥७५॥

गद्यार्थ—ज्या ठिकाणीं शब्द टाकला असतां, तो सफल होण्याची शक्यता असेल, तेथेंच शब्द टाकावा धूत वस्त्रावर उपयोजिला, तरच, रग पक्का होणें शक्य असतें. ( यासाठींच रगशास्त्रात, वस्त्रात वस्त्रवस्तुविरहित इतर जी काहीं घाण किंवा *खळ पदार्थ असतील ते रगविण्यापूर्वी धुऊन काढून टाकावे*, असें सांगितलें आहे. ) ००५

अनुष्टुभ्

पात्रापात्रविवेकोऽस्ति धेनुपन्नगयोरव ।
तृणात्सजायते क्षीर क्षीरात्सजायते विषम् ॥७६॥

अनुष्टुभ्

पात्र धेनु, अपात्राला सर्प, दृष्टात यापरी ॥
तृणाचें ती करी दूध दुधाचें विष तो करी ॥७६॥

*गद्यार्थ—पात्राला आणि अपात्राला, नीट विचार करून* दृष्टांत देणें असेल, तर, पात्राला धेनु आणि अपात्राला सर्प म्हणणेंच युक्त ठरेल, गाईला गवत चारलें तर ती त्याचें दूध करते, आणि, सर्पाला दूध पाजलें, तरी, त्याचेंहि तो विष करून सोडतो. ००५

अनुष्टुभ्

ऋषीणा च नदीना च कुलाना च महात्मनाम् ।
प्रभवो नाधिगन्तव्य स्त्रीणां दुश्चरितस्य च ॥७७॥

अनुष्टुभ्

ऋषी, नदी, महात्म्याचें कुल, स्त्रीदुश्चरित्र तें ।
मूळ यांचें न शोधावें, शोधुनी व्यर्थ वाटतें ॥७७॥

*गद्यार्थ—ऋषि, नद्या, महात्म्याचें कुल, व स्त्रीचें दुर्वर्तन* यांचें मूळ शोधण्याचे व तें जाणून घेण्याचे मानगडींत पडू नये ( तो शोध अनेक, विविध, कारणानीं व्यर्थ ठरावयाचा. काहीं ठिकाणीं त्याचा ( कुळाचा वगैरे ) शोध प्राचीन इतिहासात हस होतो मोठे ऋषि, महात्मे, नद्या यांचें मूळ, उगम, इतके क्षुद्र असतात, कीं, त्यामुळें, त्याच्याविषयींचा आजचा आदर नष्ट होण्याचा संभव फार, केव्हा केव्हा ते नुसते क्षुद्रच नव्हे तर प्रत्यक्ष पापोद्भव सुद्धा असतात स्त्रीच्या दुश्चरिताचा शोध घेता इतर अनेक लफडीं उघडकीस येऊन मूळ प्रश्न आणखी बिकट होतो. ) ०००

आर्या

अनवसरे गुणवानपि हृदयादवतार्यते स्त्रिया हार ।
पश्य शलाकाऽवसरे भूपेनापि प्रसार्यते स्वकर ॥७८॥

आर्या

गुणवानही, अवेळीं, स्त्री हृदयाहुनि करी दुरी हार ।
वेळीं काडीसाठीं राजाही लाववीतसे स्वकर ॥७८॥

गद्यार्थ—( प्रत्येक कार्याला योग्य व अयोग्य वेळ असते. अयोग्य वेळीं मोलाच्या वस्तूचें मूल्य नष्ट होतें, तर, योग्य वेळीं क्षुद्र वस्तूलाहि मोल चढतें. ) ( *गुणवान्* शब्दावर कोटि, एक *अर्थ—गुणी, गुणयुक्त, मौल्यवान, दुसरा अर्थ गुण = तत्*, धागा, यानीं युक्त; हारात दोरा, व काडींत तंतू ) त्याची, ( अगावर धारण करण्याची,) योग्य वेळ नसेल, तर स्त्रीकडून 'गुणवान्' असा ( रत्न ) हार सुद्धां, ( गळ्यातून ) हृदयापासून, उतरून दूर केला जातो उलट काडीच्या वेळीं ( म्हणजे जेवण झाल्यावर दात कोरून स्वच्छ करण्याच्या वेळीं ) राजाकडून सुद्धा, हात पसरून, (लाब करून, इकडे तिकडे ) जवळपास हाताला एखादी ( क्षुद्र मोलाची पण 'गुणवान्' ) काडी लागते काय, याचा शोध घेतला जातो. ०००

उपजाति

दारेषु किंचित्स्वजनेषु किंचिद्-
गोप्य वयस्येषु सुतेषु किंन्चित् ॥
युक्त न वा युक्तमिद विचिन्त्य
वदेद्विपश्चिन्महतोऽनुरोधात् ॥ ७९ ॥

उपजाति

पत्नी, मुलें, आप्त नि मित्र याहीं—
पासून हो गोप्य असेच काहीं ॥
थोरापरी युक्त अयुक्त सारें
विवेचुनी नीटचि बोल तूं रे ॥ ७९ ॥

गद्यार्थ—( सर्वांच्यापाशीं, सर्व गोष्टी उघड करून बोलणें, कोणालाच योग्य नसतें. ) बायकोपासून थोडेंसें, आतापासून थोडेंसें, मित्रापासून थोडेंसें, मुलापासून थोडेंसें, गुप्त ठेवणें (माणसाला आवश्यक असतें. ) थोर माणसाचें अनुकरण करून योग्य, अयोग्य याचा विचार करूनच, माणसानें बोलावें. ●●●

उपजाति

राष्ट्रस्य चित्तं कृपणस्य वित्तं
मनोरथं दुर्जनमानुषाणाम् ॥
स्त्रियश्चरित्रं पुरुषस्य भाग्यं
देवो न जानाति कुतो मनुष्यः ॥ ८० ॥

आर्या

**राष्ट्राच्या हृदयाचें वैचित्र्य नि गुप्त वित्त कृपणाचें**
**उलटे जगाहुनी ते नीच मनोरथहि दुष्ट कुजनांचे ॥**
**स्त्रीचें सकल चरित्र नि भावी सद्भाग्य गूढ, पुरुषाचें**
**देवालाहि न कळतें, तर मग मनुजास फोडुनी सांचें ? ॥८०॥**

गद्यार्थ— राष्ट्राचें मन ( मोठमोठे देश, पुढारी बदलले, कीं झपट मतें बदलतात, इत्यादि त्या मनाचें वैचित्र्य. ) — चिक्कू माणसाचें वित्त, ( म्हणजे तें किती असेल आणि कुठे कुठें ठेवलें असेल हें, ) दुष्ट माणसांचे मनोरथ, ( म्हणजे ते कोणत्या थराला पोंचतील तें, ) स्त्रीचें चरित्र ( विशेषत्वें कामचरित, कित्येक दुराचरणी स्त्रिया परमेश्वरालासुद्धा फसवितील इतक्या, वरून सोज्वळ दिसतात, याशिवाय चांगल्या अर्थानेंहि स्त्रीहृदयाची गति केव्हा कुठें कशी वळेल ) हें ( Inscrutable are the ways of a woman's heart ) पुरुषाचें भाग्य ( तें केव्हा कसें कुठे उदित होईल हें ) प्रत्यक्ष परमेश्वराला सुद्धां कळत नाहीं, मग माणसाला कुठून कळणार ? ●●●

आर्या

ऋजुता यदि लघिमानं गरिमाणं वक्रतैव तनुते चेत् ।
छन्दःशास्त्र इवास्मिल्लोके सरलः सखे किमसि ? ॥८१॥

आर्या

**सरलत्व जेथ लघुता, व्यक्त करी वक्रताच गुरुतेसी ।**
**छंदःशास्त्रापरि जगीं मित्रा, तू कां फुका सरल असती ?**

गद्यार्थ—( हल्लीं छंद शास्त्रात लघु गुरु अक्षरें दर्शविण्यासाठीं आपण ⌣ व — ( वक्र व सरल रेषा ) अनुक्रम वापरतों. पण पूर्वी संस्कृतमध्ये — ( सरल रेषा ) ही लघु; व ⌣ ( वक्र रेषा ) ही गुरु अक्षर दर्शविण्यासाठीं वापरीत होते असें दिसतें, त्यावर हा श्लोक आधारलेला असल्यानें आज हा उलट्या अर्थाचा भासेल. ) मित्रा ! अरे छंदःशास्त्रात सरलत्वानें ( सरळ रेषेनें ) लघुता ( ऱ्हस्वत्व, हलकटपणा ); व वक्रतेनें ( वक्र रेषेनें ) गुरुता ( दीर्घत्व; मोठेपणा ) जर दर्शविला जातो, तर त्या शास्त्रासारख्याच या जगात ( जगातहि सरळ वागून हलकेपणा पदरीं येतो व वक्र वर्तनाचेच मोठे ठरतात. ) तू तरी सरल का वागतोस ? ●●●

शिखरिणी

पयोधेः सर्वस्वं शिरसि धृतमन्यैर्नृपगणैः
पणो यस्य क्षोणी चतुरुदधिसीमावधिरभूत् ॥
स एवायं दैवाच्छबरवनितापाणिपतितो
मणिर्मेषग्रीवादिगुणगुणबद्धो विहरति ! ॥ ८२ ॥

आर्या

**सर्वस्वचि उदधींचें, नृपगण जें रत्न मस्तकीं ठेवी**
**चतुरुदधिवलय पृथ्वीइतुकेंही मोल ज्या सहज येई ॥**
**तें रत्न भिल्लिणीच्या हातीं पडतां, दुहेरि दोऱ्यांत**
**ओवुनि बद्ध, विहरतें, दैवें मेंढ्याचियाच कंठांत ॥८२॥**

गद्यार्थ —समुद्राचें जणु सर्वस्व, व ज्याचें मोल चारी समुद्रांनीं वलयांकित पृथ्वीइतकें सहजीं होईल, व जें अनेक राजांनीं आपल्या मस्तकावर धारण केलें, असे रत्न, शबर स्त्रीच्या ( जिला त्याचें मूल्य काहींच समजत नाहीं ) हातीं दुर्दैवानें पडल्यानें, तिनें तें चांगलें दुहेरी दोऱ्यात ओवून मेंढ्याच्या गळ्यात बांधलें, त्याठिकाणीं आता बिचारें डुलत आहे. ●●●

वंशस्थ

दरिद्रता धीरतया विराजते कुरूपता शीलतया विराजते ।
कुभोजनं चोष्णतया विराजते कुवस्त्रता शुभ्रतया विराजते ॥

उपजाति

**दारिद्र्यही धैर्य धरून साजे कुरूपही शीलगुणें विराजे**
**कुभोजना ये रुचि उष्णतेनें कुवस्त्रही सुंदर शुभ्रतेनें ॥**

किंवा हेंच शार्दूलविक्रीडितात —

**दारिद्र्यांत धरूं सुधैर्य तर तें दारिद्र्यही साजिरें**
**देई सुंदरता कुरूपहि नरा सच्छील त्याच खरें ॥**
**गोडी एक विशेष, उष्ण असतां, येई कदन्नासही**
**शुभ्र स्वच्छपणाच सुंदरपणा देई कुवस्त्रासही ॥८३॥**

गद्यार्थ—नीट धैर्य धरून ( तदुद्भव सर्व आपत्तींना ताड दिलें, तर ) दारिद्र्यसुद्धां साजिरें होतें; ( ईश्वरदत्त ) कुरूपता, सच्छील वर्तनानें सुंदर करता येते, अन्न वाईट असलें तरी तें (ताजें, पहिल्या वाफेचें,) उष्ण, असेल, तर त्यालाहि उत्तम रुचि येते, वस्त्र वाईट असलें, तरी, तें शुभ्र, (स्वच्छ,) असलें म्हणजे शोभून दिसतें ( याची अर्थांतच, भेदरट श्रीमती, दुःशील सौंदर्य, शिळेंपाकें पक्वान्न, व घाणेरडें सुवस्त्र यांशीं तुलना करावयाची.)

●●●

अनुष्टुभ्

अन्तस्तिमिरनाशाय शब्दबोधो निरर्थकः ।
न नश्यति तमो नाम कृतया दीपवार्तया ॥ ८४ ॥

अनुष्टुभ्

**नाशाया तम आंतील शब्दांनीं व्यर्थ सांगुन ॥**
**तम होईल कां नष्ट 'दिवा' हा शब्द घोकुन? ॥८४॥**

गद्यार्थ—हृदयातला अंधार नष्ट करण्याचें कामीं शाब्दिक बोध व्यर्थ. ( प्रत्यक्ष उदाहरण, कृति हीच अवश्य. ) नुसत्या दिव्याच्या गोष्टी बोलून अंधार नष्ट होईल का ?

●●●

<u>पाणपोईवरची तरुणी</u> ( प्रपापालिका )

हा व पुढील दोन श्लोक, पूर्वकालीं पांथस्थासाठीं पाणपोया असत. तेथें पाणी पाजण्यासाठीं केव्हा केव्हां तरुण स्त्रिया असत, सावलीला येऊन व पाणी पिऊन विसावलेले, पांथस्थ नुसते सुखावतच नसत, तर, त्या तरुणींशीं प्रेमाचे चाळेहि करीत, व, अनेक वेळां, त्याहि, त्यांना साथ देत, याविषयींचे आहेत

शार्दूलविक्रीडित

भो पान्थ ! त्वरितोऽसि, तिष्ठ निमिषं, किञ्चिद्वदामो वयं
मार्गोऽयं पुरतो द्विधा खलु भवेद्वामेन नो गम्यताम् ॥
तत्रास्ते सहकारकोमलतरोर्मूले प्रपापालिका
तस्या लोचनवागुरानिपतितो किं त्वं पुनर्यास्यसि ! ८५

शार्दूलविक्रीडित

**पांथा ! थांबुनि ऐक, अल्प वदतों, जाऊं नको तूं त्वरें**
**वाटा जैं फुटतील दोन पुढतीं, जा वाम मार्गें न रे ॥**
**आहे त्या तिथ कोमलाम्रतळिं जी मस्त प्रपापालिका**
**जाल्यांतून तिच्या कटाक्षकृत त्या, तूं मुक्त होशील का ? ॥ ८५ ॥**

*गद्यार्थ—( कोणीतरी, पांथस्थाला प्रपापालिकेपासून सावध राहण्यास सांगत आहे.— )* हे पांथा ! घाईंत आहेस ( खरा; पण ) क्षणभर थांब; आम्ही ( तुला ) थोडेंसे सांगत आहों (तें ऐक.) ह्या मार्गांत पुढें (द्विभागून) दोन वाटा फुटतील; त्यातल्या वाम (डाव्या, अनीतीच्या) मार्गानें जाऊं नकोस, तेथें कोवळ्या आंब्याच्या झाडाखाली एक ( मत्तयौवना ) प्रपापालिका आहे; तिच्या कटाक्षाच्या जाळ्यात, एकदां का तूं पडलास, तर, पुन्हा कसला सुटून जाणार आहेस ?

●●●

*( पण असल्या गोड विषयापासून सावध कोण होणार ! तो पांथस्थ नेमका त्याच ' वाम ' मार्गाकडे वळला, तेव्हांचा पाणपोईवरचा संवाद. )*

शार्दूलविक्रीडित

" कस्येयं तरणि प्रपा ? " " पथिक नः ; "
" किं पेयमस्याः ? " " पयः "
" किं धेनोरुत माहिषं ! " " बधिर रे
वारं " " कथं कथ्यताम्— ॥
सोमो वाऽयं शनैश्चरो ? "ऽ"मृतमिदं "
" तत्तेऽधरे दृश्यते "
" श्रीमत्पान्थ ! विलाससुंदर सखे ! यद्रोचते
तत्पिब ! " ॥ ८६

स्रग्धरा

**" कोणाची पाणपोई ! " " ममचि, " " इथ पिण्या**
**" काय ? " देतें पयातें; "**
**" गाईचें कां म्हशीचें ? " " बधिर ! न च तसें,**
**वार सर्वांस देतें; " ॥**
**" सांगे तो सोम किंवा शनि ? " " अमृत, " " तुझ्या**
**गोड ओष्ठीं दिसे तें ! "**
**" घेई यारे पिऊनी, सुचतुर पथिका !**
**जें तुला गोड वाटे ! "**

गद्यार्थ—( अशा द्वयर्थी शब्दाच्या श्लोकाच्या भाषांतरात मूळ द्वयर्थी संस्कृत शब्द, तसेच ठेवावे लागतात; एवढेंच काय पण या श्लोकात आठवड्याचे वार असा अर्थ साधण्यासाठीं मूळ संस्कृत कवीलाच वार् ( पाणी ) याचें अनेकवचन वार. करून दोन अर्थ साधावे लागले, तेंहि मराठींत तसेच घ्यावें लागलें आहे.) पाथ विचारतो, " हे तरुणि! ही पाणपोई कोणाची?" ती म्हणते, " पाथा! ही आमचीच आहे. " तो विचारतो " इथें प्यायला काय?" ती म्हणते " पय " ( आता पयाचे अर्थ दोन; एक पाणी, व दुसरा दूध; हा पाथ मुद्दाम वेड घेऊन पेडगावाला जाऊन विचारतो– ) " दूध कोणाचें गाईचें कीं म्हशीचें?" ती म्हणते, " अरे वहिन्या! मी वार ( पाणी ) देतें, " तो म्हणतो " ( अस, एकेका पाथाला एकेक वार तू नेमून देतेस, ) मग मला सांग सोमवार कीं शनिवार?" ती म्हणते, " ( काय भलभलते अर्थ लावतोस रे? अरे मी ) हें अमृत ( पाणी ) ( देतें ) " तो म्हणतो— " वा; तें तर तुझ्या अधरात दिसत आहे!" इतकें संभाषण झाल्यावर निरुत्तर झालेली व पाथाच्या चातुर्यावर प्रसन्न झालेली प्रपापालिका म्हणते—" हे विलाससुंदर ( रसिक ) सख्या! ( मला तू हरवलेंस. ) आता जें तुला रुचत असेल तें पिऊन घे!"

( इतकें झाल्यावर तीं एकमेकावर अनुरक्त झालीं अगदीं प्राणप्रिय झालीं मग पुढें तो पाथ मार्गाला लागण्यापूर्वी त्याचा संवाद होतो तो असा— ) ●●●

शार्दूलविक्रीडित

" स्मर्तव्या वयमिन्दुसुन्दरमुखि! प्रस्तावतोऽपि त्वया "
" स्यादेव यदि नाथ! दास्यति विधिर्जातिस्मरत्वं मम! " ॥
" एकस्मिन्नपि जन्मनि प्रियतमे! जातिस्मरत्वं कुतः? "
" प्राणाः पान्थ! समं त्वयैव चलिताः, काऽद्यापि जन्मैकता?" ॥ ८७ ॥

शार्दूलविक्रीडित

" ठेवी मत्स्मृति इन्दुसुंदरमुखी! वार्ताप्रसंगीं कधीं!"
" होणें तें, जर नाथ! देइल मला जातिस्मरत्वा विधि! " ॥
" एक्या जन्मिंच कां अशी प्रियतमे! जातिस्मराची कथा? "
" गेले प्राण तुझ्यासवें, प्रिय! अता कोठून जन्मैकता? ॥८७॥

गद्यार्थ—( ८६ व्या श्लोकात भाषणचातुर्यानें पाथानें प्रपापालिकेला निरुत्तर केलें. या श्लोकात ती त्याच्या वरचढ ठरली.) पाथ निरोप घेताना म्हणतो, " हे चंद्रमुखि! आमची प्रसंगाप्रसंगानीं तरी आठवण ठेव." ती म्हणते " नाथ! आता मला, ब्रह्मदेव, जर जातिस्मरत्व ( पूर्वजन्मींचें आठवण्याची शक्ति ) देईल, तरच तें ( तुझी आठवण काढणें ) मला शक्य होईल!" पाथ विचारतो, " या एकाच जन्माविषयीं आपण बोलत असता, तू जातिस्मरत्वाचा ( पूर्वजन्मस्मृति ) काय प्रश्न उपस्थित केलास?" ती म्हणते, " पाथा! माझे प्राण तर तुझ्यासंगेंच निघून गेले! आता हा तोच एक जन्म चालू आहे असे कसें म्हणतोस?" ( तुला प्राण अर्पण केल्याबरोबर तो जन्म संपला. आता तुझी आठवण काढावयाची, म्हणजे पूर्वजन्मस्मृतीच नव्हे काय?) ●●●

अनुष्टुभ्

दीपो भक्षयते ध्वान्तं कज्जलं च प्रसूयते।
यदन्नं भक्षयेन्नित्यं जायते तादृशी प्रजा ॥ ८८ ॥

अनुष्टुभ्

अंधार खाउनी दीप काजळा जन्म देतसे।
जें अन्न सर्वदा खावें प्रजा त्यापरि होतसे॥८८॥

गद्यार्थ— दिवा हा अंधार खातो व काजळाला जन्म देतो! जसें अन्न नेहमीं खावें, तशी प्रजा होते. ( हें आहारशास्त्रालाहि बऱ्याच प्रमाणात मान्य आहे. ) ●●●

अनुष्टुभ्

ग्रासोद्गलितसिक्थस्य का हानिः करिणो भवेत्?।
पिपीलिका तु तेनैव सकुटुंबोपजीवति ॥ ८९ ॥

अनुष्टुभ्

खातांना, गळुनी लाळ, (भात) हत्तीला हानि कां घडे?।
कुटुंब परि मुंग्यांचें जगे त्यानेंहि बापुडे ॥ ८९ ॥

गद्यार्थ—घास चघळत असतां, हत्तीच्या तोंडातून गळणाऱ्या मेणचट रसानें, ( लाळेनें ) किंवा भाताच्या गोळ्यानें हत्तीची काय हानि घडणार आहे? पण त्या तेवढ्या अन्नावर, मुंग्यांचें एक कुटुंबचें कुटुंब बिचारें जगू शकतें. (अशाच रीतीनें, अतिश्रीमंतानीं, आपले नुसते खिसे झटकून टाकले, तरी त्यानें कित्येक गरिबाचे संसार चालतील, पण, तितकें तरी त्यानीं केलें पाहिजे ना!) ●●●

अनुष्टुभ्

काकस्य कति दन्ता? वा मेषस्याण्डे कियत्पलम्?।
गर्दभे कति रोमाणि? व्यर्थैषा तु विचारणा ॥ ९० ॥

अनुष्टुभ्

**कावळ्यास किती दांत? मेषाण्डीं मांस वा किती?॥**
**गाढवास किती केंस? चौकश्या व्यर्थ वाटती ॥ ९० ॥**

गद्यार्थ—(शास्त्रीय जिज्ञासा म्हणून नव्हे, तर उगाचच) कावळ्याच्या चोचींत दात किती? मेंढ्याच्या अंडात मास किती? गाढवाच्या अंगावर केंस किती? असल्या चौकश्या व्यर्थ होत!

●●●

उपजाति

दिल्लीश्वरो वा जगदीश्वरो वा मनोरथान्पूरयितु समर्थः ॥
अन्यैर्नृपालैः परिदीयमानं शाकाय वा स्याल्लवणाय वा स्यात्॥

वसंततिलका

**दिल्लीश्वरांत अथवा जगदीश्वरांत**
**शक्ती असे मम मनोरथपूरणार्थ ॥**
**देती तुजे नृप जरी कुणिही कितीही**
**होईल शाकलवणापुरतेंच तेंही ॥९१॥**

गद्यार्थ—(जगन्नाथ पंडित दिल्लीश्वर अकबराचे पदरीं होता, व त्याला अकबराच्या दातृत्वाचा भलताच अभिमान! इतका कीं, एक दिल्लीश्वर, किंवा, एक जगदीश्वर काय ते दाते! बाकी सर्व राजे तुच्छ!) माझे मनोरथ पूर्ण करण्याचें सामर्थ्य केवळ एक दिल्लीश्वर किंवा दुसरा जगदीश्वर याच्यातच आहे! (इतर भिकार राजे देऊन देऊन देणार काय!) इतर नृपानीं कितीहि दिलें, तरी, तें, मला, फार फार तर शाक किंवा मीठ घेण्या पुरेसेंच असणार! (जगन्नाथाचे मनोरथ, अकबराची मुलगी लवंगी मिळविण्याचे होते;—त्याअर्थी मात्र जगन्नाथाचें म्हणणें खरें आहे; कारण, त्याला लवंगी देणें, हें, केवळ अकबर, किंवा, परमेश्वर करू शकत होते.)

●●●

भुजङ्गप्रयात

इयं सुस्तनी मस्तकन्यस्तकुम्भा कुसुम्भारुणं चारुचैलं दधाना॥
समस्तस्य लोकस्य चेतःप्रवृत्तिं गृहीत्वा घटे स्थाप्य यातीव भाति ॥९२॥

भुजङ्गप्रयात

**अहा! सुस्तनी ही धरी कुंभ डोई**
**सुवस्त्रें कुसुम्भापरी रक्त देहीं ॥**
**गमे, चित्तवृत्तीच साऱ्या जगाची**
**हरोनी, घटीं स्थापुनी, जाइ साची ॥९२॥**

गद्यार्थ—(लवंगी यवनीला पाहून म्हणा किंवा सहज रस्त्यातल्या एखाद्या तरुणीला पाहून, म्हणा, जगन्नाथ म्हणतो) मस्तकावर कुंभ घेतलेली, कुसुम्ब्याच्या फुलाप्रमाणें लाल रंगाचें सुंदर वस्त्र धारण केलेली, ही सुस्तनी, (आपल्या या सौंदर्यानें) उभ्या जगाचें हृदय हरण करून, व, तें त्या कुंभात घालूनच, घेऊन चालली आहे असं वाटतें!

●●●

वैतालीय

यवनी नवनीतकोमलाङ्गी शयनीये यदि नीयते कदाचित्॥
अवनीतलमेव साधु मन्ये न वनी माघवनी विलासहेतुः

साकी

**नवनीतापरि जिचीं सुकोमल अंगं, ऐशी यवनी—**
**भाग्यें जर कां कधिंकाळीं मी नेऊं शकलों शयनीं ॥**
**तर "तिजसंगें, अधिक बरा" मी "अवनीतलचि" म्हणेन**
**स्वर्गीच्या त्या इंद्रोपवनीं विलास करण्याहून ॥९३॥**

गद्यार्थ—(९१ व्या श्लोकात ज्या स्वतःच्या मनोरथाविषयीं "ते पूर्ण करण्यास फक्त दिल्लीश्वर किंवा जगदीश्वरच समर्थ होत" असें जगन्नाथ म्हणतो, ते मनोरथ, बहुधा हेच असावे.) (लवंगीला पाहून मिटक्या मारीत जगन्नाथ म्हणतो) नवनीता—इतक्या कोमल अवयवाची ही यवनी, मला, जर, कधींकाळीं, शयनात नेता आली, तर, मी (असा सुखोपभोग देणारा) पृथ्वीतळच, स्वर्गातल्या इंद्रोपवनात विलास करण्यापेक्षाहि अधिक गोड मानीन.

●●●

(आणि अखेर एका प्रसंगीं, आपल्या काव्यावर अकबर प्रसन्न झाल्याची संधि साधून, जगन्नाथानें त्याच्यापाशीं लवंगीची मागणी केली)—

भुजङ्गप्रयात

न याचे गजालिं न वा वाजिराजिं
न वित्तेषु चित्तं मदीयं कदाचित्॥
इयं सुस्तनी मस्तकन्यस्तकुम्भा
लवङ्गी कुरङ्गीदृगङ्गीकरोतु ॥ ९४ ॥

भुजंगप्रयात

गजाश्वावली याचितों मी न तूतें
न वित्तांत माझें कधीं चित्त होतें ॥
वरो ही मला सुस्तनी कुंभधारी
लवंगी कुरंगीपरी लोलनेत्री ॥ ९४ ॥

गद्यार्थ—( हे दिल्लीश्वरा ! ) मी तुझ्यापाशीं, मला अमुक इतके हत्ती दे, किंवा अमुक इतके घोडे दे, असे मागत नाहीं. आणि संपत्तींत माझें मन कधींच (गुतलेलें) नव्हतें. ( मी मागतों, ते इतकेंच, कीं ) ही जी सुस्तनी, कुरंगनयना लवंगी, डोक्यावर कुंभ घेऊन चाल्ली आहे, ती माझा अंगीकार करो. ●●●

उपेन्द्रवज्रा

दिवानिशं वारिणि कण्ठदघ्ने दिवाकराराधनमाचरन्ती ॥
अवाप्तये स्त्रीमुखचारुतायास्तपश्चरत्यम्बुजपङ्क्तिरेषा॥९५॥

उपजाति

आकंठ पाण्यात अहर्निशीं ती
सूर्यास पूजीत जणूं स्वचित्तीं ॥
स्त्रीवक्त्रसौंदर्य मिळावयातें
सरोजपंक्ती तप आचरीते ! ॥ ९५ ॥

गद्यार्थ—( कमलाची वेल तिच्या गळ्यापर्यंत पाण्यात असते, तिचें मुख ( कमल ) तेवढें पाण्याबाहेर, व तेंहि नर सूर्याभिमुख असतें, यावर उत्प्रेक्षा— ) गळ्याइतक्या पाण्यात रात्रदिवस बुडून "स्त्रीच्या मुखाइतकें सौंदर्य आम्हाला दे," अशी, सूर्याची आराधना करीत, जणू काय, ही कमलपंक्ति तप आचरीत आहे. ( उपमानस्यापि सखे प्रत्युपमानं मुखं स्त्रीणाम् ! ) ●●●

आर्या

काश्मीरेण तुषारक्षितिधरसयोगकुतुकमनुभूय ।
लब्धं स्तनसङ्गात्ते कनकाद्रिस्पर्शसौख्यमपि ॥९६॥

आर्या

अनुभवुनि केशरानें हिमगिरीचा नवलपूर्ण संयोग ।
कनकगिरिस्पर्शसुखा मिळवी,लाभुनि तुझाच कुचसंग॥

गद्यार्थ—(केशराचा हिमालयापासून मेरुपर्वतापर्यंत प्रवास!) ( हे सुंदरि ! ) केशरानें, प्रथम हिमालयाचें नवलपूर्ण सान्निध्य ( केशर काश्मीरात हिमालयाच्या परिसरात पिकतें; ) अनुभवून आता, ( तू आपल्या स्तनावर त्याचा लेप घातला आहेस, त्यामुळें, ) तुझ्या स्तनाच्या सहवासानें ( स्तन हे सुवर्णगिरि मेरु ही परिचित उपमा ) प्रत्यक्ष कनकगिरि मेरूचें स्पर्शसुखसुद्धा मिळविलें आहे ! ●●●

मालिनी

" यदि कथमपि दैवाद्दुर्गमार्गे स्खलित्वा
निदलति तनुमध्या, दीयतां नौ न दोषः ॥
पृथुनिबिडकुचाभ्यां पश्य वर्त्मावरुद्ध "
कथयितुमिव नेत्रे कर्णमूले प्रयाते ॥९७॥

मालिनी

" कृशकटि घसरे ही दुर्गमार्गी कुदैवें
जर कधिं, तर त्याचे दोष आम्हां न द्यावे ॥
पृथुकुचयुग मार्गा आमुच्या रोधिताती "
जणु वच वदण्या हे नेत्र कर्णास जाती ॥ ९७ ॥

गद्यार्थ—( सुंदर स्त्रीचे नेत्र आकर्ण का असतात याचा अभिनव खुलासा; व तो करताना दोष दिल्यासारखे करून स्तनाच्या उत्तुगत्वाची केलेली स्तुति ! ) " जर कधीं कोणत्याहि कारणानें, या खाचखळग्यांच्या मार्गांत, दुर्दैवानें ही कृशकटि तरुणी घसरून आपटली तर त्याचा दोष आम्हाला देऊ नका ! ( कारण ) हे पहा या स्त्रीचे पुष्ट, दाट, व ( उत्तुंग ) स्तन आमच्या मार्गांत अडथळा आणीत आहेत ( ते इतके उंच आले आहेत, कीं, आम्हाला पायाखालचें व पुढचें दिसत नसल्यानें, आम्ही या स्त्रीला नीट मार्गदर्शन करू शकत नाहीं ) " अशी ही तक्रार सांगण्यासाठीं जणू काय स्त्रीच्या कर्णमूलाशीं दोन्ही नेत्र गेलेले आहेत. ●●●

उपजाति

अर्थातुराणां न पिता न बन्धुः कामातुराणां न भयं न लज्जा ॥
क्षुधातुराणां न बलं न तेजश्चिन्तातुराणां न सुखं न निद्रा ९८

उपजाति

अर्थातुरांना न पिता न बंधु कामातुरांना भय लाज हीं न ।
क्षुधातुरांना बल तेज कैंचें ? चिंतातुरां झोंप न, सौख्य
हीं न ॥९८॥

गद्यार्थ—पैशाची हाव सुटलेल्या माणसाला, बाप, नात्याचीं माणसें, ( किंवा भाऊ ) याची काहीं पर्वा नसते. ( हीं नातीं तो ओळखत नाहीं. ) कामविकारानें व्यग्र झालेल्या माणसाला कसलेंहि भय वाटत नाहीं; कीं, लज्जाहि वाटत नाहीं; क्षुधेनें व्याकुळलेल्याला बळहि नसते व तसेच तेजहि नसते, चिंताग्रस्ताला सुख नाहीं, निद्रा नाहीं. ●●●

वंशस्थ

यथा चतुर्भिः कनकं परीक्ष्यते निघर्षणच्छेदनतापताडनैः ॥
तथा चतुर्भि पुरुष. परीक्ष्यते श्रुतेन शीलेन गुणेन कर्मणा ९९

शार्दूलविक्रीडित

सोन्याचें करितो परीक्षण जसें या चार रीतीं जन–
पाहे तापवुनी नि तोडुनि तसें घांसून वा ठोकुन ॥
तैसेंची घडतें परीक्षण जगीं या मानवाचें खरें–
त्याचें ज्ञान नि शील, सद्गुण, कृती हीं चार पाहून
ते ॥९९॥

गद्यार्थ—( कसोटीवर ) घासून, तोडून, अग्नींत तापवून, आणि ठोकून पाहून अशा चार मार्गांनीं जशी सोन्याची परीक्षा केली जाते, त्याचप्रमाणें, विद्या ( शिक्षण ) शील, गुण व कृति या चारांची पाहणी करूनच, मनुष्याची परीक्षा केली जाते. ●●●

शार्दूलविक्रीडित

ब्रह्मन्नध्ययनस्य नैष समयस्तूष्णीं बहिस्थीयता
स्वल्प जल्प बृहस्पते ! जडमते नैषा सभा वज्रिण ॥
वीणा सहर नारद ! स्तुतिकथाऽऽलापैरलं तुम्बुरो !
सीतारल्लकभल्लभग्नहृदय स्वस्थो न लङ्केश्वरः ॥ १०० ॥

शार्दूलविक्रीडित

ब्रह्मन् ! शिक्षणवेळ ही नच; मुका बाहेर राहे उभा
थोडें बोल बृहस्पते ! जडमते ही ऐन्द्र नोहे सभा ॥
वीणा आवर नारदा ! स्तुतिकथा अश्वानना ! आवर
सीतानेत्रशरें फुटून हृदयीं, अस्वस्थ लंकेश्वर ! ॥ १०० ॥

गद्यार्थ—(रावणाच्या बंदिवासात रावण सीतेला वश करण्याची वारंवार खटपट करी. पण सीता आपल्या नेत्रातल्या पातिव्रत्याच्या तेजस्वी भाल्यानें त्याचा हृदयभंग करी. अशा प्रसंगीं रावण म्हणतो )—हे ब्रह्मदेवा ! तुझ्यापाशीं शिकायला बसण्यास आज आता मला वेळ नाहीं–तू बाहेर गप्प उभा रहा ! बृहस्पते ! मूर्खा ! फार बडबड करू नको–ही काहीं इंद्रसभा नव्हे ! नारदा ! तुझें वीणावादन बंद कर ! हे ( अश्वमुख ) तुंबुरो ! माझें स्तुतिपाठ गाणें पुरें कर ! कारण सीतेच्या नेत्ररूपी भाल्यानें हृदय फुटल्यामुळें हा लंकेश्वर आज बेचैन आहे. ●●●

---

# प्रकरण ५० वें

## संकीर्ण सुभाषितें—( पुढें चालू )

अनुष्टुभ्

अक्षराणि समश्रेणीवर्तुलानि घनानि च ।
परस्परसुलग्नानि तरुणीकुचकुम्भवत् ॥ १०१ ॥

आर्या

अक्षर भरीव लिहिणें—श्रेणीवर्तुल असो समचि त्याचें ॥
एक दुज्याला चिकटुनि असोत कुचकुम्भ जेंवि तरुणीचे

गद्यार्थ—अक्षर लिहावयाचें, तें, नीट एका ओळींत, त्यातले गोलावे एकासारखे एक, व भरीव असावें. ( स्त्रीच्या श्रेणीप्रमाणें समान गोलाव्यानें व भरीव. ) आणि, अक्षरें (फार दूरदूर अंतर सोडून न लिहिता) तरुणीच्या कुचकुंभाप्रमाणें एकमेकांना बिलगून असावीं. ●●●

अनुष्टुभ्

मन्दाकिनीपय पान मन्दाक्षीमुखचुम्बनम् ।
मन्दरोपवनक्रीडा मन्दानुष्ठानन. कुत ! ॥ १०२

वसंततिलका

मंदाकिनीजल कुठून मिळे पिण्यास ?
मंदेक्षणाननहि कोठुनि चुंबिण्यास ? ॥
त्या मंदरोपवनिंचा घुठुनी विलास ?
जो आचरी तपचि मंद, अशा नरास ? ॥१०२

गद्यार्थ—( मद शब्दावर श्लेष्या. ) ज्या माणसाची तपश्चर्याच मुळीं मंद, त्याला मंदाकिनीचें म्हणजे गंगेचें पाणी पिण्याचें सद्भाग्य कोठलें ? तसेच, मंदेक्षणा म्हणजे मृदुलनयना, अशा कामिनीचें मुख चुंबन करण्याचें सौभाग्य कोठून प्राप्त होणार ? किंवा, मंदर पर्वताच्या परिसरातील उपवनात क्रीडाविहार करण्याचें सौख्य तरी कोठून मिळणार ? ( कारण हीं सर्व, उग्र तपश्चर्येमुळेंच प्राप्य आहेत ! ) ●●●

अनुष्टुभ्

स्थिरा शैली गुणवतां खलबुद्ध्या न बाध्यते ॥
रत्नदीपस्य हि शिखा वात्ययाऽपि न नाश्यते ॥ १०३

आर्या

गुणिजनवृत्ति स्थिर जी, खलबुद्धीनें कधीं न ती चळते ॥
रत्नाच्या न दिव्याची ज्योति जशी वायुनेंहि
मालविते ॥ १०३ ॥

गद्यार्थ—गुणी जनाचा वर्तनक्रम ( मूलत ) स्थिरच असतो, दुष्टाच्या बुद्धीचे आघात झाले, तरी, तो चलित होत नाहीं. ज्याप्रमाणें वाऱ्यानें ( इतर दिवे मालविले तरी ) रत्नदीपाची ज्योत काहीं विझत नाहीं, तद्वत्. ●●●

अनुष्टुभ्

पात्रे त्यागी, गुणे रागी, विरागी विषयेष्वपि ।
शास्त्रे बोद्धा, रणे योद्धा, पुरुष पञ्चलक्षणः ॥१०४

अनुष्टुभ्

पात्रीं दाता, गुणीं प्रेमी, अलिप्त विषयांतुनी ।
शास्त्रीं ज्ञाता, रणीं योद्धा नर हा पचलक्षणी ॥ १०४ ॥

गद्यार्थ—(उत्तम) पुरुष हा पाच लक्षणानीं युक्त असावा—सत्पात्राला दान करणारा, गुणाविषयीं प्रेम बाळगणारा, विषयसुखाबाबत वैराग्य असणारा, शास्त्रात गति असणारा व युद्धप्रसंगीं लढणारा. ●●●

उपजाति

प्रभुर्विवेकी प्रमदा सुशीला तुरङ्गम शस्त्रनिपातधीरः ।
विद्वान् विरागी, धनिकः प्रदाता भूमण्डलस्याभरणानि पञ्च

इन्द्रवज्रा

स्वामी विचारी, प्रमदा सुशील
घोडा, न शस्त्रासहि जो भिईल ॥
विद्वान् विरागी, नि धनी उदार
हीं भूषणें पांच, जगास थोर ॥ १०५ ॥

गद्यार्थ—सत्ताधीश असूनहि विवेक बाळगणारा, यौवनोन्मत्ता असून शीलवती स्त्री; शस्त्राच्या आघातानीं ( लढाईत ) न घाबरणारा घोडा, विद्वान् असून वैराग्ययुक्त; ( किंवा विरागी असून विद्वान् ) तसेच श्रीमंत असून पुष्कळ दान देणारा; हीं पाच, भूमंडळाचीं भूषणें होत. ●●●

आर्या

वित्त परिमितमधिकव्ययशील पुरुषमाकुलीकुरुते ।
ऊनांशुकमिव पीनस्तनजघनाया कुलीनायाः ॥ १०६

अनुष्टुभ्

धन मोजकेंच असतां उधळ्याला ओढघस्त फार घडे ।
पुष्टांग कुलीनेला वस्त्र तोकडें जसें पुरें न पडे ॥ १०६

गद्यार्थ—मोजकेंच धन जवळ असणाऱ्या उधळ्या माणसाला, त्यात मागविणें, ही गोष्ट फार त्रासाची होऊन बसते—स्तन, जघन वगैरे सर्वांगीं परिपुष्ट असणाऱ्या कुलीन तरुणीला तोकड्या वस्त्रानीं लज्जारक्षण करणें जसें कठिण जातें तद्वत् ●●●

शार्दूलविक्रीडित

सन्तश्चेदमृतेन किं ? यदि खलस्तत्कालकूटेन किं
दातारो यदि कल्पशाखिभिरलं; यद्यर्थिन किं तृणै ? ॥
किं कर्पूरशलाकया यदि दृश पन्थानमेति प्रिया ?
संसारेऽपि सतीन्द्रजालमपरं यद्यस्ति तेनापि किम् ? १०७

आर्या

असती संत, तर सुधा, कशास, विष तें असेल दुष्ट तर ?
दाता तर कल्पद्रुम, कशास, तृण तें, असेल भिक्षु जर ?

**दृष्टिस पडे प्रिया तर कर्पूराची कशास काडी ती?**
**संसारभ्रम असतां काय उरे इंद्रजालमहती ती? १०७**

गद्यार्थ—सज्जनाची संगति लाभली, तर आणखी निराळें अमृत कशाला हवें? आणि, दुष्टसंगाहून निराळें विष तें काय असणार? (खरे) दानशूर भेटले, तर त्याच्याहून कल्पवृक्ष तें (अधिक)काय (देणार)? (लाचार) याचक दिसल्यावर,(क्षुद्रतेसाठीं उपमान, म्हणून, गवताकडे पाहण्याचा काय जरूर? (तापलेल्या डोळ्यांत शीतलता आणण्यासाठीं कापराची काडी वापरतात, पण) आपली प्रिया दृष्टीस पडल्यावर (डोळे निवण्यास्तव) त्या कर्पूरशलाकेची आवश्यकता काय? संसाराएवढा (प्रचंड भ्रम समोर उभा) असतां आणखी इंद्रजाल म्हणून भ्रमोत्पादक कांहीं वेगळी वस्तु असलीच, तर तिची महती ती काय? ●●●

वसंततिलका

मातेव रक्षति पितेव हिते नियुङ्क्ते
कान्तेव चापि रमयत्यपनीय खेदम् ॥
लक्ष्मीं तनोति वितनोति च दिक्षु कीर्तिं
किं किं न साधयति कल्पलतेव विद्या? ॥१०८

शार्दूलविक्रीडित

**मातेच्या परि रक्षितें—हितपथीं नेतें पित्याचे परी**
**चित्ता रंजवितें—हरून अवघें खिन्नत्व, कांतेपरी ॥**
**लोकीं वैभव वाढवी, पसरवी कीर्ती दिगंतांतरीं**
**विद्या काय नि काय साधित नसे त्या कल्पवल्लीपरी? १०८**

गद्यार्थ—आईप्रमाणें रक्षण करते, बापाप्रमाणें हिताच्या मार्गावर ठेवते, मनातली खिन्नता काढून टाकून, प्रियपत्नीप्रमाणें हृदयाचें रंजन करते जगांत वैभव वाढवते व, दिगंतरांत कीर्ति पसरविते—एवंच, एखाद्या कल्पलतेप्रमाणें विद्या ही, माणसाचें, काय काय हित साधीत नाहीं! ●●●

अनुष्टुभ्

दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे ।
देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं विदुः ॥१०९

आर्या

**उपकार न कत्यासहि—देणें म्हणुनीच जें दिलें जातें।**
**देशीं, कालीं पात्रीं सात्त्विक ऐसेंच दान म्हणतात तें १०९**

गद्यार्थ—आपल्यावर त्यानें पूर्वी कसलाहि उपकार केलेला नाहीं, अशा माणसालाहि, केवळ, द्यावयाचें इतक्याच बुद्धीनें (आपल्यावर आधीं उपकार ज्यानें केला, त्याला देणें हें दानच नव्हे तर परतफेड होय) जें दान, नीट, योग्य स्थळ, काळ व पात्रता पाहून केलें जातें, त्याला सात्त्विक दान असें म्हणतात. ●●●

अनुष्टुभ्

अदृष्टमुखभङ्गस्य युक्तमन्धस्य याचितुम् ।
अहो बत महत्कष्टं चक्षुष्मानपि याचते ॥ ११० ॥

अनुष्टुभ्

**मुखभंग न जो पाहे, याची तो अंध, योग्य तें ।**
**याची डोळसही जेव्हां—तें भयंकर वाटतें ॥ ११० ॥**

गद्यार्थ—दात्यानें दान देतांना वाकडें केलेलें तोंड, ज्याला दिसतच नाहीं, त्या आंधळ्यानें याचना करणें, हें क्षम्य आहे पण हाय! हाय! ही केवढी भयंकर गोष्ट, कीं, डोळसमुद्धा याचना करतो! ●●●

अनुष्टुभ्

दारिद्र्यस्य परा मूर्तिर्याञ्चा न द्रविणाल्पता ।
अपि कौपीनवान् शम्भुस्तथाऽपि परमेश्वरः ॥ १११ ॥

आर्या

**भिक्षाच, न स्वल्पधनता, दरिद्रतेची भयाण मूर्ति खरी!**
**शिव राहे परमेश्वर—लंगोटीही जरी कटीस धरी। १११**

गद्यार्थ—दरिद्रीपणाची भयाण मूर्ति कोणती म्हणून विचारलें तर अत्यंत थोडें धन जवळ असणें ही नव्हे, भीक मागणें हीच! शंकर (निर्धनतेमुळें) जरी केवळ लंगोटी परिधान करीत असला, तरीहि तो परम ईश्वरच आहे! ●●●

अनुष्टुभ्

स्वयं तथा न कर्तव्यं स्वगुणाख्यापनं पुनः ।
स्वगुणाख्यापनं युक्त्या परद्वारा प्रयोजयेत् ॥ ११२ ॥

अनुष्टुभ्

**स्वगुणस्तुति केंव्हांही यदानी न निजाननें।**
**परंतु करवावी ती परद्वाराच युक्तिनें ॥ ११२॥**

गद्यार्थ--आपल्या गुणांची स्तुति आपल्या तोंडानें कधीं करूं नये पण युक्तीनें ती दुसऱ्यांकडून करवावी. ●●●

अनुष्टुभ्

धान्यानां संग्रहो राजन्नुत्तमः सर्वसंग्रहात् ।
निक्षिप्तं हि मुखे रत्नं न कुर्यात्प्राणधारणम् ॥ ११३ ॥

अनुष्टुभ्

**धान्यसंग्रह, हे राजा ! श्रेष्ठ साऱ्याच संग्रहीं ।**
**न रत्न जगवी प्राणां, जरी घालूं मुखांतही ॥११३॥**

गद्यार्थ--(राजनीति) हे राजा, इतर अनेक वस्तूंच्या संग्रहापेक्षां, धान्यसंग्रह, हाच, श्रेष्ठ आहे. रत्न, जरी तोंडात घातलें, तरी, तें प्राणरक्षण थोडेंच करणार आहे ? ●●●

शार्दूलविक्रीडित

आहारे वडवानलश्च ; शयने यः कुम्भकर्णायते ;
संदेशे बधिरः ; पलायनविधौ सिंहः ; शृगालो रणे ॥
अन्धो वस्तुनिरीक्षणेऽथ ; गमने खञ्जः ; पटुः क्रन्दने
भाग्येनैव हि लभ्यते पुनरसौ सर्वोत्तमः सेवकः ॥११४॥

शार्दूलविक्रीडित

**खाण्याला वडवाग्नि; आणि निजतो जो कुंभकर्णापरी ;**
**संदेशा बहिरा ; पळे हरिपरी ; युद्धांत कोल्ह्यापरी ॥**
**होई अंध निरीक्षणांत ; चलनीं पंगू ; पटू गेदनीं ;**
**ऐसा उत्तम भृत्य केवळ नरा भाग्येंच ये लाभुनी !! ११४**

गद्यार्थ—( व्यग्योक्तीनें आदर्श नोकराचें वर्णन ). खाण्याचे बाबतींत वडवानलाप्रमाणे; ( कितीहि खाल्ले तरी पोट न भरणारा ) झोपा काढण्याचे बाबतींत कुंभकर्णाप्रमाणें;—निरोप सांगितला, कीं, त्या वेळेपुरता बहिरा; काम सोडून पळून जाण्याचे कामीं सिंहाची गति असलेला; धन्याचे रक्षणार्थ लढण्याच्या प्रसंगीं, कोल्ह्यासारखा; ( लुच्चा व पळपुटा;) वस्तुनिरीक्षणाच्या बाबतींत आंधळा; चालण्याच्या प्रसगीं लगडा पागळा; (जरा काहीं झालें,) कीं, विव्हळून आक्रोश, कांगावा करण्यात अगदीं पटाईत; असा सर्वोत्तम !!! सेवक, माणसाला महद्भाग्यानें मिळत असतो ! (बरोबर याच्या उल्ट तो आदर्श.) ●●●

स्वागता

शिक्षिताऽपि सखिभिर्ननु सीता रामचन्द्रचरणौ न ननाम ॥
किं भविष्यति मुनीशवधूवद्भालरत्नमिह तद्रजसेति॥ ११५॥

वसंततिलका

**सीता, सख्या पढविती तिजला तरीही**
**श्रीरामचंद्रचरणीं नमलीच नाहीं ॥**
**" होईल तत्पदरजें मम भालरत्न ।**
**स्त्री अन्य गौतमवधू " म्हणुनी भिऊन ॥ ११५ ॥**

गद्यार्थ--(श्रीरामचंद्रानें, आपल्या पायाच्या धुळीनें, शिळेंतून अहल्या उत्पन्न केली; या अपूर्व पुण्याईची कीर्ति, लग्नापूर्वीच सीतेच्या कानीं गेल्यानें, तिला एक कायमचीच धडकी भरली ! (लग्नानंतर) सख्यांनीं (अनेक वेळां,) सीतेला, श्रीरामाच्या चरणीं नमस्कार करण्याबाबत, (नीट) पढवून ठेवली, तरीहि, (ती काहीं केल्या) त्याच्या पाया पडली नाहीं. तिच्या कपाळावर, मस्तकावर, अलंकार होते, रत्नजडित होते. (रत्न झालें तरी एक प्रकारचा दगडच.) त्याला रामाच्या पायाची धूळ लागली तर अहल्येप्रमाणे आणखी एखादी स्त्री उत्पन्न (होऊन मला सवत प्राप्त) व्हायची (अशी तिला सारखी धागधूग लागून राहिली होती हें त्या न नमण्याचें कारण !) ( श्रीरामाला वनवासांत नदीपार करतांना गुह नावाच्या नावाड्यालाहि, ' दगडांतून स्त्री, याच्या पायाच्या धुळीनें होते, तर कदाचित लांकडांतूनहि होईल व मग " ही कोण बया आणली ! " म्हणून स्वतःची बायको रागावेल, अशी भीति उत्पन्न झाली होती; व, म्हणून, त्यानें, रामाचे पाय, तो नौकेत चढण्यापूर्वी नीट धुऊन काढले, व त्यावर धूळ राहू दिली नाहीं असेंहि एक सुभाषित आहे. याच प्रकरणात "क्षालयामिकतव पादपद्मं" हा श्लोक पहा.) ●●●

शार्दूलविक्रीडित

निःपीते कलशोद्भवेन जलधौ गौरीपतेर्गङ्गया
होतुं हन्त वपुर्ललाटदहने यात्रक्रतः प्रक्रमः ॥
तावत्तत्र मया विपक्षनगरीनारीदृगम्भोरुह—
द्वन्द्वप्रस्खलदस्रवारिपटलैः सृष्टाः पयोराशयः ॥ ११६ ॥

शार्दूलविक्रीडित

**पीतां अब्धि अगस्तिनें सुरनदी ही श्रीशशीपोंहुनी**
**घ्याया जों सजली स्वकीय तनुला भालानलीं होमुनी ॥**
**त्याच्या आंतचि मी स्वशत्रुरमणीनेत्रस्थ अश्रूजळें**
**धो धो वाहवुनी समुद्र अवघे एक्या क्षणीं निर्मिले ॥**

गद्यार्थ -- ( जगांतली एक अद्वितीय बढाई ऐका. बढाईखोर, स्वतःच्या शौर्याचें वर्णन करतो— ) अगस्तीनें समुद्र प्राशन केल्यावर ' आपण आतां कोठें जायचें ? कारण सागर

हा सरितपति, त्यालाच त्यानें गिळलें " ! म्हणून शंकराच्या डोक्यावरची गंगा, (विषण्ण होऊन,) शंकराच्या कपाळावरच्या (अग्नीचीच चिता करून, सहगमन करून, सती म्हणून, स्वत ला) त्या अग्नींत झाकून घेण्यास धाऊन पुढें टाकते न टाकते तोंच, (एक्या क्षणमात्रात,) त्यां (शूर वीरानें) शत्रूच्या नगरींतील (हनक्या पुरुषाना ठार केलें कीं, त्याच्या शोकानें) रडणाऱ्या शत्रुस्त्रियांच्या नेत्रकमलातून बाहेर पडून (धो धो) वाहणाऱ्या अश्रूंच्या पुरामुळें ( कोरडे पडलेले ) ते सर्व सागर पुन्हा भरून निर्माण केले ! ( आणि अशा रीतीनें सती जाण्यापासून गंगेला वाचविलें ! )

●●●

आर्या

किमु स सहेत सुधांशु स्मरहरभालानलोद्भवा ज्वाला ।
शिशिरै शीकरनिवहै सिञ्चति सुरनिम्नगा नो चेत् ? ॥

आर्या

केंवि सहेल सुधाकर शंकरभालस्थ अग्निच्या ज्वाळा ।
स्वर्गंगा जर निज हिमशिशिरतुषारें न शिंपती त्याला

गद्यार्थ— जर डोक्यावरची ती स्वर्गंगा स्वत च्या हिमासारख्या शीतल तुषारांनीं त्याला शिंपीत राहिली नसती तर, तो चद्र ( हा शंकराच्या कपाळावरच्या थोडा वर बरोबर शिरोमार्गी असतो ) शंकराच्या कपाळावरच्या तृतीय नेत्राच्या भडकत्या ज्वालाची आच कशी सहन करू शकला असता ? ( हें सर्व रूपक आहे पुरुष हा घराबाहेरच्या जीवनकलहाच्या वणव्याची धग सहन करू शकतो, याचें कारण, हिमशीतल फवारीं, त्याचें सर्व दु ख व ताप हरण करणारी गृहिणी, घरांत असते, म्हणून. तिच्यावाचून तो केव्हाच भाजून कोळपून गेला असता )

●●●

अनुष्टुभ्

दह्यमानेऽपि हृदये मृगाक्ष्या मन्मथाग्निना ।
स्नेहस्तथैव यत्तस्थौ तदाश्चर्यमिवाभवत् ॥ ११८ ॥

अनुष्टुभ्

मदनाग्नींत जळत्या मृगाक्षीच्या हृदन्तरीं ।
होता तसा टिके स्नेह हें आश्चर्य न का तरी ? ॥ ११८ ॥

गद्यार्थ—( प्रत्यक्ष अग्नीच्या मध्यभागीं असलेलें तेल ( स्नेह ) न जळता तसेंच राहिलें हा चमत्कार कधीं पाहिला आहे ? पहा~) मदनाग्नीनें जळत असलेल्या मृगाक्षीच्या हृदयांत ( आपल्या प्रियकराविषयींचा स्नेह ( प्रेम ) होता तसाच टिकून राहिला ( खरें म्हणजे वाढला सुद्धा ) हें केवढें आश्चर्य घडलें बरें ?

●●●

अनुष्टुभ्

जीवेन तुलितं प्रेम सखि ! मूढेन वेधसा ।
लघुर्जीवो यया कण्ठे गुरु प्रेम हृदि स्थितम् ॥ ११९ ॥

अनुष्टुभ्

तोलिलें प्रेम जीवानें हे सखे, मूर्ख तो विधि ॥
लघु जीव चढे कंठीं— गुरु प्रेम वसे हृदीं ॥ ११९ ॥

गद्यार्थ—" सखे ! ( हातात तराजू न घेताच वस्तु जड कोणती, हलकी कोणती हें सहज समजायला हवें, तें न समजण्याइतका ) मूर्ख असल्यानें ब्रह्मदेवान एकदा माणसाचे प्राण आणि प्रेम हें ( मानवदेहरूपी ) तराजूत घालून जोखले, तेव्हा साहजिकच प्रेमाचें पारडें जड होऊन, तें हृदयाइतकें खालीं गलें, व, प्राणाचें पारडें हलकें म्हणून तें कंठापर्यंत वर चढलें," ( तात्पर्य प्रेम हें प्राणतुल्य नसून प्राणाधिक होय. )

●●●

मञ्जुभाषिणी

समय स वर्तत इवैष यत्र मां
समनन्दयत्सुमुखि ! गौतमार्पित ॥
अयमागृहीतकमनीयकङ्कण-
स्तव मूर्तिमानिव महोत्सव कर ॥ १२० ॥

वसततिलका

वाटे पुन्हा समय तोच इथें उदेला
जें गौतमें कर तुझा मज अर्पियेला ॥
आस्पृष्ट मोदकर कंकणशोभिवंत
जाणों, महोत्सव हृदीं मम मूर्तिमंत ॥ १२० ॥

गद्यार्थ—(उत्तररामचरितात, राम सीतेसह परत आल्यानंतर रामाच्या जीवनाचा चित्रपट, लक्ष्मण, त्या दोघाना दाखविता त्यांतला सीतापाणिग्रहणाचा प्रसंग पाहून, तो रोमहर्षक प्रसंग पुन्हा सजीव झाल्याचा आनंद अनुभवीत, राम, सीतेला म्हणतो)— हे सुमुखि ! गौतम मुनींनीं माझ्या हातीं दिलेला, व मी हळूच थोडा धरलेला, कंकणानीं सुशोभित, आणि मूर्तिमंत महोत्सवच असा हा तुझा हात मला अत्यंत आनंद देत आहे. तो प्रसंग पुन्हा येथें प्रत्यक्ष अस्तित्वात असल्यासारखा वाटत आहे !

●●●

अनुष्टुभ्

सागरश्चाम्बरप्रख्य आकाशं सागरोपमम् ।।
रामरावणयोर्युद्धं रामरावणयोरिव ॥ १२१ ॥

फटका

**सागर आकाशासम केवळ; आकाशहि सागरोपम।**
**रामरावणांचें युद्धहि तें रामरावणांच्याच सम ॥१२१॥**

गद्यार्थ— सागराला उपमा आकाशाची; व आकाशाला उपमा केवळ सागराची ( दोघानाहि एकमेकावाचून अन्य उपमाच शोभणार नाहीं, तद्वत् ) राम रावण याचें युद्ध हेंहि रामरावणयुद्धासारखेंच ( दुसऱ्या कोणत्याहि युद्धाशीं त्याची तुलनाच शक्य नाहीं. ) ●●●

अनुष्टुभ्

*मरणान्तानि वैराणि; निवृत्त नः प्रयोजनम् ।*
क्रियतामस्य संस्कारो ममाप्येष यथा तव ॥ १२२ ॥

अनुष्टुभ्

**मृत्यूंत संपतीं वैरें; संपलें कार्य आपुलें।**
**माझाहि हा तुझा जैसा; कर संस्कार यास रे ॥१२२**

गद्यार्थ—( रावणाचा वध झाल्यावर, रामाशीं ज्यानें एवढें वैर धरलें, त्या पापी रावणाचा, अग्निसंस्कार तरी, आपण कसा करावा,—(कारण तेंहि पापच होईल) अशा विचारानें बिभीषण कचरत होता तेव्हां राम त्याला म्हणतात— वैरें हीं मृत्यूमुळें संपतात ( मरणाबरोबरच त्याचाहि अत होतो. ) आपलें ( सीतेची मुक्तता हें ) कार्य संपलें. तेव्हा आता तूं खुशाल याचा अग्निसंस्कार कर;— हा जसा तुझा, तसा माझाहि ( बंधूच ) आहे ! ●●●

अनुष्टुभ्

पुनर्दारा पुनर्वित्तं पुन. क्षेत्रं पुनः सुतः ।
पुनः शुभाशुभं कर्म शरीर न पुनः पुन. ॥१२३॥

अनुष्टुभ्

**पुन्हां पत्नी, पुन्हां वित्त, शेती, पुत्र पुन्हां पुन्हां।**
**शुभाशुभ पुन्हां कर्मे — मिळे देहचि ना पुन्हां ॥ १२३ ॥**

गद्यार्थ—पत्नी काय, सपत्ति काय, शेतीवाडी काय, पुत्रादि संतति काय, किंवा, शुभ अशुभ कर्म काय, ह्या सर्व वस्तु जगात पुन्हां पुन्हां प्राप्त होणाऱ्या आहेत;—केवळ (मानव)देहच असा आहे कीं तो मात्र कुणाला पुन्हां पुन्हां प्राप्त होत नसतो. ( म्हणून याच जन्मांत या जीवनाचें सार्थक्य साधणें अवश्य आहे. ) ●●●

अनुष्टुभ्

न तेन वृद्धो भवति येनास्य पलितं शिरः ।
यो वै युवाऽप्यधीयानस्तं देवाः स्थविरं विदुः ॥१२४॥

अनुष्टुभ्

**पिकल्या कारणें केंस ठरेना वृद्ध तो नर ।**
**शिके तरुण पेसाही—वृद्ध त्या म्हणती सुर ॥ १२४ ॥**

गद्यार्थ—कोणाचेहि केवळ केस पाढरे झाले एवढ्यावरून काहीं तो वृद्ध होत नसतो. तरुण असूनहि जो विद्यार्जन करीत असेल त्याला देव वृद्ध म्हणतात. ●●●

अनुष्टुभ्

मन एव मनुष्याणां कारणं बन्धमोक्षयोः ।
बन्धाय विषयासङ्गि मोक्षे निर्विषयं, स्मृतम् ॥ १२५ ॥

अनुष्टुभ्

**मन हेंच मनुष्यांच्या बंधमोक्षास कारण ।**
**देई निर्विषयी, मोक्ष,-विषयीं सक्त बंधन ॥ १२५ ॥**

गद्यार्थ—मनुष्याला बधनात पाडण्याला किंवा त्याला मुक्त करण्याला ( *मोक्ष प्राप्त करून देण्याला* ) त्याचें मन, हेंच कारणीभूत होत असतें. मन जर विषयसक्त असेल, तर तें बंधनाप्रत नेतें; व निर्विषयी असेल तर मोक्ष देतें. ●●●

अनुष्टुभ्

तावद्गर्जन्ति शास्त्राणि जम्बूका विपिने यथा।
न गर्जति महाशक्तिर्यावद्वेदान्तकेसरी ॥ १२६ ॥

अनुष्टुभ्

**तोंवरी गर्जती शास्त्रें-जसे कोल्हे वनान्तरीं ।**
**न जोंवर महाशक्ति गर्जे वेदान्तकेसरी ॥ १२६ ॥**

गद्यार्थ— रानातल्या कोल्ह्याप्रमाणें, शास्त्रांची गर्जना तोंपर्यंतच चालते, जोंपर्यंत महाशक्तिमान वेदान्तरूपी सिंहाची गर्जना कानीं येत नाहीं. ●●●

अनुष्टुभ्

असता प्रतिषेधश्च सता च प्रतिपालनम् ।
एष राज्ञां परो धर्म समरे चाप्यपलायनम् ॥ १२७ ॥

अनुष्टुभ्

**सुनियंत्रण दुष्टांचें—सुष्टांचें प्रतिपालन ।**
**राजांचा हा महा धर्म—रणींहि न पलायन ॥ १२७ ॥**

गद्यार्थ—दुष्टाचें पारिपत्य करणें व सज्जनाचें योग्य पालन करणें हा राजाचा महान् धर्म आहे.—तसेंच रणातून पळ न काढणें, हाहि. ●●●

अनुष्टुभ्

असशय महाबाहो ! मनो दुर्निग्रह चलम् ॥
अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते ॥१२८॥

अनुष्टुभ्

**निस्संशय महाबाहो ! ओढाळ चल हें मन ।**
**वैराग्याभ्यासयोगें त्या घालणें शक्य बंधन ॥१२८॥**

गद्यार्थ—हे महाबाहो अर्जुना ! मन हें चचल व न आवरण्याजोगें असतें यात काहींच संशय नाहीं. परतु, अभ्यासानें, ( प्रयत्नानें, सवय करुन ) व वैराग्यानें, त्याला पकडून धरून, बधनात घालता येतें ●●●

अनुष्टुभ्

तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।
उपदेक्ष्यन्ति ते ज्ञान ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ १२९॥

अनुष्टुभ्

**जाण कीं, पडुनी पायीं, जिज्ञासायुक्त सेवुनी ।**
**ज्ञान देतील तत्त्वज्ञ ज्ञानी ते तुजलागुनी ॥ १२९ ॥**

गद्यार्थ—हें नीट ध्यानीं ठेव, कीं तू (पायीं पडण्याइतकी) नम्रता धारण केलीस, ( जिज्ञासेनें ) प्रश्न विचारीत गेलास व त्यांची सेवा केलीस, कीं, तत्त्वज्ञ ज्ञानी पुरुष तुला ज्ञान उपदेशितील. ●●●

अनुष्टुभ्

साधवो हृदय मह्य साधूना हृदय त्वहम् ।
मदन्यत्ते न जानन्ति नाह तेभ्यो मनागपि ॥१३०॥

अनुष्टुभ्

**मी हा हृदय साधूंचें—माझें हृदय साधु ते ।**
**मी न त्यांविण कांहींही—जाणिती, मद्विना न ते ॥१३०॥**

गद्यार्थ—( भगवान कृष्ण म्हणतात— ) साधु हे माझें जणु हृदयच ; आणि मीहि साधूंना हृदयच. ( माझ्याशीं ते इतके एकात्म झालेले असतात कीं ) ते माझ्यावाचून अन्य कांहींच जाणीत नाहींत व मीहि त्यांच्यावाचून इतर कांहींहि जाणीत नाहीं. ●●●

अनुष्टुभ्

न देवा दण्डमादाय रक्षन्ति पशुपालवत् ।
य तु रक्षितुमिच्छन्ति बुद्धया सयोजयन्ति तम् ॥ १३१ ॥

अनुष्टुभ्

**न देव घेउनी काठी गुराख्यापरि रक्षिती ।**
**ज्या रक्षूं इच्छिती त्याशीं बुद्धीची गांठ घालिती ॥१३१॥**

गद्यार्थ—गुराख्यानें गायींचें रक्षण करावें तसें देव हे कांहीं काठी घेऊन कोणाचें रक्षण करीत नाहींत. तर ज्याचें ते रक्षण करू इच्छितात, त्याची आणि बुद्धीची सांगड घालून देतात ( आणि योग्य ती बुद्धि मिळाली, कीं योग्य तो मार्ग शोधून त्याला तोच स्वतःचें रक्षण करू शकतो. ) ●●●

उपेन्द्रवज्रा

न हि प्रमादात्परमस्ति किञ्चिद्वधो नराणामिह जीवलोके
प्रमत्तमर्थां हि नर समन्तात् त्यजन्त्यनर्थाश्च समाविशन्ति

उपजाति

**नरा प्रमादाहुनि अन्य कांहीं**
**मृत्यूपरी या जगतात नाहीं ॥**
**नरा प्रमत्ता त्यजितात अर्थ**
**चोहोंकडोनी घुसती अनर्थ ॥ १३२ ॥**

गद्यार्थ—या जगात उन्मत्तपणा ( धुंदी, मदान्धता ) यांहून इतर कोणतीहि गोष्ट माणसाला ( अधिक मृत्युकारक )

अधिक मारक असू शकत नाहीं. मदान्ध माणसाला चोहों-कडून वैभव सोडून जातें व संकटें चोहोंकडून घुसून आत प्रवेश करतात.

●●●

शिखरिणी

श्रुतं दृष्टं स्पृष्टं स्मृतमपि नृणां ह्लादजननं
न रत्नं स्त्रीभ्योऽन्यत्क्वचिदपि कृतं लोकपतिना ॥
तदर्थं धर्मार्थौ विभवसुखसौख्यानि च ततो
गृहे लक्ष्म्यो मान्या: सततमबला मानविभवैः ॥१३३॥

शार्दूलविक्रीडित

**स्पर्शें, ऐकुनि पाहुनी स्मरुनिही जें दे नरा मोदन**
**ऐसें स्त्रीविण अन्य रत्न कुठलें केलें विधीनेंहि न ॥**
**स्त्रीप्रीत्यर्थचि धर्म अर्थ विभवें सौख्यें तिच्यापासुनी**
**स्त्री लक्ष्मीच गृहांत; नित्य विभवें द्या तीस सन्मानुनी॥**

गद्यार्थ—ज्याचा (नुसता) ध्वनि ऐकल्यानें, ज्याचें (नुसतें) दर्शन घडल्यानें, ज्याचा (नुसता) स्पर्श झाल्यानें, किंवा ज्याची (नुसती) आठवण झाल्यानें, जें पुरुषाला आनंद देतें, असें, स्त्री-विना कोणतेंहि अन्य रत्न, ब्रह्मदेवानें, कुठेंहि उत्पन्न केलेलें नाहीं! धर्म व अर्थ ( हे पुरुषार्थ ) *स्त्रीप्रीत्यर्थच असतात व स्त्रीपासूनच* वैभव व उत्कृष्ट सुखाची प्राप्ति होत असते. स्त्रिया या गृहात लक्ष्मीप्रमाणेंच असून त्यांचा, पुरुषजातीनें सर्व विभव अर्पून सन्मानच केला पाहिजे.

●●●

अनुष्टुभ्

ते धन्यास्ते विवेकज्ञास्ते शस्या इह भूतले ।
*आगच्छन्ति गृहे येषां कार्यार्थं सुहृदो जनाः ॥ १३४॥*

अनुष्टुभ्

**ते धन्य, ते विवेकी, या जगीं स्तुत्यचि ते नर ।**
**येती ज्यांच्या घरीं मित्र कार्यासाठीं निरंतर ॥ १३४॥**

गद्यार्थ—तेच धन्य, तेच विवेकी, तेच प्रशंसनीय पुरुष होत, कीं, ज्यांच्या घरीं, कार्यार्थ सतत मित्रांची ये जा सुरू असते.

●●●

अनुष्टुभ्

ईशावास्यमिदं सर्वं यत्किं च जगत्यां जगत् ।
तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृधः कस्यचिद्धनम् ॥ १३५

अनुष्टुभ्

**चल विश्वीं इथें जें जें ईशावासित सर्व तें ॥**
**अन्यस्वलुब्ध ना व्हावें—त्या त्यजूनचि भोग तें॥१३५**

गद्यार्थ— ह्या गतिमान् जगतात, जें जें आहे, त्यात त्यात, परमेश्वराचा निवास आहे. परधनाचा कधीं लोभ धरूं नको. भोगावयाचें तें, ( परधनाचा निश्चून ) त्याग करूनच भोग.

●●●

मन्दाक्रान्ता

नीरं दूरं, तदपि विरसं; जङ्गमा नो लताद्या—
स्तस्मिन्दातर्यपि जलनिधौ को लभेताम्बुबिन्दुम् ?॥
दानाध्यक्षे त्वयि जलधर ! क्वापि कुत्रापि शैलाः
शालावन्तोऽमृतनिभजलैस्तर्पिताः सर्व एते ॥१३६॥

मन्दाक्रान्ता

**पाणी दूरी, विरस परि तें, वल्लरी हालती ना**
**दाता झाला जलधि तरि कां बिंदु लाभेल कोणा ? ॥**
**दानीश्रेष्ठा ! जलद ! परि तूं दूरही वृक्षवन्त**
**शैलांना स्वामृतसम जलें सर्व केलेस तृप्त ॥ १३६**

गद्यार्थ—(आधीं) समुद्राचें पाणी ( साधारणपणें झाडें वेली *उगवण्याच्या जागेपासून) दूर; त्यातून खारट; आणि वेली वृक्षादि* ( याना पाय थोडेच आहेत ? ) या हालचाल करू शकत नाहींत, तेव्हा समुद्र मोठा उदार दाता बनून, देण्यास सिद्ध झाला, तरी त्याचा एक बिन्दु तरी कोणाच्या पदरांत पडणार आहे ? ( फार झालें तर, किनाऱ्यावरच्या वाळवंटाला किंवा खडकाला त्याचा लाभ व्हावयाचा ) पण हे दानीश्रेष्ठा मेघा ! तू (दान केल्यानें), वृक्षानीं भरलेले असे (अज्ञात) दूर कोठचे डोंगर, अपल्या अमृततुल्य पाण्यानें, सर्व तृप्त करून सोडलेस ! ●●●

उपजाति

लोकः शुभस्तिष्ठतु तावदन्यः
पराङ्मुखाना समरेषु पुंसाम् ॥
पत्न्योऽपि तेषां न ह्रिया मुखानि
पुरः सखीनामपि दर्शयन्ति ॥ १३७ ॥

उपजाति

**जो लोक लाभे रणभीरु यांतें**
***असो दुजा तो शुभ त्यां स्वतांतें !।***
**कांता तयांच्या शरमून चित्तीं ।**
**सख्यांसही तोंड न दाखवीती ॥ १३७ ॥**

गद्यार्थ—समरांगणातून पळ काढणाऱ्याना, (स्वर्गावाचून) दुसराच कोठला तरी, (नरकच), जो लोक लाभतो, तो, त्याचा त्यानाच कल्याणकारी असो! त्याच्या बायकाना मात्र लज्जेमुळें, आपल्या सख्याना सुद्धा, तोंड दाखवायची चोरी होऊन बसते ●●●

आर्या

जीवन्नेव मृतोऽसौ यस्य जनो वीक्ष्य वदनमन्योन्यम्।
कृतमुखभङ्गो दूरात्करोति निर्देशमङ्गुल्या ॥ १३८ ॥

आर्या

**जगतो तरि तो मृत, जन यन्मुख दिसताच एकमेकांत**
**आंवट तोंडें करुनी अंगुलिनिर्देश दुरुनि करितात.**

गद्यार्थ—ज्याचें तोंड दिसतांच लोक, आंबट तोंडें करून दुरून (याच्याकडे) अंगुलीनिर्देश करून (आपसांत कुजबुजतात) (असले काहीं तरी वाईट कर्म केलेला) माणूस जिवत असूनहि मेल्यासारखाच होय. ●●●

अनुष्टुभ्

अप्युत्तमात्प्रलपतो बलाच्च परिजल्पत.।
सर्वतः सारमादद्यादश्मभ्य इव काञ्चनम् ॥ १३९ ॥

आर्या

**बोले उत्तम किंवा पळें बडबडे कुणीहि त्यांतून।**
**सर्वत्र सार घ्यावें-घ्यावें कांचन जसें शिला**
**कुटुन ॥ १३९ ॥**

गद्यार्थ—कुणी उत्कृष्ट वाग्विलास दाखवीत असेल! किंवा कुणी उगाच काहीं तरी बरळत असेल—त्या सर्वांतून माणसानें सार काढून घ्यावें, दगडावरील (अलवरी) सुवर्ण रेषा ज्याप्रमाणें (दगड कुटून त्यातून) काढून घ्यावी, त्याप्रमाणें ●●●

अनुष्टुभ्

पुष्पं पुष्पं विचिन्वीत मूलच्छेदं न कारयेत्।
मालाकार इवारामे—न यथाऽङ्गारकारकः ॥१४०॥

अनुष्टुभ्

**फूल फूलचि वेंचावें तोडावें मूळ ना कुणी।**
**उद्यानात जसा माळी;—न लोणाऱ्यापरी वनीं ॥१४०॥**

गद्यार्थ—उद्यानात माळी करतो त्याप्रमाणें माणसानें फूल फूल तेवढेंच वेचावें—रानात कोळसे तयार करणाऱ्या लोणाऱ्या प्रमाणें झाडाचें मूळच तोडीत राहू नये. ●●●

अनुष्टुभ्

पिण्डे पिण्डे मतिर्भिन्ना कुण्डे कुण्डे नवं पयः।
जातौ जातौ नवाचारा भिन्ना वाणी मुखे मुखे ॥१४१॥

उपजाति

**तनूतनूंतून मती विभिन्न**
**कुंडांत कुंडांत जळें नवीन॥**
**आचारही भिन्नचि जातितूनी**
**मुखांमुखातून नवीन वाणी ॥१४१॥**

गद्यार्थ—देहादेहातून बुद्धि निरनिराळी असते; कुंडाकुंडातून पाणी भिन्न प्रकारचें असतें—जातींजातींतले आचार असमान असतात, मुखामुखांतली वाणीहि सारखी नसते ●●●

अनुष्टुभ्

अमन्त्रमक्षरं नास्ति नास्ति मूलमनौषधम्।
अयोग्यः पुरुषो नास्ति योजकस्तत्र दुर्लभः ॥१४२॥

शार्दूलविक्रीडित

**होई मंत्र न ज्यांतुनी, न दिसतें ऐसें कुठें अक्षर**
**नाहीं मूळहि, ज्यामधून न बने वा औषधी सुंदर॥**
**कोणीही न अयोग्य मानव, कधीं कामा न ये जो कुठें**
**आहे योजक मात्र दुर्मिळ सदा जेथें पहावे तिथें १४२**

गद्यार्थ—ज्यातून मंत्र निघत नाहीं असें एकहि अक्षर नाहीं, एकहि मूळ नाहीं की ज्यापासून औषधि बनत नाहीं, (कोणत्याहि कामाला उपयोगी नसलेला असा) अयोग्य माणूस कोणीच नाहीं,— प्रत्येक ठिकाणीं योजकाचीच काय ती वाण आहे. ●●●

शार्दूलविक्रीडित

आदौ रामतपोवनादिगमनं हत्वा मृगं काञ्चनं
वैदेहीहरणं जटायुमरणं सुग्रीवसंभाषणम् ॥
वालीनिर्दलनं समुद्रतरणं लङ्कापुरीदाहनं
पश्चाद् रावणकुम्भकर्णहननमेतद्धि रामायणम् ॥ १४३॥

शार्दूलविक्रीडित

जाणें राम वनामधें प्रथमतः, स्वर्णा मृगा मारणें
सीतेला हरणें, जटायु मरणें, सुग्रीव या बोलणें ॥
वालीला वधणें, समुद्र तरणें लंकापुरी जाळुन—
अतीं रावणकुंभकर्ण वधणें, हें सर्व रामायण ॥ १४३ ॥

गद्यार्थ—प्रथम रामाचें तपोवनात ( व वनवासास ) जाणें, त्यानें सुवर्णमृग मारणें,(व त्याचा परिणाम म्हणून)(रावणानें) सीतेचें हरण करणें, (रावणाचा प्रतिकार करीत असता) जटायूचें मरण; नंतर ( रामाचें ) सुग्रीवाशीं ( पुढील योजना–विषयीं ) संभाषण, वालीचा वध. समुद्रावरून (सेतु बांधून) पलीकडे जाणें; ( मारुतीनें ) लंका जाळणें आणि शेवटीं रावण व कुंभकर्ण यांचा वध या ( इतक्या प्रमुख ) घटना म्हणजे रामायण. ●●●

अनुष्टुभ्

सौवर्णानि सरोजानि निर्मातुं सन्ति शिल्पिनः ।
तत्र सौरभनिर्माणे चतुरश्चतुराननः ॥ १४४ ॥

अनुष्टुभ्

कितीक निर्मिती शिल्पी- कमलें कांचनांतुन ।
सुगंध त्यांत घालाया पटु तो चतुरानन ॥ १४४ ॥

गद्यार्थ—सुवर्णाचीं कमलें करणारे कित्येक पटाईत कारागीर ( जगभर आहेत ); परंतु, त्यात सुगंध घालण्याचें काम करणारा कुशल ( कारागीर एकटा ) ब्रह्मदेवच !

उपेन्द्रवज्रा

अहो महत्त्वं महतामपूर्वं विपत्तिकालेऽपि परोपकारः ।
यथास्यऽऽमध्ये पतितोऽपि राहोः कलानिधिः पुण्यचयं ददाति ॥ १४५ ॥

उपेन्द्रवज्रा

अपूर्व हें हो करितात थोर विपत्तिमध्येंहि परोपकार ।
शशी स्वयें राहुमुखीं पडून करीत राहे नित पुण्यदान

गद्यार्थ—थोरांची ही केवढी अपूर्व महती म्हणावी, कीं, ते स्वतः संकटात असतानाहि परोपकार करतात. जसें—चंद्र हा स्वतः राहूच्या मुखात पडलेला असताहि, ( म्हणजे ग्रहणाचे वेळीं पर्वकाळामुळें ) जगाला पुण्य प्राप्त करून देतो. ●●●

अनुष्टुभ्

मान्या एव हि मान्यानां मानं कुर्वन्ति नेतरे ।
शम्भुर्बिभर्ति मूर्ध्नेन्दुं स्वर्भानुस्तं जिघृक्षति ॥ १४६ ॥

आर्या

मान्यचि नर मान्यांचा मान करूं शकति योग्य;
नान्य कुणी ।
ज्या चन्द्रा शिव धरितो शिरीं, राहु त्यास टाकितो
गिळुनी ॥ १४६ ॥

गद्यार्थ— स्वतः सन्मान्य असतील अशानाच, मान्याचा ( योग्य ) मान ठेवता येतो; इतराना नव्हे. शंकर चंद्राला आपल्या मस्तकीं धारण करतो तर राहु हा त्याला गिळून टाकतो [ स्वर्भानुः राहु ] ●●●

अनुष्टुभ्

तुल्येऽपराधे स्वर्भानुर्भानुमन्तं चिरेण यत् ।
हिमांशुमाशु ग्रसति तन्म्रदिम्नः स्फुटं फलम् ॥ १४७

आर्या

समदोषी, तरि रविला ग्रासितसे राहु हा उशीरानें ।
ग्रासी चंद्रास झणीं, मृदुतेचें फलचि उघड तें गणणें

गद्यार्थ—रवि आणि चंद्र, यांचा अपराध सारखाच असताहि, राहु हा सूर्याला कधीकाळीं ग्रासतो; पण, चंद्राला लौकर लौकर ग्रासतो; त्याचें कारण, चंद्र हा [ सूर्यापेक्षा ] मृदु हेंच उघड [ असावें ]. ( जगाच्या व्यवहारात मृदु माणसेंच लौकर बळी जातात.) (चंद्रग्रहणें पुष्कळ असतात, पण, सूर्यग्रहण क्वचित् फार कालान्तरानें येतें, यावर भाष्य !) ●●●

अनुष्टुभ्

अनुगन्तुं सतां वर्त्म कृत्स्नं यदि न शक्यते ।
स्वल्पमप्यनुगन्तव्यं मार्गस्थो नावसीदति ॥ १४८ ॥

आर्या

अनुसरणें सन्मार्गा पूर्णपणें शक्य जाहलें न, तरी ।
मार्गी न नाश पावे; अनुसरणें म्हणुनि त्यास अल्प तरी॥

गद्यार्थ—सज्जनाचा मार्ग अनुसरणें, ही गोष्ट, पूर्णपणें जरी कोणाला शक्य झाली नाहीं, तरी, थोडेंतरी ( यथाशक्ति ) त्या

मार्गानें (अवश्य) जावें. त्या मार्गांतच असलें म्हणजे नाशाची भीति नाहीं.

अनुष्टुभ्

प्रत्यहं प्रत्यवेक्षेत नरश्चरितमात्मनः ।
किं नु मे पशुभिस्तुल्यं किं नु सत्पुरुषैरिति ॥ १४९ ॥

आर्या

नित्य समीक्षुनि चयणें नरें चरित आपुलेंच अपुल्याशीं ।
"पशुतुल्य काय माझें; तसेंच मम काय तुल्य सुजनांशीं" ॥ १४९ ॥

गद्यार्थ— मनुष्यानें प्रतिदिवशीं आपल्या आचरणाचें परीक्षण करून "पशूशीं तुल्य असें माझ्यात काय आहे तसेंच सज्जनांशीं तुल्य असें माझ्यात काय आहे" ह्यावर नजर ठेवावी.

अनुष्टुभ्

न द्विषन्ति न याचन्ते, परनिन्दां न कुर्वते ।
अनाहूता न चायान्ति तेनाश्मानोऽपि देवताः ॥ १५० ॥

आर्या

न द्वेष, न परनिंदा,
न वा कधीं याचना कुणा करिती ।
आगन्तुकी न करिती
म्हणुनि शिला याहि देवता होती ॥ १५० ॥

गद्यार्थ— परक्यांचा द्वेष करीत नाहींत, निंदा करीत नाहींत किंवा कोणाची याचना करीत नाहींत, न बोलावितां आगंतुकपणा करून कुठे (जात) येत नाहींत— यामुळें दगडसुद्धा देव होतात! (भोळ्या लोकाकडून देवत्व प्राप्त होण्यास प्रत्यक्ष साक्षात् (Positive) गुणाच्या अस्तित्वाचीसुद्धां जरुरी नाहीं. मानवाला हीनत्व देणाऱ्या काहीं दोषाचा अभाव एवढासुद्धा देवत्व –तेंहि दगडाला–देण्यास पुरा आहे.)

अनुष्टुभ्

यत्र विद्वज्जनो नास्ति श्लाघ्यस्तत्राल्पधीरपि ।
निरस्त-पादपे देश एरण्डोऽपि द्रुमायते ॥ १५१ ॥

अनुष्टुभ्

नसे विद्वान् तिथें जाई अल्पज्ञानीहि वानिला ।
ठरे उजाड देशांत वृक्ष परंडही भला ! ॥ १५१ ॥

गद्यार्थ— जेथें विद्वानच नाहीं तेथे अल्पज्ञानीसुद्धां स्तुतीला पात्र ठरतो. उजाड अशा प्रदेशात एरंडालासुद्धां 'वृक्ष' ही पदवी लाभते !

अनुष्टुभ्

यदि वाञ्छसि मूर्खत्वं वस ग्रामे दिनत्रयम् ।
अपूर्वस्यागमो नास्ति पूर्वाधीतं विनश्यति ॥ १५२ ॥

अनुष्टुभ्

मूर्ख होण्यास जा ग्रामीं रहा तूं त्रिदिनावधि ।
आधींचें शिकलें लोपे; नवीन न मिळे कधीं ॥ १५२ ॥

गद्यार्थ—तुला मूर्ख व्हायचें असेल तर (अवघे) तीन दिवस (खेडे) गावात जाऊन रहा. नवीन काहीं (पूर्वी न शिकलेले) शिकण्याम मिळणार नाहीं; आणि पूर्वीचें शिकलेलें असेल तेंहि नाश पावणार !

आर्या

स्वाधीनेऽपि कलत्रे नीचः परदारलम्पटो भवति ।
सम्पूर्णेऽपि तडागे काकः कुम्भोदकं पिबति ॥ १५३ ॥

आर्या

आधीन स्त्री असतां परस्त्रियेशींच नीच लगट करितो
भरलें तळें असूनहि कुंभजला पीत कावळा बसतो ॥ १५३

गद्यार्थ— स्वतःची (हक्काची) आज्ञेत वागणारी पत्नी असतांहि नीच हा परस्त्रीशीं लगट करतो. तळें चांगलें भरलेलें असताना तें सोडून भांड्यातल्या (गाडलेल्या घागिर् मिळ्या) व (अल्पशा, मर्यादित) पाण्यावरच कावळा खूप होऊन तें पीत बसतो.

अनुष्टुभ्

स्वगृहे पूजितो मूर्खः स्वग्रामे पूजितः प्रभुः ।
स्वदेशे पूजितो राजा विद्वान् सर्वत्र पूजितः ॥ १५४ ॥

आर्या

**स्वगृहीं पूजिती मूर्खा स्वग्रामीं प्रभु पूजित ।**
**स्वदेशीं पूजिती राजा विद्वान् सर्वत्र पूजित ॥ १५४ ॥**

गद्यार्थ-- मूर्खाला ( फारतर केवळ ) स्वत च्या घरींच मान मिळतो. श्रीमंताला किंवा ग्रामप्रमुखाला ( फारतर केवळ ) स्वत च्या गावाउच मान मिळतो, राजाला ( फारतर केवळ ) त्याच्या राज्यांतच मान मिळतो; पण विद्वान् सर्वत्र सन्मान्य असतो ●●●

आर्या

सुजनो न याति वैर परहितबुद्धिर्विनाशकालेऽपि ।
छेदेऽपि चन्दनतरु सुरभयति मुख कुठारस्य ॥१५१ ॥

आर्या

**परहितकारक सज्जन स्वनाशकाळींहि वैर ना धरितो।**
**छेदी कुन्हाड, तीसहि चंदनतरु गंध आपुला देतो**

गद्यार्थ--परहित करणें हीच बुद्धि असलेले सज्जन हे स्वत चा विनाश होत असतानाहि, ( विनाश करणारार्शीहि ) वैर धरीत नाहींत कुन्हाड, त्याला प्रत्यक्ष तोडीत असताहि चदनवृक्ष हा, तिच्या पात्याला आपला सुगध देत असतो. ●●●

शिखरिणी

वर मृत्युर्बाल्ये न पुनरधन जीवितमिद
वर वासोऽरण्ये न पुनरविवेके च नृपतौ ।
वर भैक्ष भोज्य न पुनरपमाने गृहगत
वर वेश्या भार्या न पुनरविनीता कुलवधू ॥१५६॥

शिखरिणी

**वरा मृत्यू बाल्यीं, परि न जगणें निर्धन महीं**
**रहावें रानींही--परि न अविवेकीनृपगृहीं ॥**
**जगा भैक्षें अन्नें--परि न गृहिंच्या मानरहित**
**वरी वेश्या पत्नी--न च कुलवधू नीतिरहित॥१५६॥**

गद्यार्थ--लहानपणींच मृत्यु आलेला बरा,पण,निर्धन अवस्थेंत ( दीर्घकाळ ) जगणें नको; अरण्यात राहिलेलें चालेल पण अविचारी राजाच्या आश्रयाला राहणें नको, भिक्षेचें अन्न खाणें परवडलें, पण, स्वताच्या घरींच, अपमानपूर्वक मिळालेलें अन्न खाणें नको, घडघडीत वेश्येशीं लग्न केलेलें पत्करलें पण कुलवधू असून अनीतिमान् असलेली नको. ●●●

अनुष्टुभ्

राजा दुर्जनसपर्कात्सर्वं दहति तत्क्षणात् ।
सलिलं पतित तप्ते तैले दन्दह्यते न किम् ? ॥१५७॥

अनुष्टुभ्

**राजा दुर्जनसंगानें जाळितो सर्व तत्क्षण ।**
**तप्त तैलामधें पाणी जाई जळुनि काय न ? ॥१५७॥**

गद्यार्थ--दुष्टाच्या सगतीनें राजा सर्व काहीं क्षणाभरात जाळून टाकतो. तापलेल्या तेलात पडलेलें पाणी ( क्षणांत चुर्र होऊन ) जळून जातें तद्वत्. ●●●

अनुष्टुभ्

येन यत्र च भोक्तव्य सुख वा दु खमेव वा ।
स तत्र रज्ज्वा बध्दैव बलाद दैवेन नीयते ॥१५८॥

अनुष्टुभ्

**सुख वा दु ख वा जेथें भोगणें प्राप्त ज्या असे ।**
**दोरीनें बांधुनी तेथें बळें त्या दैव नेतसे ॥१५८॥**

गद्यार्थ--ज्याला जेथें सुख किंवा दु ख भोगणें ( कपाळीं लिहिलेलें ) असेल तेथें, दोरीनें बांधूनच दैव त्याला नेतें. ●●●

अनुष्टुभ

यासामशुकवातेन दीपो निर्वाणता गत ।
तासामालिङ्गने पुसा नरके पतन कुत ? ॥१५९॥

आर्या

**पदरांच्या वाऱ्यानें ज्यांच्या, मिळतें दिव्यास निर्वाण !**
**त्यां आलिंगुनि पुरुषां नरकामध्यें कसें घडे पतन ?**

गद्यार्थ--ज्यांच्या पदराच्या वाऱ्यानें दिव्याला निर्वाण (एक अर्थ मालविला जाणें, दुसरा अर्थ मोक्ष) प्राप्त होतें त्या स्त्रियांच्या आलिंगनानें पुरुष नरकात कसा पडेल ! ●●●

अनुष्टुभ्

मानमुद्वहता पुसां वरमापत् पदे पदे ।
मानहीन सुरै. सार्धं विमानमपि सन्त्यजेत् ॥ १६० ॥

अनुष्टुभ्

**मानी जना भले येवो महापत्ति पदोपदीं ।**
**विमानहि सुरांसंगें लाचारीनें नको कधीं ॥१६०॥**

*गद्यार्थ*— या जगांत, मान रक्षून राहणान्याला पदोपदीं आपत्ति आली तरी तें पत्करतें; परंतु, मान सोडून, जरी देवांसह विमानांत बसण्यास मिळालें, तरी, ते त्यावर पाणी सोडतील !

●●●

अनुष्टुभ्

मर्कटस्य गले बद्धा पुष्पाणामिव मालिका ।
अविनीतस्य या लक्ष्मीः सा चिरं नैव तिष्ठति॥१६१॥

अनुष्टुभ्

**पुष्पमाला बांधलेली माकडाच्या गळां जशी ।**
**अविद्याच्या घरीं लक्ष्मी टिकेना फारशी तशी ॥१६१॥**

गद्यार्थ—माकडाच्या गळ्यांत बांधलेल्या पुष्पमालेप्रमाणें विद्याहीनाच्या हातीं संपत्ति ही फार काल टिकत नाहीं. ( माकडाप्रमाणेंच तो तिची लौकरच विधुळवाट लावून टाकतो.)

●●●

अनुष्टुभ्

भगवन्तौ जगन्नेत्रौ सूर्यचन्द्रमसावपि ।
काले गच्छत एवास्तं; नियतिः केन लङ्घ्यते ? ॥ १६२॥

आर्या

**जगताच्या नेत्रांसम तेजस्वी सूर्य चन्द्र हे दोन्ही ।**
***काले अस्ता जाती, दैवा टाळूं शकेल का कोणी ?॥१६२॥***

*गद्यार्थ*—जगाचे जणूं नेत्रच असे तेजस्वी सूर्य आणि चंद्र हे सुद्धा [ त्यांच्या नियुक्त ] वेळीं अस्त पावतात. दैवांत असेल तें कोण टाळूं शकेल ?

●●●

वसंततिलका

पञ्चाननं परिभवत्युदरेण वेणी—
दण्डेन पन्नगकुलं, शशिनं मुखेन ॥
या सा जगत्त्रयजयप्रथितानऽऽताङ्गी
बुद्धया कया बत बुधैरवला बभाषे ? ॥ १६३

वसंततिलका

**सिंहास जी हटविते अपुल्या कटीनें,**
**वेणीमुळेंहि उरगा; शशिला मुखानें ।**
**जिंकी त्रिलोक निज सुंदरशा तनूनें**
**बोलीं तिलाच अबला कुठल्या प्रमाणें ?॥ १६३ ॥**

*गद्यार्थ*— जी आपल्या (कृश) उदरानें (कटीनें) सिंहाचा पराभव करते; वेणीनें सर्पाचें गर्वहरण करते, मुखानें चंद्राला हटविते, आणि सर्व अंगांनीं त्रैलोक्यावर जय मिळविते त्या स्त्रीला 'अबला' हें नाव शहाण्यांनीं, कोणती अक्कल चालवून दिलें कोण जाणे ! ( कोणतें प्रमाण मानलें ? )

●●●

अनुष्टुभ्

नीचा दुःखेन याच्यन्ते प्रयच्छन्ति न याचिताः ।
अथ किञ्चित्प्रयच्छन्ति न गले, न च तालुके ॥ १६४ ॥

अनुष्टुभ्

**दुखें [ किंवा क्वचित् ] याची कुणी नीचां,**
**याचिले तरि देति न ।**
**दिल स्वल्प तरी पोंचे न टाळूस, गळ्यास न ॥१६४॥**

*गद्यार्थ*— नीचापाशीं ( क्वचित् कुणी किंवा मोठ्या संकटानें मागच पडलें तर ) मोठ्या कष्टानेंच कुणी याचना करतात. याचना करून नीच कधीं देत नाहींत. चुकून दिलेंच तर तें इतकें अल्प असेल कीं तें गळ्यापर्यंत तर पोंचणार नाहींच. पण टाळ्यापर्यंतहि पोंचणार नाहीं.

●●●

आर्या

न हि भवति यन्न भाव्य
भवति च भाव्यं विनाऽपि यत्नेन ।
करतलगतमपि नश्यति
यस्य हि भवितव्यता नास्ति ॥ १६५ ॥

आर्या

**होणें न, तें घडेना; होणारें तें घडे विनायास ।**
**भवितव्यता न ज्या, तें नासे लागोनियाहि**
**हातास ॥ १६५ ॥**

गद्यार्थ—जें व्हावयाचेंच नाहीं, (असें नियतीनें ठरविलेलें असेल) तें होत नाहीं. आणि, जें होणारच, (असें नियतीनें

ठरविलें असेल ) तें यत्नावांचूनहि होतेंच. ज्याला भवितव्यताच ( भविष्यकाल ) नाहीं, तें, अगदीं हातीं येऊन सुद्धां नष्ट होतें.

अनुष्टुभ्

धातस्तात ! विरुद्धोऽपि द्वितयं मा कृथा नृणाम् ।
भृत्यत्वमविवेकज्ञे स्नेहमन्यरते जने ॥ १६६ ॥

आर्या

होशी विरुद्ध तरिही
विधे ! न दे दोन वस्तु मनुजांसी ।
अविवेकी-जनसेवा
स्नेहहि पर-रत अशा मनुष्याशीं ॥ १६६ ॥

गद्यार्थ— हे ब्रह्मदेवा ! तू कुणाच्या ( कितीहि ) विरुद्ध झालास, तरी, कुणालाहि या दोन वस्तु देऊं नकोस. एक– अविवेकी धन्याची नोकरी; आणि, दोन– दुसऱ्यावर प्रेम जडलेल्या माणसाबद्दल प्रेम !

आर्या

दातव्यं भोक्तव्यं सति विभवे सङ्ग्रहो न कर्तव्यः ।
पश्येह मधुकरीणां सञ्चितमर्थं हरन्त्यन्ये ॥ १६७ ॥

आर्या

द्यावें वा भोगावें, वैभव असतां, न ठेवि सांठवुनी ।
मधमाशांचा मधुनिधि,
यश नेती हे हरून अन्य कुणी ॥ १६७ ॥

गद्यार्थ—वैभवकाळ असताना माणसानें, दान करावें व उपभोगहि घ्यावा पण संचय करीत बसूं नये. हा पहा येथें मधमाश्यांनीं साचविलेला मधुकोश (बिचाऱ्यांनीं कोणाला दिला नाहीं किंवा स्वतः खाल्ला नाहीं, ) दुसरेच कुणी लुटून नेत आहेत.

आर्या

कियती पञ्चसहस्री ? कियती लक्षाऽपि कोटिरपि कियती ? ।
औदार्योन्नतमनसां रत्नवती वसुमती कियती ? ॥ १६८ ॥

आर्या

पांच सहस्र कितीसे ?
लक्ष कितीसे ? नि कोटि तरि कितिशी ?
थोर महोदारांना
पृथ्वी मणिमय असूनही कितिशी ? ॥ १६८ ॥

गद्यार्थ— थोर महोदार पुरुषांच्या दृष्टीनें, पांच सहस्र (रुपये म्हणा) ही काय अशी मोठी रक्कम आहे ! लक्ष तरी असे काय मोठे ! किंवा कोटीची तरी अशी काय गोष्ट आहे ! किंवा रत्नपरिपूर्ण अशी अखिल पृथ्वी ही तरी काय मोठी मोलाची वस्तु आहे ! ( दान करतांना त्यांना या सर्व वस्तूंची काय क्षिति ? )

अनुष्टुभ्

एक एव सतां दोषो द्वितीयो नोपपद्यते ।
यदेनं क्षमया युक्तमशक्तं मन्यते जनः ॥१६९॥

अनुष्टुभ्

दोष एकचि थोरांत दुसरा दिसतोच न ।
क्षमा ते करिती तेव्हां म्हणे ' दुर्बल ' त्यां जन ॥

गद्यार्थ—सज्जनांमध्यें एकच दोष असतो; दुसरा कांहीं दिसून पडत नाहीं. (तो दोष हा कीं) जेव्हां ते क्षमा करतात तेव्हा लोक त्यांना दुर्बल म्हणतात.

अनुष्टुभ्

आयासशतलब्धस्य प्राणेभ्योऽपि गरीयसः ।
गतिरेकैव वित्तस्य दानमन्या विपत्तयः ॥ १७० ॥

अनुष्टुभ्

मिळे जें शतयत्नांनीं, श्रेष्ठ प्राणांहुनी अशा— ।
गति एकचि वित्ताची–दान; वा घोर दुर्दशा ॥१७०॥

गद्यार्थ—शेकडों कष्टानीं मिळविलेल्या आणि प्राणांहून प्रिय अशा संपत्तीची गति एकच; ती म्हणजे दान; दुसरी गति आपत्ति !

उपजाति

अहो ! अहीनामपि लेहनं स्याद् दु:खानि नूनं नृपसेवनानि ।
एकोऽहिना दष्ट उपैति मृत्युं क्ष्मापेन दष्टस्तु सगोत्रमित्रः ॥

उपेन्द्रवज्रा

बरे अहींचे विषदंश साचे, न दुःख तें हो नृपसेवनाचें ।
मरे पहा एकच सर्पदष्ट—कुटुंबमित्रांसह राजदष्ट ॥

गद्यार्थ—सर्पाचा दंश एकवेळ पुरवला पण नृपसेवेचीं तीं महादुःखें नकोत. सर्प ज्याला चावला तो एकटाच मरतो, पण

राजानें दश केला असता ज्याला दश झाला तो एकटाच मरत नाहीं तर कुटुंबीय व मित्र यासह ! ●●●

आर्या

अविदित 'शषस'विशेषा वाणी नि सरति वक्त्रतो येषाम्
गुदवदनविवरभेदो रदनैरनुमीयते तेषाम् ॥१७२॥

आर्या

'श ष सां' तिल भेदांविण निघते ज्याच्या मुखांतुनी वाणी ।
भेदहि गुद-वदनातिल त्यांच्या दांतामुळेंच ये दिसुनी

गद्यार्थ—ज्याच्या मुखातून श, ष, स याचे उच्चार अस्पष्ट ( व निराळे न समजतील अशी वाणी ) येत असेल त्याचें गुदद्वार आणि मुखविवर याच्यातला फरक दुसऱ्यात दात आहेत म्हणून ओळखू येतो ! (अशुद्ध वाणी उच्चारणाऱ्या मुखाला गुदच म्हणावे अशी ही निंदा आहे—कारण जें मुख 'शरण' चा 'सरण' (म्हणजे चिता) व 'सकृत्' चें 'शकृत्' म्हणजे विष्ठा करतें त्याला हेंच नाव योग्य !) ●●●

शार्दूलविक्रीडित

शीतार्ता इव सङ्कुचन्ति दिवसा, नैवाम्बरं शर्वरी
शीघ्रं मुञ्चति, किं च सोऽपि हुतभुक्कोणं गतो भास्कर ।
त्वं चानङ्गहुताशभाजि हृदये सीमन्तिनीनां गतो
नास्माकं वसनं न वा युवतय कुत्र व्रजामो वयम् ? १७३

आर्या

गारठुनी आखसले दिन, रजनी नैव अंबरास झणीं—
सोडी ; रविही बसला शेकोटीच्या कडेस जावोनी ॥
तूंहि नृपा मदनानलतप्त स्त्रीच्या कुशींत घुसलास
आम्ही जावें कोठें ? नाहीं तरुणी न वस्त्र आम्हास १७३

गद्यार्थ—( श्लोक जगन्नाथाचा समजतात. कोणी याचक कवि, राजाला, थडीच्या दिवसात विनवितो ) दिवस हे जणु थंडीनें गारठून कुडकुडून आखसले आहेत (लहान झाले आहेत.) शर्वरी म्हणजे रात्र, अंबर म्हणजे आकाश ( दुसरा अर्थ वस्त्र ) लौकर सोडीत नाहीं ( म्हणजे रात्र दीर्घ झाली आहे ) ( गुप्तितार्थ असा कीं, स्त्री लौकर वस्त्र सोडीत नाहीं—यामुळें पुरुष कुडकुडत बसला आहे,—ऊब देणार तरी कशी ?) सूर्य ( हा जगाला ऊब देणारा म्हणतात, ) तर, स्वतांच अग्नीची दिशा जी दक्षिण दिशा तिथें गेला आहे ( शेकोटीला बसला आहे ) ( हिवाळ्यात सूर्य दक्षिणेकडे असतो. ) हे राजा ! तूंहि मदनाग्नीनें तप्त झालेल्या तरुणींच्या हृदयात ( ऊब घेत ) जाऊन बसला आहेस ! हाय ! हाय आम्हाला नाहीं वस्त्र ना तरुणी ! आम्ही कोठे जावें ? ●●●

अनुष्टुभ्

युक्तियुक्तमुपादेयं वचनं बालकादपि ।
अन्यत्तृणमिव त्याज्यमप्युक्तं पद्मजन्मना ॥ १७४ ॥

अनुष्टुभ्

सयुक्तिक अशी उक्ति घ्यावी बाळाकडूनहि ।
दुजी तृणापरी टाका, वदता ब्रह्मदेवहि ॥ १७४ ॥

गद्यार्थ—सयुक्तिक असे बोलणें, मग तें उच्चारणारें एखादें बालक का असेना, त्याच्यापासूनहि तें घ्यावें. त्याहून निराळें ( युक्तीला सोडून ) जें बोलणें मग तें, प्रत्यक्ष ब्रह्मदेवाच्या का मुखातून निघालेलें असेना, तें तृणासमान समजून टाकून द्यावें ●●●

उपजाति

न जातु कामान्न भयान्न लोभाद्
धर्मं त्यजेज्जीवितस्यापि हेतो ॥
धर्मो नित्य सुखदु खे त्वनित्ये
जीवो नित्यो हेतुरस्य त्वनित्य ॥१७५॥

उपजाति

कामें न, लोभें न, भयें न किंवा
प्राणार्थेही धर्म न रे त्यजावा ॥
अनित्य दु खेंसुख, धर्म नित्य
अनित्य हेतू, परि जीव नित्य ॥१७५॥

गद्यार्थ—कामासाठीं, भयामुळें, लोभामुळें, एवढेंच काय प्रत्यक्ष प्राण जगविण्यासाठींसुद्धा धर्माचा त्याग करू नये, कारण धर्म हा शाश्वत आहे पण सुखेंदु:खें हीं अनित्य आहेत ( या ठिकाणीं जीव शब्दाचा अर्थ ) आत्मा हा नित्य आहे पण जन्म येण्याचा हेतु-कारण-हें अनित्य आहे. ●●●

अनुष्टुभ्

तस्य श्रीभोजराजस्य द्वयमेव सुदुर्लभम् ।
शत्रूणां शृङ्खलैर्लोहं ताम्रं शासनपत्रकै ॥१७६॥

अनुष्टुभ्

**राज्यांत भोजराजाच्या दुर्मिळ द्वय हें असे— ।**
**शत्रु बांधून लोखंड, तांबें ताम्रपटें तसें ॥१७६॥**

गद्यार्थ—( दोष दाखवून गुण दाखविण्याचा प्रकार. ) (श्रीभोजराजाच्या राज्यात इतकी सुबत्ता होती कीं, अमुक वस्तु मिळत नाहीं, किंवा, दुर्मिळ झाली, असें कधीं घडलेच नाहीं. ) मात्र, दोन वस्तु त्याच्या राज्यात ( अति मागणीमुळें ) दुर्मिळ होऊन बसल्या होत्या. पैकीं पहिली म्हणजे लोखंड ! भोजानें इतके शत्रु जिंकिले, कीं, त्यांच्या हातापायात बेड्या साखळदंड घालण्यासाठीं, मोठ्या प्रमाणावर लोखंड लागत असल्यानें लोखंड दुर्मिळ झालें ! दुसरी वस्तु तांबें ! भोजराजा एवढा मोठा दाता होता, कीं, तीं दानें देताना त्यासाठीं जे ताम्रपट लागत, ते तयार करण्यास तांब्याचा फार वापर झाल्यानें तांबेंहि दुर्मिळ झालें !

●●●

अनुष्टुभ्

अखिलेषु विहङ्गेषु हन्त ! स्वच्छन्दचारिषु ।
शुक पञ्जरबन्धस्ते मधुराणां गिरां फलम् ॥१७७॥

आर्या

**उडती स्वच्छंद अशा**
**सगळ्या पक्ष्यांत पकड्या तूंतें !**
**शुक ! पिंजऱ्यांत कोंडिति;**
**मधुरवचांचेंच तव फल न कां तें ? ॥१७७॥**

गद्यार्थ—इतर सर्व पक्षी मन मानेल तसे, आकाशात भराऱ्या मारीत असता, हे पोपटा ! तुला मात्र पिंजऱ्यात कोंडून ठेविण्यात यावें हें, हाय ! हाय ! तुझ्या मधुर वाणीचेच फल नव्हे का ? ( मुखरस्तत्र हन्यते ! सुदर निष्पाप स्त्रीवरच पापी चाडाळाची पहिली धाड ! गुणानामेवाय तव जननि ! दोषः परिणतः । असें गंगानदीविषयींसुद्धां जगन्नाथाला म्हणावें लागलें ! ] ( शुकान्योक्ति. )

●●●

अनुष्टुभ्

यान्ति न्यायप्रवृत्तस्य तिर्यञ्चोऽपि सहायताम् ।
अपन्थानं तु गच्छन्तं सोदरोऽपि विमुञ्चति ॥ १७८ ॥

अनुष्टुभ्

**न्याय्यमार्गें चालत्याला पशुपक्षीहि साह्यद ।**
**जाई जो कुपथें त्याला-सख्खा भाऊहि सोडित ॥ १७८**

गद्यार्थ—न्याय्य मार्गानें जाणाऱ्याला पशु पक्षीसुद्धा साह्यकारक होतात. ( उदाहरणार्थ—सीता परत मिळविण्याच्या कार्यांत श्रीरामाला जटायुसारखा पक्षी, सुग्रीव, हनुमान् यासारखे पशुसुद्धा साह्यकर्ते झाले. ) वाईट मार्गानें जाणाराला मात्र सख्खा भाऊसुद्धा सोडून जातो. ( उदाहरणार्थ-परस्त्रीहरण करणाऱ्या रावणाला सोडून, बिभीषण श्रीरामाच्या पक्षात आला.)

●●●

प्रहर्षिणी

सौमित्रिर्वदति "बिभीषणाय लङ्कां
देहि त्वं भुवनपते विनैव कोशम् ॥
एतस्मिन् रघुपतिराह वाक्यमेतद्:—
"विक्रीते करिणि किमङ्कुशे विवादः ? " ॥१७९॥

प्रहर्षिणी

**श्रीरामा अनुज वदे तदा " बरें कां**
**दे कोशाविणचि बिभीषणास लंका ॥ "**
**तैं बोले रघुपति त्यास हेच शब्द—**
**"कां हत्ती विकुनिहि अंकुशार्थ वाद ?" ॥ १७९**

गद्यार्थ—( श्रीरामानें रावणवध करून लंका जिंकिली पण बिभीषणाला तेथें राज्यावर बसविलें. "सोन्याची लंका" हें नाव पडण्याइतकी अलोट संपत्ति लंकेच्या भांडारात होती तिचा लोभ लक्ष्मणाला वाटला. ) लक्ष्मण रामाला म्हणतो. "दादा ! (लंकेचें राजपद बिभीषणाला द्यायचें तें द्या ! पण कोशातली संपत्ति तेवढी आपण अयोध्येला नेऊ. ) बिभीषणाला कोश वगळून राज्य तेवढें द्या." तेव्हा श्रीराम त्याला म्हणाले "(अरे वेड्या) ! हत्ती विकून टाकला – आणि आता " अंकुश (कोणाचा व तो केवळ्याला द्यायचा ) याबद्दल घासाघीस करणें बरें दिसेल का ? "

●●●

" विक्रीते करिणि किमङ्कुशे विवादः ? " ही समस्या-पूर्तीसाठीं ओळ समजून दुसऱ्या एका चावट कवीनें तिची अशी पूर्ति केली –

प्रहर्षिणी

मत्प्रेमा त्वरितचि साथ तूं दिलीस,
देहाचें मिलनहि गे घट्ट दिलेंस ॥
कां आतां मग मुखचुंबनीं विरोध ?
कां हत्ती विकुनिहि वाद अंकुशार्थ ? ॥ १८० ॥

गद्यार्थ—( प्रेमी युगलाचें देहमीलन झाल्यावर, एक दिवस प्रिया रुसली; व, मुखचुंबनाला विरोध करूं लागली; तेव्हां, तिचा प्रियकर तिला म्हणतो— ) मी माझें तुझ्यावरील प्रेम व्यक्त केलें, व त्याला तूंहि त्वरित साद दिलीस; व, आपण देहांचें अद्वैतसुद्धां साधलें ! आणि आतां मुखचुंबनाला विरोध करितेस ? वेडे ! हत्तीगारखा हत्ती विकून टाकला, आणि, आतां अंकुशासाठीं एवढी खळखळ ? ●●●

आर्या

यत्र न फलितास्तरवो विकसितसरसीरुहाः सरस्यो वा ।
न च सज्जनाः, स देशो गच्छतु निधनं श्मशानसमः १८०

आर्या

सुफलित वृक्ष न जेथें,
फुललीं कमलें न वा तळ्यांतून ।
सुजन न जिथें, श्मशानचि—
येवो देशास त्या, क्षणीं निधन ॥ १८० ॥

गद्यार्थ—ज्या देशामध्यें वृक्षांना फळें लागत नाहींत, व तळ्यांतून कमलें फुलत नाहींत, आणि ज्या देशांत सज्जन रहात नाहींत — तो देश स्मशानासारखाच असून त्याचा विनाश होवो ! ●●●

अनुष्टुभ्

" अधः पश्यसि किं बाले !
तत्र किं पतितं भुवि !"
" रे रे मूढ ! न जानासि
गतं यौवनमौक्तिकम् ? " ॥ १८१ ॥

आर्या

" बाले कां पहसी खालीं ! काय गे वस्तु सांडली ? । "
"वेडया ! तुला न ठाऊक गेलें तारुण्यमौक्तिक ?"॥१८१॥

गद्यार्थ—( रस्त्यानें एक म्हातारी वांकत वांकत चालली असतां एकजण तिला खवचटपणें मुद्दामच 'बाले !' असें संबोधून विचारतो — ) बाले ! अशी खालीं कां बघत आहेस — तुझी कांहीं वस्तु कां जमिनीवर सांडली आहे ? " ( ती बाई पक्की होती. )" वेडया तुला ठाऊक नाहीं कां ? अरे तारुण्यरूपी मोती सांडलें आहे !" (असें उत्तर देऊन " बाबा आतां खवचटपणा करतोहेस खरा, पण, तुझ्यावरहि केव्हां तरी हा प्रसंग येणारच आहे " अशा इशाऱ्याचा फटकारा जो तिने दिला, तो त्या माणसाला कितपत झोंबला तें कळण्यास मार्ग नाहीं ! ) ●●●

उपजाति

अनन्तपारं किल शब्दशास्त्रं
स्वल्पं तथायुर्बहवश्च विघ्नाः ॥
सारं ततो ग्राह्यमपास्य फल्गु
हंसो यथा क्षीरमिवाम्बुमध्यात् ॥ १८२ ॥

इंद्रवज्रा

या शब्दशास्त्राप्रति अंत नोहे;
विघ्नें किती ! जीवित अल्प आहे ॥
घ्या क्षुद्र तें सोडुनि, सार जें तें
पाण्यांतुनी हंस जसा दुधातें ॥१८२॥

गद्यार्थ—शब्दशास्त्राला अंत नाहीं. मानवी आयुष्य अगदीं थोडें आहे. त्यांत विघ्नेंहि पुष्कळ; तेव्हां ( या माझ्या लेखनांतून ) ( किंवा या जीवनांतून ) क्षुद्र, महत्त्वहीन तें सोडून, जलमिश्र दुधांतुन हंस जसा दूधच तेवढें घेतो तसें सार–महत्त्वाचें–तेवढेंच घ्या. ●●●

रथोद्धता

क्षालयामि तव पादपङ्कजं;
नाथ ! दारुदपदोः किमन्तरम् ?
मानुषीकरणचूर्णमस्ति ते
पादयोरिति कथा प्रथीयसी ॥ १८३ ॥

स्वागता

मी धुतों रघुवरा ! तव पाय
भेद लांकुडशिलांमधि काय ? ॥
पादधूलि तव निर्मितेच स्त्री
ही कथा तव जगांत गाजली ॥ १८३ ॥

गद्यार्थ—( वनवासांत जातांना, वाटेंत नदी ओलांडतांना श्रीरामाला पडावांतून जाणें भाग होतें. पण त्या पडावाचा नावाडी जो गुहक त्यानें प्रथम श्रीरामाचे पाय नीट धुतले व

मगच त्याला पडावात चढूं दिलें. त्याचें कारण तो सागतो —) हे राघवा! मी तुझे पाय आधीं नीट धुऊन घेतों. लांकूड व दगड यांत असा काय मोठा फरक आहे? तुझ्या पायाची धूळ ज्याला स्पर्श करील त्यांतून एक (अहल्येसारखी) स्त्री उत्पन्न करील अशी शक्यता आहे; कारण, (अहल्येची) गोष्ट आतां सर्वत्र प्रसिद्ध आहे. (तेव्हां दगडाची स्त्री करणाऱ्याला लाकडाची स्त्री करणें अवघड थोडेंच आहे? तशी जर या पडावाची स्त्री झाली, तर, माझी बायको, ही सवती पाहून, मला घरात घेणार नाहीं; व पडाव हें माझें उपजीविकेचें साधन गेल्यानें माझी अन्नान्नदशा व्हावयाची! अशीच मध्यवर्ती कल्पना असलेला एक श्लोक "शिक्षिताऽपि सखिभिः" (प्रकरण ५०) पहावा.)

●●●

आर्या

अनचितकर्मारम्भो, स्वजनविरोधो, बलीयसा स्पर्धा।
प्रमदाजनविश्वासो मृत्युद्वाराणि चत्वारि ॥ १८४ ॥

आर्या

**करणें अनुचित, मित्राविरुद्ध, वा स्पर्धणें बलिष्टासी।**
**विश्वसणें स्त्रीवर, हीं द्वारें जणुं चार नेति मृत्यूसी ॥**

गद्यार्थ—अयोग्य कर्म करणें, आपल्याच माणसाशीं विरोध करणें, बलिष्टाशीं चढाओढ करणें, व तरुण स्त्रीवर विश्वास ठेवणें, हीं जणू काय, मृत्यूचीं चार द्वारेंच होत.

●●●

उपजाति

गवाशनानां स शृणोति वाक्य-
महं तु राजन् वचनं मुनीनाम् ॥
न तस्य दोषो न च मद्गुणो वा
संसर्गजा दोषगुणा भवन्ति ॥ १८५ ॥

उपजाति

**गोभक्षकांचें वच ऐकतो तो**
**ऐकें मुनींच्या वचनांस मी तों ॥**
**न दोष त्या; ना गुण यांत मातें**
**दोषां गुणां संगति मूळ होते ॥ १८५ ॥**

गद्यार्थ—(एका राजाला दोन वृत्तींचे पोपट पाहण्यास मिळाले. भिल्लाच्या वस्तींतला पोपट म्हणे "सावज आलें रे आलें. धरा, मारा, कापा!" दुसरा पोपट ऋषिमुनींच्या आश्रमांत वाढल्यानें, "या बसा; कोण बरें आपण? आश्रमांत का बरें पायधूळ झाडली?" असें काहीं अत्यंत संस्कारी शब्द बोले. याची पूर्वपीठिका, राजाला मात्र माहीत नसल्यानें, त्यानें या दुसऱ्या पोपटाला, "दोघांच्या बोलण्यात असा भेद का?" असें विचारल्यावरून तो पोपट सांगतो—) तो दुसरा पोपट गोभक्षकाचे शब्द (नेहमीं) ऐकतो; मी मात्र मुनींचें बोलणें (नित्य) ऐकतों. (तेव्हां दोघांचें बोलणें असे भिन्न असण्यात) त्या दुसऱ्याला दोष (देतां येत) नाहीं किंवा मला त्याचें श्रेयहि (घेता येत नाहीं.) राजा! दोष काय किंवा गुण काय संगतीमुळेच प्राप्त होतात.) (*अन्योक्ति प्रकरणात हरिणान्योक्तींत* (प्र. ४७ श्लो. २७४) पहा. त्यात पारध्यांच्या वस्तींतला पोपट असेच बोलतांना दाखविला आहे.)

●●●

अनुष्टुभ्

दन्तैर्हीनः शिलाभक्षी निर्जीवो बहुभाषकः।
गुणस्यूतिसमृद्धोऽपि परपादेन गच्छति ॥ १८६ ॥

अनुष्टुभ्

**दांतांवीण, खडे खातो; निर्जीव बहु बोलतो।**
**अंगीं गुण असोनीही परपादेंच चालतो ॥ १८६ ॥**

*गद्यार्थ*—(*प्रहेलिका—उखाणा—*) दात नाहींत तरी खडे खातो, जीव नसून पुष्कळ बोलतो, अंगात 'गुण ओतप्रोत' भरले असूनहि (दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी प्यावें तसा) दुसऱ्याच्या पायानें चालतो. (उत्तर—पायातला चर्मी जोडा.) (गुण म्हणजे सद्गुण किंवा दोरा. शिवणीचे दोरे जोड्याच्या अंगात *आरपार भरपूर गेलेले असतात.)(बाकीचा अर्थ स्पष्ट आहे.)*

●●●

रथोद्धता

निर्धनं निधनमेतयोर्द्वयो-
स्तारतम्यविधिमुक्तचेतसाम् ॥
बोधनाय विधिना विनिर्मिता
'रेफ' एव जयवैजयन्तिका ॥१८७॥

रथोद्धता

**निर्धनांत निधनांत जाणिती—**
**तारतम्य न अशा नरांप्रति— ॥**
**बोधनार्थ विधिनेंच निर्मिलें—**
**शीर्षि 'रेफ' जयचिन्ह हें भलें ॥ १८७ ॥**

गद्यार्थ—(शब्दशास्त्र, किंवा, व्युत्पत्तीच्या दृष्टीनें पाहता, निर्धन व निधन या दोन्ही शब्दांचा अर्थ दारिद्य असा असताहि 'निधन' शब्दाला मरण हा अर्थ का आला, व मरणापेक्षा दारिद्य अधिक भयंकर का याविषयीं अभिनव कविकल्पना निर्धन (त्व) आणि निधन (मरण) याच्यांत अधिक भयंकर कोण याविषयीं, चढाओढ लागली, तर, निर्धनत्व (दारिद्य) च विजयी होतें, हें जगानें (दारिद्यान्मरणं वरम्) मान्य केलें आहे. पण दारिद्यांतसुद्धा प्राणांना कंटाळून वसणाऱ्या कित्येक मूर्खांना डोळ्यांनीं स्पष्ट दिसावें म्हणून—) निर्धन आणि निधन या दोघांत (अधिक भयंकर कोण—त्यांतल्या त्यांत बरें कोण हें समजण्याइतकें) तारतम्य ज्यांना नसतें, अशांना तो भेद स्पष्ट दिसावा म्हणूनच जणू काय, विधीनें (भयंकरपणांत) विजयी होणाऱ्याच्या डोक्यावर रफाररूपी शिरपेंच लावून ठेविला आहे. (प्र. १० श्लो. १९ "उत्तिष्ठ क्षणमेकम्" हा श्लोक पाहिल्यास हीच गोष्ट त्या कवीनें, निराळ्या युक्तीनें सिद्ध केल्याचें दिसेल.)

●●●

उपजाति

प्रिये प्रयाते हृदय प्रयातं
निद्रा गता चेतनया सहैव ॥
निर्लज्ज हे जीवित ! न श्रुतं किं—
"महाजनो येन गतः स पन्था" ॥ १८८ ॥

आर्या

**जातां प्रियकर माझा, हृदयहि गेलेंच मागुनी निघुनी**
**गेली निद्राहि तशी चैतन्याला स्वयेंच घेवोनी ॥**
**निर्लज्ज जीविता ! तू ऐकिलेंस का न हें कधीं ऐसें—**
**कीं "जातात महाजन युक्तचि तो मार्ग बहुजनांस असे" ॥ १८८ ॥**

गद्यार्थ—(प्र ३४ श्लोक १ यामध्ये तर्क, श्रुति आणि ऋषींच्या उक्ति यांत मेळ नाहीं. धर्मतत्त्व गूढ असल्यानें "महाजनो येन गतः स पन्थाः" असा निष्कर्ष काढला; तेंच समस्येचें वाक्य करून कुण्या कवीनें अभिनव पूर्ति केली आहे. प्राणांना कंटाळलेली एक विरहिणी म्हणते—) माझा प्रियकर गेला त्याच्या मागोमाग हृदय चालतें झालें (हृदयच ठिकाणीं नाहीं तेव्हां चैतन्य शिवा निद्रा तरी कुठून असणार ?) आणि पाठोपाठ चैतन्याला घेऊन निद्राहि निघून गेली (पण लोचट सारखे प्राण मात्र जात नाहींत म्हणून चिडून ती म्हणते) "हे निर्लज्ज जीविता ! मोठे लोक जातात त्या मार्गानें शुद्रांनीं जावें हा नीतिनियम तू ऐकला नाहींस काय ?" (विरहिणीच्या दृष्टीनें हृदय, चैतन्य निद्रा हेच महाजन. प्राण हे क्षुद्र.) ●●●

अनुष्टुभ्

'सर्वज्ञ' इति लोकोऽयं भवन्तं भाषते वृथा ।
पदमेकं न जानीते वक्तुं नास्तीति याचके ॥ १८९ ॥

अनुष्टुभ्

**जन 'सर्वज्ञ' हे तूंतें म्हणती तें असे वृथा ।**
**याचका शब्द 'नाहीं' हा तुला येई न बोलतां ॥ १८९ ॥**

गद्यार्थ—(दोष दाखवून स्तुति) (हे राजा !) लोक तुला 'सर्वज्ञ' असें जें म्हणतात ते खोटें आहे. कारण याचकाला उद्देशून 'नाहीं' हा शब्द बोलण्याचें तुला माहीत नाहीं. (राजस्तुति प्र. २५ श्लो १ "सर्वदा सर्वदोऽसि" पहा त्यांत "सर्व देणारा असलास तरी दोन वस्तु तू देत नाहींस" असें दाखविलें आहे.)

●●●

अनुष्टुभ्

मृगेन्द्रस्येव चन्द्रस्य मयूखैर्नखरैरिव ।
पाटितध्वान्तमातङ्गमुक्ताभा भान्ति तारकाः ॥ १९० ॥

आर्या

**किरणांच्याच नखांनीं, शशीरूप हरि तमोगजा भेदी ।**
**तेणें नभीं विखुरले मोती तारेच भासतात तधीं ॥ १९०**

गद्यार्थ—(सुन्दर पूर्णोपमा) किरणरूपी नखांनीं, चंद्ररूपी सिंह, अंधकाररूपी हत्तीला फाडून काढतो तेव्हां (त्याच्या गंडस्थळांतून) सर्वत्र विखुरलेले मोती हेच जणू काय ताऱ्या-सारखे (आकाशांत पसरलेले) शोभताहेत. (कृष्णवर्ण हत्तीला अंधार, तीक्ष्ण नखांना किरण, मोत्यांना तारे म्हणण्यांतलें औचित्य विचार आहे.)

●●●

शार्दूलविक्रीडित

रामाधाचव मेदिनी, धनपतेर्बीजं जलाद्वाहल
प्रेतेशान्महिषं तवास्ति वृषभं फालं त्रिशूलादपि ॥
शक्ताऽहं तव चान्नदानकरणे स्कन्दोऽस्ति गोरक्षणे
खिन्नाऽहं हर ! भिक्षया कुरु कृषिं, भिक्षाटनं मा कृथा ॥ १९१ ॥

सुमंदारमाला

धरा माग तूं भार्गवा, धीं कुबेरा,
वलाला पहा नागरा याचुनी ।
यमा माग रेडा; तुझा बैल आहे;
वने फाळ रे या त्रिशूलांतुनी ॥
असें अन्नपूर्णा तुला पोसण्या मी,
करी पुत्र हा स्कंद गोरक्षण ।
भिकेला तुझ्या मीच कटाळलें रे !
करी तू कृषी, सोड भिक्षाटन ॥ १९१ ॥

गद्यार्थ— ( प्र. ४१ श्लो. ९ ' अत्तु वाञ्छति ' यात गृहकल्हाला विटलेला शंकर आहे. या श्लोकात पार्वती शंकराच्या भिकेला विटली आहे. ) ( पार्वती शंकरास म्हणते )—तुझ्या भिक्षेला मी कंटाळले आहें भिक्षार्थ फिरण्याचें सोडून, तू आता शेती कर. ( तू म्हणशील " शेतीचीं साधनें मजपाशीं नाहींत. " तर तीं कशीं मिळवायचीं तें मी सांगतें ) ( समुद्राला हटवून शेतीला जमीन मिळविण्यातला तज्ज्ञ ) परशुराम याचेपाशीं जमीन माग ( तो तुझा शिष्य असल्यानें नाहीं म्हणणार नाहीं ) ( तुझा मित्र व शेजारी ) कुबेर आहे त्याच्यापासून उत्तम बीबियाणें मागून घे. बलरामापासून ( त्याचें आयुध ) नांगर मागून घे, यमापासून एक रेडा मागून घेऊन त्याच्या जोडीला तुझा बैल आहेच; तुझ्या त्रिशूलापासून ( छानपैकीं तीन सरींचा ) फाळ तयार होईल. ( शेतावर ) तुला भाकरी आणावयाला मी भरभक्कम अन्नपूर्णा (तुझ्या घरातच) आहे ! आणि (सहा तोंडें असल्यानें सर्वांच्या सहापट अधिक दक्ष असा) गुरांना रानोळीला न्यायला आपला कार्तिकस्वामी आहेच ( शंकर पार्वती व त्यांच्या मुलांविषयीं कोट्या केलेलीं अनेक चमत्कृतियुक्त सुभाषितें आहेत. पहा— प्र ४१ श्लो. १७-१८-१९-२०. )

●●●

आर्या

अवसरपठिता वाणी गुणगणरहिताऽपि शोभते पुंसाम ।
रतिसमये युवतीना भूषाहानिर्विभूषण भवति ॥ १९२ ॥

आर्या

वच उक्त युक्त समयीं, गुणरहितहि शोभवीच पुरुषास
रतिसमयीं तरुणींचें भूषण नसणेंच भूषवी त्यास ॥

गद्यार्थ—मोठेंसें अलंकारगुणयुक्त नसले तरी योग्य वेळीं योग्य शब्द बोलले तर ते मनुष्यास शोभादायक होतात. रतिसमयीं तरुणीच्या अंगावर अलंकार नसणेंच, (तिचें मूलभूत सौंदर्य दिसून) तिला अलंकारभूत होतें. (गुण शब्दावर कोटि )

●●●

अनुष्टुभ्

अस्मासु कलहे प्राप्ते वय पञ्च, शत च ते ।
अन्यैस्तु कलहे प्राप्ते वय पञ्चाधिक शतम् ॥१९३॥

अनुष्टुभ

शत ते, पांच अन् आम्ही, भांडतां आपसांमधें।
होतोंच एकशेंपांच दुजांच्या भांडणामधें ॥१९३॥

गद्यार्थ—(महाभारतात, वनवासात पांडव असता, त्यांना हिणविण्यास गेलेला दुर्योधन, परस्पर, चित्ररथ गंधर्वाकडून पराभूत होऊन बंदी केला जातो तेव्हा त्यानें पांडवाचें इतके नुकसान केलें असताहि तो दंश मनात न धरता धर्मराजानें चित्ररथाचा पराभव करून दुर्योधनास सोडविलें. त्या वेळीं धर्मराज या गोष्टीचें समर्थन करतो—) आमच्या आमच्यात भांडण्याचे वेळीं ते ( *कौरव* ) शंभर ( *एक बाजूस* ), *तर आम्ही पाच* (विरुद्ध बाजूस लढण्यास उभे राहतों) परतु परक्याशीं भांडण्याचा प्रसंग आल्यास आम्ही दोघे मिळून एकशेंपाच (होऊन एकजुटीनें लढून समान शत्रूचा समाचार घेतों )

●●●

अनुष्टुभ्

वृक्षस्याग्रे फल दृष्ट फलाग्रे वृक्ष एव च ।
'अ'कारादि 'स'कारान्त यो जानाति स पण्डित १९४

अनुष्टुभ्

फल वृक्षावरी, वृक्ष फलावरहि वाढतो !
' अ ' आदि आणि अतीं ' स ' हें जो जाणील सुज्ञ तो॥

गद्यार्थ— (प्रहेलिका - उखाणा) झाडावर फळ आणि फळावर झाड ! आदि ' अ ' व अतीं ' स ' जो ओळखील तो पंडित.
(उत्तर – अननस)

●●●

शार्दूलविक्रीडित

बद्धस्त्व ननु राघवेण जलधे ! मुष्टोऽसि देवासुरै
श्रीमद्रामशराग्निभीतमनसा त्यक्ता त्वया मेदिनी ।
नि पीतस्त्वमगस्तिना निमिषत कृत्वाऽथ मुक्तो भवान्
लोके गर्जसि यत्पुनस्त्वमधुना निर्लज्ज तुभ्य नम. ॥ १९५

शार्दूलविक्रीडित

**रामानें तुज बांधिलें; नि लुटिलें देवासुरांनीं तुला**
**भीतां भार्गव बाण अग्निस तसें तूं सोडिलें भूमिला ॥**
**प्राशोनी तुजला अगस्ति उदधे! ओकी क्षणानें पुन्हां**
**निर्लज्जा! नमितों तुला अजुनि कीं चाले तुझी गर्जना**

*गद्यार्थ* — (सागरान्योक्ति) हे सागरा, रामानें (सेतु बांधून) तुला बद्ध केलें; (समुद्रमथनाचे वेळीं निघालेलीं सर्व रत्नें घेऊन) देवासुरांनीं तुला लुटलें; भार्गवराम परशुरामाच्या दाहक बाणांना भिऊन तू मागें हटून त्याला पुष्कळ भूभाग मोकळा करून दिलास; अगस्तीनें तुला प्राशन करून क्षणभरांत पुन्हां परत ओकून टाकलें — (इतके सर्व अपमान सोसूनहि धर) अजूनहि निर्लज्जा! तुझी गर्जना चालूच आहे! (तुझ्या कोडगेपणाला) नमस्कार असो. (बाहेर सर्वत्र लाथा खाऊन घरच्या बायकोपाशीं बहादुरी दाखविणाऱ्यास उद्देशून.) ●●●

अनुष्टुभ्

'अ'पूर्वोऽयं मया दृष्टः 'का'न्त कमललोचने।
'शो'ऽन्तरं यो निजानाति स विद्वान्नात्रसंशयः ॥१९६॥

अनुष्टुभ्

**'अ' पूर्व पाहिला मी गे**
**हे पद्मेक्षण 'का' न्त तो।**
**'शो' मध्य निश्चयें सुज्ञ**
**जो कोणी यास जाणितो ॥ १९६॥**

*गद्यार्थ*—हे कमललोचने! 'अ' पूर्व (आद्याक्षर अ असलेला) 'शो' न्तर (शो हें मधलें अक्षर असलेला) 'का'न्त (क हें शेवटचें अक्षर असलेला) मी पाहिला. जो *ओळखील तो शहाणा हें नि:संशय. उत्तर (अशोक.)* ●●●

आर्या

कुटिला लक्ष्मीर्यत्र प्रभवति न वसति सरस्वती तत्र।
श्वश्रूस्नुषयो प्रायो न दृश्यते सौहृदं लोके ॥ १९७॥

आर्या

**कुटिला लक्ष्मी धरिते**
**सत्ता, तेथें सरस्वती न वसे।**
**सासुसुनेंत यहुधा**
**प्रेम असे, दृश्य हें कुठें न दिसे ॥ १९७॥**

*गद्यार्थ*—(लक्ष्मी ही सासू, व विष्णूच्या नाभिकमलांतून निघालेल्या ब्रह्मदेवाची म्हणजे, लक्ष्मी-विष्णु यांच्या मुलाची पत्नी सरस्वती ही लक्ष्मीची सूनच!) जेथें कुटिल अशा लक्ष्मीचा *प्रभाव असतो (श्रीमंताच्या ठायीं) तेथें सरस्वती सहसा रहात* नाहीं. (श्रीमंतांना विद्या नकोयचीच.) याचें कारण सासू आणि सून यांच्यात सहसा प्रेमभाव दिसत नाहीं. (लक्ष्मी सरस्वतींच्या वैराविषयीं – प्र. ९ श्लोक ९; १३ वगैरे पहा.) ●●●

अनुष्टुभ्

गुणानामन्तरं प्रायस्तज्ज्ञो जानाति नेतरः।
मालतीमल्लिकाभेदं घ्राणं वेत्ति, न लोचनम् ॥ १९८॥

अनुष्टुभ्

**प्रायें भेद गुणांतील जाणे तज्ज्ञचि; अन्य न।**
**चमेली मोगरी भेदा घ्राण जाणे, न लोचन ॥ १९८॥**

*गद्यार्थ*—(सर्व गुण सारखे नसतात.) गुणांगुणांत सुद्धां सूक्ष्म भेद असतात ते बहुधा तज्ज्ञनाच कळून येतात. इतरांना नव्हे. चमेली आणि मोगरी यांच्या सुगंधांतील फरक केवळ नाकच ओळखील; डोळा कसा ओळखील? ●●●

अनुष्टुभ्

स्वभावसुन्दरं वस्तु न संस्कारमपेक्षते।
मुक्तारत्नस्य शाणाश्मघर्षणं नोपयुज्यते ॥ १९९॥

अनुष्टुभ्

**मूळ सुन्दर जी वस्तु तिला संस्कार कासया?।**
**शाणघर्षण हें होई उपयुक्त न मोतिया ॥१९९॥**

*गद्यार्थ*—जी वस्तु निसर्गतःच सुंदर असते तिला सौंदर्य आणण्यासाठीं संस्कार करण्याची आवश्यकताच नसते. (इतर रत्नें खडबडीत असतात म्हणून सहाणेवर घासून पैलू पाडून त्यांना सौंदर्य आणावें लागतें); पण मोती हे मूळचेच सुंदर असल्यानें त्याला सहाणेवर घासणें हें उपयोगी नाहीं (उलट तें बिघडून जाईल.) ●●●

अनुष्टुभ्

अतिदानाद्बलिर्बद्धो ह्यतिमानात् सुयोधनः।
विनष्टो रावणो लौल्यादति सर्वत्र वर्जयेत् ॥ २००॥

अनुष्टुभ्

अतिदानें बली गेला; अतिमानें सुयोधन।
दशास्य अतिलोभें; घा अति सर्वत्र टाकुन ॥२००॥

गद्यार्थ—दानात अतिरेक केल्यानें बलिराजा (पाताळात) गेला; गर्वाच्या अतिरेकानें दुर्योधन नाश पावला; (परस्त्रीच्या) अतिरेकी लोभानें रावण नष्ट झाला. तेव्हा कोणत्याहि विषयात केव्हाहि अतिरेक करू नये. ●●●

शार्दूलविक्रीडित

शैलैर्बन्धयति स्म वानरहृतैर्वाल्मीकिरम्भोनिधिं
व्यासः पार्थशरैस्तथाऽपि न तयोरत्युक्तिरुद्भाव्यते ॥
वागर्थौ च तुलाधृताविव तथाऽप्यस्मन्निबन्धानयं
लोको दूषयति प्रसारितमुखस्तुभ्यं प्रतिष्ठे! नमः ॥२०१॥

सुमंदारमाला

लिही थोर वाल्मीकि, कीं, "वानरांनीं
गिरी आणुनी अब्धिला बांधिलें,, ॥
म्हणे व्यास "पार्थे शरें तेंच केलें!"
कुणा तें न अत्युक्तिसें वाटलें ॥
रचूं शब्द अर्थास तोलून आम्ही
जरी गुच्छ काव्यात्म ऐसा भला।
मुखा फाडुनीया तरी निंदिती लोक
आम्हा, प्रतिष्ठे! नमस्ते तुला ॥२०१॥

गद्यार्थ— वाल्मीकीनें लिहून ठेविलें कीं "वानरानीं डोंगर आणून समुद्रावर सेतु बांधला" (हें खरें असणें शक्यच नाहीं केवळ कविकल्पनाच ती!) दुसरा महाकवि व्यास! त्यानें लिहिलें, कीं, अर्जुनानें बाणानीं समुद्रावर सेतु बांधला (हीहि त्याच किमतीची गप्प!) पण या दोघाहि कवींचें हें लिहिणें अतिशयोक्तीचें असेसुद्धा कोणी म्हन्लें नाहीं. (लब्ध प्रतिष्ठितांनीं काहीं केलें तरी तें चांगलेंच ठरतें.) इकडे आम्ही कवि, आमचीं काव्यें रचिताना शब्द, अर्थ याना (धारवाडी) काट्यात घालून तोलून मापून लिहितों, तरी, लोक जिभा काढकाढून आमची निंदा करतात! प्रतिष्ठे! तुझ्यापुढे हात जोडतों! ●●●

अनुष्टुभ्

अस्ति ग्रीवा शिरो नास्ति भुजा करवर्जितौ।
सीताहरणसामर्थ्यो न रामो न च रावणः ॥२०२॥

अनुष्टुभ्

आहे गळा; नसे शीर्ष; भुज दोन करांविण।
हरी सीता स्वसामर्थ्यें; न राम न च रावण ॥ २०२ ॥

गद्यार्थ—(प्रहेलिका—उखाणा) गळा आहे, पण, डोकें नाहीं; दोन बाहू आहेत पण हात नाहींत, सीताहरण करण्याचें सामर्थ्य अंगीं आहे; पण राम नाहीं वा रावण नाहीं! (उत्तर)—(चोळी, कचुकी.) (कांचन मृग पाहिल्यावर त्याच्या कातड्याची चोळी करण्याची सीतेला हाव सुटली व त्यापायीं शेवटीं सीता-हरण झालें हें प्रसिद्ध आहे.) ●●●

आर्या

अलिरनुसरति परिमलं लक्ष्मीरनुसरति नयगुणसमृद्धिम्।
निम्नमनुसरति सलिलं विधिलिखितं बुद्धिरनुसरति ॥ २०३॥

आर्या

भ्रमर अनुसरे गधा;
नयगुणयुत मानवास लक्ष्मी ही।
सखलाकडे पळे जळ,
विधिलिखिता धरुनि जाइ बुद्धीहि ॥ २०३ ॥

गद्यार्थ—भुंगा हा सतत सुगंधाच्या मागावर उडत असतो. न्यायनीतिसद्‌गुणशाली पुरुषामागे (वरमाला घेऊन) लक्ष्मी जात असते, पाणी नेहमीं सखल प्रदेशाकडे जात असतें; व कपाळीं लिहिलें असेल त्याला अनुसरूनच बुद्धि ही काम करीत असते. ●●●

आर्या

वितरति यावद्दाता तावत्सकलोऽपि भवति कलभाषी।
विरते पयसि घनेभ्यः शाम्यन्ति शिखण्डिनां ध्वनयः ॥२०४॥

आर्या

देई दाता जोंवर,
तोंवर वदतात गोड सर्व जन।
थांबे ध्वनि मोरांचा,
थांबे जलवृष्टि जधिं घनांतुन ॥ २०४ ॥

गद्यार्थ—दाता जोंपर्यंत दान देत असतो तोंवर सर्व लोक ( त्याच्याशीं ) गोड बोलत असतात. आकाशांतील ढगापासून होणारी जलवृष्टि थांबली, कीं, मोराचा केकारवहि थांबला.

●●●

शिखरिणी

वपु.प्रादुर्भावादनुमितमिदं जन्मनि पुरा
पुरारे ! न प्रायः क्वचिदपि भवन्तं प्रणतवान् ॥
नमञ्जन्मन्यस्मिन्नहमतनुरग्रेऽप्यनतिभाङ
महेश ! क्षन्तव्यं तदिदमपराधद्वयमपि ॥२०५॥

सुमंदारमाला

पुन्हां जन्म आला, मिळे देह, तेणें
मनीं तर्क कीं , पूर्वजन्मीं कदा-
नमस्कार मी निश्चयानेंच केला
नसावा पुरारे ! तुझ्या या पदा ॥
नमीं जन्मि या नष्टजन्मा तयानें,
शकेना नमूं मी पुढेंही तुला
प्रचंडापराधद्वयाची महेशा !
करावी क्षमा तूंच आतां मला ॥ २०५ ॥

गद्यार्थ—( श्रीशंकराच्या चरणीं एकवार जरी नमन केलें, तरी माणसाला तो जन्ममरणाच्या फेऱ्यातून निश्चितपणें मुक्त करतो अशा गृहीतकृत्यावर उभारलेला अभिनव कोटिक्रम ) हे पुरारे ! मला हा चालू जन्म मिळून मी देहधारी झालों त्याअर्थी असें अनुमान काढणें भाग आहे, कीं, मागील जन्मीं कोठेंहि ( एकदाहि ) मी तुला नमन केलें नसलें पाहिजे. ( कारण तसें केलें असतें तर हा जन्मच मला आला नसता !) आतां या जन्मात मी तुला हें नमन करीत आहें. पण त्यामुळें (आणखी एक नवाच घोटाळा उत्पन्न होणार आहे तो असा कीं, )(तू मला जन्ममरणाच्या फेऱ्यांतून मुक्त केल्यामुळें) मला देह लाभणार नाहीं व मी तुला पुढेंहि नमन करूं शकणार नाहीं; तेव्हा, हे महेशा ! ( मागच्या जन्मीं मी तुला नमस्कार केला नाहीं हा एक अपराध व पुढें करूं शकणार नाहीं हा दुसरा अपराध ) या दोन्ही अपराधाबद्दल तूं मला क्षमा केली पाहिजे.

●●●

---

संस्कृत—मराठी—सुभाषित—कोश—
दुसरा खंड समाप्त

# परिशिष्ट १

*( सूचीतल्या संक्षिप्त ग्रंथनामाचे खुलासे, व ग्रंथकर्त्यांची व कवींची नावें व काल )*

अमरु = अमरुशतकम् ( अमरुक, ८ वें शतक )
अल कौ. = अल्कारकौस्तुभ ( विश्वेश्वर पंडित, १८ वें शतक )
अ. शा. = अभिज्ञानशाकुन्तलम् (कालिदास, १ लें ते ५ वें शतक)
ईशोपनिषद् = मन्त्रद्रष्टे अज्ञात धूसर भूतकाळ.
उत्तरराम. = उत्तररामचरितम् ( भवभूति, ८ वें शतक )
उद्भट =
औचित्य = औचित्यविचारचर्चा ( क्षेमेन्द्र, ११ वें शतक )
काव्यप्रकाश = ( मम्मट व अलट, १०५० ते ११०० )
काव्यप्रदीप = ( गोविन्दभट्ट, १५ वें शतक )
किरात. = किरातार्जुनीयम् ( भारवि, इ स ५५० )
कुमार. = कुमारसम्भवम् ( कालिदास, १ लें ते ५ वें शतक )
गरुड = गरुडपुराणम्.
घटख = घटखर्परकाव्यम्.( घटखर्पर )
चाणक्य = चाणक्यनीतिसार ( चाणक्य )
चातका. = चातकाष्टकम्.
चा.नी. = ( लघु ) चाणक्यशतकम् ( चाणक्य )
दशरू. = दशरूपकम् ( धनजय, इ स. ९७४ )
दृ. श. = दृष्टान्तकलिकाशतकम् ( कुसुमदेव )
नागा = नागानन्दम् ( हर्षवर्धन, ७ वें शतक )
नीतित. = नीतितरग ( विश्वेश्वरदत्त )
नीतिप्र. = नीतिप्रदीप ( वेतालभट्ट )
नीतिस = नीतिसकल्प
नैष = नैषधीयचरितम् ( श्रीहर्ष, १२ वें शतक )
पच. = पचतत्र ( विष्णुशर्मा )
प्र. रा. = प्रसन्नराघवम् ( जयदेव, १३ वें शतक )
भगवद्गीता = महाभारतान्तर्गत व्यास.
भर्तृ. नी. = भर्तृहरिनीतिशतकम् } ( भर्तृहरि, ८ वें शतक )
भर्तृ. वै. = भर्तृहरिवैराग्यशतकम् }
भर्तृ शृ. = भर्तृहरिशृगारशतकम् }
भर्तृ सु स. = भर्तृहरिसुभाषितसग्रह (भर्तृहरि) डॉ. कोसबी भारतीय विद्याभवन
भल्लट = भल्लटशतकम् (भट्ट, इ. स. ८८३ ते ९०२)

भामिनी. = भामिनीविलास ( जगन्नाथपडित, १७ वें शतक)
भो. प्र. = भोजप्रबन्ध ( बल्लाळ, १६ वें शतक. )
भ्रमरा = भ्रमराष्टकम्
महा. ना. = महानाटकम् (हनुमत्कवि, ११ वें शतक )
महाभा. = महाभारतम् ( व्यास ) पर्व, अध्याय, श्लोक.
मालती. = मालतीमाधवम् ( भवभूति, ८ वें शतक )
मृच्छ = मृच्छकटिकम् ( शूद्रक, )
मेघ. = मेघदूतम् ( कालिदास, १ लें ते ५ वें शतक. )
मोहमुद्ग. = मोहमुद्गरम् ( श्रीशकराचार्य )
योगवा = योगवासिष्ठ
रघु. = रघुवशम् ( कालिदास )
रसग = रसगगाधर ( जगन्नाथपडित, १७ वें शतक. )
रामा. = रामायणम् ( वाल्मीकि )
राघव वि = राघवविलासकाव्यम् ( विश्वनाथ कवि )
विक्रम. = विक्रमचरितम् ( लेखारम्भा, )
विक्रमो. = विक्रमोर्वशीयम् ( कालिदास )
वृ चा. = वृद्धचाणक्यशतकम्
वे सं. = वेणीसहारम् ( भट्टनारायण, ८ वें शतक )
शा. प = शार्ङ्गधरपद्धति ( शार्ङ्गधर, इ स १३६४. )
शिशु = शिशुपालवधम् ( माघ, ७ वें शतक )
शौनकीनी. = शौनकीयनीतिसार ( गरुडपुराण )
सं. पा = सस्कृतपाठोपकारकतत्त्व-बोधिनी
सा. द. = साहित्यदर्पणम् ( कृष्णानन्द, १७ वें शतक )
सु. = सुभाषितावलि ( वल्लभदेव, इ स ११६० ) भांडारकर इंस्टि
सु. र. को. = सुभाषितरत्नकोश ( विद्याकर, ११ वें शतक ) कोसबी व गोखले ( १९५७ )
सु र. भा. = सुभाषितरत्नभाण्डागारम्-निर्णयसागर ८ वी आवृत्ति १९५२.
सूक्ति = सूक्तिमुक्तावलि ( जल्हण )
हनु. ना. = हनुमन्नाटकम् ( हनुमत्कवि )
हि. = हितोपदेश ( नारायणशर्मा, १० वें ते १४ वें शतक. )

व प्रतिस्थान देण्यात आपण फारच परिश्रम केले आहेत.... आपली प्रस्तावना मार्मिक व अभ्यासपूर्ण आहे... मंदाक्रान्ता वृत्तात केलेल्या उपसंहारात, संस्कृत व मराठी भाषांच्या अर्थ-व्यक्तिशक्तींची आपण केलेली साधार तुलना—मराठी भाषेच्या अभिमानी लोकांनाहि मान्यच करावी लागेल.... आपलीं भाषांतरें प्रसादपूर्ण झालीं आहेत.... अशीं शेंकडो स्थळें जीं या ग्रंथात आहेत, त्यांचें सोदाहरण वर्णन करणें म्हणजे एक प्रबंधच होईल. .. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति समितीनें आपणास सन्मानपूर्वक पुरस्कार देऊन छपाईचा सर्व खर्च केला पाहिजे."

## संस्कृत पंडित श्री. भा वर्णेकर नागपूर—

"श्री. विंझे यांच्या कोशात जें आहे तें सुभाषितांच्या यापूर्वींच्या इतर संग्रहात नाहीं. या कोशात मराठी पद्य व गद्य आहे व विशेष म्हणजे ते फारच उत्तम आहे; यामुळें संस्कृतान-भिज्ञास मूळ संस्कृत सुभाषिताचा स्वाद घेता येतो. मुद्रणाची स्वच्छता व शुद्धता हें या कोशाचे दुसरें आकर्षण आहे.... एवढा मोठा उद्योग केल्याबद्दल श्री विंझे यांना कोणत्या शब्दांत धन्यवाद द्यावेत ते कळत नाहीं."

## आचार्य वि. प्र. लिमये पुणें—

"श्री विंझे यांचे नीतिशतकाचे पद्यमय भाषांतर मूळ भर्तृहरीच्या व वामनाच्या मराठी श्लोकांशीं ताडून पाहिलें श्री. विंझे यांचें नीतिशतकाचें पद्यमय भाषांतर काटेकोर असून चांगलें वठलें आहे. .. त्यांना कवितेची हातोटी साधली आहे व हें कसब त्यांना उपजत व सहजसुलभ आहे असे ठायीं ठायीं वाटतें."

## श्री. रा बिवलकर (एक लेखक व रसिक वाचक)—

"केवळ वर्तमानपत्रांतील अभिप्रायावर विसंबून, ४ महिन्यां पूर्वी, आपला सुभाषितकोश खरेदी केला. सतत जवळ असतो व वेळ मिळेल तेव्हां चाळीत असतो. हळूहळू नशा चढविणाऱ्या एखाद्या अमली पदार्थाप्रमाणें या कोशाचा अमल आता मनात चांगलाच भिनत चालला आहे.

वर्तमानपत्रांतील अभिप्राय क्वचितच खरे असतात; पण मी वाचलेला अभिप्राय त्या क्वचितांपैकींच होता. आपली सर्वच रचना छान आहे विशेषत. वसंततिलका वृत्तावरील आपलें प्रभुत्व विस्मयकारक आहे. या वृत्तांतील आपली रचना सहजींच कंठस्थ होते."

## श्री. व्ही. आर. किब्बे (रसिक वाचक व रत्नपरीक्षक) इंदूर—

"इंग्रजींतील प्रो. रायडर, सर मोनियर वुइल्यम्स, आपल्याकडील वामनपंडित, परशुरामपंत तात्या, प्रो. आगरकर, लेले शास्त्री इत्यादींनीं, मराठी, इंग्रजी, संस्कृत यांचीं एकमेकांत केलेलीं भाषांतरें वाचणें हा माझा आवडता छंदच होता. . पण ते सर्व भाषांतरकार दिवंगत झाल्यानें, त्यांच्याशीं प्रत्यक्ष संभाषण करण्याची मौज मला अनुभविता येणें अशक्य होतें पण आपल्या रूपानें हीं सर्व थोर मंडळीच मला भेटल्यासारखें वाटलें.

...आपलीं भाषांतरें मला मूळ बिंबाचीं प्रतिबिंबेंच वाटलीं आपल्या भाषांतरांनीं मराठी कविताकामिनीवर बहुमोल सुंदर आभूषणें चढविलीं आहेत ही गोष्ट वादातीत आहे. त्यांतून आपली "सुखं वा यदि वा दुःखं, प्रियं वा यदि वाऽप्रियम् ॥ प्राप्तं प्राप्तमुपासीत हृदयेनापराजितः" अशी वृत्ति तर फारच दुर्मिळ! निद्रानाश व हृदयविकार, आणि प्रतिकूल परिस्थिति यावर आपण जी काव्यपूर्ण मात केलीत, त्या आपल्या यशाच्या कायेस जरा अथवा मरण नष्ट करू शकणार नाहीं हें निश्चित."

## डॉ. म. का. फाणे (रसिक वाचक. कुष्ठरोगतज्ज्ञ) पुणें—

तुमच्या संस्कृत मराठी सुभाषिताच्या रूपानें तुमची भेट होण्याचा सुयोग व भाग्य प्राप्त झालें तो आनंद व्यक्त करण्यास असमर्थ आहे. पौराणिक कालातील समुद्रमंथन ऐहिक जड वस्तूंच्या प्राप्तीसाठीं होतें, परंतु हें मंथन बौद्धिक व चिरकाल आनंद देणारें आहे. संस्कृतानभिज्ञांना एक नवें भांडार भरलेलें दाखून तुम्हीं मोकळें केलें. . पुस्तक फारच छान आहे. त्याबद्दल हार्दिक अभिनंदन. परमेश्वरानें निर्माण केलेलीं पुष्पें जशीं त्यालाच वहावयाचीं असतात तसे, तुमच्याच पुष्पाद्वारें पुढील शुभेच्छा प्रदर्शित करीत आहे—

महाकष्टांनीं त्वां सुमनन-समुद्रांत बुडुनी
वरी काढीयेला ललित रसगंगाधर मणि ॥
धरो वक्षीं यातें गुणिजन, मन:कल्मषहर
अलंकारा सर्वां तव मणि ठरो हा मदहर ॥

(प्र २ श्लो. ५७ यांना थोडा फरक करून)

**श्री. कृ. ह. ढमढेरे**

( रसिक वाचक; भूतपूर्वाध्यक्ष – महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्स. )

सुभाषितकोशाची आपली प्रस्तावना विद्वत्ताप्रचुर व चतुरस्र असून, टिळकचरित्राला तात्यासाहेब केळकरांनी लिहिलेल्या प्रस्तावनेच्या धाटणीची वाटली. विशेषत: भाषांतराचें स्वरूप, त्याबद्दलच्या वाचकांच्या अपेक्षा, भाषांतराची स्वतःची कठीण पण आत्मविश्वासयुक्त भूमिका वगैरे भाग आपण उत्तम विवेचिले आहेत.

वामनपंडितांबरोबर आपल्या भाषांतराची तुलना केली जाऊन, सरसनिरसपणा चर्चिला जातो, व तात्यासाहेब केळकरांच्या प्रस्तावनेबरोबर आपली प्रस्तावना एकत्र विचारार्थ येते, यातहि आपल्या ( अनेक गुणाचा ) गौरवच होतो यांत शंका नाही.

भाषांतराची सर्वांत सुयोग्य व सहज पटणारी ( प्रस्तावना पृष्ठ ५ वरील शेवटच्या चार ओळी ) व्याख्या तुम्हीं सांगितली ती हृद्य असून मननीय आहे......ग्रंथाची २८-२९-३० हीं प्रकरणें आपण जोडलीं आहेत, यावरून आपली काव्यदृष्टि व रसिकता प्रत्ययास येतेच; पण काही लेखकांनीं, सकोचानें किंवा भ्रांत सभ्यतेच्या कल्पनास बळी पडून हे विषय गाळले असते. परंतु आपण आत्मविश्वासानें व खऱ्या काव्यप्रेमानें या विषयांवरील काव्यपंक्ति या ग्रंथास जोडल्या व विद्वत्तेबरोबर मनोधैर्यहि प्रकट केलें हें फार प्रशंसनीय वाटलं.. आपल्या-सारख्या पंडित व रसिकवर्यांच्या कलाकृतीबद्दल बोलण्या-लिहिण्याचा माझा अधिकार नाहीं, परंतु विषय समजून घेऊन त्याचा रसास्वाद चाखण्याचा हक्क माझा राहणार तेवढा पुरे. "

**श्री. ल. ना. गोखले सहसंपादक केसरी**

" स. न. वि. वि. आपलें २१-८-६३ चें पत्र मिळालें; आपण लॉंगफेलोच्या ' दि अॅरो अँड दि साँग् ' चा दाखला देऊन जें म्हटलें आहे तेंच खरें आहे कीं, " कोणालाहि उद्देश न करतां रचलेलीं सुभाषितें कोण्या प्रसंगीं, अगदीं चपखल पण कोठें जाऊन बसतील याचा नेम नाहीं. " परीक्षणकार्य आटो-पल्यावर ( केसरींतलें परीक्षण डॉ. वाटवे यानीं लिहिलें होतें. ) डॉ. वाटवे यांच्याकडून आपला ग्रंथ आला, तेव्हांच त्यांतील कित्येक प्रकरणें वाचलीं होतीं. (१८-८-६३ केसरींत) सर्व, ?... नव्हे पुष्कळ ' हा लेख लिहितांना आकस्मिकपणें डोक्यात ' आइन्स्टाइन् ' आला व आपल्या पुस्तकात त्याचा उल्लेख करून एक सुभाषित भाषांतरलें आहे हेंहि आठवलें;— मग तें धुंडण्यास फार वेळ लागला नाहीं. आपलीच कल्पना, आपल्या गद्य भाषांतरासह घेतली व काम भागविलें. मजकूर वाचून पाहिला तेव्हा सुभाषित-दाखला शक्क जमल्याची जाणीव झाली. मनात आपणास धन्यवाद दिले. तेच या पत्रीं देतों. असाच आपल्या ग्रंथाचा उपयोग होईल ही खात्री आहे. पुढील भाग केव्हा निघणार ? "

२३-२-६४—" आपलें नासाभूषणाविषयींच्या सुभाषितांचें पत्र पोंचलें. आनंद झाला. "नथीविषयीं संस्कृत सुभाषित नाहीं" हें विधान कै. वा. गो आपटे यांच्या 'विविधज्ञानविस्तार' मधील एका लेखांतील आहे. ज्ञानकोशांतहि तेच आढळलें. पण पत्रांत आपण कळविलीं तीं सुभाषितें फारच सुंदर आहेत. आपल्या कोशास जर ' शब्दसूचि ' असती तर २१६ व्या पानावरचा श्लोक मीं वापरला असता. (नंतर ९-४-६४ च्या केसरींत तो वापरण्यांत आला.) आपल्या दुसऱ्या खंडात विषयसूचीप्रमाणें शब्दसूचीहि अवश्य द्यावी. "

**श्री. धुं. कवीश्वर बी. ए. (ऑ.) काव्यतीर्थ**

मालाड.

...संस्कृत हि सुभाषितखनिः खलु । छात्रवर्गस्य कृते, नीति -सुविचार व्यवहार सौन्दर्य-बहुश्रुतत्वादि-शील-निर्मिति पोषक गुणवृन्द लालित्यसंमिततया पाठयितुं नास्ति खलु सुभाषितादन्यः कुशलतरोऽध्यापकः। एतादृशसुभाषितरत्नानि समाहृत्य संस्कृत-रत्नाकरात् भवद्भिः महाराष्ट्रशारस्वतमन्दिरस्य सुवर्णमय-भाषा-तर-कलाविभागः विलोभनीयां समृद्धिं नीतः। ...... प्राध्या-पकानामपि कृते मूलसंस्कृत सुभाषितानामशेषसौन्दर्य-विभूषितः अयं कोशः अतीव उपयुक्ततमः इत्यत्र नास्ति संशयलेशोऽपि।

विशेषेतत् महाराष्ट्रशासनस्यशिक्षण विभागेन भवत्कोश-ग्रन्थस्य कृते संग्रहांचेज्ञनप्रदं स्वतंत्र परिपत्रक शालासु शालासु प्रेष्यते चेत् तर्हि "स्वकर्तव्यप्रतिपालनेन चिरस्य याच्य न गतः ग‍तु शिक्षण विभागः " इत्येव प्रशंसा मन्येऽनूनम्। ...... पद्यमय-सुरस-भाषांतर-कर्तृमहाराष्ट्रकविवरवृन्दे कनिष्ठाधिष्ठिताः तत्र-भवन्तः। इति शुभेच्छां प्रकटीकृत्य विरम्यते द्वितीयखंडावलोक-मार्गे चातक-शीलेन जनेन अनेन।

**H. Pandia** M. A. L. L. B. Solicitor,
High Court, Bombay.

"Who says India is poor? Shri. Vinze has in this thoughtfully prepared volume, collected some of the rich Sanskirt treasure of Indian culture, rendered it in fine verse, and attached explanatory notes thereto. He has mode Indian culture available in an attractive form, both to the old and the young and provided them with an excellent opportunity to pick up the treasure and enrich themselves at will.

Thank you Shri. Vinze !"

**डॉ. ग. वा. पळसुले** M. A. Ph. D.
उपसंपादक संस्कृत कोश डेक्कन कॉलेज.

"रसिक दोन प्रकारचे असतात. व्यावसायिक रसिक व अभिजात रसिक! श्री. विंझे हे दुसऱ्या प्रकारचे रसिक आहेत. त्यांची संस्कृत रसिकता व्यवसायातून जन्मलेली नसून, ती स्वभावसिद्ध आहे. तसेंच त्यांच्या मनोवृत्तीचा असा एक विशेष आहे, कीं, त्यांना संस्कृतमध्यें (किंवा इतरहि भाषात) जें जें म्हणून आवडलें, त्याला त्याला, मराठी श्लोकरूप दिल्याशिवाय त्याचा संपूर्ण रसास्वाद घेतला, असे त्यांच्या कविमनाला वाटतच नाहीं. या त्यांच्या द्विविध स्वभावविशेषाचें गोमटें फळ म्हणजे प्रस्तुतचा, संस्कृत-मराठी-सुभाषित-कोश.

एका भाषेंतील कवितेचें दुसरींत भाषांतर करणें म्हणजे बांगड्या मोडून चपलाहार करण्यासारखें आहे. म्हणजे असें कीं, नुसत्या बांगड्या ठोकून त्याचा हार होणार नाहीं; त्या वितळवून नंतरच त्याचा हार करतां येईल. तद्वत् विशिष्ट भाषेच्या मुशींत आकारलेला काव्याशय विनळवून, नंतर, दुसऱ्या भाषेच्या मुशींत कुशल कारागिरानें घातला, तरच, तो दुसरें सुंदर रूप घेईल. नुसत्या बाह्य ठोकाठोकीनें कांहीं होणार नाहीं. श्री. विंझे हे पहिल्या भाषेचे संस्कार काढून टाकून अस्सल नवीन रूप देणारे कुशल कारागीर आहेत. म्हणून त्यांचें भाषांतर (थोड्या जुन्या वळणाचें वाटलें तरी) अस्सल मराठी वाटतें—केवळ मराठी प्रत्यय जोडलेला संस्कृत शब्दराशि वाटत नाहीं... अशीं असंख्य उदाहरणें आहेत...... यांवरून श्री. विंझे यांच्या कौशल्याचा प्रत्यय येईल......... मूळच्या श्लोकांत त्यांनीं आणखी भर घातल्याचीहि अनेक उदाहरणें सापडतील......संस्कृत मराठी रसिक वाचकाला, हा कोश म्हणजे अपूर्व आनंद देणारा ठेवाच वाटेल.

**घा. वा. चितळे** बी. ए. एलएल. बी.
(नागपूरच्या ऑल इंडिया रिपोर्टरचे संस्थापक)
सीनियर ॲडव्होकेट सुप्रीम कोर्ट

—"न्यायालयाशीं संबद्ध असलेल्या विधिनिर्बंधांच्या रुक्ष विषयांत छपन्न वर्षें घालविल्यामुळें, माझ्या मनांत आजपर्यंत रसिकतेला मुळींच वाव मिळाला नाहीं. तरीहि—कदाचित् त्यामुळेंच—पाणपोईंतील पाण्यातच इतका रस आढळला कीं, मनाला असें वाटलें, कीं एवढ्यानें तृप्ति होईल. पण ती समजूत चुकीची ठरली; व "पाणपोई" च्या दुसऱ्या खंडानें रसाबद्दलची उत्सुकता व आवड उलट वाढलीच. नतर संस्कृत-मराठी-सुभाषित-कोशानें रसास्वाद घेण्याची चटकच लावली. याच्या द्वितीय खंडाचे मलपृष्ठावरील सुभाषित-मूळ व अनुवाद-याचे कर्ते दोन नसून एकच असावेत, अशी शंका आली; व ते एकच आहेत याची खात्री पहिल्या खंडाच्या सूक्ष्म अभ्यासानें निश्चितपणें झाली.

**वे. से. गजेन्द्रगडकर** एम. ए. बी. टी.
महाराष्ट्र राज्य शिक्षणाधिकारी, मुंबई विभाग

—१९५३ पासून आपल्या भाषांतरित काव्याचा मी एकनिष्ठ वाचक व पाठक आहें. (तसा कदाचित् मी एकटाच नसेन.) परंतु एक गोष्ट खरी कीं, आपल्या भाषांतरित काव्याचा, एक उपासक या नात्यानें, मीं अनेकविध प्रचार केला. प्राचार्यपदावर काम करीत असतांना, आपल्या सुविचारांवर मी कांहीं पाठ घेऊन दाखविले व सांगावयास आनंद वाटतो, कीं, विद्यार्थ्यांनीं ते सुविचार आत्मसात् केले. दैनिक प्रार्थनेवरितां आपले कांहीं भाषांतरित श्लोक २०० विद्यार्थी एकाच ठिकाणीं एका आवाजात, मेटी तबल्याशीं साथ घेऊन गात होते— हें नमूद करण्यास मला अभिमान वाटतो.

मूळ संस्कृताचें सुरस व उत्कृष्ट भाषांतर, ओघवती भाषा व दोन्ही भाषांवरील आपलें असामान्य प्रभुत्व अशीं अनेक कारणें याच्या पाठीमागें आहेत. 'तवास्मि गीतरागेण हारिणा प्रसभं हृतः।' अशीच माझी स्थिति झाली. आपल्या भाषांतरित व रूपांतरित श्लोकांचा मीं मनसोक्त उपयोग करून घेतला आहे आपलें आतांपर्यंत प्रसिद्ध झालेलें वाङ्मय वाचून

"सुरस्वति ! तुझा कोश विचित्रचि किती असे।
देतां वाढे; साचवोनी त्याचा क्षयचि होतसे ॥"

(अपूर्वः कोऽपि कोशोऽयं याचें आपण केलेलें भाषांतर) या उक्तीची सत्यता पूर्णपणें पटली.

गीर्वाण वाणीषु विशिष्टबुद्धिस्तथाऽपि भाषान्तरलोलुपोऽहम्।' हा माझा स्वभाव असल्यानें मी आपल्या ग्रंथाशीं समरस होऊं शकतो. आपण अंगीकारलेल्या कार्यात ( आणि आठवण करून देतों—" अङ्गीकृत सुकृतिन परिपालयन्ति " ) आपल्याला चिरतन यश मिळो ( कार्यं सुमगल घडोत सदैव हातीं । सत्की र्तिचा ध्वज सदा फडको दिगन्तीं ॥ ) व आपला शुभमार्ग होवो ( शुभश्च पन्था ) एवढीच सदिच्छा ! किमत्र लेखेऽधिकलेखनीय भवादृशाना बुधीमणीनाम् ?

**नी. शं. नवरे.** B A B T.

भूतपूर्व प्राचार्य ट्रेनिंग कॉलेज पनवेल
योगायोग ३६३ सदाशिव

" हा प्रथसागरू एवढा । उतरौनी पैलीकडा ।
कीर्तिविजयाचा ढेंढा । नाचे जे का ॥

वाई बहु बोलों सकळा । मेळविला जन्मफळा ।
ग्रथसिद्धीचा सोहळा । दाविला जो हा ॥

संस्कृत मराठी-सुभाषित-कोशाचा द्वितीय खड तुम्ही माझ्या हातात देताच मला ज्ञानेश्वराच्या वरील उक्तीचें स्मरण झालें. लक्ष्मणराव ! तुम्ही केवढें तरी हें प्रचड काम केलेलें आहे ! तुमचें किती अभिनदन करू ? — अनुवाद करण्यांत तुमचा हातखडा आहे, हें सागणें म्हणजे त्याची द्विरुक्ति करण्यासारखें आहे सुभाषिताची निवड तुम्हीं फार रसिकतेनें केली आहे. त्याचें वर्गीकरण करण्यात कुशलता प्रकट केली आहे. कालिदास, भवभूति, जगन्नाथ आणि भर्तृहरि याच्या काव्यातील रसाळ वचनाचा तुम्ही जो अनुवाद केलेला आहे तो मला फारच आवडला. मराठी भाषेच्या धाटणीला तुम्ही कोठेंहि धक्का लावलेला नाहीं. मूळातील सौंदर्य व स्वारस्य तुम्ही कमी होऊ दिलेलें नाहीं. शक्य तोंवर तुम्ही सोपे, सार्थ, सुबक शब्द गोळावेरीज अर्थ आला म्हणजे पुरे अशी तुमची दृष्टि नाहीं. (योजता. — यमकानें तुम्हाला कोठ अडावलेल दिसत नाहीं.) दर्पणात प्रतिबिंब पडावें तसें ' देशीकार लेण्यात ' मूळ संस्कृतचें हुबेहुब प्रतिबिंब पडलेलें आहे. उदाहरणें म्हणून किती देऊ ? —संस्कृत वाचकानाहि, या ग्रथात, त्यानीं न वाचलेलीं अशीं सुभाषितें आढळतील कै गुरुवय महादेव पाडुरग ओक याच्या पुष्पान्योक्तींचा अनुवाद करून ( पृष्ठ ४१७ ) तुम्हीं गुरूचें ऋण फेडलें आहे. अन्योक्तींचें विवरण करताना तुम्ही गद्यांत अर्थ दिल्यानतर कसामध्यें त्याचा खुलासा करून जीवनाशीं सबध जोडता ही गोष्ट सर्वसामान्य वाचकाच्या दृष्टीनेंहि मार्ग दर्शक आहे. त्याबद्दल सर्व लोक तुम्हाला धन्यवाद देतील . . या कोशानें तुम्ही मराठी भाषेच्या खजिन्यात आणि आपल्या लौकिकात मोलाची भर घातली आहे, याबद्दल, माझ्या-सारख्या तुमच्या मित्रास अभिमान वाटत आहे.